महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळाकडून
अनुदान मिळालेला ग्रंथ

# भारतीय स्त्री

(हिंगणे स्त्री-शिक्षणसंस्थेचे माणिकमहोत्सव प्रकाशन)




१९६७

हिंगणे स्त्री-शिक्षण संस्था

पुणे

प्रकाशक
के. रा. भास्कर
चिटणीस, हिंगणे स्त्री-शिक्षण संस्था
कर्वेनगर, पुणे ४



किंमत दहा रुपये

आवृत्ति पहिली, डिसेंबर १९६७

मुद्रक
वि. पु. भागवत
मौज प्रिंटिंग ब्यूरो
खटाववाडी, गिरगाव, मुंबई ४ (बी आर)

विक्रेते
भटकळ बुक्स इंटरनॅशनल
३५ सी, ताडदेव रस्ता, मुंबई ३४ (डब्ल्यू बी)

# प्रकाशन समिती

अध्यक्ष

डॉ. कु. सरोजिनी बाबर

संपादक

प्रा. श्री. ना. बनहट्टी

प्रा. मो. शा. शाहणे

सभासद

श्री. बापूराव नाईक

श्री. वि. आ. मोडक

प्रा. वा. गो. मायदेव

श्री. श्रीपाद जोशी

प्रा. गं. बा. सरदार

कु. चंद्राबाई कर्नाटकी

श्री. गंगूताई पटवर्धन

श्री. के. रा. पाल्कर

निमंत्रक

श्री. भा. धों. कर्वे

भारतरत्न महर्षी डॉ. धोंडो केशव कर्वे यांनी स्थापन केलेल्या ‘अनाथ बालिकाश्रम’ या संस्थेला १९४६ साली ‘हिंगणे स्त्री-शिक्षण संस्था’ हे नाव देण्यात आले. १४ जून १९६६ रोजी संस्थेला ७० वर्षे पूर्ण झाली. तसेंच १९६७ मध्ये या संस्थेच्या महिलाश्रम हायस्कूलला ६० वर्षे व अध्यापिका शाळेला ५० वर्षे पूर्ण झाली. त्यामुळे या वर्षी तिहेरी उत्सव एकत्र साजरा करण्याचे ठरले. या प्रसंगी प्रकाशित करावयाच्या ग्रंथासाठी एक प्रकाशन समिती नेमण्यात आली त्यातील सदस्यांची यादी मागील पृष्ठावर दिली आहे. प्रकाशन समितीच्या अनेक सभा झाल्या व ग्रंथाच्या प्राथमिक आखणीपासून त्याची छपाई पूर्ण होईतो अनेक तपशिलाच्या गोष्टी सर्वांच्या विचाराने व सल्ल्याने पुऱ्या करण्यात आलेल्या आहेत. समितीने आखलेल्या कार्यक्रमात प्रस्तुत ग्रंथाला अग्रस्थान आहे. समितीने केलेल्या सर्व मदती-बद्दल हिंगणे स्त्री-शिक्षण संस्था प्रकाशन समितीची अत्यंत आभारी आहे.

# निवेदन

हिंगणे स्त्री-शिक्षण संस्थेचा माणिक महोत्सव साजरा करण्यासाठी जी कार्यकारी समिती नेमण्यात आली तिने निरनिराळ्या कामांकरिता अनेक पोटसमित्या नेमल्या. त्यांमध्ये महोत्सवाच्या निमित्ताने संस्थेचा गेल्या दहा वर्षांचा अहवाल व स्मरणिका तयार करण्यासाठी एक लहानशी प्रकाशन समितीही नेमण्यात आली. या समितीच्या पहिल्याच सभेत डॉ. सरोजिनी बाबर यांनी माणिक महोत्सवाच्या निमित्ताने स्त्रीजीवनविषयक लेखांचा एक संग्रह संस्थेने प्रसिद्ध करावा अशी कल्पना पुढे मांडली. ती सर्वांना पसंत पडून प्रकाशन समितीवर आणखी काही मंडळी स्वीकृत करून घेण्यात आली.

या समितीने ग्रंथाची रूपरेषा मुकर करून भारतीय स्त्रीच्या वेदकालापासून आतापर्यंतच्या वाटचालीचा परामर्श घेणारा ग्रंथ प्रसिद्ध करावा असे ठरविले. त्यासाठी निरनिराळे कालखंड पाडण्यात येऊन त्या त्या विशिष्ट कालखंडाचा अभ्यास असणाऱ्या तज्ज्ञांकडून लेख लिहून घ्यावेत असाही निर्णय घेण्यात आला. निरनिराळ्या लेखकांनी लिहिलेल्या लेखांचा संग्रह असे ह्या ग्रंथाचे स्वरूप निश्चित झाल्यावर लेखांची व लेखकांची योजना समितीने निर्धारित केली. परंतु लेखक देशभर पसरलेले व आपापल्या उद्योगात निमग्न; तेव्हा ते लेख लिहिण्याचे मान्य करतील की नाही व केल्यास लेख वेळेवर मिळतील की नाही याबद्दल किंचित शंका होती. पण सर्वांनी समितीच्या विनंतीला तात्काळ होकार दिला व लेख तत्परतेने पाठविले हे नमूद करणे आवश्यक आहे. समिती या सर्व विद्वानांची फार ऋणी आहे.

आलेल्या लेखांची यथायोग्य जुळणी करून त्यांना ग्रंथाचे स्वरूप देण्याचे काम प्रा. श्री. ना. बनहट्टी व प्रा. मो. शा. शहाणे या संपादकद्वयाकडे समितीने सोपविले. हे काम फार जबाबदारीचे व जरासे नाजूक होते. पण सर्व लेखकांच्या सौजन्यपूर्ण सहकार्याने संपादक त्या कामात यशस्वी होऊ शकले.

भारतीय स्त्रीच्या धार्मिक, सामाजिक, राजकीय वा सांस्कृतिक जीवनाच्या प्रगतीचा विस्तीर्ण कालखंडातील परामर्श निरनिराळ्या लेखकांनी विविध दृष्टिकोणातून घेतलेला या ग्रंथात आढळेल. अर्थात काही बाबतीत लेखकांची मते परस्परांशी तितकीशी जुळती नसणे अपरिहार्य आहे. तसेच एका विशिष्ट दृष्टिकोणानेच लेख लिहावेत असा संपादकांचाही आग्रह नव्हता.

ग्रंथातील लेखात व्यक्त केलेले सर्वच विचार हिंगणे स्त्रीशिक्षण संस्था, प्रकाशन समिती वा संपादकद्वय यांना मान्य आहेत असे नाही. त्यांबद्दल मतभेद असणे साहजिक आहे. पण त्यामुळे ग्रंथाच्या गुणवत्तेस उणेपणा येतो असे मुळीच नाही. किंबहुना मतभेद आहेत हे आपले वैचारिक जीवन कुंठित नसून प्रवाही आहे याचेच लक्षण होय.

स्त्रियांचे प्रश्न मुख्यतः विवाहसंस्थेशी निगडित, तेव्हा आर्यांच्या अनादिअनंत इतिहास-पुराणात विवाहसंस्थेचे जे विविध स्वरूप दर्शित पडते, समूह विवाहापासून वटक पातिव्रत्यापर्यंत त्यात जे वेळोवेळी फरक पडत गेले, सुधारणा होत गेल्या त्यांची सांगोपांग चर्चा व विवरण या ग्रंथात वाचावयास मिळेल. त्याचप्रमाणे स्त्रियांचे आपल्या समाजातील स्थान व कर्तबगारी, त्यांच्या समस्या व भविष्यातील जीवनविकासाची संभाव्य दिशा यांवरील विचार उद्बोधक ठरतील. मराठी भाषेत या विषयावर सर्वांगीण विचार करणारा हा पहिलाच ग्रंथ असावा.

अशा प्रकारच्या ग्रंथात संपादकाचे काम बव्हंशी संकलनकाराचेच राहते. श्री. म. रा. मित्रगोत्री यांनी अतोनात परिश्रम घेऊन अल्प कालावधीत सर्व लेखांच्या टंकलिखित प्रती तयार करून दिल्या, त्यामुळे या संकलनास फार मदत झाली. प्रकाशन समितीचे निमंत्रक श्री. मा. धों. कर्वे यांचे निरलस साहाय्य झाले नसते तर ग्रंथसंपादनाचे व प्रकाशनाचे काम त्वरित निभावले गेले असते याची शंकाच आहे. ग्रंथाबद्दल व लेखाबद्दलच्या पत्रव्यवहाराचे सर्व काम त्यांनी सांभाळले, प्रुफे तपासण्याचा बोजाही अंगावर घेतला व संपादकांचा भार हलका केला. त्यामुळे या ग्रंथाच्या यशाचे निम्म्याहून अधिक श्रेय त्यांना व त्यांचे सहकारी श्री. के. रा. पालकर यांना आहे हे येथे नमूद करणे अवश्य वाटते.

या ग्रंथाची आकर्षक रचना व सुंदर छपाई यांमध्ये श्री. बापूराव नाईक यांचा सहा व मौज प्रिंटिंग ब्यूरोचे कौशल्य यांचा मोठा भाग आहे. या उभयतांच्या सहकार्यानेच ग्रंथ इतका सुबक व बळकट तयार होत आहे.

या ग्रंथास प्रस्तावना लिहिण्याची विनंती महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाचे अध्यक्ष व मराठी विश्वकोशाचे संपादक तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांना करताच त्यांनी आपल्या विविध कार्यांतून वेळ काढून ती लिहिली याबद्दल त्यांचे आभार मानावेत तेवढे थोडेच.

साडेतीनशे पानांचा हा ग्रंथ वाचकांच्या हाती देणे प्रस्थमूल्याखेरीज कसे शक्य होणार याचीही चिंता होतीच. परंतु तिचे अंशतः निरसन साहित्य आणि संस्कृति मंडळाच्या पाच हजार रुपयांच्या अनुदानाने झाले याबद्दल प्रकाशन समिती कृतज्ञ आहे.

शेवटी जोडलेल्या ग्रंथसूचीची जुळणी करण्याचे कामी मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या कु. शांता सेणकुरकर व पुणे विद्यापीठाच्या जयकर ग्रंथालयाचे ग्रंथपाल श्री. हिंगवे यांची फार मदत झाली. त्याचप्रमाणे मुंबईचे सुप्रसिद्ध चित्रकार श्री. दीनानाथ दलाल यांनी ग्रंथाकरिता आकर्षक वेष्टन तयार करून दिले. या सर्वांची प्रकाशन समिती अत्यंत ऋणी आहे.

# अनुक्रमणिका

## विभाग तिसरा—स्त्रीजीवनाच्या समस्या



## विभाग चौथा—पुढची वाटचाल

# प्रस्तावना

ज्ञान व मानवी स्वातंत्र्य यांचा कार्यकारणभाव संबंध आहे. शेतीचे ज्ञान झाल्याने मनुष्य भुकेच्या व शीतोष्णांच्या बाधेतून मुक्त झाला. शरीर व बाह्य जग यांच्या क्रिया-प्रतिक्रियांचे ज्ञान जसे वाढत आहे तसा माणूस रोगांच्या बंधनातून मुक्त होत आहे. निसर्ग, मानवाचे जीवन व समाजसंघटना यांचा अर्थ जितका अधिक कळत जाईल तितके मानवी स्वातंत्र्य अधिकाधिक विस्तारत जाईल. म्हणून स्त्री अशिक्षित व पुरुष शिक्षित अशा परिस्थितीत स्त्रीचे बंधन सुटणे अशक्य आहे याची जाणीव जेव्हा समाज-सुधारकांना झाली तेव्हा स्त्रीस्वातंत्र्याची क्षितिजे त्यांना दिसू लागली. अशाच एका भारतीय समाजसुधारकाला म्हणजे भारतरत्न कै. अण्णासाहेब कर्वे यांना स्त्री-स्वातंत्र्य व स्त्रीशिक्षण यांच्या प्रत्यक्ष कार्यकारणभावाचा साक्षात्कार झाला, ते अप्रतिम स्वार्थत्यागास तयार झाले व त्यांनी भारतीय स्त्रीशिक्षणाचा भक्कम पाया रचला.

१. भारतातील समाजसुधारणेच्या चळवळीचा शुभारंभ स्त्री-शूद्र दास्यविमोचनाच्या प्रेरणेने झाला. ही प्रेरणा एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी बुद्धिवादावर आधारलेल्या इंग्रजी शिक्षणाने वैचारिक स्वातंत्र्य प्राप्त झालेल्या भारतीय सुशिक्षितांना लाभली. त्यांचा विचार बंधमुक्त झाला, त्यामुळे बंधमुक्तीचे आंदोलन निर्माण झाले. सकस नवविचारांचे आकंठ सेवन केलेली नवीन पिढी जन्माला आली. त्याना नवीन मूल्याचा प्रत्यय आला, प्रत्ययामुळे स्फूर्ती प्राप्त झाली. हिंदुधर्मसंस्थेची समीक्षा पहिल्या शिक्षितांनी सुरू केली. हिंदूंच्या सामाजिक जीवनाचा प्राण हिंदुधर्म होय. या धर्माच्या गाभ्यात बुद्धिवादाने प्रकाश टाकला. धर्मदृष्टी बदलल्याशिवाय दुष्ट रूढी नष्ट होणार नाही हे त्यांच्या लक्षात आले. अशा सुशिक्षितांमध्ये राजा राममोहन रॉय व ज्योतिराव फुले हे प्रज्ञावंत पुढे आले. राजा राममोहन रॉय यांनी सर्व धर्मग्रंथांचे अबाधित प्रामाण्य नाकारणारा मानवव्यापी नवा धर्मविचार पुढे मांडला. त्याचेच निराळ्या पद्धतीने अनुसरण ज्योतिराव फुले यांनी केले. राममोहन रॉय यांनी सतीची अमानुष रूढी कायद्याने बंद पाडण्याची चळवळ सुरू केली आणि त्यांना त्यात यशही आले. स्त्रीजीवनाचे मूल्य पुरुष-जीवनाच्या मूल्याइतकेच अंतिम मूल्य आहे, हे त्यांनी सिद्ध केले.

स्त्री ही या जगात स्वत करिता अस्तित्वात नाही, ती पुरुषाकरिता अस्तित्वात आहे, तिचे व्यक्तित्व पुरुषात समर्पित आहे, या तत्त्वाचाच पडसाद हिंदूंच्या सर्व प्रकारच्या स्त्रीजीवनावर त्या काळी पडलेला होता. स्त्रीला बालपणीच अजाण अवस्थेत विवाह-बंधनाने बद्ध व्हावे लागे. या सामाजिक बंधनाचा पाया आर्थिक होता. कुलीन स्त्रीला स्वतंत्र आर्थिकजीवनाची मनाई होती. तिला स्वतंत्र वारसाहक्क कायद्याने व धर्माने मना केला होता. स्वतंत्र व्यवसाय करून जगणाऱ्या स्त्रीला सामाजिक श्रेणीत खालचा दर्जा होता.

गृहसंस्थेत पिता, पती, श्वशुर, सासू इत्यादी वडीलधाऱ्या मंडळींच्या बंधनात राहण्याची धर्माने व रूढीने तिला सक्ती केली होती. पांढरपेशा वर्गात किंवा कुलीन समजल्या जाणाऱ्या सर्व उच्च व मध्यम वर्गांत विधवाविवाहास बंदी होती. बालविधवांना सतीने सती जाणे किंवा संन्यासधर्माने घरात विरक्तीने आयुष्य घालविणे याशिवाय अन्य मार्ग नव्हता. एकंदरीत तिचे स्वत्विनाशच सुरक्षित गेले होते.

सुधारकांनी स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, विधवाविवाह, अनाथ-बालक संगोपन इत्यादी विधायक कार्यक्रमावर आधारलेले आंदोलन सुरू केले. १८२९ साली सतीची चाल कायद्याने बंद झाली. १८५६ साली पुनर्विवाहाचा कायदा पास झाला. १८६५ साली हिंदुस्थानातील कोणत्याही जातीच्या वा धर्माच्या स्त्री-पुरुष व्यक्तीला दुसऱ्या जातीतील वा धर्मांतील व्यक्तीशी विवाह करण्याची संमती देणारा क्रांतिकारक कायदा झाला. या कायद्याने जातिभेदाचे व धर्मभेदाचे सामाजिक मूळच तोडून टाकले. भारत स्वतंत्र झाल्यावर हिंदूंच्या कायद्यात अधिक क्रांतिकारक बदल झाले. स्त्रियांना पुरुषांबरोबरच समान वारसाहक्क आता कायद्याने प्राप्त झाला आहे. आणि संपत्तीवरील समान स्वामित्व पुरुषांइतकेच कायद्याने प्राप्त झाले आहे.

ब्रिटिश सत्ता स्थापन झाल्यानंतर हजारो वर्षे दृढमूल झालेली भारतीयांची विशेषतः हिंदूंची समाजसंस्था वेगाने मुळापासून बदलू लागली आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर हा वेग वाढला आहे. आर्थिक व्यवस्था मुळापासून हादरली असून तिच्या ठिकाणी नवीन अधिक सामर्थ्यशाली व नित्य प्रगतिशील अशी अर्थव्यवस्था निर्माण होत आहे. तिचे सामाजिक संबंधावर खोल परिणाम होत आहेत. स्त्रीपुरुष समानतेचा सिद्धान्त सामाजिक जीवनात प्रभावीपणे कार्यान्वित होण्यास वेळ लागत आहे हे जरी खरे असले तरी हे परिवर्तन समानतेच्या केंद्रानुसाराने घडत आहे याबद्दल शंका बाळगण्याचे कारण नाही. आर्थिक समृद्धी, न्याय्य आर्थिक विभाजन, शिक्षणाचा प्रसार आणि स्त्रियांचे आर्थिक स्वावलंबन हे जितक्या प्रमाणात उच्च स्तरावर जात राहील तितक्या उच्च स्तरावरील स्त्री-पुरुष समानतेची संस्कृति निर्माण होत राहील.

विज्ञान व तंत्र यांच्यावर आधारलेली नवीन औद्योगिक क्रांती कुटुंबसंस्थेची नवी रचना घडवीत आहे. यामध्ये कौटुंबिक जीवनातील नव्या पवित्र मूल्यांची घडण कशी होईल यासंबंधी विचारवंतांनी, समाजसेवकांनी आणि सत्ताधाऱ्यांनी सावधपणे विचार करून कुटुंबसंस्थेस नवा आकार देण्याची आवश्यकता आहे. व्यक्तिनिष्ठ कुटुंबसंस्था जन्माला आल्यानंतर पतिपत्नी, मातापिता, पुत्रकन्या यांची व्यक्तिनिष्ठ पवित्र नाती निर्माण झाली. या पवित्र नात्यांच्यामध्ये पतिपत्नी यांचा संबंध सख्याचा असावा आणि मातापिता व त्यांची संतती यांचा संबंध गुरुशिष्यांचा असावा हा आदर्श हजारो वर्षे मानवी कुटुंबसंस्थेने आपल्यापुढे ठेवलेला आहे. पितृप्रधान व मातृप्रधान अशा दोन प्रकारच्या कुटुंबसंस्था इतिहासपूर्वकालात अस्तित्वात आल्या. त्यांपैकी पितृप्रधान संस्था इतिहासात विजयी झाली. या पितृप्रधान संस्थेत स्त्री व संतती यांचे कमीजास्त प्रमाणात

दास्य वा पारतंत्र्य पवित्र म्हणून मानले गेले होते. परंतु त्या इतिहासात वैदिक काळी सप्तपदी नामक विवाह संस्कार करणाऱ्या एका विशिष्ट भारतीय सामाजिक गटात पत्नी ही शेवटच्या सातव्या पावलाने मित्र बनावी अशी पती अपेक्षा करतो. (सखा सप्तपदी भव ।). परंतु हा सख्याचा आदर्श अद्यापर्यंत मानवी व भारतीय कुटुंबसंस्थेत केवळ दूरचा काल्पनिक आदर्श म्हणूनच राहिला आहे. घटस्फोटाची चाल असो वा नसो, दोन्ही ठिकाणी स्त्री ही पायाची दासी तरी असते किंवा निदान पतीच्या हुकमतीखाली रावणारी अबला तरी असते. परंतु त्यातल्या त्यात पुत्र व कन्या यांच्यासंबंधी असलेला दृष्टिकोण पुष्कळच सुधारलेला आहे.

परंतु आता या औद्योगिक क्रांतीच्या वातावरणात व नव्या सार्वजनिक शिक्षण-संस्थांच्या कक्षेत जन्मलेली व वावरणारी मुले मातापितरांच्या नैतिक प्रभावापासून निसटून जाऊ लागली आहेत. मातापितरांचे व संततीचे जिव्हाळ्याचे व एकात्मतेचे संबंध शिथिल होत आहेत. त्यामुळे उनाड व बकाल जीवनाची कक्षा रुंदावत आहे. त्यामुळे पहिल्या शिकण्याच्या वयात ज्या प्रकारचे सकस नैतिक व्यक्तिमत्त्व निर्माण व्हावयास पाहिजे ते तसे निर्माण होणे कठीण होत चालले आहे. अनेक प्राचीन व आधुनिक सामाजिक ध्येयवाद्यांनी, प्लेटोपासून आजपर्यंतच्या मोठमोठ्या समाजवाद्यांनी कल्पनेने निर्माण केलेल्या अद्भुतरम्य आदर्श समाजात व्यक्तिनिष्ठ कुटुंबसंस्था राहू शकत नाही वा तिची गरज नाही, असे जे भविष्य वर्तविले आहे, त्याची भुरळ फार भयानक आहे. या समाजवाद्यांना विकसित मानव्याचे अधिष्ठान हे स्वतंत्र नैतिक व्यक्तिमत्त्वच होय, याचा विसर पडला आहे. ही विस्मृती समाजवादी क्रांतीच्या परिसरात माणसांना यंत्राचे जडभाग बनवील आणि माणसाच्या सुंदर षोडश जीवनकलांना (प्रश्नोपनिषद्), निस्तेज व निर्जीव करील. हा धोका टाळणारी शिक्षणपद्धती कशी निर्माण करता येईल, हा नव्या विज्ञानयुगाचा यक्षप्रश्न आहे.

२. या प्रस्तुत लेखसंग्रहात भारतीयांच्या प्राचीन विवाहसंस्थेचा, कुटुंबसंस्थेचा व स्त्रीपुरुषसंबंधाचा विस्तृत परामर्श प्रथम अनेक लेखकांनी घेतला आहे. भारतीयांच्या विवाहसंस्थेत व कुटुंबसंस्थेत इतिहासपूर्व काळापासून अनेक परिवर्तने झालेली प्राचीन भारतीय साहित्यावरून दिसून येतात. विविध प्रकारच्या विवाहसंस्थांचीही नोंद धर्मसूत्रे, महाभारत, मन्वादी स्मृतिग्रंथ आणि अन्य साहित्य यात केलेली आढळते. या विविध विवाहसंस्थांचा विविध सामाजिक संस्थांशी कार्यकारण संबंध असावा असेही अनुमान करता येते. कै. इतिहाससंशोधक वि. का. राजवाडे यांनी चित्रमयजगत या मासिकात लेखमाला लिहून या विविध प्रकारच्या विवाहसंस्थेचा इतिहास सांगितला आहे. त्याचप्रमाणे विशेषतः कै. डॉ. श. रा. भळवेकर यांनी 'हिंदु संस्कृतीत स्त्रियांचे स्थान' या सुप्रसिद्ध प्रबंधात या विषयाचा व्यवस्थित ऊहापोह केला आहे. कै. राजवाडे यांनी विवाहविषयक वैदिक मंत्रांचा अर्थ एका विचित्र सामाजिक उपपत्तीने व्युत्पादून दाख-विला आहे. ती फार थोड्यांना पटण्य सारखी विचार्य आहेच. या प्रस्तुत लेखसंग्रहात प्राचीन विवाहसंस्थेचे विवरण केलेले आहे, त्यासंबंधी येथे थोडासा परामर्श घेतो —

महाभारतात विवाहसंस्थेचा इतिहास इतर कोणत्याही प्राचीन भारतीय साहित्यापेक्षा अधिक प्रमाणात सापडतो. मानवी विवाहसंस्थेचा इतिहास संकलित करण्याचा फार मोठा प्रयत्न पश्चिमी विद्वानांनी केला आहे; अतिप्राचीन काळी समूहविवाह होता की नाही याबद्दल त्यांच्यात मतभेद आहेत. त्यांच्या विचारांच्या संदर्भात महाभारतातील इतिहासाचा विचार करता एक मुद्दा मुख्यतः वादग्रस्त ठरतो, तो म्हणजे समूहविवाहाचा. महाभारतात कुन्तीला पंडूने सांगितलेल्या श्वेतकेतूच्या कथेवरून (महाभारत पर्व १ अध्याय १२२, मुंबई प्रत) विवाहसंस्थेच्या तीन अवस्था दर्शित केलेल्या दिसतात. पंडू म्हणतो — *महात्म्या धर्मवेत्त्यांनी सांगितलेल्या प्राचीन इतिहासात असे म्हटले आहे की, पूर्वी स्त्रिया* मोकळ्या होत्या; त्या स्वतंत्र यथेच्छ विहार करीत. पतीची पर्वा न करता अन्यत्र संभोग घेतला तरी अधर्म होत नसे. हा धर्म अजून उत्तर कुरु देशात प्रचलित आहे. त्या सनातन धर्माला उद्दालक ऋषींचा पुत्र जो श्वेतकेतू त्याने बंदी घातली. असे एकदा झाले की, श्वेतकेतूचे वडील उद्दालक ऋषी यांनी आपल्याकडे अतिथी आलेल्या मित्राबरोबर लैंगिक संभोगार्थ जाणाऱ्या आपल्या पत्नीला अडथळा केला नाही, त्याबरोबर श्वेतकेतू क्षुब्ध झाला. तेव्हा उद्दालक ऋषी म्हणाले की, सर्व वर्णांतील स्त्रियांना आपआपल्या वर्गात हे संभोगस्वातंत्र्य आहे, हा सनातन धर्म आहे. त्या ऋषिपुत्र श्वेतकेतूस हे सहन झाले नाही. त्याने जबरदस्तीने नवीन नियम असा घालून दिला की, आजपासून कोणत्याही लग्न झालेल्या स्त्रीने पतीचे असे अतिक्रमण केल्यास तिला पातक होईल. असा पातिव्रत्याचा नियम श्वेतकेतूने घातला. म्हणून पतीने नियुक्त केले तरच किंवा त्याची अनुमती असेल तरच स्त्री अन्य पुरुषापासून पुत्रसंतती निर्माण करू शकते किंवा लैंगिक संबंध त्याच्याशी ठेवू शकते. सौदास राजाने नियुक्त केलेल्या मदयंती नामक पत्नीच्या ठिकाणी वसिष्ठापासून *अश्मक राजा जन्मला. ऋतुकाली स्त्रीने पतिव्रता म्हणून राहावे. ऋतुकाल नसताना तिला* संपूर्ण स्वातंत्र्य आहे.

महाभारतातील या संदर्भावरून प्राचीन विवाहसंस्थेच्या तीन अवस्था सूचित होतात. (१) विवाहित स्त्रीस स्ववर्णामध्ये म्हणजे स्वतःच्या सामाजिक वर्गामध्ये संभोगस्वातंत्र्य, (एक प्रकारे समूहविवाहाचा हा अवशेष.) (कुले कन्या प्रदीयते।), (२) विवाहित स्त्रीस पतीने वा पती नसल्यास कुलप्रमुखाने नियुक्त केल्यास अन्य पुरुषापासून पुत्रोत्पत्तीचा वा अन्यत्र संभोगाचा अधिकार व (३) पती अक्षम असेल किंवा मृत झाला असेल तर केवळ *दिरापासून संतती निर्माण करण्याचा अधिकार. दुसऱ्या अवस्थेत उच्चवर्णीय किंवा समान*-वर्णीय अन्य पुरुषापासून संतती निर्माण करण्याचा अधिकार स्त्रीला होता. तिसऱ्या अवस्थेत पती नसताना केवळ पतीच्या बंधूपासूनच आपत्काली संतती निर्माण करण्याचा अधिकार राहिला. ही तिसरी अवस्था महाभारतात अन्यत्र व स्मृतीमध्ये स्पष्ट सांगितली आहे. हाही अधिकार पुढे विवादग्रस्त झाला आणि कालांतराने अमान्य ठरला. तिसरी अवस्था अनेक पुत्रप्रकार सांगताना मान्य करून पुन: दुसरीकडे मनूने अमान्य केली आहे.

धर्म सूत्रादी धर्मशास्त्र ग्रंथामध्ये विवाहाचे काहींनी (वसिष्ठ व आपस्तंब) सहा प्रकार

व पुष्कळांनी आठ प्रकार सांगितले आहेत. ब्राह्म, प्राजापत्य, दैव, आर्ष, गांधर्व, राक्षस, आसुर व पैशाच असे आठ प्रकार एकंदरीत धर्मशास्त्रात वर्णिले आहेत. या विवाह-प्रकारांच्या परिगणनेमध्ये स्वयंवर हा प्रकार एक निराळा प्रकार म्हणून सांगितलेला नाही. तो न सांगण्याचे कारण, या आठ प्रकारांपैकी कोणते प्रकार कोणत्या वर्णास प्रशस्त वा अप्रशस्त होत, हे वर्णभेदाने स्मृतिकारांना सांगावयाचे असल्यामुळे सर्व वर्णांकरिता वैध मानलेला स्वयंवर विवाहप्रकारांमध्ये सांगितला नाही. हा स्त्रीने स्वेच्छेने निवडलेल्या वराशी होणारा विवाह होय. ऋतुमती म्हणजे वयात आलेली कन्या ब्राह्म विवाहपद्धतीने विवाहित होण्याची गरज नाही असा गौतम, बौधायन, वसिष्ठ इत्यादी धर्मशास्त्रकारांचा अभिप्राय दिसतो. तीनदा ऋतुमती झाल्यानंतर स्त्री स्वयंवर करण्यास मोकळी असते असे त्यांचे मत दिसते. मनूने ऋतुप्राप्तीनंतर तीन वर्षेपर्यंत वडिलांची वाट पाहून कन्येने स्वयंवर करावा असे म्हटले आहे. याज्ञवल्क्याच्या मते दाता नसेल तर कन्येने स्वयंवर करावा. महाभारतात व अन्यत्र स्वयंवराची अनेक उदाहरणे सांगितली असून स्वयंवर प्रकार हा क्षत्रियास अधिक प्रशस्त होय असे म्हटले आहे.

आठ विवाहप्रकारांमध्ये विवाहाचा प्रत्यक्ष धार्मिक संस्कार किंवा मंत्रपूर्वक विधीने होणारा संस्कार ज्यात आहे असे पहिले चार प्रकार होत. ब्राह्म म्हणजे विधिपूर्वक कन्यादान (अर्थात् बालविवाह). दैव म्हणजे यज्ञामध्ये यजमानाने इतर द्रव्यदक्षिणेबरोबर ऋत्विजास करावयाचे कन्यादान. प्राजापत्य म्हणजे वधूवरांमध्ये दोघांनी एकनिष्ठ राहून धर्माचरण करावयाचे अशा प्रतिज्ञेने मंत्रपूर्वक विवाहबद्ध होणे; यात एकपत्नीव्रत विवक्षित आहे. आर्ष म्हणजे कन्येच्या पित्यास गोमिथुनाचे दान करून विवाहबद्ध होणे. हे चारी विवाहप्रकार मंत्रप्रधान भारतीय संस्कृतीचे दर्शक आहेत. हे पहिले चार ब्राह्मणवर्णास विहित आहेत, परंतु त्यातल्या त्यात पहिला उत्तम, दुसरा दुय्यम, अशा क्रमाने ब्राह्मण-वर्णास ते प्रशस्त मानले आहेत. (मंत्रप्रधान संस्कृतीचे असतील तर) क्षत्रियवैश्यांनाही काही स्मृतिकारांनी पहिले चार विहित मानले आहेत. ऐतिहासिक पद्धतीने विचार केल्यास क्षत्रिय व वैश्य यांच्यामध्ये वैदिक संस्कृतीचे असलेले व वैदिक संस्कृतीचे नसलेले असे दोन प्रकार इतिहासपूर्व काळापासून चालत आलेले आहेत. वैदिक संस्कृती न स्वीकारलेल्या अथवा वैदिक संस्कृतीची विशेष छाप नसलेल्या क्षत्रियांना हे पहिले चार प्रकार विहित नाहीत; असे स्मृतींच्याच मतभेदाच्या विश्लेषणावरून दिसते. मंत्रप्रधान संस्कृतीच्या सामाजिक वर्गातही प्राथमिक अवस्थेत एक प्रकारचे शैथिल्य असते त्यामुळे नियमधर्म कटाक्षाने पाळले जात नसतात.

गांधर्व, राक्षस, आसुर व पैशाच असे, वैदिक किंवा मंत्रप्रधान संस्कृतीची छाप नसलेल्या आर्य व आर्येतर सामाजिक वर्गामधील रूढ असलेले चार विवाहप्रकार होत. परंतु हेही वर्ग मंत्रप्रधान संस्कृतीकडे झुकलेले असल्यास पहिल्या चार प्रकारांचाही स्वीकार करतात; जेव्हा दोन्ही संस्कृतींचे साहचर्य घडू लागले तेव्हा गांधर्व म्हणजे प्रेमविवाह मान्य झाला. प्रेमवश होऊन स्त्रीपुरुष युग्माने एकांतात विवाहबद्ध होण्याचा संकल्प केला व

बौद्ध धर्म स्वदेशात लुप्त होऊन परदेशात पसरला. जैन धर्म संकुचित बनत बनत एका लहानशा संघटित जमातीत स्थिरावून लहानशा संप्रदायाचे रूप घेऊन दृढबद्ध झाला. शैव व भागवत धर्मांनी परंपरागत सामाजिक व्यवस्थेला विशेष धक्का पोचू न देता केवळ पारमार्थिक भावनेत समानता राखून संमिश्र, उच्च वा नीच रूढींच्या संस्कृतीला संमती दिली. त्यामुळे समान व व्यापक आचार धारण करणारी संस्कृतीच भारतात निर्माण होऊ शकली नाही. या गेल्या दीडशे वर्षांच्या कालखंडात या शिलावत झालेल्या, सामाजिक दृष्ट्या पतितावस्थेत व जडावस्थेत मूढ होऊन पडलेल्या संस्कृतीमध्ये वेगाने परिवर्तन होऊ लागले आहे. तिच्यात सजीवपणाची लक्षणे दिसू लागली आहेत. तिचा कायापालट करणारी सामर्थ्येही प्रकट होऊ लागली आहेत.

३. प्रस्तुत लेखसंग्रहाची योजना व्यापक व सर्वांगीण अशी संपादकांनी तयार केली आहे. नामवंत व मान्यवर लेखकांनी त्यात लेख लिहिले आहेत. भिन्न लेखकांचे लेख असल्यामुळे लेखही भिन्न दर्जांचे झाले आहेत आणि हे अगदी स्वाभाविक आहे. काही लेख समर्थ लेखकांनी परिश्रमपूर्वक लिहिलेले दिसतात. आणि ही गोष्ट या लेखसंग्रहास मोठी भूषणास्पद आहे. प्रा. वि. म. दांडेकर व म. भा. जगताप, के. वा. भोळे, माजी न्यायमूर्ती नाईक, सौ. मालतीबाई बेडेकर इत्यादिकांचे लेख उल्लेखनीय ठरतात. काही लेखांमधील महत्त्वाची विधाने वादग्रस्त किंवा अमान्य ठरण्यासारखी असूनही लेखक महाशयांचे परिश्रम लक्षात घेता ते सह्य ठरतात. उदा. प्रा. रा. वि ओतुरकर यांच्या 'ऐतिहासिक कालातील स्त्री' या लेखातील पहिलाच परिच्छेद 'वेदकाळात स्त्रीपुरुषांची समानता' वादग्रस्त ठरतो. कै. डॉ. अळतेकरांच्या 'हिंदुसंस्कृतीतील स्त्रियांचे स्थान' या पुस्तकाच्या आधारे वेदकालात स्त्रीपुरुषांचा दर्जा समान होता, असे विधान केलेले आढळते. परंतु ते मान्य होण्यासारखे नाही. वेदकाळी एकाच पुरुषाने पुष्कळ बायकाशी लग्न करण्याचा प्रघात होता व त्याचे समर्थनही पुष्कळ ठिकाणी वेदामध्ये केलेले आढळते; (ऋग्वेदसंहिता १-६६-८; ७-१८-२; १-५६-५; १-८६-१६; १०-४३-१; तैत्तिरीय संहिता १-८-९-१; ४-७-१२-३; ६-६-१-५; मैत्रायणीसंहिता ३-११-५, ४-१३-८; इत्यादी शेकडो आधार.) हरिश्चंद्राला शंभर बायका होत्या असे ऐतरेय ब्राह्मणात म्हटले आहे (३३-१); स्त्रियांना मात्र एकच पती असला पाहिजे असे स्पष्ट विधान त्याच संदर्भात वेदामध्ये केलेले दिसते. त्याचप्रमाणे स्त्रीला वारसाहक्क नाही, असेही वेदात स्पष्ट म्हटले आहे (तैत्तिरीयसंहिता ६-५-८-२,). एवढेच नव्हे तर, ऋग्वेदातील दानस्तुतीमध्ये एकेक ऋषी शंभर स्त्रियांचे दान घेतो असे वर्णिले आहे. हे सोडले तर श्री. ओतुरकरांनी आपला विषय चांगला मांडला आहे असे म्हटले पाहिजे.

या लेखसंग्रहातील पहिला लेख मान्यवर लेखक प्रा. दिघेकर यांनी लिहिला. त्यांनी महाभारतपूर्व वेद कालातील स्त्रीजीवनाचा इतिहास देताना मनुपासून धर्मराजापर्यंत नऊ कालखंड पाडिले आहेत. ते काल्पनिक वाटतात. विशेषतः 'गायत्री हा ऋग्वेदाचा आद्य मंत्र आहे, तो ज्या ऋषीस स्फुरला तो विश्वामित्र त्रिशंकू राजाच्या वेळचा आहे.'

(पृ. ५) हे विधान अत्यंत निराधार आहे. ऋग्वेदाचा आद्य मंत्र 'अग्निमीळे पुरोहितं' हा गायत्री छंदातला असून तो विश्वामित्राचा पुत्र मधुच्छंदस याचा आहे, प्रत्यक्ष विश्वामित्राचा नव्हे. प्रत्यक्ष विश्वामित्राचा सुप्रसिद्ध गायत्री मंत्र 'तत् सवितुर्वरेण्यम्' हा तिसऱ्या मंडलात ६२ व्या सूक्तात गवला आहे. आपल्या विधानाच्या पुष्टीकरिता ऋग्वेद खिलसूक्त ३३ यातील एकोणिसावा मंत्र 'यो वेदादिषु गायत्री सर्वव्यापी महेश्वरः। तदुक्तं यदा वेदन तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु।' त्यांनी निर्दिष्ट केला आहे.

'वेदादिषु गायत्री' या निर्देशाने प्रस्तुत लेखकाचा घोटाळा झाला आहे. येथे 'वेदादिषु' हे बहुवचन आहे, 'वेदादौ' असे एकवचन नाही. बहुवचनामुळे 'वेद इत्यादिकांमध्ये जो गायत्रीस्वरूपी सर्वव्यापी महेश्वर आहे,' असा पहिल्या अर्धाचा अर्थ होतो. 'वेदाच्या प्रारंभी असलेला जो गायत्री मंत्र म्हणजे सर्वव्यापी महेश्वर' असा अर्थ होत नाही. गायत्री हा छंद आहे. या छंदातील मंत्रालाही गायत्री म्हणण्याची प्रथा आहे, एवढेच. याच संदर्भात प्रथम प्रा. दिवेकर यांनी असे विधान केले आहे की, पहिले तीन कालखंड संपेपर्यंत ऋग्वेद रचनेस प्रारंभच झाला नव्हता. म्हणजे लेखकांचा अभिप्राय असा की, विश्वामित्राचा गायत्री मंत्र हाच ऋग्वेदाचा प्रारंभ होय, पूर्वी ऋग्वेद रचना झालीच नाही. परंतु पहिल्या कालखंडातील जो पहिला पुरुष मनु-वैवस्वत त्याची पाच सूक्ते (८।२७–३१) ऋग्वेदात समाविष्ट झालेली आहेत. मनुपुत्र नाभानेदिष्ठ याची दोन सूक्ते (१०।६१,६२) आलेली आहेत. विश्वामित्राच्या पूर्वी झालेले नहुष, ययाति, अंबरीष इत्यादिकांची सूक्ते सापडतात. दिवेकरांच्या मताप्रमाणे तिसऱ्या कालखंडाच्या शेवटी झालेला स्वस्त्यात्रेय याचीही दोन सूक्ते (५।५०, ५१) समाविष्ट केलेली आहेत. या सर्व आधाराच्या अनुसारे असे म्हणता येते की, वैवस्वत मनूपासून तरी ऋग्वेद रचनेस प्रारंभ झाला असला पाहिजे. विश्वामित्राच्या कालखंडात ऋग्वेद सूक्तांच्या रचनेस बहर आला, एवढेच निश्चितपणे म्हणता येईल.

प्रा. वि. म. वेडेकर यांचा 'सूत्र व स्मृति कालातील स्त्रीजीवन' हा लेख उद्बोधक आहे. परंतु आठ विवाहप्रकारांची त्यांनी दिलेली माहिती फार अपुरी आहे. 'मनूने हे विवाहप्रकार वर्णभेदाच्या अनुसाराने लागू केले आहेत,' (पृ. २२). मनूने व इतर स्मृति-कारांनी, असे पाहिजे. 'जे जे स्मृतिकार विवाहप्रकारांची मांडणी करतात ते ते सर्वच सातवा ब्राह्म व आठवा प्राजापत्य या दोन विवाहप्रकारात तसा विशेष फरक करत नाहीत.' (पृ. २२). मुळामध्ये या दोन विवाहप्रकारात मोठा फरक आहे. ब्राह्म हे कन्यादान होय. व प्राजापत्य हा वधूवरांच्या आपसातल्या धार्मिक प्रतिज्ञेने होणारा विवाह होय. प्राजापत्य विवाहात दोघेही स्वयंवर करतात, हे लक्षात घेणे जरूर आहे. कालांतराने धर्म-निबंधकारांनी पैशाच वगळल्यास सर्व विवाहप्रकारांना ब्राह्म विवाहाचा विधी जोडावा असे सांगून वैधरूप देण्याचा प्रयत्न केला आहे. 'वसिष्ठ व आपस्तंब या धर्मशास्त्रकारांनी प्राजापत्याचा उल्लेखही केलेला नाही. ते सातच विवाहप्रकार मानतात.' सात नव्हे सहा. हे मतभेद येथे उदाहरणार्थ दाखविले आहेत.

श्री. बा. मो. कानिटकर यांच्या 'पुराण कालातील स्त्री-जीवन' या लेखातील– 'त्या काळात सतीची चाल रूढ होती. इ. स. पूर्व १५० ते इ. स. २५० पर्यंत उत्तर हिंदुस्थानात ही चाल सर्वत्र मान्य होती···पुढेही इ. स. १२०० पर्यंत बहुतेक सर्व हिंदुस्थानात ही चाल प्रचलित होती' (पृ. ४७) हे वाक्य. २५० पर्यंत व १२०० पर्यंत या पर्यंतांची संगती लागत नाही. प्रा. संत यांच्या लेखात भूतदयावादी दृष्टिकोण पहिल्या सुधारकांना लावला आहे; सुधारकांच्या दुसऱ्या पिढीचा पहिल्या पिढीपेक्षा निराळा दृष्टिकोण व्यक्तिस्वातंत्र्यवाद हा दाखविला आहे; असे दाखविणे बरोबर नाही. उदारमतवादाचे भारतीय अध्वर्यू कै. न्या. मू. रानडे हे पहिल्या पिढीतील मोठे सुधारक होत. उदारमतवादाचे मूलतत्त्वच व्यक्तिस्वातंत्र्य हे होय. व्यक्तिस्वातंत्र्याचे तत्त्व पश्चिमी संस्कृतीमध्ये आधारभूत तत्त्व म्हणून दृढमूल झाल्यानंतरच पहिले पश्चिमी विद्याविभूषित भारतीय सुधारक जन्मले, हे लक्षात घेतले म्हणजे पहिल्या सुधारकांचा दृष्टिकोण भूतदयावादी व दुसऱ्या पिढीतील सुधारकांचा व्यक्तिस्वातंत्र्यवादी असा भेद दाखविता येत नाही.

या माणिकमहोत्सवाच्या निमित्ताने प्रसिद्ध होणाऱ्या या लेखसंग्रहाच्या रूपाने मराठी साहित्यात एका मूलभूत सामाजिक विषयावरील सर्वांगीण चर्चेची भर टाकली आहे, याबद्दल हिंगणे स्त्री-शिक्षणसंस्थेच्या संचालकांचे मी मनःपूर्वक अभिनंदन करतो.

वाई
दिनांक १७–११–६७
त्रिपुरी पौर्णिमा

लक्ष्मणशास्त्री जोशी

महाभारतपूर्व शब्दाचे स्पष्टीकरण केल्यानंतर 'वेदकाल' म्हणजे काय ह्याचा विचार केला पाहिजे. आपल्या जुन्या काय किंवा नव्या काय, कुठल्याच संस्कृत वाङ्मयात हा शब्द सापडत नाही. पाश्चात्य संस्कृत पंडित ज्यास इंग्रजीत 'वेदिक पीरिअड' म्हणतात त्याचे हे मराठी रूप आहे. ह्या काळाची अगदी अलीकडील मर्यादा म्हणजे स्थूल मानाने इ. स. पूर्वी ५०० ह्या पंडितांनी ठरविली आहे.[1] इ. स. पूर्वी ५०० च्या पलीकडे असलेल्या सारा कालखंड ह्यांच्या मताने वेदकाल समजला पाहिजे. ह्या कालापैकी आपणास केवळ महाभारतपूर्व कालाचाच विचार करावयाचा असल्याने कौरवपांडव युद्धाच्या वेळी वर्तमान असलेल्या वेदव्यासानंतरच्या काळाचा आपणास विचार करता येणार नाही. वेदांच्या संहिता सोडल्या तर बाकीचे सारे वैदिक वाङ्मय वेदव्यासानंतरचे आहे. आज आपल्यापुढे जे पुराणवाङ्मय आहे ते तर अगदीच अर्वाचीन काळात रचले गेले आहे. पण पुराणांतल्या घटना व व्यक्ती मात्र प्राचीन काळातल्या आहेत. एखादा ग्रंथ कुणी लिहिला, केव्हा लिहिला गेला अथवा कुठल्या मापेत लिहिला गेला, इत्यादी गोष्टींवरून त्या ग्रंथात जे सांगितले आहे त्याचा काल निश्चित करणे न्यायसंगत होत नाही. म्हणून महाभारतपूर्व वेदकालातील जीवन पाहावयाचे असेल तर ते निवळ यज्ञासाठी म्हणून रचल्या गेलेल्या वैदिक वाङ्मयात फारसे सापडणार नाही. असा प्रयत्न करणे म्हणजे वायबल आदी ग्रंथांवरून युरोपचा इतिहास लिहिण्यासारखे आहे.[2] पण आपल्या प्राचीन जीवनाविषयी लिहिताना असेच केले गेले आहे. याचाठी आपले खरे प्राचीन जीवन समजून घ्यावयाचे असेल तर नुसत्या वैदिक संहितांवर न विसंबता त्यातील माहितीस, जुन्या पुराणग्रंथात 'इति ह आस,' असे घडले म्हणून जे सांगितले आहे त्याची जोड दिली पाहिजे.

महाभारत युद्धापूर्वीच्या एवढ्या अफाट कालखंडातील जीवनाचा विचार करताना आपणास एक अडचण भासते ती अशी की, एवढ्या मोठ्या कालखंडातल्या आरंभाच्या आणि शेवटच्या घटना जर सरमिसळ झाल्या तर त्यातून प्रकट होणारे जीवनविषयक चित्र डोळ्यापुढे उभे राहात नाही. ह्यासाठी त्या कालखंडाची पुढीलप्रमाणे विभागणी केली आहे. वैवस्वत मनूपासून पांडव धर्मराजापर्यंतचा काल विषयाच्या सोयीसाठी असा विभागला आहे:—

| | |
|---|---|
| १ मनु ते ययाति | पिढ्या ८ |
| २ ययाति ते जह्नु | पिढ्या १६ |

---

१. Vedic Index of Names and Subjects by Macdonell and Keith. Preface : Chronological Limits—The Lower Limit of the Vedic Period is the epoch of the rise and spread of Buddhism or roughly 500 B. C.

२. F. E. Pargiter's Ancient Indian Historical Tradition, Ch. 1, P. 14

१

# महाभारतपूर्व वेदकालातील स्त्रीजीवन

हरि रामचंद्र दिवेकर

साहित्याचार्य प्रा. हरि रामचंद्र दिवेकर, एम. ए., डी. लिट्. (पॅरिस) (जन्म ५-११-१८८५). सध्या वैदिक संशोधन मंडळ, पुणे येथे संशोधन व संपादनकार्य पूर्वी श्री. ना. दा. ठा. महिला पाठशाला, पुणे, व्हिक्टोरिया कॉलेज, ग्वाल्हेर यांमध्ये संस्कृतचे प्राध्यापक; उज्जैन कॉलेजचे प्राचार्य. भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे व ऑल इंडिया ओरिएंटल कॉन्फरन्स यांच्या स्थापनेच्या खटपटीत अंशभाग. सेवानिवृत्तीनंतरही मध्यभारत एज्युकेशन सोसायटीच्या कार्यांत प्रमुख भाग. पुणे, नागपूर व शिवाजी विद्यापीठात वेदांसंबंधी व्याख्याने. वेदविषयीचा पन्नास वर्षांचा सखोल अभ्यास. (८०, मित्रमंडळ कॉलनी, पर्वती, पुणे ९)

या देवी सर्वभूतेषु मातृरूपेण वर्तते ।
नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमो नमः ॥

## वेदकाळाची विस्तीर्णता : शंभर पिढ्या

वर दिलेल्या विषयावर काही लिहिण्यापूर्वी त्यातील शब्दांचे थोडे स्पष्टीकरण केले पाहिजे. पहिल्याच शब्दातील महाभारत म्हणजे त्या नावाने प्रसिद्ध असलेला ग्रंथ नव्हे, तर ज्या कौरव-पांडव युद्धाचे वर्णन लिहिण्यासाठी महाभारत ग्रंथाची रचना झाली ते युद्धच होय. हे युद्ध केव्हा झाले याबद्दल जरी विद्वानांत मतभेद असले तरी ही घटनाच घडली नाही, असे कोणीही म्हटलेले नाही. त्यामुळे प्राचीन इतिहासात ही घटना एक महत्त्वाचा टप्पा होऊन बसली आहे. आपल्या पुराण ग्रंथांत ह्या युद्धापूर्वी होऊन गेलेल्या जवळजवळ शंभर पिढ्यांचे वर्णन आहे. त्यातील काव्यात्मक भाग काढून टाकला तर त्याच्या मुळाशी परंपरागत इतिहासच सापडतो. हा निव्वळ काल्पनिक नाही. सुमारे शंभर पिढ्यांतील आणि बीसबावीस घराण्यांतील जवळजवळ आठशे राजांची व त्यांच्या कृत्यांची नमवार माहिती नुसत्या कल्पनेने देणे असंभाव्य आहे. त्यामुळे असे मानावेच लागते की जुन्या लोकांनी गोळा करून ठेविलेली आणि एकसारख्या परंपरेने प्राप्त झालेली माहितीच या पुराणेतिहासाच्या मुळाशी असली पाहिजे. म्हणून महाभारतपूर्व जीवनाचा विचार जर करावयाचा असेल तर या सुमारे शंभर पिढ्यांच्या कालखंडाचा विचार करावा लागेल.

महाभारतपूर्व शब्दाचे स्पष्टीकरण केल्यानंतर 'वेदकाल' म्हणजे काय ह्याचा विचार केला पाहिजे. आपल्या जुन्या काय किंवा नव्या काय, कुठल्याच संस्कृत वाङ्मयात हा शब्द सापडत नाही. पाश्चात्य संस्कृत पंडित ज्याला इंग्रजीत 'वेदिक पीरिअड' म्हणतात त्याचे हे मराठी रूप आहे. ह्या कालखंडाची अगदी अलीकडील मर्यादा म्हणजे स्थूल मानाने इ. स. पूर्वी ५०० ह्या पंडितांनी ठरविली आहे.[1] इ. स. पूर्वी ५०० च्या पलीकडे असलेला सारा कालखंड त्यांच्या मताने वेदकाल समजला पाहिजे. ह्या कालखंडापैकी आपणास केवळ महाभारतपूर्व कालाचाच विचार करावयाचा असल्याने कौरवपांडव युद्धाच्या वेळी वर्तमान असलेल्या वेदव्यासानंतरच्या काळाचा आपणास विचार करता येणार नाही. वेदांच्या संहिता सोडल्या तर बाकीचे सारे वैदिक वाङ्मय वेदव्यासानंतरचे आहे. आज आपल्यापुढे जे पुराणवाङ्मय आहे ते तर अगदीच अर्वाचीन काळात रचले गेले आहे. पण पुराणांतल्या घटना व व्यक्ती मात्र प्राचीन काळातल्या आहेत. एखादा ग्रंथ कुणी लिहिला, केव्हा लिहिला गेला अथवा कुठल्या भागात लिहिला गेला, इत्यादी गोष्टींवरून त्या ग्रंथात जे सांगितले आहे त्याचा काळ निश्चित करणे न्यायसंगत होत नाही. म्हणून महाभारतपूर्व वेदकालातील जीवन पाहावयाचे असेल तर ते निवळ यज्ञासाठी म्हणून रचल्या गेलेल्या वैदिक वाङ्मयात फारसे सापडणार नाही. असा प्रयत्न करणे म्हणजे शायकर आदी ग्रंथावरून युरोपचा इतिहास लिहिण्यासारखे आहे.[2] पण आपल्या प्राचीन जीवनाविषयी लिहिताना असेच केले गेले आहे. यासाठी आपले खरे प्राचीन जीवन समजून घ्यावयाचे असेल तर जुन्या वैदिक संहितांत न शिरता त्यातील माहितीस, जुन्या पुराणग्रंथात 'इति ह आस,' असे घडले म्हणून जे सांगितले आहे त्याची जोड दिली पाहिजे.

महाभारत युद्धापूर्वीच्या एवढ्या अफाट कालखंडातील जीवनाचा विचार करताना आपणांसी एक अडचण वाटते ती अशी की, एवढ्या मोठ्या कालखंडातल्या आरंभाच्या आणि शेवटच्या घटना जर एकत्रित झाल्या तर त्यातून प्रकट होणारे जीवनविषयक चित्र डोळ्यापुढे उभे राहात नाही. ह्यासाठी त्या कालखंडाची पुढीलप्रमाणे विभागणी केली आहे. वैवस्वत मनूपासून पांडव धर्मराजापर्यंतचा काळ विषयाच्या सोयीसाठी असा विभागला आहे:—

| | |
|---|---|
| १ मनु ते ययाति | पिढ्या ८ |
| २ ययाति ते यदु | पिढ्या १६ |

---

१. Vedic Index of Names and Subjects by Macdonell and Keith. Preface : Chronological Limits—The Lower Limit of the Vedic Period is the epoch of the rise and spread of Buddhism or roughly 500 B. C.

२. F. E. Pargiter's Ancient Indian Historical Tradition, Ch. 1, P. 14

| | | |
|---|---|---|
| ३ जन्हु ते त्रिशंकु | पिढ्या १० | |
| ४ त्रिशंकु ते भरत | पिढ्या १० | |
| ५ भरत ते हस्तिन | पिढ्या ९ | |
| ६ हस्तिन् ते राम | पिढ्या १५ | |
| ७ राम ते कुरु | पिढ्या ६ | |
| ८ कुरु ते प्रतीप | पिढ्या १६ | |
| ९ प्रतीप ते धर्मराज | पिढ्या १० | एकूण १०० |

या कालखंडात होऊन गेलेल्या स्त्रियांचे जीवन आपण पाहिले म्हणजे महाभारतपूर्व वेदकालातील स्त्रीजीवनाची आपणास कल्पना येईल व स्त्रीजीवनाचा विकास कसकसा होत गेला हेही स्पष्टपणे समजेल.

## १. प्रथम कालखंडातील प्रसिद्ध स्त्रिया

ह्यापैकी पहिले तीन कालखंड संपेपावेतो ऋग्वेदरचनेस आरंभच झाला नव्हता. गायत्री हा ऋग्वेदाचा आद्य मंत्र आहे.[1] तो ज्या ऋषीस स्फुरला तो विश्वामित्र त्रिशंकु राजाच्या वेळचा आहे. म्हणून हे तीन कालखंड म्हणजे जवळ जवळ चौतीस पिढ्यांचा काल ऋक्पूर्व कालात मोजला जातो. त्यापैकी पहिल्या म्हणजे ययाति राजापावेतोंच्या कालखंडात पुढील आठ स्त्रिया प्रसिद्ध आहेत. त्या म्हणजे इला, उर्वशी, दानवी, विरजा, जयन्ती, देवयानी, शर्मिष्ठा व गौ. आता आपण त्यापैकी प्रत्येकीचे जीवन पाहू.

इला ही मनूची मुलगी. पुराणेतिहासात ज्ञात असलेली ही पहिली स्त्री. त्या काळी बापाच्या मिळकतीत मुलींना वाटा नसे. ही गोष्ट ऋग्वेदसूक्तात नमूद आहे.[1] त्यामुळे मनूची मिळकत जेव्हा इक्ष्वाकुस मिळाली तेव्हा ही घराबाहेर पडली व स्वतःच आपले लग्न जमवून राहू लागली. हिच्या मुलाचे नाव पुरूरवा. मातेच्या प्रेरणेने गंगा-यमुना संगमाजवळ गंगेच्या उजव्या तीरावर नव्हे, तर डाव्या तीरावर स्वपराक्रमाने प्रतिष्ठान नावाच्या नगराची याने स्थापना केली. इलापुत्राचे हे राज्य मनुपुत्र इक्ष्वाकूच्या अयोध्या-राज्यापेक्षाही त्या काळी सरस होते. हे नगर कालिदासाच्या कालापर्यंत प्रसिद्ध होते.[3] हे सारे इलेमुळेच झाले म्हणून पुरूरवा आपणास 'ऐल' म्हणवीत असे. पितृनामाने प्रसिद्ध न होता हा मातृनामानेच प्रसिद्धी पावला. त्यावरून इलेची कर्तबगारी चांगलीच समजून येते.

ह्या पुरूरव्याशी लग्न करणारी 'उर्वशी' नावाची गंधर्वकुलातील स्त्री होती. हिने

१. ऋग्वेद त्रिसप्तक ३३ – १९.

२. ऋ. ३. ३१-२

३. कालिदास 'विक्रमोर्वशीय' दुसरा अंक, चित्रलेखेचे 'सखि मेघस्व' हे वाक्य

आपले लग्न स्वतःच ठरविले, एवढेच नव्हे, तर ते हिच्या कुळात जी पद्धती प्रचलित होती तदनुरूप ठरविले. या विवाहास गांधर्वविवाह म्हणतात. गंधर्व, दानव, देव ही मानवकुलासारखीच आरंभी निरनिराळी कुळे होती. कालांतराने ही सारीच मानवकुलात समाविष्ट झाली. गांधर्वविवाहात पुरुषाबरोबर राहण्यासाठी स्त्री विशिष्ट अटी घाली व पुरुषाने त्या मोडल्या तर ती त्यास सोडून जाते. ही गोष्ट शतपथ ब्राह्मणाच्या कालापर्यंत माहीत होती.[1] पुरूरव्याने अट मोडताच उर्वशी त्यास सोडून गेली. लग्नाच्या बाबतीत स्वतःवर बंधन घालण्याची आवश्यकता पुरुषास कधीच वाटली नाही. पुरुषावर बंधन घालण्याची आवश्यकता स्वाभाविकपणे स्त्रीसच वाटावयाची. कारण लग्नाचे परिणाम स्त्रीसच अधिक भोगावे लागतात, आणि म्हणून त्या परिणामास जबाबदार असून जो मोकळा राहू शकतो त्यावर बंधन घालण्याची कल्पना स्त्रीसच प्रथम सुचणे स्वाभाविक आहे.

उर्वशीचा मुलगा आयु. उर्वशीने सुरू केलेली गांधर्वविवाहाची प्रथा हळूहळू रूढ होत होती. पण आईने वडिलांस सोडल्यावर आपल्या पित्याची वेड्यासारखी स्थिती कशी झाली व त्यास आपल्या राज्यास व प्राणास मुकावे लागले[2] हे पाहिल्यामुळे त्याचा परिणाम आयूचे मनावर होणे अगदी साहजिक होते, म्हणून या एकतर्फी — पुरुषास तेवढ्या शर्ती व स्त्री बिनशर्त — पद्धतीविरुद्ध त्याचे मन विटले व शेजारच्या दानवकुळातली दानवी प्रभा नावाची मुलगी त्याने जबरदस्तीने हरण करून आणली व तिच्याशी लग्न[3] केले. जबरदस्तीने धरून आणलेल्या स्त्रीशी केलेला पुराणेतिहासातील हा पहिलाच विवाह.

आयूच्या मुलाचे नाव नहुष होते. गांधर्वविवाहाप्रमाणेच मानवकुलात अशी जबरीची लग्नेही लागू लागली. पण नहुषाच्या हे लक्षात आले असावे की अशी बलात्काराने झालेली लग्ने गृहसौख्यास उपयोगी पडत नाहीत. सबब त्याने एक अशी कुमारी शोधली की जिचे लग्न होत नसल्यामुळे बापाच्या घरीच राहून ती मोठी झाली होती. हिचे नाव विरजा होते. अशा रीतीने लाचार झालेल्या विवाहकांक्षिणीस स्वतःच्या अटी घालणे शक्यच नव्हते. नहुषाने विचारताच तिने स्वीकार केला व या दोघांचे लग्न झाले.[4]

दानवकुळात वृषपर्वा नावाचा राजा होता व त्याचा पुरोहित मानवकुळातला शुक्राचार्य नावाचा होता. देवकुळातल्या एका स्त्रीने आपल्या सौंदर्याने शुक्राचार्यास जिंकून त्याच्याशी लग्न केले होते. हिचे नाव जयन्ती होते.[5] व हिच्यापासून शुक्राचार्यांस

१. शतपथ ब्राह्मण ११ – ५ – १
२. वायुपुराण ९ – १४ ते २३
३. ब्रह्मांड पुराण ३ – ५, ८, २३ – २८
४. वायुपुराण ९३ – १२
५. मत्स्यपुराण ४७ – ११४ ते १२१

जी मुलगी झाली तिचे नाव देवयानी होते. देवयानीच्या बालपणीच जयंती आई तिला सोडून गेली. ही मातृविहीन कन्या शुक्राचार्यांची अत्यंत लाडकी होती. आपल्या पित्याजवळ विद्या शिकावयास आलेल्या एका देवकुलातील गुरुपुत्रावर—कचावर—हिचे प्रेम बसले. पण त्याने हिला झिडकारून टाकले. हिची कथा सर्वविश्रुत आहे. प्रेमभंगामुळे लाचार झालेल्या देवयानीची नहुषपुत्र ययातीशी गाठ पडताच तिने त्यास वरिले. ययातीने केवळ हिच्याशीच नव्हे तर हिच्याबरोबर आलेल्या वृषपर्वा राजाच्या शर्मिष्ठा नामक कन्येशीही लग्न लावले. पुराणेतिहासात एकाच वेळी दोन स्त्रियांशी लग्न लावणारा हाच पहिला पुरुष.

देवयानी पतिगृही गेल्यानंतर शुक्राचार्यांस साहजिकपणेच एकएकटे वाटू लागले. हे एकाकीपण घालविण्यास त्यांनी विरजेशारख्याच लग्न न होता पितृगृही वाढलेल्या एका स्त्रीस आपली सहचारिणी करण्याचा विचार केला व तिच्याशी विवाह लावला.[1] जयंतीचा जसा शुक्राचार्यांवर दाब होता तसा हिचा राहणे शक्यच नव्हते. उलट शुक्राचार्यांचाच दाब हिच्यावर होता. त्यामुळे एकशृंगा नाव असलेल्या हिचे जे नाव प्रसिद्ध झाले ते होते 'गौः' म्हणजे 'गरीब गाय'.

## २. दुसरा कालखंड : विवाह स्वातंत्र्यावर बंधने

प्रथम कालखंडातील हे स्त्रीजीवन पाहिल्यानंतर आपण द्वितीय कालखंडाकडे वळू. हा कालखंड पहिल्या कालखंडाच्या दुप्पट मोठा आहे. या काळात फारशा घडामोडी झाल्या नाहीत. ययातीचे प्रतिष्ठानचे राज्य, शर्मिष्ठेच्या पूरु नावाच्या मुलास मिळाले व ययातीच्या दुसऱ्या चार मुलांनी आपली स्वतंत्र राज्ये स्थापन केली. अनिवगांने पंचनद प्रांती व भृगुगणांने माळवप्रांती लोकराज्ये स्थापन केली. एवंच नर्मदेच्या उत्तर भागात त्या काळी सर्वत्र शांतता नांदत होती. हामुळेच त्या काळचे वर्णन, घडामोडी नमूद करणाऱ्या पुराणेतिहासात फारसे सापडत नाही. शांततेच्या या काळातच घोडे माणसाळले गेले, रथ तयार केले गेले व या दोन्ही गोष्टींचा सेनेत पायदळाप्रमाणेच समावेश झाला. पण फौजेची जसजशी वाढ होऊ लागली तसतशी राजेलोकांची विजिगीषा वाढत गेली व एक राज्यकर्ता दुसऱ्यावर स्वारी करू लागला. त्यामुळेच त्या कालखंडातल्या शेवटच्या पानचार पिढ्यांचे वर्णनच पुराणेतिहासात अधिक दिलेले आहे. तेव्हा तिकडेच आता दृष्टी वळवू.

पूरुपासून अठराव्या पिढीत रौद्राश्व नावाचा पौरव राजा होऊन गेला. हा आपल्या घोडदळाबद्दल फार प्रसिद्ध होता. याच्या वेळी स्त्रियाही घोड्यावर बसून, अश्वारोही स्त्रियांची तुकडी त्याच्या सैन्यात होती. त्याने पंचनदातील लोकराज्यावर चढाई केली. पण हे प्रभावर आनेवाच्या देखरेखीखाली इतक्या चांगल्या रीतीने चालले होते की

---

१. वायुपुराण ९३–१४

रौद्राश्वाचे काही चालले नाही व एवढेसे तोंड घेऊन त्यास परत यावे लागले. मात्र परतताना याच्या मुली पंचनदातच राहिल्या. त्या प्रभाकराच्या पराक्रमावर इतक्या भाळल्या की त्यांनी साऱ्यांनी प्रभाकराजवळच विवाहबद्ध होऊन राहावयाचे ठरविले.[१] ह्या स्त्रियांपासून प्रभाकरास जी मुले झाली ती 'स्वस्त्यात्रेय'–सुखाने राहणारे आत्रेय–म्हणून प्रसिद्ध झाली.[२]

रौद्राश्वाचा नातू मतिनार नावाचा होता. यावर जेव्हा कोसलनरेश प्रसेनजिताने चढाई केली तेव्हा याने आपली गौरी नावाची कन्या प्रसेनजिताच्या युवनाश्व नावाच्या मुलास देण्याचे कबूल करून तह केला व तेवढ्या वेळेपुरते आपले राज्य वाचविले.[३] राजकारणी दृष्टीने झालेला हा पुराणेतिहासातील पहिलाच विवाह होय. यापूर्वी जे विवाह झाले होते त्यात बापाची अनुमती कदाचित घेतली गेली असेल, पण बापाने ठरविलेला व मुलीने मान्य केलेला हा पहिलाच विवाह होता. ह्या विवाहाने गौरीची प्रसिद्धी बरीच झालेली दिसते. कारण हिचा मुलगा मांधाता हा पितृनामावरून जसा 'यौवनाश्व' म्हणून प्रसिद्ध झाला तसाच गौरीचा मुलगा म्हणून 'गौरिक' ही म्हणविला गेला. पण गौरीचा हा स्वार्थत्याग व्यर्थच ठरला. हिच्याच मुलाने–मांधात्याने–आपल्या माना मरताच मतिनाराचे राज्य कोसल राज्यात सामील केले. मतिनाराचे राज्य जरी टिकले नाही, तरी मुलगी देऊन तह करण्याची प्रथा मात्र टिकली. कारण मांधात्याने नर्मदेपर्यंत राज्य वाढवून नागराजावर जेव्हा स्वारी केली तेव्हा नागराजाने आपली मुलगी मांधात्याच्या मुलास देऊन तह केला.[४] या मुलीचे नावही नर्मदाच होते. हीच पाळी, ज्या मांधात्याचे पुरुकुत्स नावाच्या मुलास नर्मदा दिली गेली, त्याच्यावरही आली. कान्यकुब्जराज जह्नूने जेव्हा कोसल राज्यावर चढाई केली तेव्हा पुरुकुत्सालाही आपली मुलगी देऊनच तह करावा लागला.[५]

याप्रमाणे या दुसऱ्या कालखंडातील स्त्रीजीवन आपण पाहिले. या कालखंडाच्या अखेरीस विवाहाचे बाबतीत जी स्वतंत्रता स्त्रीला पूर्वी होती, ती सारी नाहीशी होऊन मुलीवर बापाचा हक्क आहे व तो त्याच्याशी विवाह लावून देईल तो पति निमूटपणे मान्य करणे हेच स्त्रीचे कर्तव्य मानले जाऊ लागले. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे मुलगी ही बापाची मिळकत समजली जाऊ लागली. कन्यादान हा शब्द हळूहळू रूढ झाला. या गोष्टीस कारण तत्कालीन परिस्थिती झाली. राजेलोकांनी फौजा वाढवून एकमेकांवर स्वाऱ्या करण्यास जेव्हा आरंभ केला तेव्हा देशातील शांतता नष्ट झाली व अशांततेच्या

१. वायुपुराण ९९–१२० ते १२७
२. विष्णुपुराण ४–११–१
३. वायुपुराण ९९–१३९
४. विष्णुपुराण ४–३ ते १२
५. ब्रह्मपुराण १०–११४ ते

काळात शारीरिक शक्तीने पुरुषांशी तुल्यबळ नसणाऱ्या स्त्रियांचे रक्षण करण्याची जबाबदारी पुरुषावर पडली. स्वाभाविकपणेच अविवाहित मुलींचे रक्षण पित्यास करावे लागले आणि रक्षक म्हणून रक्षितावर त्याचा अधिकार मान्य झाला.

## ३. तिसरा कालखंड : रेणुकेची शोकांतिका

आपण केलेल्या तिसऱ्या कालखंडाचे आरंभीही हीच अशांतता पसरली होती. माल्व आणि पंचनद दोन्ही देशांतील लोकशासित राज्ये नष्ट होऊन तेथेही राजसत्ता सुरू झाली व अत्रिवर्गास व भृगुवर्गास लहानलहान आश्रम स्थापून राहावे लागले. यातल्याच एका अत्रिवर्गातील पुरुषाचे भृगुवर्गातील एका स्त्रीशी लग्न झाले होते. कुठलीही सत्ता न जुमानणे व समभावाने राहणे या गोष्टी लोकराज्ये स्थापन करणाऱ्या उभय वर्गांच्या अंगवळणीच पडलेल्या होत्या. त्यामुळे ह्या दोघांनी असे ठरविले, की कुणीच कुणावर अटी घालावयाच्या नाहीत. व स्त्री आणि पुरुष दोघांनीही 'सह धर्मं चरावः' अशी शपथ घेऊन सहधर्मी नात्याने वागावे. यामुळे कुणाच्याच मनात असूया नसे व यामुळेच या स्त्रीचे नाव अनसूया पडले. हिच्या या सरळ असूयारहित व पतीशी समानधर्मी वागणुकीचा असा प्रभाव होता की विषयलालसा धरून आलेले मोठमोठे पुरुषही हिच्यापुढे येताच त्यांची ती दुर्वासना जिरून ते हिच्याशी बालभावाने वागू लागत. दत्तात्रेयजन्माचे काव्य अनसूयेच्या याच गोष्टीवर उभारले आहे.[१]

अत्रिवर्गाचे लोक जरी ह्याप्रमाणे शांत राहिले, तरी भृगुवर्ग असा राहिला नाही. त्यामुळे शासनकर्त्यांपासून त्यांस त्रास भोगावा लागला. त्यांस रानावनातही राहावे लागले. त्यापैकीच एका भृगु पुरोहित पत्नीस विंध्यवनात एक मुलगा झाला. प्रसूतिसमयी धड वस्त्रही जवळ नसल्याने तिला ऊर्वी म्हणजे जमिनीवरच प्रसूत व्हावे लागले आणि त्यामुळे मुलाचे नावच और्व पडले. एकदा रानात लाकूड वाकवीत असता त्याच्या हातून ते निसटून दूर उडाले. त्यावरून और्वाने धनुष्यबाणाची कल्पना काढली व त्यात तो प्रवीण झाला. ही धनुर्विद्या त्याने आपल्या ऋचीक नावाच्या मुलास शिकविली व ऋचीकाने ती कोसलराजास व नंतर कान्यकुब्ज राजास शिकविली. कान्यकुब्ज देशात त्या काळी गाधि नावाचा राजा राज्य करीत होता. गाधीच्या सत्यवती नावाच्या मुलीवर ऋचीकाचे मन बसले आणि त्याने गाधीजवळ तिची मागणी केली. मुलगी हवी असेल तर ऋचीकाने काही घोडे मिळवून द्यावे अशी अट गाधीने घातली. ऋचीकाने कोसल राजाजवळून घोडे मिळवून गाधीस दिले व सत्यवतीशी लग्न लाविले.[२] काहीतरी मोबदला घेऊन मुलगी देण्याचा प्रघात येथून सुरू झाला. ह्या और्वपुत्र ऋचीकास सत्यवतीपासून जो मुलगा झाला त्याचे नाव जमदग्नी होते. हा अत्यंत क्रोधी

---

१. मार्कंडेय पुराण १७—६ ते १६

२. ब्रह्मपुराण, १०—२८ ते ४९

होता. यांनीही फार धन देऊन रेणुका नावाच्या कोणत्या राजकुलातील एका मुलीशी लग्न लाविले. धन देऊन घेतलेल्या पत्नीवर पतीची किती सत्ता चाले याचे रेणुका हे उत्तम उदाहरण आहे. पतीबरोबर आश्रमात राहात असताना एकदा हैहयराज कार्तवीर्य सहस्रार्जुन याच्या आश्रमात आला. आश्रमात रेणुका एकटीच होती. सहस्रार्जुनाने तिच्याशी अतिप्रसंग करण्याचा प्रयत्न केला. पण तितक्यात जमदग्नीस येताना पाहून तो निघून गेला. या संशयावरून जमदग्नीने आपल्या परशुराम नावाच्या मुलास रेणुकेला मारून टाकण्याची आज्ञा केली व परशुरामाने पित्राज्ञेने मातेस ठार केले. पुढे पतीने अट मोडली म्हणून त्यास सोडून जाणारी उर्वशी व कुठे केवळ संशयावरून शिरास मुकणारी मूक रेणुका! या तीन कालखंडांत स्त्रीजीवन कुठून कुठे येऊन पोचले.

## ४, ५. स्वावलंबनाकडे वाटचाल : पुनर्विवाह आणि स्वयंवर

जमदग्नी व विश्वामित्र हे त्रिशंकुचे समकालीन होते. आपल्या चौथ्या कालखंडाचा येथूनच आरंभ होतो. विश्वामित्रालाच गायत्री मंत्र स्फुरला. हीच रचली गेलेली पहिली ऋचा. वेदकालास येथून आरंभ होतो. परशुरामाने हैहयांचा पराभव निरनिराळ्या एकवीस ठिकाणी ह्या कालखंडात केला. ह्या काळी स्त्रियांचे पारतंत्र्य इतके वाढले की पती मरताच त्या मृतप्राय समजल्या जाऊ लागल्या व असे जीवित कंठण्यापेक्षा पतीबरोबर सती म्हणून त्या आपणास जाळूनही घेऊ लागल्या.

या कालखंडातच आता आपणास सती जाण्यासाठी निघालेल्या एका स्त्रीची जीवनकथा पाहावयाची आहे. ह्या स्त्रीचे नाव ममता. उचथ्य नावाच्या एका ऋषीशी हिचे लग्न झाले होते. लग्नानंतर हिला एक मुलगा झाला पण तो आंधळा होता. त्यामुळेच दीर्घतमा म्हणजे 'ज्याच्या दृष्टीपुढे लांबच लांब अंधार पसरला आहे' हे त्याचे नाव पडले. हा अगदी लहान होता तेव्हाच उचथ्य कालवश झाला व आंधळ्या मुलासह पतिहीन जीवित भारभूत वाटून ममता सती जाण्यास निघाली. चितेवर चढलेल्या हिला हात धरून बृहस्पती नावाच्या उचथ्याच्या धाकट्या भावाने, म्हणजेच ममतेच्या

होती. वैदिक शब्दांचा व स्वरांचा उच्चार नीट व स्पष्टपणे करण्याच्या बाबतीत त्या काळी ही उपमानभूत झाली होती.

ममतेच्या ह्या पुनर्विवाहाने ममता व बृहस्पती दोघांनाही खूप प्रसिद्धी मिळाली. वैशालीच्या मरुत्त राजाने बृहस्पतीस आपल्या येथे यज्ञकर्म चालविण्यासाठी बोलाविले. पण बृहस्पतीने स्वतः न जाता आपल्या संवर्त नावाच्या धाकट्या भावास तेथे पाठविले. त्याच्या विद्वत्तेवर मरुत्त इतका संतुष्ट झाला की त्याने आपली मुलगी संवर्तास दिली. वराच्या विद्येवर संतुष्ट होऊन त्यास मुलगी दिल्याचे हे पहिलेच उदाहरण सापडते. त्यावरून त्या काली विवाहाचे सारे प्रकार समाजात रूढ होते असे म्हणावयास हरकत नाही. अग्नीने अट घालून केलेला, स्त्री व पुरुष दोघांनी स्वखुशीने मिळून केलेला, स्त्रीस जबरीने हरण करून होणारा, आपल्या फायद्यासाठी बापाने घडवून आणलेला, मुलीचा मोबदला घेऊन होणारा आणि बापाच्या खुशीवर अवलंबून राहाणारा हे सारे प्रकार ह्या काळी आपणास पहावयास सापडतात.

ममतेच्या पुनर्विवाहाने स्त्रियांस स्वतंत्रता मिळाली व तिचा उपयोग करून पती-पासून संतती होत नसेल तर दुसऱ्या पुरुषाकडूनही त्या संतती प्राप्त करून घेऊ लागल्या. या विधीस त्या काळी नियोगविधी असे नाव असे. त्यामुळे स्त्रीपुरुष संबंध थोडेसे ढिले झाले व त्याकडे कानाडोळाही होऊ लागला. मरुत्तकन्या व मग संवर्तपत्नी झालेल्या स्त्रीशी ममतेचा वडील अंध मुलगा दीर्घतमा याचा असा झालेला संबंध पुराणेतिहासात नमूद आहे. दीर्घतमा अंध असला तरी दिसण्यात फार देखणा असल्या-मुळे ह्या बाबतीत त्याचे नाव अनेक ठिकाणी गोवलेले सापडते.[1] अनैतिक संबंधाने झालेल्या संततीस स्त्रिया टाकूनही देत व आपल्या व्यवसायात मग्न होत.

अशाच प्रकारे टाकून दिलेल्या एका मुलीचे रक्षण कण्व नावाच्या ऋषीने केले. रानात टाकून दिलेल्या या नवजात मुलीच्या सभोवती पक्षी चिवचिव करीत होते व म्हणूनच तिला शकुंतला म्हणू लागले. शकुंतलेची कथा सर्वविश्रुत आहे. मांधात्याने कोसल राज्यात सामील केलेले पौरव राज्य सगराच्या काळी पुन्हा दुष्यन्त राजाने मिळविले. शकुंतलेच्या कथेशी निगडित असलेला दुष्यंत हाच होय. आश्रमात अज्ञातपणे झालेले शकुंतलेचे लालनपालन, अनेक स्त्रिया असलेल्या दुष्यंतासारख्या राजाचा तेथ झालेला प्रवेश, शकुंतलेचे त्यावर मन जडणे, त्याचा घडलेला परिणाम, पुढे दुष्यंताकडे गेल्यावर त्याने साऱ्याच गोष्टी नाकारणे आणि शेवटी मुलासह तिचा केलेला स्वीकार, ह्या साऱ्याच गोष्टी स्त्रीचे जीवन कसे असते हे दाखवितात आणि 'उत्पन्ना हि दारेषु प्रभुता सर्वतोमुखी'[2] स्त्रियांवर सर्व प्रकारची पुरुषी सत्ता कशी चालत असे हे दर्शवितात. या शकुंतलेचाच मुलगा सम्राट भरत झाला. याच्याच राज्यास प्रथम 'भारत'

---

१. वायुपुराण ९९–१६ ते २४ आणि ४७ ते ९७; ब्रह्मपुराण १३–२१ ते ३१

२. कालिदासकृत शाकुंतल ५–२९

हे नाव मिळाले. तेच पुढे वाढत वाढत भारतवर्ष, भरतखंड म्हणून प्रसिद्ध झाले.

याच कालखंडाच्या शेवटी शेवटी लोपामुद्रा होती. ही विदर्भ राजाची मुलगी आणि राजा सगराची मेहुणी होती. अनेक दुर्गम ठिकाणे पाहून आलेल्या अगस्त्य-ऋषीवर तिचे मन जडले व पित्याच्या अनुज्ञेने हिने त्याच्याशी लग्न केले. पतीबरोबर विंध्य पर्वताचे दक्षिणेस घेट दक्षिण समुद्रापर्यंत ही फिरून आली. शेवटी काशीच्या उत्तरेस गंगातटाकी आश्रम बांधून हे दांपत्य राहिले. त्या उभयतांच्या प्रवासानेच आपणास दक्षिणेस असलेल्या प्रदेशांचे प्रथम ज्ञान झाले आणि अगस्त्याच्या पराक्रमामुळेच पावसाळ्याच्या शेवटापासून दक्षिण दिशेस दिसत असलेल्या एका ठळक ताऱ्यास आपण अगस्त्य हे नाव दिले.

भरतापासून हस्तिनूपर्यंतचा काळ शांततेचा होता. अयात्तनेच्या काळात स्त्रियांचे जीवन जे पूर्णपणे परावलंबी झाले होते ते वेदकाळाच्या या दोन्ही खंडांत पुष्कळच स्वावलंबी झाले. ह्या काळातच स्वयंवर प्रथा अस्तित्वात आली. अनेक तरुणांस एका ठिकाणी बोलवावयाचे व तेथे सर्वांसमोर मुलीने वर निवडून त्याचे गळ्यात माळ घाल-पयाची हिचे नाव स्वयंवर पद्धती. या कालखंडाच्या शेवटी विदर्भराजा भीमकाने आपली कन्या दमयंती हिचे स्वयंवर या पद्धतीने घडवून आणले. तिने जमलेल्या लोकांतून नळ-राजास वरिले व त्याचे बरोबर ती विदर्भातून निषध देशी गेली. दमयंतीच्या कथेवरून एक गोष्ट आपणास समजते ती ही की त्या काळी पतीचा मृत्यू एवढे एकच कारण पुनर्विवाहास आवश्यक समजले जात नसे. बरेच दिवस पतीचा पत्ता नसेल तर त्या स्थितीतही पत्नीस पुनर्विवाह करावयाची मोकळीक होती आणि तीही गौण म्हणून नव्हे तर पूर्वीप्रमाणे राजरोस स्वयंवर करून दुसरा पती वरण्याची असे. विदर्भ राजाने पुनः स्वयंवराची निमंत्रणे पाठविली होती यावरून ही गोष्ट स्पष्ट होते.

हस्तिनूपासून रामापर्यंतचा पवरा पिढ्यांचा काळ ऋग्वेद दृष्टीने फार महत्त्वाचा आहे. हस्तिनूने हत्ती हा प्राणी माणसाळवला व त्याचा सैन्यात समावेश केला. हस्तिनापूर नगरही त्यानेच वसविले. तेथून ह्या कालखंडास आरंभ होतो. ह्या कालखंडात अत्री व कण्व या दोन कुळातल्या ऋषींनी अनेक सूक्ते रचिली. कण्व कुळातले ऋषी तर भारता-बाहेर बायल्बेकडील देशात गेले व तिकडे त्यांनी आपली यज्ञसंस्कृती व देव ह्यांची प्रसिद्धी केली. त्या देशातील राजाकडून दक्षिणा मिळविली. ह्या दक्षिणेत आपल्या ऋषीस त्या बाजूच्या वाळवंटमय देशात अत्यंत उपयुक्त असे उंट तर मिळालेच[1] पण अनेक तरुण मुलीही[2] दक्षिणा म्हणून मिळाल्या. त्या मुली ह्या ऋषींबरोबर राहात. असे दिसते की त्या प्रांती मोठमोठे वनानखाने त्या राजाचे पदरी असत व त्यांपैकीच मुली ते आपल्या ऋषींस दक्षिणा म्हणून देत. ह्या स्त्रीवर्गाचा परिणाम

---

१. ऋग्वेद ८–५–३७, ८–६–४८
२. ऋग्वेद १–१२६–३, ८–१९–३६

आपल्या संस्कृतीवर बराच झाला आणि बहुपत्नीकत्व त्या काळापासून मोठ्या प्रमाणावर प्रचलित झाले.

## ६. कार्यक्षेत्र विस्तारले : यज्ञकर्मात भागीदारी

हस्तिनपूर्वीच्या कालखंडात स्त्रियांचे जीवन म्हणजे लग्न आणि प्रजासंवर्धन इतक्यापुरतेच मर्यादित होते. पण या सहाव्या कालखंडात त्या पुरुषांबरोबर यज्ञकर्मात भाग घेऊ लागल्या.[1] यजमान व यजमानपत्नी मिळून यज्ञ करू लागताच देवाच्या पत्नीस बरोबर आणण्यासाठीही अग्नीची प्रार्थना होऊ लागली.[2] अग्नीने स्वतः तर लग्न करावेच पण ज्यांची लग्ने झाली नसतील त्यांसही सपत्नीक करावे असे अग्नीस सांगितले जाऊ लागले.[3] हा पत्नीवंत देवाच सोमरस अर्पण केला जाऊ लागला. इंद्र, अग्नी, अश्विनी, रुद्र व वरुण यांच्या स्त्रियांस इंद्राणी, अग्नायी, अश्विनी, रोदसी आणि वरुणानी अशी नावे दिली गेली.[4] आणि जे देवांचे तेहतीस गण मानले गेले होते त्या सर्वांसच सपत्नीक करण्यात आले.[5] ह्याप्रमाणे पुरुषांच्या बरोबरीने यज्ञकर्मात स्त्रियांस वाटा मिळू लागला.

महिलोन्नतीची ही चळवळ येथेच थांबली असे नाही. पुरुषांच्या प्रमाणेच आता स्त्रियाही सूक्ते रचू लागल्या. अपाला व विश्ववारा नावाच्या अत्रिकुळातल्या दोन स्त्रियांनी सूक्ते रचिली व स्त्रियांस या कामी वाट करून दिली. अपाला ऋषिकेने रचलेले इंद्रसूक्त[6] तर एक अत्युत्कृष्ट ध्वनिकाव्य आहे. पण '×× गीतानि काव्यानि' म्हणणाऱ्या, वेद व काव्य यांचा उभा दावा आहे असे समजणाऱ्या आणि म्हणूनच कालिदास कवीकडून 'वेदाभ्यासजड' म्हणवून घेणाऱ्या वैदिक टीकाकारांनी ह्या सूक्ताचा अर्थ करताना त्या सूक्तातला व्यंग्यार्थ न समजता नुसत्या वाच्यार्थाचे आधारावर त्या सूक्तास नुसते नीरसच नव्हे तर असुरस करून टाकिले आहे. विश्ववारेचे सूक्त[7] तर स्त्रीसुलभ भावनांनी पूर्णपणे भरलेले आहे. आज विवाहित स्त्री आपल्या नावापूर्वी जो शब्द लावण्यास चुकूनही चुकत नाही तो 'सौ' हा शब्द विश्ववारेने प्रयुक्त केलेल्या सौभग शब्दापासूनच निघालेला आहे. ह्या ऋषिकेच्या समोर जे स्त्रीजीवन दिसत होते त्यात पुरुषांनी अनिर्बंध भोगतृष्णा व स्त्रियांची प्रतिकार करण्याची अक्षमता दिसत

---

१. ऋग्वेद ३–२८–४
२. ऋग्वेद १–२२–९
३. ऋग्वेद १–१४–७
४. ऋग्वेद ५–४६–८
५. ऋग्वेद ३–२८–१ व २
६. ऋग्वेद ८–९१
७. ऋग्वेद ५–२८

दिसली व तिचे हृदय आमूलाग्र उठले की, 'हे अग्निदेवा, स्त्रीपुरुष संबंधाचे फार चांगल्या रीतीने आणि सुसंस्कारपणे नियमन कर.' माता होताना आईला जे दुःख सहन करावे लागते ते पाहून विश्ववारेचे हृदय द्रवले, कळवळले व त्यातून ही नियमनाची हाक बाहेर पडली हे ध्यानात ठेवण्यासारखे आहे.

अज व इंदुमतीचे स्वयंवर याच कालखंडात झाले. हे, स्वयंवर शब्दाच्या खऱ्या अर्थाने स्वयंवरच होते. यानंतर स्वयंवर शब्द राहिला पण दोन विधांनच त्यात किती अंतर पडले ते पाहाण्यासारखे आहे. सीतेचे स्वयंवर नावाचेच स्वयंवर होते. तिच्या जनकाने पण ठरविला होता की त्याचा घरात जे माहेश्वर धनुष्य होते त्यास वाकवून जो कोणी दोरी चढवील त्यास सीता दिली जाईल. म्हणजे हे स्वयं-वरण नसून सामर्थ्य-परीक्षण होते. रावणास तो पण पुरा करता आला नाही, ही गोष्ट निराळी. पण रावण तो प्रयत्न करीत असता सीतेस काय वाटले असेल किंवा रावण सफल झाला असता तर तिची काय अवस्था झाली असती याची कल्पना करणे कठीण नाही. तिला विचारीत निमूटपणे रावणाकडे जावेच लागले असते. त्यास स्वयंवर नाव लावणे अन्वर्थक तर नव्हेच पण निरर्थकही नाही, अनर्थकच आहे.

मुलीस वारस समजत नसत हे पूर्वी सांगितलेच आहे. पण या कालखंडाच्या शेवटी एक नवीन प्रथा सुरू झाली. नियोगविधीचा उल्लेख मागे केलाच आहे. पण त्याच्याच निपुत्रिका स्त्रिया नियोगविधीस तयार नसत. ह्यामुळे मुलीस पुत्रिका म्हणून तिचा विवाह करावयाची प्रथा रूढ झाली. या विवाहात अशी अट घातली जात असे की मुलीस मुलगा झाला तर तो आपल्या पित्याचे घरी न राहता त्याने मातामहाकडे राहावयाचे व तो त्याच्या संपत्तीचा वारस व्हावयाचा. हे लग्न झाल्यानंतर जर मातामहास मुलगा झाला तर मग ती मुलगी पुत्रिका मानली न जाता इतर मुलींसारखीच मानली जाई. दशरथाने एक मुलगी अशी मानली होती. पण पुढे त्याच्या तीनही राण्यांस मुलगे झाल्यामुळे तिला पुत्रिका म्हणून राहावे लागले नाही.

अहल्या याच कालखंडातली होती. ही उत्तर पांचालच्या दिवोदास राजाची बहीण होती आणि हिचे लग्न शरद्वान नावाच्या एका गौतम कुळातील ऋषीशी झाले होते. हिच्याकडून एकदा चुकून व्यभिचार कर्म घडले व त्यासाठी हिच्या पतीने हिचा एखाद्या शिळेसारखा त्याग केला. विश्वामित्राचे यज्ञसंरक्षण करून जनकाकडे जात असताना रामाचे पाय त्या ठिकाणास लागले व या आनंदोत्सवात अहल्येची शिक्षाही संपून ती पुन्हा पतीबरोबर राहू लागली.

या कालखंडातली शेवटची प्रसिद्ध स्त्री म्हणजे सीता होय. विदेह देशात शेताची नांगरणी होत असताना ही एका पेटीत सापडली. विदेहाधिपती जनकराजाने हिचे लालन-पालन केले. हिचे चरित्र सर्वांस माहीत आहे. पतीबरोबर ही वनवासास गेली. तेथून रावणाने हिला उचलून नेली. रामाने सोडवून आणल्यावर ही अयोध्येस आली. पण निव्वळ लोकापवादासाठी रामाने लक्ष्मणाकडून हिला रानात सोडून दिले. तेव्हा ती

गरोदर होती व दिवस भरलेले होते. वाल्मीकि ऋषीने तिला आश्रय दिला, तिच्या मुलांस वाढविले व त्यांना रामाच्या स्वाधीन केले. रामाने मुलांचा स्वीकार केला. पण सीता पुन्हा रामाजवळ राहिली नाही. ती जन्मास कशी आली हे जसे कुणास समजले नव्हते तसेच तिच्या जीविताचा अंत कसा झाला हेही कुणास कळले नाही. भूगर्भातून जशी ती आली तशीच भूगर्भात गडप झाली. सीतेचे सारे चरित्र पाहिल्यानंतर 'स्त्रीजन्मा, ही तुझी कहाणी' असे म्हटल्याशिवाय राहवत नाही.

## ७, ८. महत्त्वहीन कालखंड

राम ते कुरु या सहा पिढ्यांचे कालखंडात ऋग्वेदसूक्ते पुष्कळच रचिली गेली. सामगानाचा आविष्कार झाला. वसिष्ठ व वामदेव दोन्ही कुलात सूक्तकार ऋषी बरेच झाले. पुरुकुत्स स्त्रियांनीही सूक्ते रचिली. यात अंभृण ऋषींच्या वाक् नावाच्या मुलीची रचना नावाजण्यासारखी आहे. पण यापलीकडे या सूक्तात स्त्रीजीवनाचे प्रतिबिंब फारसे कुठे दिसून येत नाही. त्यामुळे हा कालखंड स्त्रीजीवनाच्या दृष्टीने फारसा उपयुक्त नाही.

पुढचा कुरु ते अग्निवर्ण या सोळा पिढ्यांचा कालखंडही यासारखाच महत्त्वहीन आहे. या काळी ऋक्, यजु व साम तीन वेदांच्या संहिता तयार झाल्या. पण इतर काही महत्त्वाच्या घडामोडी घडल्या नाहीत. त्यामुळेच कविकुलगुरू कालिदासासही या काळातल्या रघुवंशातील अठरा राजांचे वर्णन एकामागून एक करिताना त्यांच्या नावावर श्लेष्म करूनच करावे लागले.[1] शेवटच्या अग्निवर्ण नावाच्या राजा तर इतका विषयी निघाला की त्यास राजयक्ष्मा नावाचा क्षयरोग होऊन त्यातच त्याचा अंत झाला. त्याचे मागून त्याची विधवा स्त्री गादीवर बसली. स्त्रीजीवनाच्या दृष्टीने ही बाब महत्त्वाची आहे. सिंहासनाधिष्ठित होऊन राज्यशकट चालविणारी ही पहिलीच राणी. तिच्या पूर्वी पुराणेतिहासात कुणी स्त्री राज्यशासिका झाली नाही व ज्या वेदकालाचा विचार आपणास करावयाचा आहे त्यात तिच्यानंतरही अशी राणी झाली नाही. तिने राज्यशासन उत्तम चालविले. आपल्या उदरातल्या गर्भाची व नंतर झालेल्या बाळराजाची चांगली जोपासना केली व प्रजेस सुखी राखिले. तिचा ध्रुव नावाचा पुत्र आणि पौरवदंपतीचा प्रसिद्ध कुमारसीन होते.

## ९. शेवटचा टप्पा : तेजस्वी कर्तबगार स्त्रिया

आता आपण आलेल्या विचारणीय कालाच्या शेवटच्या टप्प्यात प्रवेश करीत आहोत. या कालखंडात स्त्रीजीवन पुन्हा नव्याच्या स्वरूपात दिसून येते. मरुत्त राजाच्या मुलाचे नाव नरिष्यन्त होते. ... काही दिवस अशा ... नावाची एक स्त्री राज्य करीत होती. तिच्यावर हा ... आणि तिने ... आठ ... करून घेतली

---
1. रघुवंश सर्ग १८ वा

तिच्याशी गांधर्वविवाह लावला. तिची अट ही होती की तिच्या कुठल्याच क्रियेचा राजाने निषेध करू नये व तिला हवे तसे वागू द्यावे. त्यानंतर प्रतिवर्षी ही माता झाली व दरवेळी आपल्या नवजात शिशूस गंगेत फेकून देण्याचा क्रम हिने चालविला. शेवटी आठव्या खेपेस राजाने तिला अडविले. तिने मूल राजाच्या स्वाधीन केले पण स्वतः राजास सोडून निघून गेली. ह्या मुलाचे नाव देवव्रत होते.

त्याच काळी यमुनेच्या तीरावर नौका चालवून उपजीविका चालविणारा एक नावाडी होऊन गेला. एकदा पराशर नावाच्या वसिष्ठ कुळातील एका तरुण ऋषीस परतीरी जावयाचे होते. नावाड्याने आपल्या नुकत्याच तारुण्यात पदार्पण केलेल्या मुलीस त्या ऋषीस पार करण्याचे काम सांगितले. ऋषी त्या मुलीवर मोहित झाला. दोघांनीही यमुनेतल्या एका लहानशा द्वीपात नौका थांबवून आपली इच्छा पुरी केली व ऋषी निघून गेला. कुमारी 'काली'ला दिवस गेले. बापाने विचारल्यावर तिने निर्भयपणे खरी घडलेली गोष्ट सांगितल्यावरून कालीऐवजी तिला सत्यवती म्हणू लागले. कृष्ण म्हणजे यमुनेच्याच द्वीपात तिला मुलगा झाला. हाच पुढे कृष्णद्वैपायन व्यास ह्या नावाने प्रसिद्ध झाला. गंगेने सोडलेल्या शंतनूने सत्यवतीस पाहिले व तिच्याबद्दल तिच्या बापाकडे मागणी केली. बापलेकींनी एकच अट घातली की राज्य देवव्रतास न मिळता हिच्या मुलास मिळाले पाहिजे. शंतनूस ही अट मान्य न झाल्याने तो झुरू लागला. देवव्रतास ही गोष्ट कळताच त्याने आजन्म ब्रह्मचारी राहाण्याची व सत्यवतीच्या मुलाचे रक्षण करण्याची भीष्म प्रतिज्ञा करून सत्यवती वडिलास मिळवून दिली. ह्या भीष्म प्रतिज्ञेमुळेच त्याचे नाव भीष्म पडले. सत्यवतीस दोन मुले झाली. वडील मुलगा शंतनुमागून गादीवर बसला पण एका युद्धाचे मोहिमेत तो मरण पावला. त्यामुळे दुसरा मुलगा गादीवर बसला आणि भीष्म संरक्षक राहिला.

*त्याच वेळी काशीच्या राजाने एक नवीनच प्रथा पाडिली. त्यास अंबा,* अंबिका व अंबालिका नावाच्या तीन मुली होत्या. जो कोणी सर्वांत पराक्रमी असेल व ज्याच्याशी युद्ध करण्यास कुणी धजणार नाही अशा वीरास मी तीनही मुली देईन अशी घोषणा करून त्याने राजेलोकांस निमंत्रणे धाडली. भीष्म तेथे गेला व त्याचा सामना करावयास कुणी तयार न झाल्याने त्याने तीनही मुली मिळवून आणिल्या. अंबेने भीष्मास स्पष्ट सांगितले की तिचे मन शाल्व राजावर बसले आहे. ते ऐकून भीष्माने तिला शाल्वराजाकडे पाठविले. पण त्याने दुसऱ्याने जिंकून नेलेली म्हणून तिचा स्वीकार केला नाही. शेवटी तिने गंगेत जीव दिला व दुसऱ्या दोघी सत्यवती होऊन सत्यवतीच्या सुना झाल्या, पण दुर्दैव सत्यवतीचा पाठलागच करीत होते. तिचा हा दुसरा मुलगाही वारला आणि दोघी सुना विधवा झाल्या. वंशविस्तारासाठी तिने जबरीने दोघींवरही नियोगविधी करविला. दोघींसही मुलगे झाले पण एक आंधळा व दुसरा पंडुरोगी होता. संरक्षक भीष्माने गांधार देशातून एक मुलगी आणवून तिचे धृतराष्ट्र नाव असलेल्या आंधळ्या राजपुत्राशी लग्न लावून दिले, आणि कुंती व मद्र

देशातून एक मुलगी आणून त्या दोघींचे पंडूशी लग्न लावून दिले. धृतराष्ट्राची मुले कौरव म्हणून प्रसिद्ध झाली. पंडूच्या दोन्ही स्त्रियांस नियोगविधीनेच पुत्र झाले. कुंतीस तीन व माद्रीस दोन असे पांच येथु पांडव म्हणविले गेले. कुंतीस कुमारिकावस्थेतच कर्ण नावाचा झालेला मुलगा राधा नावाच्या एका सूतस्त्रीने वाढविला म्हणून तो आपणास राधेय म्हणवी.

कौरवपांडवांचा काळ आपल्या विचाराचा शेवटचा टप्पा आहे. ह्या कालात स्त्रीजीवन आणखीही विविध प्रकारांनी संमिश्र झाले. पांडवांबरोबरच त्यांचा सखा कृष्ण ह्याचाही विचार करावयास हवा. कृष्णाचे सारेच चरित्र आश्चर्यकारक आहे. गोकुळातल्या त्याच्या खोड्या व लीला, वयाने त्यापेक्षा मोठ्या असलेल्या राधा नावाच्या गोपीची यावर जडलेली प्रीती, कंसवध करून मथुरेची राज्यप्राप्ती, पुढे मथुरेहून द्वारकेस नेलेली राजधानी, निरनिराळ्या रीतींनी धरलेल्या असंख्य स्त्रिया आणि शेवटी भारतीय युद्धातून निवृत्त होऊ पाहाणाऱ्या अर्जुनास लढण्यासाठी गीतोपदेश करून प्रवृत्त करणे, या साऱ्या गोष्टी अशा आहेत की त्यामुळे कृष्ण ही फक्त एकच व्यक्ती आहे की अनेक व्यक्तींचे एकीकरण करून कर्त्यांनी व्यक्तिचित्र निर्माण केले आहे, असा संदेह उत्पन्न होतो.

कृष्णाच्या चरित्राप्रमाणेच या कालखंडातली शेवटली स्त्री द्रौपदी हिचेही चरित्र आहे आणि स्त्रीजीवनाच्या दृष्टीने तर ते 'न भूतो न भविष्यति' असे आहे. ही पांचाल-देशाच्या द्रुपदराजाची कन्या होती. हिला 'वीर्यशुल्का' मानूनच द्रुपदाने काही अटींवर हिचे स्वयंवर ठरविले. एका जड धनुष्यावर दोरी चढवून वर फिरणाऱ्या यंत्राचे भोकातून बाण मारून लक्ष्यभेद करावयाची अट द्रुपदाने घातली होती. जो कोणी ही पूर्ण करील त्यास द्रौपदी दिली जायची होती. अनेक राजांचे प्रयत्न व्यर्थ ठरल्यावर राधेय कर्ण ती अट पुरी करावयास उठला. याचे हातून पण पुरा होईल असे वाटताच द्रौपदीने उच्चरवाने सांगितले की 'मी सूतास वरणार नाही.'[1] पूर्वीच्या कुठल्याही वीर्यशुल्क स्वयंवरात कुणाही कुमारिकेने पित्याची प्रतिज्ञा दूर सारून व अयोग्य माणसाला न वरण्याचा निश्चय प्रकट करून आपला स्वयंवरणाचा हक्क बजाविला नव्हता तो बजावण्याचे काम हिने केले. पण त्याहीपेक्षा पाचही भावांशी एकटीने लग्न करण्याचे हिने दाखविलेले धाडस तर खरोखरच अद्वितीय होते. आईच्या आदेशाप्रमाणे चालणाऱ्या, परस्पर भ्रातृभावाने भरलेल्या पाच पांडवांत भेद उत्पन्न करण्यास आपण कारण होऊ नये यास्तव तिने पाचांचीही नियमपूर्वक पत्नी होण्याचे स्वीकारले व हे असिधाराव्रत जन्मभर पाळले. स्त्रीजीवनातला हा अद्वितीय प्रयोग सफल करून दाखविणारी स्त्री द्रौपदीच एकटी निघाली.

महाभारतपूर्व वेदकालातील स्त्रीजीवन ह्याप्रमाणे येथे साधार दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. इतिहासातल्या या कथा मागून लिहिणाऱ्या पौराणिक कर्त्यांनी पदरची

---

१. महाभारत आदिपर्व अध्याय १८७ श्लोक २३

पुष्कळशी भर घालून सजविल्या आहेत. त्या साजाकडे आपणास पहावयाचें कारण नाहीं. कवींनीं जरी परांचे मोर करून नाचविले असले तरी या लेखांत केवळ मूलभूत पर्यंतचा विचार, अनुकूल प्रतिकूल काहीं न सांगताच केला आहे. स्त्रीजीवनाचे हे सारे पैलू पाहिले म्हणजे असें वाटतें कीं सर्व काळीं व सर्व स्थळीं मनुष्याचे विचार विकार आज जसे आहेत तसेच होते आणि म्हणूनच असें म्हणावेंसे वाटतें कीं

स्त्रीसंबंधेषु सर्वेषु सर्वकालस्थलेषु च।
यदिहास्ति तदन्यत्र, यन्नेहास्ति न तत् क्वचित्॥

0

# २

# सूत्र व स्मृति कालांतील स्त्रीजीवन

विठ्ठल महादेव वेडेकर

प्रा. विठ्ठल महादेव वेडेकर, एम्. ए. (जन्म २६-४-१९०१) रिसर्च फेलो, भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे. माजी आजीव सदस्य, खानदेश शिक्षण मंडळ; अमळनेरच्या प्रताप कॉलेजमध्ये संस्कृतचे प्राध्यापक; संपादक, 'नवभारत' मासिक, वाई. महाराष्ट्रीय संस्कृत तज्ज्ञ व प्राचीन वाङ्मयोपासकात उच्च स्थान. ('उन्नति' ७८३, शिवाजीनगर, पुणे ४)

प्रस्तुत लेखात सूत्रे व धर्मशास्त्रे ही मामुख्याने ज्या कालात रचिली गेली त्या कालातील सूत्र-धर्मशास्त्र ग्रंथांतून जे स्त्रीजीवनाचे चित्र पहावयास मिळते त्याचा संक्षेपाने विचार करावयाचा आहे. हा काल स्थूलमानाने पहाता, विद्वानांच्या मते वैदिक वाङ्मयाच्या कालानंतर सुरू होतो. याच कालात गृह्यसूत्रे, धर्मसूत्रे, मनुस्मृति, याज्ञवल्क्यस्मृति व इतर धर्मशास्त्रे रचिली गेली. याच कालात आरंभी कौटिल्याचे अर्थशास्त्र, त्यानंतर वात्स्यायनाचे कामसूत्र इत्यादि ग्रंथही लिहिले गेले. त्याचप्रमाणे याच कालात, सुमारे इ. स. पूर्वी ४०० ते इ. स. ४०० या अवधीत, आज महाभारत व रामायण ही प्राचीन महाकाव्ये ज्या स्वरूपात उपलब्ध आहेत ते स्वरूप त्यांना आले असावे. या प्राचीन महाकाव्यांतून मिळणाऱ्या माहितीमुळेही या कालातील स्त्रीजीवनाचे आकलन होण्यास आपणास मदत होते. म्हणून या कालातील स्त्रीजीवनाच्या विविध बाजूंचे विवेचन करताना वरील विविध ग्रंथांचे मधून मधून आवश्यक वाटले ते उतारे दिले आहेत.

या कालातील स्त्रीजीवनाच्या विविध बाजू व अंग यांचा विचार करताना पुढील सहा शीर्षकांखाली त्यांचे विवेचन करावयाचे योजिले आहे: (१) कौमार्य व शिक्षण (२) विवाह व वैवाहिक जीवन (३) विधवांची स्थिती व स्थान (४) आर्थिक हक्क व स्वत्वे (५) स्त्रियांचे सामाजिक व धार्मिक जीवनातील स्थान (६) दोषारोप व दासदासींचे.

## १. कौमार्य व शिक्षण

पाश्चात्यांनी फल म्हणजे वैदिक काल. त्याशी तुलना करता सर्वसाधारणपणे वर्णांनी

असा निष्कर्ष काढला आहे की, सूत्र-स्मृतींच्या या काळात हळूहळू वाढत्या प्रमाणात स्त्रीशिक्षणविषयक दृष्टिकोण संकुचित होत गेला. विवाहाची वयोमर्यादा कमीकमी होत गेली. वैदिक काळी कुमारिकांची विवाहमर्यादा १६ वर्षे वयाची तरी असावी. त्या काळी मुलांप्रमाणेच मुलींचेही 'उपनयन' होत होते. यम नावाच्या धर्मशास्त्रकाराचे वचन प्रसिद्ध आहे की, 'पूर्वीच्या काळी स्त्रियांचे मौंजीबंधन म्हणजेच उपनयन इष्ट समजले जात असे'. मुलांप्रमाणेच मुलींचेहि उपनयन वयाच्या आठव्या वर्षी होऊन त्यांना विवाह होईपर्यंत मुलांप्रमाणेच ७/८ वर्षे शिक्षण घेता येत असे. त्याही वेदाध्ययन करीत असत. त्यामुळे वैदिककाळी स्त्रियाही विदुषी, 'ब्रह्मवादिनी', सभासंमेलनातून वादविवादात भाग घेणाऱ्या असत. परंतु आर्यांचे जीवन व जीवनपद्धति येथील भिन्न भिन्न सामाजिक गटांशी संपर्क-संघर्ष येऊन जसजशी बदलू लागली तसतशा त्यांच्या स्त्रीशिक्षणविषयक दृष्टिकोनातही फरक होत गेला. हारीत नावाच्या धर्मशास्त्रकाराने स्त्रियांचे दोन प्रकार मानले आहेत. एक ब्रह्मवादिनी स्त्रिया व दुसरा प्रकार म्हणजे 'सद्योवधू' म्हणजे लवकर विवाह होऊन संसारात पडणाऱ्या. अर्थात् या दुसऱ्या प्रकारातील स्त्रियांच्या शिक्षणाचा अवधी कमी झाला. हळूहळू त्यांचे वैदिक उपनयनही होईनासे झाले. मनूने म्हटले आहे की 'स्त्रियांचे सर्व संस्कार विवाह या संस्कारातच अंतर्भूत होतात. विवाह हाच त्यांना वैदिक संस्कार होय.' पुढेपुढे मुलींच्या विवाहाची वयोमर्यादा कमी कमी होत गेली. वयात येण्यापूर्वीच म्हणजे १२ व्या, १३ व्या वर्षी व पुढे पुढे ८ व्या-९ व्या शतकानंतर तर ८–९ वर्षांच्या मुलींचे विवाह रूढ होऊ लागले. त्यांचा वेदाध्ययनाचा अधिकार गेला. शूद्रांप्रमाणेच स्त्रियाही वेदाध्ययनाच्या अनधिकारी समजल्या जाऊन, शिक्षणाच्या दृष्टीने स्त्रीपुरुषात विषमता उत्पन्न झाली.

अर्थात् ही स्त्रीशिक्षणाची पीछेहाट हळूहळू होत गेली. इ. स. च्या ८ व्या व ९ व्या शतकापर्यंत काही विदुषी स्त्रियांचे उल्लेख सापडतात त्यांवरून समाजातील काही वरच्या वर्गाच्या कुटुंबातून स्त्रियांना साहित्य, त्यावेळची शास्त्रे यांचे उत्तम प्रकारचे शिक्षण मिळत असावे असे अनुमान निघते. 'गाथा-सप्तशती' या ग्रंथात रेवा, रोहा, माधवी, शशिप्रभा इत्यादी कवयित्रींनी रचिलेल्या गाथांचा उल्लेख आला आहे. १० व्या शतकात होऊन गेलेल्या राजशेखराने विजयांका नावाच्या प्रसिद्ध कवयित्रीची प्रशंसा केली आहे. राजशेखराची क्षत्रियवर्णीय पत्नी स्वतः कवयित्री व साहित्यसमीक्षक होती. खलीफा हरून याच्या कारकीर्दीत ८ व्या शतकात एका वैद्यकावरील ग्रंथाचे भाषांतर अरबी भाषेत झाले. तो मूळ वैद्यक ग्रंथ एका रुजा स्त्रीवैद्याने लिहिला असून अरबी अनुवादात तिचे नाव रूसा असे आहे. याशिवाय लष्करी व राज्यकारभाराचे शिक्षण घेतलेल्या स्त्रियांची उदाहरणेही या काळात आढळून येतात. शातवाहन घराण्यातील नयनिका (इ. स. पूर्वी दुसरे शतक), वाकाटक घराण्यातील प्रभावती गुप्त (इ. स. ४ थे शतक), विजयभट्टारिका (चालुक्य घराण्यातील, इ. स. ७ वे शतक) इत्यादी स्त्रियांनी स्वतंत्रपणे राज्यकारभार हाकल्याचे दिसून येते.

कामसूत्रातील उल्लेखांवरून गायनवादन, नृत्य, चित्रकला, मालाग्रथन, खेळणी, वस्तूंची सजावट इत्यादी कलांचा अभ्यास करून स्त्रिया त्यात नैपुण्य मिळवीत असत, असे दिसते.

पण ही सुशिक्षित स्त्रियांची उदाहरणे समाजातील उच्चवर्णीय श्रीमंत कुटुंबातील व घराण्यातील होत. सामान्य स्त्रियांना, विवाह लवकर होत असल्यामुळे, शिक्षणाची संधी दुर्मिळ होत गेली.

## २. विवाह व वैवाहिक जीवन

यापूर्वीच्या काळात विवाहाचे वय १६ ते १८ असल्यामुळे मुली विवाहाच्या वेळी सज्ञान असत. त्यामुळे पतीची निवड करताना त्यांची जाणीवपूर्वक संमती घेतली जात असण्याचा अधिक संभव होता. विवाहाची स्वयंवरपद्धति, गांधर्वविवाहाचा प्रकार यांवरून मुलींना विवाह करताना स्वतःची पसंती व नापसंती व्यक्त करण्याचा अधिकार होता असे म्हणता येईल. हा अधिकार सूत्र-स्मृतिकाळात हळूहळू कमी झाला. मुलींच्या विवाहाची वयोमर्यादा कमीकमी होत गेली.

सूत्र-स्मृतिग्रंथांतून पूर्वी व त्यांच्या काळी प्रचलित असलेल्या आठ विवाह-प्रकारांचा उल्लेख येत असतो. त्यांचा प्रस्तुत स्थळी थोडक्यात निर्देश करणे उचित होईल. त्यांपैकी जे तीन विवाह-प्रकार किंवा पद्धति बहुतेक स्मृतिकारांना मान्य नाहीत ते असेः (१) पैशाचविवाह — मुलीला दारू पाजून, बेशुद्ध स्थितीत आणून तिच्याशी केलेला विवाह. (२) राक्षसविवाह — क्षात्रवृत्तीने इतरांना युद्धात पराजय करून जिंकून आणलेल्या मुलीशी केलेला विवाह. महाभारतात हा विवाहप्रकार शिष्टांना संमत होता असे दिसून येते. भीष्माने विचित्रवीर्याकरिता तीन मुली युद्धात इतर राजांचा पराभव करून जिंकून आणल्या. अर्जुनाने याच विवाहप्रकाराचा अवलंब करून सुभद्राहरण केले. बलराम रागावला असताना, 'अर्जुनाने आपल्या पराक्रमाने सुभद्रा जिंकली.' अशी प्रशंसा करून श्रीकृष्णाने त्याची समजूत घातली. स्वतः कृष्णानेही रुक्मिणीचे हरण करून याच विवाहप्रकाराचा अवलंब केला होता. अर्थात सुबुद्ध विचारवंतांना हा प्रकार मान्य नसावा असे दिसते. शिशुपालाने राजसूय यज्ञाच्या वेळेस कृष्णाची निंदा करताना कृष्णाने केलेल्या अशा प्रकारच्या विवाहाला भर सभेत दोष दिला आहे. (३) आसुर-विवाह — मुलीच्या वडिलांना द्रव्य वगैरे देऊन अशा रीतीने विकत घेतलेल्या मुलीशी केलेला विवाह. प्राचीन असीरिअन लोकांमध्ये हा विवाह प्रचलित होता म्हणून याला आसुर विवाह नाव पडले असावे. रामायणातील कैकेयी, महाभारतातील गांधारी व माद्री या स्त्रियांचे विवाह याच पद्धतीने झाले. अर्थात् अशा प्रकारे द्रव्य घेऊन मुलीचा एक प्रकारचा विक्रय करणे हळूहळू सामाजिक विचारवंतांच्या दृष्टीने निंद्य मानले गेले. भीष्माने, 'माद्रीबद्दल द्रव्य किती द्यायचे ?' असे विचारले असता, शल्याने मिनतवारीने म्हटले आहे, "मला असे स्पष्टपणे द्रव्य मागावयास तू का भाग पाडतोस ?" काही

स्मृतिकारांनी तर कन्येबद्दल शुल्क देणे व घेणे हा प्रकार निंद्य मानला आहे.

नंतर (४) चौथा विवाहप्रकार गांधर्वविवाह किंवा प्रेमविवाह होय. धर्मसूत्रकार बौधायनाला हा विवाह मान्य असून, कामसूत्रकार वात्स्यायन तर या विवाहाला 'तो सुखकारक व अनुरागात्मक' असल्यामुळे श्रेष्ठ मानतो. भवभूतीने या विवाहाच्या मंगल्य-पूर्णतेला पुष्टिकारक म्हणून एका अंगिरस् नावाच्या ऋषीचे वचन उद्धृत केले आहे: 'ज्या मुलीने मन व दृष्टी आकर्षून घेतली असेल त्या मुलीशी विवाह करण्यात ऋद्धि किंवा अभ्युदय होईल.' परंतु पुढे होऊन गेलेल्या धर्मशास्त्रकारांनी गांधर्वविवाह व स्वयंवर हे अप्रशस्त ठरविले आहेत. कारण साहजिकच असे असावे की विवाहाची वयोमर्यादा कमीकमी होत गेली व त्यामुळे मुलीने आपली इच्छा व्यक्त करणे अशक्य झाले. या चार विवाहप्रकारानंतर (५) पाचवा म्हणजे आर्षविवाह होय. या विवाहात मुलीच्या वडिलांना एक बैल व एक गाय देत. हा एक प्रकारे शुल्काचाच पर्यायहोय. परंतु मीमांसासूत्रकार जैमिनि व त्याचा भाष्यकार शबर यांनी असे म्हटले आहे की, "हे शुल्क नाही. कारण गाईची देणगी ही धार्मिक कार्यपरता आहे. शिवाय ही द्यावयाची-घ्यावयाची वस्तु निश्चित व मर्यादित आहे. भिन्न वस्तू असल्या तर त्यांच्या किंमती कमीअधिक होऊन ते शुल्क होऊ शकेल." (६) सहावा विवाहप्रकार दैव नावाचा. यात यज्ञातील एका ऋत्विजाला मुलगी दिली जाते. जसे वैदिक यज्ञ कमीकमी होत गेले तसा हा विवाहप्रकारही कमी झाला. (७) सातवा ब्राह्म व (८) आठवा प्राजापत्य — या दोन विवाहप्रकारांत तसा विशेष फरक नाही. 'एका विद्वान सच्छील ब्राह्मणाला बोलावून वस्त्रादींनी त्याचे पूजन करून कन्या देणे' हा, या दोन्हीही विवाहप्रकारात, प्रमुख विधी आहे. वसिष्ठ व आपस्तंब या धर्मशास्त्रकारांनी प्राजापत्याचा उल्लेखही केलेला नाही. ते सातच विवाहप्रकार मानतात.

मनूने हे विवाहप्रकार वर्णभेदाच्या अनुषंगाने लागू केलेले आहेत. पण तसे करताना त्याने अनेक मतांचा उल्लेख केलेला आहे. एका मताप्रमाणे (३·२३) ब्राह्मणाला पहिले सहा म्हणजे ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर व गान्धर्व हे सहा; क्षत्रियाला आसुर, गान्धर्व, राक्षस व पैशाच हे चार आणि वैश्यशूद्रांना आसुर, गान्धर्व, पैशाच हे तीन क्रमाने योग्य होत. तर दुसऱ्या एका मताप्रमाणे (३·२४) ब्राह्मणाला फक्त पहिले चारच, क्षत्रियाला फक्त राक्षसच आणि वैश्यशूद्रांना फक्त आसुरच प्रशस्त होय असे म्हटले आहे. आणखी एका अशा मताचा मनूने उल्लेख केला आहे त्याप्रमाणे (३·२५) पैशाच व आसुर हे कोणत्याही वर्णातील मनुष्याने करू नयेत असे स्पष्ट सांगितले आहे.

विवाह हा एक अत्यंत पवित्र सामाजिक संस्कार मानला गेला असून त्यायोगाने प्राप्त होणाऱ्या गृहस्थाश्रमाची थोरवी स्मृतिकारांनी मुक्तकंठाने वर्णिलेली आहे. मनूने म्हटले आहे (३·७७): "प्राण्यांना जशी हवा, तसा गृहस्थाश्रम सर्व समाजाला आहे. बाकीचे आश्रम त्यावर अवलंबून असतात." विवाहाच्या वेळेचा गार्हपत्य अग्नि

पतिपत्नींनी देवयज्ञ, पितृयज्ञ करावयाचा, असा दंडक असून पत्नीला पतीबरोबर धार्मिक दृष्ट्या समान दर्जा होता.

यापूर्वीच्या काळी विवाहाची वयोमर्यादा जेव्हा अधिक होती, तेव्हा मुलींची वराच्या निवडीच्या बाबतीत इच्छा विचारात घेतली जात असे. जर योग्य मनासारखा वर मिळाला नाही तर एखादी स्त्री सुलभेसारखी निवत असे. महाभारतात (शांतिपर्वात अ. ३०८) सुलभाजनकसंवादरूपी आख्यानात या सुलभेचे वर्णन आले आहे. तिला मनासारखा पति मिळाला नाही म्हणून ती अविवाहित राहिली व संन्यासिनी होऊन ब्रह्मज्ञानाविषयी जनकाशी वादविवाद करून तिने त्याला कुंठित केले. सूत्र-स्मृतिकालात पुढे पुढे विवाहाची वयोमर्यादा कमी कमी होत गेली. स्त्रियांना वैदिक उपनयनाचा अधिकारही गेला. त्यांना विवाह एवढाच वैदिक मंत्रांचा संस्कार शिल्लक राहिला. त्यामुळे स्त्रीने अविवाहित राहणे म्हणजे कोणत्याहि संस्काराशिवाय राहणे याला स्मृतिधर्मशास्त्रकाराचा तीव्र विरोध होऊ लागला. 'अ-पति नारी पातकी होय' असे महाभारतात एका ऋषीचे वचन आहे. कुणि नावाच्या ऋषीची मुलगी मृत्यू मरायच्या आदल्या दिवशी शृंगवत् नावाच्या मुनीशी विवाहबद्ध झाली व म्हणूनच ती स्वर्गाला गेली अशी महाभारतात कथा आहे. बौधायन या धर्मसूत्रकाराने तर असे म्हटले आहे की अविवाहित मुलीचे प्रेत लग्न लावूनच नंतर दहन करण्यात यावे.

पुरुषाला अविवाहित राहून विद्याध्ययन, अध्यापन करता येत असे. अशा अविवाहित आचार्यांना आपली शिष्यपरंपरा आध्यात्मिक संतति म्हणून मानण्याचा अधिकार असे. परंतु स्त्रियांना विवाह हा अत्यावश्यक विधी मानला गेल्यामुळे त्यांच्या आध्यात्मिक, सामाजिक आशा-आकांक्षांवर निर्बंध पडले. रजोदर्शनापूर्वीच कन्यांचे विवाह करावयाची प्रथा रूढ होऊ लागली. यमस्मृतीने म्हटले आहे की, "गुणवान् पति मिळाला नाही तर मुलगी गुणहीनालाही देऊन टाकावी पण तिला अविवाहित रजस्वला ठेवू नये." अर्थात् याही बाबतीत स्मृतिकारांमध्ये मतभेद होते. मनूने एका ठिकाणी म्हटले आहे की, "कन्या ऋतुमती झाली व तिचा विवाह झाला नसला तर तिने तीन वर्षे वाट पाहावी. नाहीतर स्वतःच पति शोधून काढावा." दुसऱ्या ठिकाणी त्यानेच म्हटले आहे की, "गुणवान् वर पाहूनच मुलगी द्यावी, गुणवान् वर मिळाला नाही तर तिने खुशाल आमरण अविवाहित रहावे." अर्थात् ही वचने निरनिराळ्या काळाला व सामाजिक थराला लागू असणे शक्य आहे.

काही गृह्यसूत्रांमधून 'वधू नग्निका असावी' असे म्हटले आहे. आता नग्निका म्हणजे काय ? महाभारतात एके ठिकाणी सोळा वर्षांच्या मुलीला नग्निका म्हटले आहे. त्याचा अर्थ भाष्यकारांनी असा केला आहे की, 'नग्निका म्हणजे मैथुनार्ह, वस्त्र फेडण्यास योग्य'. परंतु पुढे विवाहाचे वय जसजसे कमी कमी होऊ लागले तसे नग्निका याचा अर्थ लहान, परकरातली मुलगी असा होऊन बालविवाह रूढ होऊ लागले.

हुंडा किंवा विवाहापूर्वी मुलीच्या वडिलांनी मुलाच्या वडिलांशी करार करून

द्यावयाचे द्रव्य. ही पद्धत प्राचीन काळी अस्तित्वात नव्हती. मुलीचे वडील मुलीला पाठविताना नजराणे देत असत, असे द्रौपदी, सुभद्रा, उत्तरा इत्यादींच्या विवाहांच्या कथांतून उल्लेख सापडतात. पण ती अट नव्हती. स्नेहभावाने आपण होऊन दिलेला तो नजराण्याचा प्रकार होता. परंतु पुढील काळात – १३ व्या १४ व्या शतकापर्यंत हुंड्याची पद्धत सुरू होऊन ती वाढू लागली. विवाहात कन्यादान करावे लागते, त्यातील दानाला एक विशिष्ट धार्मिक अर्थ येऊन कन्येच्या दानाबरोबर इतरही काही सोने व मूल्यवान वस्तू द्यावयाचा धार्मिक प्रघात पडला असावा. अर्थात् त्या वेळी या इतर दान द्यावयाच्या वस्तूंचे मोल नाममात्र होते. परंतु नंतर मात्र वरपक्षाचा कुलाभिमान व अडवणूक, वधूपक्षाची आपल्या मुलीचा शक्य तो लवकर विवाह व्हावा ही वाढती चिंता, यांतूनच बाधक स्वरूपाची हुंडापद्धत अस्तित्वात आली असावी.

गृह्यसूत्रे किंवा धर्मसूत्रे यांतून विवाहापूर्वी वधूवरांची ज्योतिषशास्त्रदृष्ट्या पत्रिका पहावयाची पद्धत आढळून येत नाही. त्यावेळी ज्योतिषशास्त्राचाही इतका विकास झाला नव्हता. पुढे इ. स. च्या दुसऱ्या तिसऱ्या शतकाच्या सुमारास विवाहार्थी शुभ तिथि, त्या दिवशी कोणते नक्षत्र आहे हे पाहून ठरविण्याची पद्धत रूढ झाली असावी, असे भासाच्या नाटकातील उल्लेखावरून दिसते. पुढे ज्योतिष्याला विवाहसमारंभात अधिकाधिक महत्त्व येत गेले. इ. स. च्या ७ व्या शतकात रचलेल्या 'दशकुमार चरित' या ग्रंथात मुलीचे वडील शुभाशुभलक्षणे जाणणाऱ्या ज्योतिष्याला मुली दाखवून सल्ला घेत असत, असा उल्लेख आढळून येतो.

प्राचीन काळी सगोत्र विवाहाला प्रतिबंध नव्हता, असे वसुदेव-देवकी इत्यादींच्या उदाहरणावरून दिसते. ती दोघेही यादव कुळातील होती. पण पुढे सगोत्र विवाहाचा निषेध प्रथम गृह्यसूत्रातून सापडतो. पुढे होऊन गेलेल्या धर्मशास्त्रविषयक स्मृतिनिबंधा-तून सगोत्र विवाहाचा कडाडून निषेध आहे.

इ. स. च्या आठव्या शतकापर्यंत भिन्न वर्ण किंवा जातीतील विवाह समाजाला मान्य होते, असे स्मृति-निबंधांतील यावाबत केलेल्या नियमांवरून दिसून येते. उच्चवर्णीय वर व त्याच्या वर्णातील वधू म्हणजे अनुलोम विवाह बऱ्याच प्रमाणात रूढ होते. याउलट उच्चवर्णीय वधू व त्याच्या वर्णातील वर म्हणजे प्रतिलोम विवाहही थोड्या प्रमाणात का होईना घडून येत असत. अशा विवाहापासून झालेल्या मुलांना मालमत्तेचे हक्क काय असावेत इत्यादींविषयी बौधायनादि धर्मशास्त्रकारांनी नियम घालून दिलेले आढळतात. शिलालेख व वाङ्मयांत उल्लेख यांतून अनुलोम-प्रतिलोम विवाहाची उदाहरणे सापडतात. इ. स. च्या पाचव्या शतकातील शिलालेखात, एका सोम नावाच्या ब्राह्मणाने क्षत्रिय स्त्रीशी श्रुतिस्मृति विहित विवाह केला असे म्हटले आहे. सुमारे त्याच काळात कदंब घराण्यातील ब्राह्मणराजाने आपली मुलगी वैश्यवर्णीय गुप्त घराण्यातील एका राजपुत्राला दिली असा प्रतिलोम विवाहाचा उल्लेख आहे. प्रतिहार राजवंशाचा संस्थापक राजा हरिश्चंद्र (इ. स. ५५०) याला ब्राह्मण व क्षत्रिय अशा दोन भार्या

होत्या. बाणाच्या वडिलांची एक शूद्र भार्याही असून तिच्यापासून झालेली मुले त्याच्या एकाच कुटुंबात राहात असत. 'कथासरित्सागरा'त असा उल्लेख आहे की, बाप आपल्या मुलीला विचारतो, 'चार वर्णांतील कोणता वर तुला पसंत आहे?'

पुढे इ. स. च्या दहाव्या शतकापासून भिन्नवर्णीय वधूवराचे विवाह कमीकमी होऊन निषेधार्ह ठरू लागले असावेत असे दिसते. अल्बेरुणीने (इ. स. १०२०) असे म्हटले आहे की, त्यावेळचे ब्राह्मण खालील तीन वर्णांतील स्त्रियांशी विवाह करताना आढळून येत नाहीत. कल्हण या १२ व्या शतकातील काश्मीरमधील ब्राह्मण इतिहास-काराने 'संग्रामराज नावाच्या क्षत्रिय राजाने (इ. स. १०२८) आपली बहीण ब्राह्मण युवकाला दिली अशी नोंद करून, त्या राजाने आपल्या यशाला गालबोट लावले', असे म्हणून या मिश्रविवाहाबद्दल आपली तीव्र नापसंती व्यक्त केली आहे. असे विवाह निषेधार्ह ठरू लागले, याचे कारण भिन्नवर्णांतील वाढती सांस्कृतिक विषमता हे असावे. पूर्वी सर्व त्रैवर्णिक द्विज असून ते वेदाध्ययन करीत. परंतु क्षत्रिय-वैश्यवर्णीयांचे वेदाध्ययन सुटले. 'वैश्य कोणीही वेदाध्ययन करीत नाहीत' असे अल्बेरुणीने नमूद करून ठेविले आहे. पूर्वी सर्व त्रैवर्णिक ब्राह्मण देखील मांसाशन करीत असत. पुढे ब्राह्मणांत मांसाशन कमी झाले. क्षत्रिय-वैश्यांचे चालूच राहिले. अशा भिन्न आचार विचारांमुळे भिन्नवर्णीय विवाह कमीकमी होत गेले असावेत.

हल्ली विवाहसंस्कार करण्याची जी वैदिक पद्धत रूढ आहे तिचे वर्णन आश्वलायन व बौधायन यांच्या गृह्यसूत्रांतून आढळते. विवाहसमारंभानंतर, पतिपत्नींनी तीन दिवस ब्रह्मचर्य पाळून स्वस्थ राहण्याचे असा नियम काही धर्मशास्त्रांतून आढळतो. अर्थात् या नियमाचा हेतू दाखवायचा आत्मसंयमनाने संस्कार निवडणे हा असावा. परंतु इतर काही धर्मशास्त्रकारांना हा नियम जाचक वाटतो. कामसूत्रामध्ये बाभ्रव्य नावाच्या स्मृतिकाराच्या मताचा उल्लेख केला आहे. बाभ्रव्याने म्हटले आहे : "स्तंभाप्रमाणे निश्चल असलेल्या नायकाकडे काहीही न बोलता नुसती पहात तीन रात्री काढण्याने स्त्री ही मनातून विटून जाईल व नवऱ्याचा तिरस्कार करील."

पुढे बालविवाह प्रचलित झाल्यावर विवाहानंतरच्या त्रिरात्रीच्या शेवटी होणारे चतुर्थीकर्म अशक्य झाले व वधू वयात आल्यावरचा गर्भाधानसंस्कार नवीन अस्तित्वात आला. या गर्भाधानसंस्काराचे वर्णन स्मृतिचन्द्रिकेमध्ये दिलेले आहे. हा संस्कार ११ व्या शतकात रूढ झाला होता असे अल्बेरुणीने केलेल्या उल्लेखावरून दिसून येते.

इ. स. ३००-४०० नंतरच्या धर्मशास्त्र-वाङ्मयातून स्त्रीला घटस्फोट किंवा विवाह-विच्छेद (डायव्होर्स) करायची परवानगी दिलेली आढळत नाही. पण त्यापूर्वी मात्र काही विशिष्ट परिस्थितीत विवाहविच्छेद मान्य केलेला आढळून येतो. पुरुषाना पहिली पत्नी जिवंत असताना दुसरी करायची परवानगी होती. पण स्त्रियाना मात्र ती नव्हती. मनूने (९-४६) म्हटले आहे की, भार्येची भर्त्याच्या विवाहबंधनातून कधीच सुटका होत नाही. परंतु एका विशिष्ट कालखंडात स्त्रीला विवाहबंधनातून काही विशिष्ट

परिस्थितीत मुक्त होता येत असे, असे काही वचनांवरून दिसून येते. मनूनेच स्त्रीला, जर ती परित्यक्ता असेल व अक्षतयोनि असेल तर तिला, पुन्हा दुसरा विवाह करावयास परवानगी दिली आहे. 'पति जर क्लीब असेल किंवा पापमार्गाचा अवलंब करणारा असेल किंवा त्याने जर संन्यास घेतला असेल तर स्त्रीने दुसरा पति करावयास हरकत नाही' अशा अर्थाचे पराशराचे वचन प्रसिद्ध आहे. या वचनावरून स्त्रीला पतीच्या विवाहबंधनातून मुक्त होता येत असे हे स्पष्ट होते. कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्रात स्त्रीपुरुषांना परस्परांच्या वागण्यामुळे एकत्र राहणे अशक्य झाले असेल तर त्यांना विवाहविच्छेदनाची परवानगी दिली आहे. अर्थात ही परवानगी त्याने फक्त आसुर, (राक्षस), गांधर्व, क्षात्र, आणि पैशाच या विवाहप्रकारांत मोडणाऱ्यांनाच दिली आहे.

प्राचीन काळापासून वैवाहिक जीवनाचे सुंदर, उदात्त आदर्श विचारवंतांनी मांडून ठेवले असून धर्मशास्त्रकारांनीहि त्यावर जोर दिला आहे. विवाहविषयक वैदिक मंत्रांत वधूला उद्देशून 'तू आपल्या सासरी सम्राज्ञी हो, श्वशुरावर व दिरावर अधिकार ठेव' अशा अर्थाचा एक मंत्र असून त्यावरून पत्नीला सासरी मानाने उत्तम तऱ्हेने वागवण्यात येत असे, हे स्पष्ट होते. भर्ता आणि भार्या यांनी परस्परवश होऊन राहावे, भर्त्याने भार्येला अप्रिय बोलू नये, रति, प्रीति व धर्म ही भार्येवरच अवलंबून असतात असे महाभारतात एक वचन आहे. गृहव्यवस्थेचा सर्व अधिकार पत्नीकडे आहे, तिने आपल्या पतीच्या सहाय्याने आयव्ययाकडे लक्ष द्यावे, पतीच्या उधळेपणाला आळा घालावा, नोकरचाकरांचा नीट सांभाळ करावा, शेती व गुरेढोरे यांवर नजर ठेवावी, अशा अर्थांची पत्नीची कामे म्हणून कामसूत्रात (४–१) दिलेली आढळून येतात.

वैवाहिक जीवनाचे साफल्य म्हणजे स्त्रीने माता होणे. या मातृत्वाचा महिमा महाभारत, स्मृतिग्रंथ यांमधून गाइलेला आढळून येतो. "सर्व गुरूंमध्ये माता श्रेष्ठ परम गुरु होय" असे महाभारतात म्हटले आहे.

धर्मशास्त्राच्या पुढच्या पुढच्या काळात ज्या वेळी बालिकेशी विवाह रूढ झाले, त्यावेळी पूर्वीच्या काळातील पत्नीचा दिलेला स्थान दर्जा कमी झाला. पत्नी म्हणून आलेल्या बालिकेला, लहान मुलाला जसे शिकवावयाचे, तसा गौण दर्जा प्राप्त झाला. "भार्येच्या हातून जर काही चूक झाली, तर दोरीने किंवा काठीने मारावे, पण अशी शिक्षा करताना डोक्यावर मारू नये, पाठीवर मारावे' असे मनूचे वचन आहे (८–२९९).

एकपत्नीकत्व ही हिंदु समाजात सामान्यतः आढळून येते. पण राजेरजवाड्यांत व श्रीमंत लोकांत बहुपत्नीकत्वाही प्रचलित होती. महाभारतामध्ये 'पुरुषांनी बहुपत्नीक असणे हा अधर्म नाही, पण स्त्रीने मात्र आपल्या भर्त्याला सोडणे हा महान् अधर्म होय' असे म्हटले आहे (१–१६१–३६). बहुपत्नीकत्वाची चाल पडण्यामागील हेतू हा असावा की, संतती म्हणून कुटुंबात भरपूर राहावी. कामसूत्रात (४–२) तर स्पष्ट म्हटले आहे की, पत्नीला जर मुलगा झाला नाही तर तिने आपल्या भर्त्याला दुसरे लग्न

करण्यास सांगणे तिचे कर्तव्य आहे. अर्थात् पहिल्या पत्नीला मूल होत नाही हे पाहायला पुरेसा दहा वर्षांचा काळ लोटला पाहिजे, असे बौधायन धर्मसूत्रात सांगितले आहे. 'पत्नीला जर मूल झाले नाही तर दहाव्या वर्षी, मुलगीच झाली तर बाराव्या वर्षी, मूल जगतच नसेल तर पंधराव्या वर्षी, जर ती अप्रिय कटु बोलणारी असेल तर लगेच, तिचा त्याग करावा' असा त्या वचनाचा मथितार्थ आहे. आपद्धर्म म्हणून बहुपत्नीकत्वाला दिलेल्या ह्या सवलतीचा गैरफायदा एरवीही पुरुष घेऊ लागले. त्यांना धिक्कार धर्मशास्त्रकारांनी केला आहे. आपस्तंब-धर्मसूत्रांत 'पत्नी जर धर्मप्रजासंपन्न असेल तर द्वितीय संबंध करू नये' असे म्हटले असून महाभारताने 'भार्या टाकणाऱ्या मनुष्याचे पाप प्रायश्चित्तापलीकडे आहे' (१३. परिशिष्ट ७ अ २०८) असा स्पष्ट निषेध केला आहे.

बहुपतिकत्वाचे उदाहरण महाभारतातील द्रौपदीचे असून ते प्रसिद्ध असे एकमेव आहे. त्याचे स्पष्टीकरण करताना खुद्द महाभारतकार, धर्मशास्त्रकार व सूत्रकार यांच्या नाकी नव आले आहेत. 'तन्त्रवार्तिक' या मीमांसाविषयक ग्रंथाने त्याचे स्पष्टीकरण असे केले आहे : 'द्रौपदीचा पाच पतींशी विवाह हा लाक्षणिक समजावा. द्रौपदी म्हणजे राज्यलक्ष्मी. पाचहि भाऊ राज्याचा सर्व मिळून उपभोग घेत होते.'

### ३. विधवांची स्थिती व स्थान

पतिमरणानंतर विधवांचे काय होत होते ? त्या पतीबरोबर सती जात की पुनर्विवाह करीत ? त्यांना कुटुंबाकडून वागवणूक कशी मिळे ? तिला स्थावर वा जंगम मालमत्तेचा काही भाग मिळत असे का, की ज्यामुळे तिला स्वतंत्र मानाचे जिणे जगता येईल ? असे अनेक प्रश्न विधवांच्या स्थितीसंबंधी उत्पन्न होतात. त्याचा येथे सूत्र-धर्मशास्त्र-महाभारतकालापुरता विचार करावयाचा आहे.

आर्यलोक हिंदुस्थानात येण्यापूर्वी इंडोयुरोपीय कालात त्यांच्यामध्ये सतीची चाल होती असे म्हणतात. परंतु आर्यलोक हिंदुस्थानात आल्यावर त्यांनी रचलेल्या पहिल्या पहिल्या वाङ्मयातून सतीचा उल्लेख सापडत नाही. त्यावरून हिंदुस्थानात प्रवेश करतेसमयी आर्यांमधील सतीची चाल बंद झाली असावी असा विद्वानांचा निष्कर्ष आहे. अथर्ववेदात (१८–३–१) एका ठिकाणी असा उल्लेख आहे की, मृताच्या प्रेताशेजारी पत्नी काही काळ पडते व मग तिला परत बोलावण्यात येते. हा उल्लेख प्राचीन सतीच्या स्मरणरूप अवशेष असावा. ब्राह्मणग्रंथात, सूत्रसूत्रातही सतीचे उल्लेख सापडत नाहीत. सतीच्या चालीबद्दल साधारणतः जुन्या वाङ्मयातील पहिला असा उल्लेख महाभारतात आहे. त्यात पांडूबरोबर माद्री सती गेली. परंतु सती जाण्याचे कारण जे तिने दिले आहे, ते धार्मिक दिसत नाही : "माझ्या इच्छा तृप्त झाल्या नाहीत म्हणून मला पतीमागून गेले पाहिजे. मी जर मागे राहिले तर तुझ्या पुत्रांशी मी समतेने वागेन असे मला वाटत नाही." असे तिने कुंतीला कारण दिले आहे. तसेच मौसलपर्वात, वसुदेवाच्या

चारीही भार्या सती गेलेल्या दाखविल्या आहेत. कृष्णाच्या निधनाची वार्ता ऐकून त्याच्या पत्नींपैकी पाच जणी सती गेल्या. याविरुद्ध युद्ध महाभारतातच पतिमरणोत्तर सर्वच स्त्रिया सती जात असत असे दिसत नाही. लढाईत शेकडो योद्धे रणांगणावर मरून पडलेले आहेत पण एकाही योद्धयाची पत्नी सती गेलेली नाही. रामायणातही उत्तरकांडात वेदवतीची आई सती गेलेली दाखविली आहे. तसेच रावणाने आपल्या मायेने रामाचे निधन दाखविल्यावर सीतेने त्याच्याबरोबर आपलेही दहन व्हावे अशी इच्छा प्रदर्शित केल्याचा रामायणाच्या सहाव्या कांडात उल्लेख आहे. परंतु तज्ज्ञ विद्वानांच्या मते हे दोन्हीही उल्लेख प्रक्षिप्त असावेत. कारण दशरथ किंवा रावण यांच्या पत्नी सती गेलेल्या दाखविलेल्या नाहीत.

ग्रन्थातले जुने उपलब्ध असे सतीचे ऐतिहासिक उदाहरण इ. स. पूर्वी ३१६ सालचे आहे. एक हिंदु सेनापति ग्रीकांविरुद्ध लढताना मरण पावला. त्याच्या दोन्हीही पत्नी त्याच्याबरोबर सहगमन करायला तयार झाल्या. मोठी पत्नी गरोदर होती म्हणून तिला सती जाऊ दिले नाही. धाकटी मात्र सती गेली. इ. स. च्या आरंभीच्या तीनचारशे वर्षांच्या या कालखंडात सतीची कल्पना आत्यंतिक त्यागाचे उदाहरण म्हणून लोकात प्रसृत झाली असली पाहिजे.

या चालीविरुद्ध स्मृतिकारांनी जोराचा आवाज उठविलेला दिसून येतो. विष्णुस्मृतीत (इ. स. १००) म्हटले आहे की, सतीची चाल ही सर्वांना पटणारी नाही; मरून देखील आपल्या मर्त्यांच्या सांनिध्यात राहता येणे शक्य नाही. 'कादंबरी' कर्त्या बाणाने तर या चालीवर कडाडून हल्ला चढविलेला प्रसिद्ध आहे.

परंतु या विचारवंतांच्या विरोधाचा विशेष परिणाम झाला नाही, असे दिसून येते. धर्माचारात अवास्तव त्यागधर्माची पकड मजबूत चालली होती व सतीचा जोराने जळजळीत पुरस्कार करणारे धर्मशास्त्रकार (इ. स. ७०० पासून पुढे) निघाले. अंगिरस् नावाच्या धर्मशास्त्रकाराने म्हटले आहे की, पतिमरणानंतर स्त्रीस त्याच्यासह अग्नीत पडण्याशिवाय दुसरा धार्मिक मार्ग नाही. हारीताने असे प्रतिपादले आहे की, गारुडी जसा सापाला बिळातून बाहेर ओढून काढतो तशी सती जाणारी स्त्री आपल्या पतीला नरकातून ओढून काढते. या मतांचा प्रभाव समाजावर पडलेला दिसून येतो. इ. स. ७८० ते ११०० या अवधीत उत्तर हिंदुस्थानात व विशेषतः काश्मीरमध्ये कितीतरी स्त्रिया सती गेलेल्या आढळून येतात. जयमतीसारखी व्यभिचारी राणी, त्याचप्रमाणे राजाच्या इतर रखेल्या यांनी राजांच्या मरणानंतर स्वतःला जाळून घेतले असे कल्हणाने 'राजतरंगिणी'त म्हटले आहे. स्त्रियाच नव्हे तर राजाची आई, बहीण, प्रधान, नोकर, दाया यांनीही सहगमन केल्याचे वर्णन आले आहे.

हिंदुस्थानच्या दक्षिणेकडील भागात मात्र इ. स. १००० पर्यंत सतीची चाल प्रसृत झाली नव्हती असे दिसते. पल्लव, चोल, पांड्य, या राजघराण्यांच्या शिलालेखांतून सतीचा एकही उल्लेख आढळून येत नाही. पण पुढे इ. स. १००० नंतर सतीच्या

चालीचा प्रसार दक्षिणेकडेही आला. ब्राह्मणवर्णातील स्त्रियाही या त्यागधर्मांत आपण मागे पडू नये म्हणून सती जाऊ लागल्या.

**नियोगाची चाल**—पतीच्या अभावीं स्त्रीनें अपत्योत्पादनार्थ नियोगाचा अवलंब करणें ही पद्धत इ. स. पूर्वी सुमारें ३०० पर्यंत प्रचलित होती. महाभारतातील अशी नियोगाचीं उदाहरणे प्रसिद्धच आहेत. पुढे काही धर्मशास्त्रकारांनी नियोगपद्धतीला जोराचा विरोध केलेला दिसून येतो. आपस्तंबाने म्हटले आहे की, नियोगज पुत्र हा शेवटी त्याच्या जनकाचाच. मनूने नियोगपद्धति पशुधर्मतुल्य मानली असून, विधवेला अपत्यार्थ नियोग करावयास लावणे निंद्य होय असे प्रतिपादिले आहे. या उलट वसिष्ठ व गौतम यांच्यासारखे धर्मसूत्रकार नियोगाला काही मर्यादेपर्यंत पाठिंबा देतात. विधवेची इच्छा नसेल तर नियोग करायला लावू नये असा स्पष्ट आदेश काही धर्मसूत्रांतून आढळतो. एखाद्या वेळेला दीर आपल्या विधवा भावजयीला तिच्या आपल्यापासून होणाऱ्या पुत्राला इस्टेटीमध्ये हिस्सा मिळेल या लोभाने, नियोगाला भाग पाडणे शक्य होते. त्याविरुद्ध हा आदेश असावा. 'नियोग लोभप्रेरित नसावा' असे वसिष्ठधर्मसूत्रात वचन आहे. पुढे इ. स. ६०० नंतर नियोगपद्धति बंद होत गेली.

**पुनर्विवाहाची पद्धत**—ही प्राचीन काळापासून काही प्रमाणात अमलात असावी. एखादीचा नवरा बाहेर प्रवासाला गेला असता तो पाच वर्षे जर परत आला नाही किंवा आल्यावर त्या स्त्रीची त्याच्याबरोबर राहायची इच्छा नसेल तर तिने आपल्या कुटुंबातील जवळच्या नातेवाईकाशी लग्न करावे असे वसिष्ठ (इ. स. १००) या धर्मशास्त्रकाराने म्हटले आहे. वसिष्ठाने ही पुनर्विवाहाची परवानगी स्त्रीला, तिला मुले असली तरी दिलेली आहे. कौटिल्याने पुनर्विवाहास अशाच परिस्थितीत परवानगी दिलेली आहे.

पण पुढे हळूहळू विधवांच्या पुनर्विवाहाला विरोध होऊन तो निंद्य समजला जाऊ लागला. महाभारतात दुर्योधनाच्या एका उक्तीमधील उपमेच्या द्वारा हा विरोध व्यक्त झाला आहे. दुर्योधन महायुद्धाच्या शेवटच्या दिवशी म्हणतो, 'विधवा स्त्रीचा उपभोग घ्यावा असे ज्याप्रमाणे वाटत नाही त्याप्रमाणे क्षत्रियश्रेष्ठ मारले गेले आहेत अशा पृथ्वीचे राज्य मला उपभोगावेसे वाटत नाही.' विष्णुस्मृतीने (इ. स. २००) विधवेला कडक ब्रह्मचर्यव्रत पाळावयास सांगितले आहे. विधवेने पुनर्विवाहाचा विचारही मनात आणू नये असे मनूने एके ठिकाणी म्हटले आहे. नारदस्मृतीत (इ. स. ५००) मात्र परस्परविरुद्ध मते दिसून येतात. एके ठिकाणी असे म्हटले आहे की, मुलीचा विवाह फक्त एकदाच होतो तर दुसऱ्या ठिकाणी असे प्रतिपादिले आहे की, पति मृत झाला असेल, दीर्घ प्रवासाला गेला असेल किंवा संन्यासी झाला असेल तर त्याच्या पत्नीने पुनर्विवाह करावा. या परस्परविरोधी वचनांवरून असा निष्कर्ष निघू शकेल की, विधवेचा पुनर्विवाह ब्राह्मणजातींतून जरी निषेधार्ह मानला जाऊ लागला असला तरी इतर वर्णांतून तो चालू असावा असे वाटते. प्रसिद्ध सम्राट् चन्द्रगुप्त विक्रमादित्य

(इ. स. ४१४) हा वैश्यवर्णाचा असावा; याने आपल्या मोठ्या भावजयीशी भावाच्या मरणानंतर लग्न लाविले. यांच्यापासून झालेल्या मुलगा कुमारगुप्त हा पुढे गुप्त सम्राट् झाला.

बालविवाह प्रचलित झाल्याच्या काळी काही धर्मशास्त्रकारांनी पुनर्विवाहाला परवानगी काही अटींवर दिलेली आढळते. नुसता विवाहसंस्कार झाला पण जर समागम झाला नसेल तर स्त्रीने पुनर्विवाह करावयास हरकत नाही. परंतु इ. स. १००० पासून पुनर्विवाहाचा निषेध बालविधवांनाहि लागू करण्यात येऊ लागला असे दिसून येते. पुनर्विवाहाची पद्धति पूर्वीच्या युगाला लागू होती ती हल्लीच्या कलियुगात योग्य नव्हे असे देवणभट्टाने (११५० इ. स.) म्हटले आहे. या निषेधाची कमाल येथपर्यंत गेली की, कन्येचा नुसता वाङ्निश्चय झाला असला व प्रत्यक्ष विवाह होण्यापूर्वी जर पति मेला तरी देखील तिने पुनर्विवाह करू नये असा निर्बंध घालण्यात आला. अर्थात् हा अधर्मसमपणा सर्व विचारवंतांना पटला नाही. विवाह पूर्ण झाला असे सप्तपदीनंतर समजावे हे मनूचे वचन साधारणपणे सर्वमान्य होते. पण पुढे इतका व्यापक अर्थही लुप्त झाला व इ. स. ११०० नंतर पुनर्विवाहाची प्रथा प्रायः बंदच झाली. पुढे ब्रिटिशांच्या विचारसंपर्कानंतर ही पुनर्विवाहबंदी समाजधुरीणांना अन्याय्य वाटून पुनर्विवाह पुन्हा कसे रूढ झाले हा पुढील इतिहास विदितच आहे.

विधवेच्या केशवपनाची चाल इ. स. ५०० पर्यंत तरी नसावी असे दिसते. काही धर्मशास्त्रीय वचनांतून विधवांनी केशसंस्कार म्हणजे केशभूषा करू नये एवढेच म्हटले आहे. महाभारतात (१५ व्या पर्वात) धृतराष्ट्राच्या विधवा सुनांनी आपली सीमन्तकेश-रचना व्यवस्थित केली होती असे म्हटले आहे.

मदनपालाच्या मेहोत्याच्या शिलालेखात (इ. स. ९००) विधवांचे पूर्वीचे कुरळे केस तेल न लावल्याने सरळ ताठ होत असत असे म्हटले आहे. नवव्या शतकानंतर केशवपनाच्या चालीचा प्रसार झाला असे दिसते. यापुढील काळात होऊन गेलेल्या वेदव्यास या स्मृतिकाराने असे म्हटले आहे की, विधवा सती न जाता जर जिवंत रहाणार असेल तर तिने आपल्या केशांचा त्याग करून आपले शरीर तपश्चर्येने शुष्क करून टाकावे. स्कन्दपुराणात असे वचन आहे की, विधवेची बांधलेली वेणी मृत भर्त्यांस जखडणारी, बाधक होते म्हणून विधवेने केशवपन केले पाहिजे. पुढे १२ व्या शतकानंतर ही केशवपनाची चाल विशेषतः ब्राह्मणजातीमध्ये पसरली. ही चाल उत्तरेपेक्षा दक्षिणेकडील प्रांतात विशेषतः आढळून येत होती.

## ४. आर्थिक हक्क व सवलती

स्त्रियांचे आर्थिक हक्क व सवलती याविषयी विचार करता मागल्या कोणत्याही-काळापेक्षा या सूत्रस्मृतींच्या काळात या बाबतीत अत्यंत अभिमानास्पद व उज्ज्वल प्रकारची प्रगति झालेली दिसून येते. पूर्वीच्या काळी पतिपत्नी आपल्या घराचे व घरातील

चीजवस्तूंचे संयुक्त स्वामी किंवा मालक समजले जात असत. परंतु प्रत्यक्षात मात्र स्त्रीला मालमत्तेत समसमान वाटा व दर्जा मिळाला नाही. तिला काही गौण प्रकारचे हक्क मिळत. याज्ञवल्क्याच्या मताप्रमाणे, स्त्रीचा या मालमत्तेच्या एक तृतीयांश वाट्यावर अधिकार होता. आपस्तंबधर्मसूत्रानुसार पति प्रवासाला गेल्यावर त्याच्या गैरहजेरीत पत्नीला नेहमीचा खर्च करण्याचा हक्क होता. पतिपत्नीच्या संयुक्त मालकीत पत्नीला समसमान अधिकार देण्यास पूर्वीचा काल अनुकूल नव्हता. जमीनजुमला ही स्थावर मालमत्ता मोठ्या अविभक्त कुटुंबाची किंवा ग्रामपंचायतीची समजली जात असे. वैयक्तिक मालकी अजून अस्तित्वात आली नव्हती. जेव्हा पुढे वैयक्तिक मालकी अस्तित्वात आली त्या वेळेला स्त्रीचा दर्जा कमी होऊन पति हेच सर्वस्व किंवा देव मानला जाऊ लागला. म्हणून पत्नीला पतीबरोबर समसमान आर्थिक हक्क मिळणे दुर्घट झाले. स्थावर मालमत्तेवर स्त्रियांना अधिकाराचा वाटा पुढे धन्याच उशिरा मिळाला. परंतु जंगम मालमत्ता म्हणजे दागदागिने, वस्त्रप्रावरणे, जडजवाहिर यांवरील त्यांचा हक्क चन्याच आधीपासून मान्य झाला. स्त्रियांच्या अधिकारातील जंगम मालमत्तेचा 'स्त्रीधन' असे नाव आहे. 'स्त्रीधना'चा उगम, कन्येबद्दल प्राचीन काळी आईबापांना जे शुल्क मिळत असे त्यातून झाला असावा. आईबाप वात्सल्यभावनेमुळे वरपक्षाकडून मिळालेल्या शुल्काचा काही भाग किंवा ते सर्वच आपल्या मुलीला देऊन टाकीत असत. मुलीच्या मरणानंतर ते तिचे स्त्रीधन तिच्या संततीकडे येत असे. जर ती अनपत्य मृत झाली असेल तर ते तिचे सर्व स्त्रीधन पुन्हा तिच्या माहेरी वडिलांना मिळत असे.

कन्येचे शुल्क ज्या विवाहप्रकारात दिले जात नसे त्या ब्राह्मादि विवाहामध्ये वधूला विवाहसमयी काही देणग्या मिळत. या देण्यांना 'पारिणाह्य' अशी संज्ञा आहे. 'पारिणाह्य' वस्तू म्हणजे मुख्यतः अलंकार व वस्त्रप्रावरणे असत. यावर स्त्रीची संपूर्ण मालकी असे.

स्त्रियांच्या बाबतीत काही जुन्या कुरूपी चालींचे अवशेष दाखविणारी मनुस्मृतीमध्ये वचने आहेत. उदाहरणार्थ, त्यात एका ठिकाणी (८–४१६) असे म्हटले आहे की, "भार्या, पुत्र व दास यांना धनावर कोणताही हक्क नाही. त्यांना जे काही धन (देणगी) मिळाले असेल ते त्यांचे नसून त्यांच्या मालकाचे होय." पण हे वचन फार जुन्यापुराण्या जमान्याला लागू होते, आता ते लागू नाही, असे धर्मशास्त्रकारांनीच निक्षून सांगितले आहे. बौधायन व मनु यांसारखे धर्मशास्त्रकार स्त्रियांना वारसाहक्क देण्याच्या विरुद्ध असले तरी स्त्रीधनावरील त्यांच्या अधिकाराला त्यांचा संपूर्ण पाठिंबा आहे.

स्त्रीधनामध्ये कोणकोणत्या वस्तूंचा अंतर्भाव होत होता? मनुस्मृतीप्रमाणे (९–१९४) स्त्रीधन सहा प्रकारचे आहे: (१ – ३) पिता, माता व भ्राता यांनी दिलेल्या देणग्या. (४) पतीने विवाहोत्तर प्रेमाने दिलेल्या देणग्या. (५ – ६) विवाहाच्या वेळी किंवा नवीन घरी आल्यावर कोणी दिलेल्या देणग्या. विष्णुस्मृतीने स्त्रीधनात आणखी तीन गोष्टींचा समावेश केला आहे: १ पुत्राने, २ कोणा जवळच्या नातेवाईकाने दिलेल्या देणग्या,

३ पतीने दुसरे लग्न केल्यावर आपल्या पहिल्या पत्नीला भरपाई म्हणून दिलेले द्रव्य. त्यानंतर मातिपाईकांशिवाय इतरांकडून मिळालेल्या देणग्या आणि पत्नीने स्वतः काम करून मिळविलेले द्रव्य, यांचा स्त्रीधनात अंतर्भाव होत नसे.

इ. स. च्या ७ व्या शतकापासून पुढे स्त्रीधनाची व्याप्ति अधिक विस्तृत करण्याकडे कल दिसून येतो. देवल या स्मृतिकाराने स्त्रीच्या चरितार्थाला लागणारे धन, व तिला वेळोवेळी मिळालेल्या वस्तू यांचा स्त्रीधनात अंतर्भाव केला आहे. विज्ञानेश्वराने (इ. स. ११ वे शतक) तर स्त्रीधनाची व्याप्ति खूपच विस्तृत केली आहे. त्यात वारसाहक्काने मिळणारी मालमत्ता, वाटणीने व विक्रयाने मिळालेले द्रव्य व चीजवस्तू इत्यादींचाही समावेश केला आहे. अपरार्क, कल्यवर या नंतरच्या धर्मशास्त्रपंडितांनी विज्ञानेश्वराने दिलेला स्त्रीधनाचा अर्थ मान्य केला आहे. या उलट जीमूतवाहन (१२ वे शतक) व देवणभट्ट यांनी तो अर्थ स्वीकारला नाही.

स्त्रीधनावर जरी स्त्रियांचा हक्क मान्य केला गेला असला तरी तो हक्क सर्वस्वी संपूर्ण नव्हता. मनूने म्हटले आहे की, (९–१९९) स्त्रीने आपल्या पतीच्या आज्ञेशिवाय स्वतःचे स्त्रीधन देखील दुसऱ्या कोणास देऊन टाकता येणार नाही. स्त्रीधनाच्या हक्कावरील घातलेली ही मर्यादा पुढेपुढे अन्याय्य वाटू लागली. त्यातील अन्यायाचे निराकरण करण्याच्या हेतूने नंतरच्या धर्मशास्त्रकारांनी स्त्रीधनाचे दोन प्रकार मानले: (१) सौदायिक म्हणजे आई, बाप, भाऊ, पति यांनी प्रेमाने दिलेले धन हा पहिला प्रकार. या सौदायिक स्त्रीधनावरील स्त्रियांना त्याचा इच्छेप्रमाणे विक्रय करणे, दान करणे, यावाबत संपूर्ण स्वातंत्र्य आहे असे कात्यायनाने म्हटले आहे. (२) असौदायिक म्हणजे इतरांकडून मिळवलेले धन वा वस्तू. त्यांचा फक्त जिवंत असेपर्यंत स्त्रियांना उपभोग घेता येत असे. त्याना ते देऊन टाकण्याचे स्वातंत्र्य नव्हते.

स्त्रीधनामध्ये आधी दागिने व मूल्यवान् वस्त्रप्रावरणे यांचा अंतर्भाव होता. पुढे त्यात स्थावर मालमत्तेचाही अंतर्भाव काही धर्मशास्त्रकारांनी केलेला आढळून येतो. कात्यायनाने स्थावर मालमत्तेचा सौदायिक स्त्रीधनामध्ये समावेश केलेला आहे. या उलट नारद या स्मृतिकाराने स्त्रीधनात स्थावराचा समावेश केलेला नाही. पुढील धर्मशास्त्रकारांनी त्याचेच म्हणणे मान्य केले आहे.

धर्मशास्त्रकारांनी असेही लिहून ठेवले आहे की पतीला स्त्रीधनावर कोणत्याही प्रकारचा हक्क नाही. जर त्याला स्त्रीधनाचा उपयोग करणे भाग पडले तर त्याने ते पत्नीला सव्याज (सवृद्धि) परत केले पाहिजे. जर काही अनपेक्षित आपत्तींना तोंड देण्याकरिता स्त्रीधन वापरावे लागले तर ते परत द्यावे की नाही याबद्दल धर्मशास्त्रकारात मतभेद दिसून येतो. याज्ञवल्क्याच्या मते परत दिले नाही तरी चालेल. याउलट कात्यायनाने म्हटले आहे की, पतीने घेतलेले स्त्रीधन परत द्यायचे आपले वचन पाळले पाहिजे. जर त्याला आपल्या हयातीत ते पाळता आले नाही तर ते ऋण म्हणून त्याच्या मुलांनी फेडले पाहिजे.

स्त्रीच्या मरणानंतर तिचे स्त्रीधन तिच्या मुलींना मिळाले पाहिजे या बाबतीत बहुसंख्य धर्मशास्त्रकारांची एकवाक्यता आहे. स्त्रीधनात बहुधः अलंकार-दागिने व उंची वस्त्रप्रावरणे यांचाच अंतर्भाव असल्यामुळे त्यांचा उपयोग मुलींच करू शकणार हे उघडच आहे. अर्थात सुनांना त्यांचा उपयोग करता आला असता हे खरे. परंतु आईचा ओढा मुलीकडे अधिक असल्यामुळे स्त्रीधन मुलीकडे जाणे साहजिकच होते. त्यातही पुन्हा मुलींमध्ये निवड करावयाची झाल्यास विवाहित मुलींपेक्षा अविवाहित मुलींचा, विवाहित मुलींमध्येहि ज्यांची सांपत्तिक स्थिति बरी नाही अशांचा स्त्रीधनावर अधिक हक्क मानला आहे.

मनूचे एक वचन असे आहे की, आई मेल्यावर तिच्यामागे राहिलेल्या स्त्रीधनात तिच्या सर्वच मुलांना व मुलींना हिस्सा मिळावा (९–१९२). या वचनाचा अभिप्राय असा असावा की पतीने प्रेमाच्या भरात इतर मुलांचा विचार न करता जर पत्नीला द्रव्याच्या मोठमोठ्या देणग्या, पुढे तिला तिच्या आपत्काळात उपयोगी पडाव्या म्हणून, दिल्या असतील तर मुलांना अन्याय होऊ नये म्हणून त्यानाही स्त्रीधनात हिस्सा दिला असावा.

इतर देशांतील समाजाच्या त्या काळच्या इतिहासाशी तुलना करता स्त्रीधनाचा हा इतिहास हिंदु स्त्रीजीवनाच्या इतिहासातील एक उज्ज्वल पर्व समजले जाते. स्त्रीधनाची व्याप्ति वाढवीत राहून स्त्रियांच्या आर्थिक हक्काविषयी अत्यंत स्पृहणीय जागरूकता हिंदू समाजाने दाखविली यात शंका नाही.

आईबापांना एकुलती एक मुलगीच असली, तिला भाऊ नसला तर पूर्वीच्या काळी म्हणजे इ. स. पूर्वी २०० वर्षेपर्यंत अशी प्रथा होती की, मुलीलाच वडिलांची सर्व इस्टेट मिळे. पण त्यानंतरच्या काळात मुलीच्या अधिकाराविषयी मतभेद होऊन तिचे हक्क कमी कमी होत गेले. आपस्तंबाने म्हटले आहे की, 'जवळचा सपिण्ड नातेवाईक किंवा गुरु, आचार्य किंवा शिष्य जर कोणी नसेल तरच मुलीला ती इस्टेट देण्याचा हक्क आहे.' त्याने अशीही पुस्ती जोडली आहे की, मुलीला देण्यापेक्षा, धर्मकृत्यासाठी ती इस्टेट देऊन टाकावी. परंतु आपस्तंबाच्या ह्या मताला इतर धर्मशास्त्रज्ञांचा पाठिंबा फारसा मिळालेला दिसत नाही. महाभारतात (१३–४५–१२) असे वचन आहे की, "जसा पुत्र तशी दुहिता. ती असताना, दुसऱ्या कोणाला त्याचे धन का मिळावे? तिला एकला नाही तरी अर्धा भाग मिळाला पाहिजे." कौटिल्याने मुलीचा हक्क मान्य केला असून तिला अंशतः का होईना वाटा मिळाला पाहिजे असे म्हटले आहे. धर्मशास्त्रकारात असेही काही निघाले की, एकुलत्या एक मुलीला वडिलांच्या इस्टेटीचा वारस समजावे, पण ते फक्त तिचा विवाह होईपर्यंतच. कात्यायन याच मताचा होता. परंतु या मताला फारसा पाठिंबा मिळालेला दिसत नाही.

मुलीला जर भाऊ असले तर पित्याच्या इस्टेटीमध्ये तिला कोणताही वारसा हक्क नसला पाहिजे असे अनेक धर्मशास्त्रकारांचे मत दिसून येते. एकच शुक्रनीतीचा कर्ता

शुक्राचार्य असा आहे की, त्याने मुलीस इतर मुलांइतका थोडा तरी वाटा—भावाच्या हिश्याच्या १/८ तरी—मिळाला पाहिजे असे म्हटले आहे. म्हैसूरमधील एका इ. स. ११८८ च्या शिलालेखात एका भावी नायाच्या सहस्थाने त्याची इस्टेट मुलामुलींमध्ये वाटून दिल्याचा उल्लेख आहे, तो शुक्रनीतीस अनुसरून दिसतो. इतर धर्मशास्त्रकार, उदाहरणार्थ विष्णु व नारद, यांनी मुलीस वाटा मिळावा पण तो तिचा विवाह होईपर्यंतच असे म्हटले आहे.

या पूर्वीच्या काळात म्हणजे सुमारे इ. स. पूर्वी १०० पर्यंत विधवेचा पतीच्या इस्टेटीवर वारसा हक्क समाजाला मान्य नव्हता असे दिसून येते. त्यावेळी विधवांना नियोग व पुनर्विवाह करता येत असल्यामुळे तसा वारसा हक्क त्यांना देण्याची जरूर वाटली नसावी. आपस्तंबाने म्हटले आहे की, पतीची इस्टेट जवळच्या सपिंड नातेवाईकाला मिळावी पण ती विधवेला मिळू नये. मनूचेही तेच मत आहे. पण त्यापुढील काळात, नियोग व पुनर्विवाह यांची समाजातील प्रतिष्ठा जसजशी कमी होत गेली तसतशी विधवेची काही तरतूद करणे अवश्य आहे अशी जाणीव उत्पन्न झाली. विधवेचा चरितार्थ चालविण्यापुरता इस्टेटीचा भाग मिळावा, असे धर्मशास्त्रकार म्हणू लागले. कौटिल्याने म्हटले आहे की, राजाकडे जरी मृताची इस्टेट आली तरी त्यातील काही भागाचा विनियोग विधवेच्या चरितार्थाकरिता केला पाहिजे. याच्या पुढचे पाऊल म्हणजे गौतमासारख्या धर्मशास्त्रकारांनी विधवेला इतर सपिंड नातेवाईकांबरोबर समान वारसा हक्क असावा असे म्हटले आहे. एवढ्यावरच पुढील धर्मशास्त्रकारांचे समाधान झाले नाही. विधवेला सर्व इस्टेटीवर हा हक्क नसावा? विष्णु आणि याज्ञवल्क्य या धर्मशास्त्रकारांनी तर स्पष्ट असे प्रतिपादन केले आहे की, पुत्राच्या अभावी, पतीच्या सर्व इस्टेटीवर पत्नीचाच संपूर्ण वारसा हक्क असावा. कर्नाटकामधील एका शिलालेखात (इ. स. १२ वे शतक) विधवेचा पतीच्या संपूर्ण इस्टेटीवर हक्क मान्य केलेला आढळून येतो. पण याविरुद्ध लवकरच प्रतिक्रिया झाली. नारद, कात्यायन, माळव्याचा भोजराजा (इ. स. १०५५) यांनी विधवेचा संपूर्ण हक्क अमान्य केला. 'संततीच्या अभावी मृताची इस्टेट राजाकडे जावी व त्यातून विधवेला चरितार्थ चालविण्यापुरता भाग राजातर्फे मिळावा' असे त्यांनी प्रतिपादिले आहे. कालिदासाच्या 'शाकुंतल'त अनपत्य मृत सार्थवाहाच्या सर्व इस्टेटीचा वारसा राजाकडे येतो या मताचा उल्लेख आला असून राजाने तो वारसा गर्भस्थ अपत्याला मिळावा असा निर्णय दिला आहे. विधवेचा वारसा हक्क मर्यादित असावा असे एकंदर पुढच्या काळातील धर्मशास्त्रकारांचे मत दिसते. विधवेने इस्टेटीचा उपभोग घ्यावा पण ती कोणाला देऊन टाकायचा तिला हक्क नाही, असे महाभारतात (१३-४७-२४) म्हटले आहे. कात्यायनाचे देखील हेच मत दिसून येते.

मातेचा वारसा हक्क धर्मशास्त्रकारांनी मान्य केला आहे. जर मुलगा अनपत्य वारला, तर त्या मुलाच्या मालमत्तेचा वारसा आईकडे जातो असे मनूने (९-२१७) म्हटले आहे. विधवेचा वारसा हक्क मान्य न करणाऱ्या मनूने मातेचा वारसा हक्क

मान्य केला आहे, हे विशेष होय. हिंदू संस्कृतीमध्ये मातेबद्दल जी आदरभावना विशेषत्वाने दिसून येते त्याचे हे निदर्शक होय.

पती जिवंत असताना त्याने जर आपल्या संपत्तीची वा मालमत्तेची वाटणी केली व पत्नीला पतीबरोबर जीवन कंठणे अशक्य झाले तर तिला संपत्तीचा एक तृतीयांश वाटा मिळावा असे याज्ञवल्क्य-स्मृतीत सांगितले आहे. जर पतिपत्नींचे चांगले असेल, तर अर्थातच पत्नीला दिलेल्या वाट्याची गरज पतीच्या वाट्यात पडत असे.

## ५. स्त्रियांचे सामाजिक व धार्मिक जीवनात स्थान व समाजाचा त्यांच्याविषयी दृष्टिकोण

सार्वजनिक व सामाजिक जीवनात या काळात स्त्रियांचा काय दर्जा होता, त्या सार्वजनिक व्यवहारात कितपत भाग घेऊ शकत, त्यांच्याविषयी समाजाचा साधारण दृष्टिकोण काय होता याचा संक्षेपाने विचार करावयाचा आहे.

प्रथम पडदापद्धतीचा विचार करू. असे दिसते की, सुमारे इ. स. पहिल्या शतकापर्यंत स्त्रियांना सार्वजनिक ठिकाणी पडदा, अवगुंठन किंवा ओढणी घेण्याची प्रथा नव्हती. प्राचीन वैदिक कालात मुलीचे मुलाबरोबर सहशिक्षण होत असे. स्त्रिया सभासंमेलनातून भाग घेत असत.

अवगुंठनासारख्या पद्धतीचा कालदृष्ट्या पहिला उल्लेख महाभारत-रामायणातून सापडतो. धृतराष्ट्र अरण्यात जावयास निघताना स्त्रिया राजमार्गावर आल्या त्यावेळी त्यांचे वर्णन करताना ज्यांना पूर्वी सूर्यचंद्रांनीही पाहिले नव्हते असे वर्णन केले आहे (म. भा. १५-२१-१३). तसेच रामायणात सीता वनात जावयास निघाली असता, 'जी पूर्वी आकाशस्थ भूतांना' देखील दिसू शकत नव्हती ती आज भर रस्त्यावरून जात आहे', असे म्हटले आहे (२-३३-८). परंतु वरील उतारे या प्राचीन महाकाव्यांत प्रक्षिप्त असावेत, असा विद्वानांचा अंदाज आहे. कारण यावरील इतर उल्लेखांशी हे उल्लेख जुळत नाहीत. कौसल्या, कैकेयी, सुमित्रा चित्रकूट पर्वताकडे जावयास निघाल्या तेव्हा त्यांनी अवगुंठन वापरले असे वर्णन नाही. द्रौपदी द्यूतगृहाकडे निघाली असता तिने अवगुंठन घेतल्याचे वर्णन नाही. महाभारतातील पौष्याच्या कथेमध्ये (१-३-११५) उत्तंक थेट राणीच्या अंतर्गृहात जातो असे वर्णन आहे. राणी

होता. 'ललितविस्तर' या बौद्ध संस्कृत ग्रंथामध्ये गोपा नावाच्या वधूस अवगुंठन घालण्यास सांगितले असता तिने परखडपणे असे उत्तर दिले आहे की, "आम्ही आमचे वदन का झाकावे? आम्ही अंतःकरणाने पवित्र व संयमी आहोत, तेव्हा अवगुंठनाची आम्हांला काय जरूरी?" इ. स. नंतर एक हजार वर्षांच्या काळातील जे पुत्ते शिल्पांचे व असंख्यात भित्तिचित्रांचे अवशेष उपलब्ध आहेत, त्यांतून स्त्रिया कोठेच अवगुंठनवती दिसत नाहीत. या चित्रांतून स्त्रीपुरुषसमाज हा एकत्र संचार करीत असलेल्या दिसतो, तरीही स्त्रियांना अवगुंठन दिसत नाही. ह्युएन त्संगने (७वे शतक) जे त्यावेळच्या हिंदू समाजाचे वर्णन केले आहे त्यात पडदा या चालीचा उल्लेख नाही. कल्हणाच्या राजतरंगिणीमध्येही नाही. १०व्या शतकात येथे येऊन गेलेल्या अरबी प्रवासी अबू झैद याने असे म्हटले आहे की, राजदरबारी बहुतेक राण्या बुरखा किंवा पडदा घालताना दिसत नाहीत.

मुसल्मान राजांचे वर्चस्व स्थापित झाल्यानंतरच पडद्याची पद्धत सर्वसाधारण रूढ झाली. तीही विशेषतः उत्तर हिंदुस्थानात. पुढे दक्षिणेकडे विशेषतः महाराष्ट्रात मराठे सरदारांच्या स्त्रियांकडून मुसल्मानी स्त्रियांचे अनुकरण म्हणून पडदापद्धती स्वीकारली गेली.

पूर्वीच्या काळी स्त्रियांनी गायन, नृत्यकला शिकणे प्रतिष्ठितपणाचे समजले जात असे. परंतु त्यानंतर प्रतिष्ठित व संभावित वर्गातील स्त्रियांनी गायन, नृत्य शिकणे व करणे अनुचित समजू लागले. गणिका किंवा कलावंतिणी यांचा एक निराळा वर्ग समाजात तयार झाला. विवाहाची वयोमर्यादा कमी झाल्यावर, अप्रौढ, अशिक्षित पत्नीच्या सहवासात न रमणारे आणि संगीत व नृत्य यांची आवड असलेले युवक, यांना या गणिकांबद्दल आकर्षण वाटणे साहजिकच होते. गणिकांना समाजात जरी एका अर्थी प्रतिष्ठा नव्हती, तरी ललितकलांच्या कार्यातील त्यांच्या नैपुण्याबद्दल आदर व आकर्षण होते. वैशालि व राजगृह या सारख्या राजधान्यांतून नगरास्थसंस्थेनेच गणिकांना ऐश्वर्याचा व मानाचा दर्जा दिलेला अंबापालीसारख्या गणिकेच्या उदाहरणावरून दिसून येतो. त्यांपैकी काही गणिका शीलसंपन्न व एकाच पुरुषाशी एकनिष्ठ असलेल्या आढळून येतात.

मोठमोठ्या देवळांतून गायन-नर्तन करणाऱ्या स्त्रिया कायम ठेवलेल्या असत. मुल्तान येथे सूर्यमंदिरात अशा पुष्कळ मुली ठेविल्या होत्या असे ह्युएनत्संगाने (७ वे शतक) लिहून ठेवले आहे. राजतरंगिणीमध्येही तसा उल्लेख आहे. सोमनाथ येथील मंदिरात देवासमोर गायन-नर्तन करायला ५०० मुली ठेविल्या होत्या, असे वर्णन सापडते. दक्षिण हिंदुस्थानातील कित्येक कोरीव लेखांतून देवदासींच्या या प्रथेचा उल्लेख आढळून येतो.

राज्यकारभारही स्त्रिया कर्तबगारीने करीत असत. युद्धामध्ये राजे मरण पावल्यावर, जर त्यांना पुत्र नसेल व मुलगी असेल तर त्या मुलीला राज्यावर बसवावे असे भीष्माने युधिष्ठिराला सांगितल्याचे महाभारतात (१२-३४-३३) वचन आहे. ओरिसामध्ये इ. स. च्या ९व्या शतकात राजा ललिताभरणदेव व त्याचा पुत्र यांच्या निधनानंतर त्याच्या राणीला राज्यावर बसविले, व नातू होईपर्यंत तिने राज्यकारभार

हाक्या असे वर्णन आहे. पहिला चन्द्रगुप्त आपली लिच्छवि गणातील राणी कुमारदेवी हिच्यासह संयुक्तपणे राज्यकारभार करीत होता. ४थ्या शतकात प्रभावतीगुप्ताने पतिनिधनानंतर मध्यप्रदेशावर १० वर्षे आपला मुलगा वयात येईपर्यंत राज्य केले. ७व्या शतकात चालुक्य घराण्यातील राणी विजयभट्टारिका महाराष्ट्रातील दक्षिण विभागावर राज्य करीत होती. इ. स. ७८६मध्ये राष्ट्रकूट घराण्यातील राजा ध्रुव याची राणी शीलमहादेवी हिने स्वतःच्या अधिकारात भूमिदान दिल्याचा उल्लेख आहे.

स्त्रियांना हिंदू समाजात कोणते स्थान होते, त्यांच्याविषयीच्या समाजाच्या आदरभावनेत निरनिराळ्या कालखंडांत, जीवनाच्या भिन्न भिन्न अंगांना अनुलक्षून कमीअधिक बदल कसा होत गेला याची कल्पना वरील विवेचनावरून येऊ शकेल. या ठिकाणी आणखी एका मुद्याचा विचार करणे उचित होईल. ज्या स्त्रियांच्या नशिबी गुंडांच्या किंवा दुश्मनांच्या हाती सापडून भ्रष्ट किंवा पतित होण्याचे आले, त्यांच्या बाबतीत हिंदू समाजाने कोणती वृत्ती दाखविली हे पाहण्यासारखे आहे. रामायणात सीतेला ज्या कठोर दिव्यातून जावे लागले त्यावरुन पूर्वी समाज स्त्रियांच्या बाबतीत किती असमंजस व कठोर होता हे दिसून येते. या वृत्तीतील असमंजसपणा व अन्यायीपणा धर्मशास्त्रकारांच्या लक्षात येऊन त्यांनी सीतेसारख्या अवस्थेत पडलेल्या सामान्य स्त्रियांविषयी अधिक समंजस व सहानुभूतिपूर्ण दृष्टिकोण बाळगलेला दिसत येतो. वसिष्ठ-धर्मसूत्रात असे म्हटले आहे की जर एखादी स्त्री चोर-दरवडेखोरांनी हरण करून नेली असेल, किंवा तिच्यावर बलात्कार झाला असेल, तर ती परत आल्यावर तिचा कुटुंबाने त्याग करू नये. बृहस्पति या धर्मशास्त्रकाराने तर 'स्त्री जरी अत्यंत दूषित किंवा भ्रष्ट झाली असली तरी तिचा त्याग करणे योग्य नव्हे, योग्य त्या प्रायश्चित्त-संस्काराने तिला त्यातून मुक्त होता येईल' असा हवाला दिला आहे. जर बलात्कार झालेल्या नारीला गर्भ राहिला तर काय? त्याबाबत अत्रि व देवल आदी धर्मशास्त्रकारांनी असा मार्ग काढला आहे की, तो प्रगत झाल्यावर मग तिला पूर्वीच्या कुटुंबात परत घ्यावे.

इ. स. च्या ९व्या शतकापर्यंत हिंदू समाजाने अत्रि-देवलाच्या मताप्रमाणे पतित स्त्रियांच्या बाबतीत सहानुभूतिपूर्ण वृत्ती दाखविली. आठव्या शतकात मुसलमानांच्या आक्रमणात हजारो स्त्रिया मुसलमानांनी गिरफदार करून ठेवल्या. त्यातून ज्या निसटून आल्या, त्यांना परत कुटुंबात व समाजात पूर्ववत स्थान देण्यात आले. पुढे ११ व्या शतकानंतर मात्र समाजाची वृत्ती अनुदार बनली. शत्रूने पकडून दास्यात ठेवलेल्या स्त्रियांना परत घ्यायचे धोरण हिंदू समाजाने सोडले. मुसलमानांच्या अनुकरणाने वा अवास्तव पावित्र्याच्या भावनेने हिंदू समाजाच्या वृत्तीत हा बदल घडून आला असेल. याचा परिणाम हिंदू समाजाला भयंकर अनर्थकारक ठरला. मुसलमानांनी बलात्काराने पकडलेल्या स्त्रियांना परत आपल्या कुटुंबात यायची इच्छा असूनही त्यांना समाजाने आपला दरवाजा बंद केला व त्यांच्या पुढील संततीला हिंदू समाज कायमचा मुकला. मुसलमान समाजाच्या संख्येत भर पडली.

स्त्रियांच्याबद्दल संमानभावना धर्मशास्त्रग्रंथांतून अनेक प्रकारांनी दिसून येते. स्त्रीही अवध्य होय, स्त्रीला वाचविण्याकरता प्राण देणाराला स्वर्ग मिळतो, रस्त्यावरून जाताना गर्दीत स्त्रीला आधी वाट करून द्यावी, नदी पार करताना तरीचे भाडे स्त्रीकडून घेऊ नये, असे धर्मशास्त्रात उल्लेख आढळून येतात. स्त्री म्हणजे गृहाची लक्ष्मी होय; साध्वी स्त्रिया लोकमाता होत; त्या पृथ्वीचे धारण करतात; जेथे स्त्रियांना दुःख, यातना भोगाव्या लागतात ते कुळ लवकर विनाश पावते; पृथ्वीवरील सर्व तीर्थे पतिव्रतेच्या पायाशी लोळण घेतात अशा आशयाची वचने महाभारत, धर्मशास्त्रग्रंथ यांमधून विखुरलेली आहेत.

याउलट स्त्रियांची निंदा करणारी वचनेही अनेक सापडतात हे खरे. परंतु ती अवास्तव संन्यासमार्गाकडे झुकणाऱ्या पुरुषांची असून अविवेकी व एकतर्फी आहेत. ती समाजाच्या भावनांची प्रातिनिधिक नव्हेत असे समग्र विचार करणाराला दिसून येईल. वराहमिहिराने आपल्या 'बृहत्संहिता' या ग्रंथात अशा स्त्रीद्वेष्ट्यांची चांगली खरपूस हजेरी घेतली आहे: *"गरीब बिचाऱ्या निष्पाप स्त्रियांची निंदा करणाऱ्या दुष्ट लोकांचे केवढे हे धाडस! चोरी करून पुन्हा 'चोर, चोर' म्हणणाऱ्या या वीरांच्या उलट्या बोंबा!"* (७६-४).

या काळात समाजाच्या धार्मिक जीवनात स्त्रियांचे काय स्थान होते याचा संक्षेपाने विचार करू. यापूर्वीच्या म्हणजे वैदिक काळात यज्ञामध्ये यजमान पुरुषाबरोबर त्याच्या पत्नीला साधारण बरोबरीचा मान होता; यज्ञातील अनेक कर्मक्रिया ती करीत असे. यज्ञाकरिता लागणारा तांदूळ कांडणे, यज्ञिय पशूला स्नान घालणे, वेदीच्या इष्टका रचणे, आहुती देणे इत्यादी कामे तिच्याकडे असत. पति प्रवासावर गेला तर यज्ञकर्म तीच करीत असे. रामाच्या यौवराज्याभिषेकाच्या दिवशी सकाळी, दशरथ राजा कैकेयीची समजूत घालण्यात गुंतला असताना, कौसल्येने स्वतः सर्व स्वस्तियाग केल्याचा रामायणात उल्लेख आहे. पुढे अनुलोम विवाहात सवर्ण पत्नीशिवाय इतर वर्णांतील पत्नींना यज्ञकर्मात अधिकार धर्मशास्त्रांनी दिलेला आढळतो. पुढे यज्ञसंस्था कमी कमी होत गेली, स्त्रियांचा उपनयनाचा व वेदाध्ययनाचाही अधिकार गेला. त्यांच्या बाबतीत जातकर्मादी संस्कार जे पुरुषांप्रमाणे होत असत तेही बंद होऊन विवाह एवढाच संस्कार त्यांना शिल्लक राहिला. तेव्हा स्त्रियांचे वैदिक ग्रंथांचे अध्ययन जाऊन उपासतापास, व्रतवैकल्ये त्यांच्या मागे लागली. पुराणोक्त धर्म प्रचारात आला व त्यांतील, विशेषतः भक्तिमार्गातील उपासना व पूजा स्त्रियांना विहित ठरली.

## ६. पोषाख, दागिने, अलंकार व प्रसाधने

पूर्वीच्या म्हणजे प्राचीन (वैदिक) काळी स्त्रिया दोन वस्त्रे वापरीत असत. एक आतील वस्त्र (अंतर्वास:) व दुसरे वरून घ्यायचे वस्त्र (परिधान). महाभारतकाली देखील तीच पद्धत चालू होती. द्रौपदीला द्यूतसभेकडे ओढून नेत असता ती म्हणते—'माझ्या

अंगात एकच वस्त्र आहे. अशा अवस्थेत तू मला ओढून नेऊ नकोस.' नेसलेल्या एक वस्त्राचा किंवा साडीचा पदर खांद्यावरून घ्यायची पद्धत असावी. दुःशासन तिच्याशी दांडगाई करीत असताना तिचे वर्णन 'पतितार्धवस्त्रा' ('जिचा अर्धा पदर गळून पडला आहे') असे केले आहे. भर्हुत व सांची येथील स्त्रियांच्या खोदीव मूर्ती पाहाता त्यांनी आपल्या डोक्यावर ओढणीसारखे काही घेतलेले दिसते. त्याउलट पूर्व हिंदुस्थान, शूरसेन, दक्खन या भागातील मूर्तींच्या डोक्यावर ओढणी दिसत नाही. कदाचित आपली केशरचना व केशभूषा स्पष्ट दिसावी म्हणून त्यांनी डोक्यावरून ओढणी घेतली नसावी. गुप्त सम्राटांच्या नाण्यांतून लक्ष्मी नेहमी गळ्यापासून पायांपर्यंत असलेली दाखवलेली आहे. शालीने अंगाचा वरचा भाग, बाहू, मनगटे झाकलेली आहेत. शंखस्मृतीने म्हटले आहे की, स्त्रीने घोट्यापर्यंत अंग झाकून घ्यावे; तिची नाभी दिसू नये. पंजाब व वायव्य सरहद्द प्रांतात खोदीव मूर्तीतून (इ. स. पूर्वी १०० ते इ. स. ३००) स्त्रियांचा वरचा भागही झाकलेला दिसून येतो.

याउलट मध्य हिंदुस्थान, दक्षिण हिंदुस्थान येथील शिल्पकलेच्या अवशेषांतून व अजंठा येथील भित्तिचित्रांतून स्त्रियांचा वरचा भाग—स्तन व खांदे उघडे दिसतात. वर एखादे शेल्यासारखे दुपट्ट्यासारखे वस्त्र त्या वापरताना दिसतात. पण त्याने त्यांचे वक्षस्थळ झाकलेले नाही. अजंठा येथील चित्रांतून केवळ अंतःपुरातून वसलेल्या स्त्रियांचेच नव्हे तर राजरस्त्यावरून हिंडणाऱ्या स्त्रियांच्याही वरच्या भागाचे असेच अनावृत दर्शन घडते. यावरून प्रत्यक्ष व्यवहारात व जीवनात स्त्रिया अशाच हिंडत असतील, असे अनुमान काढणे चुकीचे ठरेल. चित्रकलेच्या त्या वेळच्या विशिष्ट संकेत असावा. या विशिष्ट संकेतानुसार स्त्रीचे माता म्हणून दर्शन प्रेक्षकावर बिंबविण्याकरिता तिचा वरचा भाग अनावृत ठेविला असावा. याउलट नर्तिकांचा पोषाख मानेपासून घोट्यापर्यंत त्यांचे शरीर झाकून टाकणारा चित्रांतून दाखविलेला आहे.

बिहार, व युक्त प्रांतांतील मथुरा येथील स्त्रियांच्या मूर्तींतून त्यांनी साडी विकच्छ पद्धतीने नेसलेली दिसून येते. याउलट पंजाब व वायव्य सरहद्द प्रांत यांत इ. स. च्या प्रारंभीच्या शिल्पांत स्त्रिया सकच्छ साड्या नेसलेल्या दिसतात. खुद्द महाराष्ट्रात इ. स.च्या ७व्या-८व्या शतकापर्यंत स्त्रियांची साडी विकच्छ असलेली दिसून येते. अजंठा येथील भित्तिचित्रांतून, तेलगू प्रदेशातील नागार्जुनकोंडा येथेही सापडलेल्या अवशेषांवरून विकच्छ पद्धतीचा प्रघात दिसतो. दाक्षिणात्य फक्त एकच्छ साडी दिसते. याउलट माळवा व मध्य हिंदुस्थान यामधील शिल्पांत सरसकट सकच्छ साडी नेसलेली दिसून येते. त्याचा परिणाम म्हणूनच की काय ९व्या शतकानंतर मात्र महाराष्ट्रात उच्चवर्गीय स्त्रियांतून सकच्छ नेसण्याची चाल रूढ झाली असावी.

वक्षःस्थळाकरिता शिवलेल्या कंचुकीचा वापर इ. स. पूर्वी ६०० पासून रूढ असावा असे बौद्ध भिक्षुणींना जो पोषाख सांगितला आहे त्यावरून दिसते. समुद्रगुप्ताच्या नाण्यावरील प्रतिकृतीत लक्ष्मीने कंचुकी घातलेली दाखविलेली आहे. शक कुषाण

यांच्या आगमनानंतर पोलकी, विजारी, कोटासारखा डगला हा पोशाख आला. मथुरा येथील व गांधार शिल्पकलेच्या नमुन्यांतून (इ. स. ५० – ३८०) स्त्रियांनी पोलकी व झगे घातले आहेत असे दिसून येते. सप्त मातृका म्हणजे देवीही याच पोशाखात आहेत. एका शक राजाच्या नाण्यावर लक्ष्मी पोलके व विजार घातलेली दाखविली आहे.

बौद्ध भिक्षुणींच्या पोशाखात तीन भाग असत. संघाटी (शरीराच्या खालच्या भागा-करिता), अन्तर्वासक (वरच्या भागाकरिता), उत्तरासंग (सर्वांगाला आच्छादन करणारे).

लहंग्यासारखे वस्त्र स्त्रियांनी परिधान केलेले इ. स. च्या दुसऱ्या शतकातील मथुरा शिल्पांत दिसून येते. मुसलमानांच्या आगमनानंतर लहंगा किंवा परकर विशेषतः लहान मुलींमध्ये रूढ झाला.

प्राचीन काळी स्त्रियांबरोबर पुरुषांना देखील भूषणांचा—दागिन्यांचा शोक दिसून येतो. हातात व पायात कडी कोपरापर्यंत किंवा गुडघ्यापर्यंत घातलेली, बोटात अंगठ्या, गळ्यात सोन्याच्या व रत्नांच्या माळा, कानात कर्णशोभने, डोक्यावर कुंभ नावाचा अलंकार अशी स्त्रीपुरुषांची नानाविध भूषणे प्राचीन काळच्या चित्रांवरून व वर्णनांवरून दिसून येतात.

इ. स. च्या आरंभापासून प्रचलित असलेले दागदागिने यांची माहिती त्यावेळची शिल्पकला व चित्रकला यांचे नमुने व भरतनाट्यशास्त्रासारखे ग्रंथ यांवरून मिळते. डोके व कपाळ यांच्याकरिता सोने व मोती यांपासून बनविलेल्या शिखाजाल, पिशाजाल, मुक्ताजाल इत्यादी अलंकारांची नावे मिळतात. अजंठा चित्रांवरून त्यांची ठेवण किती सुंदर असावी याची कल्पना येते. भरताने चार प्रकारच्या मेखलेचा उल्लेख केला आहे. नितंबांवर घालण्याकरिता एक मोत्यांची माळ असे. तिला भरताने 'पादरन' म्हटले आहे. त्याचा नमुना अजंठा चित्रांतून पहावयास मिळतो. स्कंधभागावर केयूर नावाचे अलंकार, पायात वाजणारी नूपुरे, हातात हिरेजडित किंवा मुक्ताजडित बांगड्या असा स्त्रियांचा साज असे.

या काळातील स्त्रियांची केशभूषा व केशप्रसाधन कलांतील कौशल्यपूर्ण दिसून येते. अजंठा येथील चित्रांतून, ओरिसामधील मंदिरांतून, खजुराहो येथील शिल्पकलेतून जे केशरचनेचे नमुने दिसून येतात ते पाहून आधुनिक केशभूषानिपुणिकांनाही अभिमान गळून पडावा इतके ते विविधतापूर्ण व सुंदर आहेत.

शरीर भूषवायची अनेक प्रसाधने माहीत होती. नेत्रांकरिता अंजन, ओठांकरिता रंजन, शरीराला चंदनाचा लेप, केशराची उटी, शिवाय मुखाला लावायची विविध चूर्णे, हात, पाय, नखे, यांना रंगवायचे अनेक प्रकारचे रंग, कपोलांचे व स्तनांचे सौंदर्य वाढविण्याकरिता तयार केले जाणारे 'पत्रलेखन' किंवा चेन्नुरी इत्यादी स्त्रियांच्या विविधतापूर्ण भूषणप्रकारांचे उल्लेख या काळातील वाङ्मयातून आढळतात. विवाहित स्त्रिया व कन्या कुंकुमतिलक लावीत असत. सीमंतामध्ये सिंदूर भरीत असत. कुंकुम-तिलक व सिंदूर सौभाग्याचे लक्षण समजले जात असे.

नाकातली नथ, त्याचप्रमाणे पायाच्या बोटातली वेढी किंवा जोडवी या अलंकारांचे प्राचीन वाङ्मयात उल्लेख आढळून येत नाहीं. भरताने आपल्या नाट्यशास्त्राच्या २३व्या अध्यायात स्त्रियांच्या अलंकारांची भरगच्च यादी दिली आहे. तीत नथीचा उल्लेख नाहीं. नथीला हिंदीमध्ये 'बेसर' तर गुजरातीमध्ये 'वाळी' म्हणतात. इतर ठिकाणी नाकातल्या 'नथनी', 'नथना' असेंही म्हणतात. हे शब्द मूळ कोणत्या संस्कृत शब्दापासून उद्भूत झाले असावेत याचा पत्ता लागत नाहीं. नथ, नथनी हे शब्द प्राकृत 'नत्था' या शब्दापासून झाले असणे शक्य आहे. 'नत्था' याचा अर्थ एखाद्या प्राण्याच्या नाकातील घातलेली वेसणासारखी दोरी असा आहे. नथ हा अलंकार मुसलमानांच्या आगमनानंतर प्रसृत झाला असावा असा विद्वानांचा अंदाज आहे. शंकराचार्यांच्या 'सौन्दर्यलहरी' या स्तोत्रात 'नासामौक्तिक' या शब्दाने नथीचा उल्लेख आहे. परंतु हा श्लोक मूळ आद्य शंकराचार्यांचा नसावा, मागाहून आलेल्या शंकराचार्य नाव धारण करणाऱ्या आचार्यांनी असणे शक्य आहे. भारतीयांनी नथीसारखा अलंकार सिंधू संस्कृतिकडून घेतला असावा. अरबांनी मलबार किनाऱ्यावर वसाहती करायला केल्या नंतर. सिंधूपासून मलबारपर्यंत हळूहळू यात्री आणि व मुसलमानांच्या आगमनानंतर त्याचा प्रसार झाला असावा.

३

# पुराण कालातील स्त्रीजीवन

बाळकृष्ण मोरेश्वर कानिटकर

डॉ. बाळकृष्ण मोरेश्वर कानिटकर, एम्. ए., पीएच्. डी., एल्एल्. बी., बी. एस्सी., बी. टी. (जन्म १८-२-१९०३) सेवानिवृत्त. विश्वकोशाचे अभ्यागत लेखक. वृत्तपत्रांत व नियतकालिकांत विपुल लेखन. अनेक पुस्तकांचे लेखक, प्रवचनकार व व्याख्याते. (१२९४, शिवाजीनगर, पुणे ५)

## कालनिश्चिती आणि स्थलनिश्चिती

आजच्या या निबंधाचा विषय थोडासा मर्यादित आहे. पुराणकालातील स्त्रीजीवन हा तो विषय असल्यामुळे प्रथम पुराणकालाच्या मर्यादा आपणास ठरवाव्या लागतील. पुराणांचा काल हा थोडासा वादग्रस्त प्रश्न आहे. तथापि बहुसंख्य जाणकारांनी हा काळ इ. स. पूर्व २०० ते इ. स. १३००–१४०० हा धरलेला आहे. स्थूलमानाने या काळातील स्त्रीजीवन आपण पाहणार आहोत. या आलोचनास मुख्य आधार पुराणग्रंथ आणि त्या कालखंडातील जीवनाची चर्चा करणारे अन्यग्रंथ हेच असतील. पुराणात वर्णिलेला काळ हा वरील मर्यादेपेक्षा पुष्कळच प्राचीन आहे. त्यातील वंश वगैरे वेदपूर्व काळापासूनचे आहेत. पुरूरवा-उर्वशी हे आख्यान वेदात आहे. पुरूरवा ही व्यक्ती ऐतिहासिक मानली तर त्याचा वृत्तांत सांगणाऱ्या (गाणाऱ्या) वेदापेक्षा ती अर्थातच प्राचीन असली पाहिजे. म्हणजे पुराणकालातील व्यक्तींत वेदपूर्वकालीन व्यक्तीही असण्याचा संभव आहे. दुसऱ्या बाजूने व्हिक्टोरिया या राणीपर्यंतची वंशावळ उपलब्ध पुराणात आहे. ही माहिती अर्थातच मूळ पुराणात मागाहून घातलेली आहे. पुराणे मुख्यतया ज्या काळात रचली गेली त्या काळातील स्त्रीजीवन आपण पाहणार आहो, हे आरंभी सांगणे इष्ट होईल.

कालनिश्चितीप्रमाणेच स्थलनिश्चिती हाही एक महत्त्वाचा विचार आहे. आपण जेव्हा अमुक काळातील व्यक्ती म्हणतो, तेव्हा ती व्यक्ती कुठली ? असा प्रश्न येतोच.

अगदी वंदनीय सीता-सावित्रीची किंवा दमयंती-द्रौपदीची गोष्ट घेतली तरी त्यांचे स्थान म्हणजे भारतातील कोठलेही ठिकाण असा अर्थ होईल का ? अर्थातच या ठिकाणी अतिव्याप्तीचा दोष येईल. जम्बुद्वीप हा जो विश्वाचा भूभाग पुराणात सांगितलेला आहे, त्यात भारतवर्षाचा समावेश आहे. हा भारतवर्ष आजच्या भारता (इंडिया) पेक्षा अधिक विस्तृत होता. पूर्व पश्चिम, आणि उत्तर दक्षिण सुमारे १४०० ते १८०० मैल लांबीचा भूविस्तार हा लहान नाही. अर्थातच त्यातील रहिवाशांचे जीवन अगदी एक स्वरूपाचे आढळणे कठीण आहे. तथापि मूळ कल्पना हम अस् शकतील. त्यातही परकीयांच्या आक्रमणाचा धोका असणारे सीमाप्रांत आणि दूरचे अंतरप्रान्त यांतील एकंदर जीवनात थोडाफार फरक सहजच असणार, अर्थातच स्त्रीजीवनात कमीजास्त बदल होणारच. आमचे म्हणणे एका पडद्याच्या चालीवरून लक्षात येण्यासारखे आहे.[1] पंजाब, राजस्थान, वगैरेत पडदापद्धती जेवढी प्रबळ आहे तेवढी दक्षिणेत नाही (मुळीच नाही).

जीवनाच्या प्रादेशिक भिन्नतेप्रमाणेच मानवाच्या निष्ठांचा परिणामही जीवनावर घडतो. भारतात विविध निष्ठा होत्या, आजही आहेत. धार्मिक निष्ठा, आचारनिष्ठा, हेतुनिष्ठा अशा कितीतरी भिन्न निष्ठा आपणास आजही आढळतात. धार्मिक कल्पनांच्या निष्ठेमुळे आपल्या स्वतःच्या मुलाचे डोके करवतीने चिरणाऱ्या राजाची आणि राजपत्नीची कथा आपल्याला आढळते.[2] त्यांतील व्यक्ती ऐतिहासिक असोत नसोत, पण त्यांतील धर्मविषय समाजमान्य होता एवढे निश्चित. चितोडच्या राणी पद्मिनीने अग्नीत जाळून घेतले, पण त्याच्या नंतरच्या काळात राजपुतराण्या आणि राजकन्या परकीयांच्या जनानखान्यात सुखाने (?) गेल्या. भारताची फाळणी झाल्यावर अशा किती घटना घडल्या असतील ते देवच जाणे.

## हिंदू स्त्रीजीवनाची एकरूपता

तथापि भारतवर्षातील हिंदू स्त्रीजीवन सामान्यपणे एका स्वरूपाचे होते, असे म्हणता येण्यासारखे आहे. याशाठी येथे इ. स. पूर्व २०० ते इ. स. १३०० या काळातील सामान्य हिंदू स्त्रीचे जीवन कसे असे त्याचा विचार केलेला आहे.

त्या काळातील, स्त्रियांच्या जीवनाचा पुढील अनुक्रमाने विचार केलेला आहे. (१) बाल्यपण आणि शिक्षण, (२) विवाह आणि विवाहित जीवन, (३) सार्वजनिक जीवनातील स्थान, (४) वारसा व संपत्ती, (५) विधवांचे जीवन.

ज्याच्या पदरी असे पाप । त्याला मुली होती आपोआप ॥ हा विचार मागू जमान्यातल्या लोकांचा आहे. पुराणकाळी असा दृष्टिकोन नव्हता. पुत्रजन्माइतका

---

१. CF. Purda System : "The Position of Women in Hindu Civilization" by Dr. A. S. Altekar. 1938. pp 196-200

२. राजा रुक्मांगद व पत्नी विंध्यावली कथा. नारदपुराण अ. २ : २६.

उत्सव करण्यासारखा कन्याजन्म नसला तरी तो अजून संकट वाटण्यासारखा झाला नव्हता. कित्येकदा तर कन्याजन्म हा पुत्रापेक्षा जास्त आकर्षक वाटलेला आहे.[१]

## शिक्षण

जन्मानंतर शिक्षणाचा प्रश्न आपण विचारात घेऊ. पुराणकाळात स्त्रियांचे शिक्षण पुरुषांप्रमाणे पण घरीच होत असे.[२] तथापि काळ बदलला व सर्वच गोष्टी बदलल्या. ब्राह्मणकाळात स्त्रियांचे उपनयन होत असे. कारण यज्ञकर्मात स्त्री प्रत्यक्ष भाग घेत असे. ब्राह्मणकाळानंतर ही स्थिती पालटली. समाजाला मुलींने बराच काळ अविवाहित राहणे रुचेनासे झाले.[३] स्मृतींनी तर आठव्या वर्षापर्यंत मुलींचे विवाह झालेच पाहिजेत हा दंडक घातला आणि तोच आचारधर्म पुराणात स्वीकारलेला आहे, असे अनेक पौराणिक आख्यानांवरून आपणास म्हणता येईल.[४]

'*ब्राह्मण आपले तत्त्वज्ञान स्त्रियांस शिकवीत नाहीत*' असे मेगॅस्थिनीसने म्हटले आहे. त्यावरून इ. स. पूर्व ३५० च्या सुमारास स्त्रियांचे अध्ययन संपुष्टात आले असे दिसते.[५] पुराणवाङ्मयात मैत्रेयी, गार्गी, सुलभा, यांच्यासारख्या अध्ययन केलेल्या स्त्रियांची वर्णने नाहीत. शिक्षणासाठी स्त्रियांनी बरीच वर्षे अविवाहित राहावे ही कल्पनाच मुळी समाजाने टाकून दिलेली होती.[६] तत्कालीन राजकीय परिस्थिती या गोष्टीला कारण असावी. गरीब घराण्यातील मुलींच्या प्राथमिक शिक्षणाचीही हेळसांड होऊ लागली.

*कुलीन व संपन्न आणि सुसंस्कृत घराण्यात मात्र, मुलींचे वेदाध्ययन बंद पडल्या*-वरही त्यांचे वाङ्मयीन व कलात्मक शिक्षण चालू राहिले. इ. स. नंतर २०० ते ४०० पर्यंतच्या काळात विवाहाची कालमर्यादा साधारणपणे १२-१४ वर्षे होती.[७] अर्थात तोपर्यंत मुलींना लेखन वाचन वगैरे शिकवून थोडीशी वाङ्मयाचीही ओळख करून देत. या काळात स्त्रिया प्राकृत भाषांचा विशेष अभ्यास करीत. त्या भाषांतून कवयित्रींनी

---

१. वैवस्वत मनू व श्रद्धा यांना यज्ञानंतर श्रद्धेच्या इच्छेनुसार इला नावाची कन्या झाली. पुढे तिला पुरुष (इल) करण्यात आले. (मत्स्य पु० ११-१२, पद्म पु० ८ : ७५-१२५)

२. प्राचीन भारतीय शिक्षण पद्धती—डॉ. अ. स. अळतेकर १९३५ पा. १२७

३. प्राचीन भारतीय शिक्षण पद्धती—डॉ. अ. स. अळतेकर १९३५ पा. १२९

४. तस्माद्‌द्वादशवर्षा कन्या यावन्नर्तुमती भवेत्। सं. सौरीव मुंबई पा. २१३
चतुर्थात्सरादूर्ध्वं...दशमात्ययः। तावद्विवाहः कन्यायाः पित्रा कार्यः प्रयत्नतः॥

ब्रह्मपुराण १६५ : ८

५ The Position of Women etc.—Dr. Altekar p. 212

६. प्रा. भा. शिक्षण पद्धती—डॉ. अळतेकर—पा. १२७

७. प्रा. भा. शिक्षण पद्धती—डॉ. अळतेकर—पा. १३१

कविताही लिहिलेल्या आहेत. पुढे संस्कृताचे अध्ययन विशेष सुरू झाल्यावर संस्कृता-तही स्त्रियांनी कविता केलेली आहे.[1]

इ. स. च्या नवव्या शतकापर्यंत संपन्न आणि सुसंस्कृत घराण्यातील स्त्रियांना उच्च शिक्षण देत असत, असे काव्यमीमांसेवरून ध्यानी येते. या शिक्षणात संगीत व नृत्य यांचा विशेष समावेश होता. परंतु यावरून बहुसंख्य स्त्रिया सुशिक्षित होत्या असे अनुमान काढता येत नाही. उलट नवव्या किंवा दहाव्या वर्षी मुलींची लग्ने होऊ लागल्यापासून बऱ्याचशा मुली अशिक्षित राहू लागल्या. फार काय, आळतेकरांच्या म्हणण्याप्रमाणे त्या काळात दे. १० इतक्या तरी मुली साक्षर होत्या किंवा नाही असे वाटू लागते.[2]

## विवाह आणि विवाहविषयक रूढी

प्राचीन काली स्त्रियांचे विवाह प्रौढपणी होत असावेत. परंतु इ. स. च्या चवथ्या शतकापासून समाजातील विचारवंत ही विवाहवयोमर्यादा कमी करण्याच्या मताचे झाले. मुलगी वयात येण्यापूर्वीच तिचा विवाह उरकून टाकण्याकडे कल झाला.[3] इ. स. २०० च्या सुमारास स्त्री ऋतुमती होण्यापूर्वीच तिचा विवाह करण्याचा प्रघात पडला. तथापि हा प्रघात मुख्यत्वे ब्राह्मण वर्गात जास्त दृढ झाला. क्षत्रियांना तसे बंधन नसे.

इतर वर्णांमध्ये साधारणपणे ८ ते ९ वर्षांपर्यंत मुलींचे विवाह होत. ब्रह्मपुराणा-सारख्या पुराणातून तर आणखी आधी विवाह लावावे असे वचन आहे. उपनयनविधीही स्त्रियांचे विवाह अधिक लवकर घडवून आणण्यास कारण झाला. आपल्या मुलाला जास्त शिक्षण, शक्य तितक्या लवकर मिळावे म्हणून पुत्रांचा उपनयन संस्कार ५ व्या वर्षीच होऊ लागला आणि विवाह संस्कार हाच स्त्रियांचा उपनयन संस्कार मानला गेल्यामुळे अर्थातच स्त्रियांचे विवाह फारच लहानपणी घडून येऊ लागले. समाजातल्या खालच्या वर्गांनी या रिवाजाचा स्वार्थी उपयोग केला. त्यांच्यात मुलीला क्रमाने वराकडून पैसा मिळे. तो पैसा लवकरात लवकर मिळवण्याचा खालच्या वर्गातले आईबाप प्रयत्न अर्थातच करीत. शिवाय सतीची चाल असल्यामुळे मुलीचे वडील निवर्तले आणि आई सती गेली तरी मुलींची काळजी घेणारे सारे सावरे असतात, हा विचारही डोळ्याआड झाला नाही.

क्षत्रिय वगैरे वर्णांत स्वयंवर पद्धतीही होती. अग्निपुराणाने ही पद्धत मानली आहे.[4] परंतु ब्रह्मपुराण मात्र या पद्धतीच्या विरुद्ध आहे. गांधर्व विवाह रूढ अनुमान्य समाजात वधूवराच्या गाठी बहुधा उद्यानात, मेजवानीच्या प्रसंगी किंवा

---

१. प्रा. भा. शिक्षण पद्धती—डॉ. अळतेकर—पा. १३१

२. प्रा. भा. शिक्षण पद्धती—डॉ. अळतेकर—पा. १३३

३. Position of Women etc. Dr. Altekar pp. 67, 69, 70

४. शरण्या स्त्री भर्त्रेष्टा पत्यन्तरी स्वयन् पतिम् ॥ अग्निपुराण २२६.४१

उत्सवसमारंभात पडत.[1] कित्येकदा आईबाप अशा गाठीभेटी मुद्दाम घडवून आणीत.

हुंड्याची चाल पुराणांत वर्णिलेली नाही. पुराणात अनेक विवाह वर्णन केलेले आहेत. त्यावेळी वधूच्या बरोबर पुष्कळ वैभव व संपत्ती, घोडे, रथ, हत्ती, दासदासी वराला आंदण दिल्याची नोंद आहे. परंतु हुंडा म्हणजे विवाहाची एक अट ही कल्पना त्यात नाही. उलट वधूच्या पित्यालाच मोल दिल्याची वर्णने आहेत. हे मोल म्हणजे एक प्रकारची वधूची किंमत म्हणावयाची.[2] इ. स.च्या १३ किंवा १४व्या शतकापासून या प्रथेने भयानक रूप धारण करण्यास सुरुवात केली. विशेषतः राजस्थान, बंगाल या प्रांतांतून या प्रथेचे बंड फार माजू लागले. हुंडा पद्धतीप्रमाणे पत्रिका बघून विवाह जुळविण्याचे बंडही प्राचीन काळी नव्हते.[3] कोणाचाही विवाह, पत्रिका जुळल्या नाहीत म्हणून मोडला किंवा स्थगित झाला अशी नोंद नाही. वर्णविचार आणि गोत्रप्रवरविचार स्मृतिपूर्व काळी विवाहाच्या आड येत नसत. स्मृतिकार आणि निबंधकार[4] मात्र सगोत्र व सप्रवर विवाहांना कडाडून विरोधच करीत आले आहेत. पुराणांतील कथांतून याबद्दल आग्रह नाही. ही पद्धती — सगोत्र, सप्रवर विवाह निषेध — अनार्य व वेदपूर्व जमातींमधून रूढ झाली ती वैदिकांत आली असावी. इ. स. च्या १४ चौदाव्या शतकापर्यंत असवर्ण विवाह रूढ होते. मात्र ते अनुलोम असत. प्रतिलोम विवाहाची उदाहरणे पुराणग्रंथांत क्वचित आहेत. ही असवर्ण विवाहपद्धतीसुद्धा पुढे पुढे बंद पडली.

याचे एक कारण असे दिसते की, इ. स. च्या ८व्या ९व्या शतकापासून ब्राह्मणांच्या आणि इतरांच्या आचारात, आहारात फार फरक पडला. ब्राह्मण हळूहळू निवृत्तमांस झाले. अन्य वर्णीयांचे मांसाशन तसेच चालू राहिले. आचारांतही पुष्कळ फरक पडला. अनेक व्रते आली, दोन वेळांच्या संध्येमध्ये तिसरी माध्यान्ह संध्या आली, वगैरे अनेक प्रकारे भेद उत्पन्न झाला व रोटीबेटी व्यवहार हळूहळू संपुष्टात आला आणि तो नियमबाह्य ठरला.

पुराणांतून सतींची वर्णने आहेत. परंतु पुनर्विवाहाची वर्णने मिळत नाहीत. त्याचप्रमाणे विवाहविच्छेद किंवा काडीमोड पुराणांनी वर्णिलेले नाहीत. ब्राह्मण व क्षत्रिय वर्णांतून विवाहविच्छेद मान्य नव्हता. खालच्या वर्णांतून व जमातींतून तो प्राचीन काळापासून रूढ असून चालत आलेला आहे.

## वैवाहिक जीवन

स्त्रियांच्या वैवाहिक जीवनासंबंधाने पुराणांत चांगली माहिती मिळते. स्त्रीला कुटुंबात मानाचे स्थान असे. सासूसासरे देखील तिचा मान राखीत. आणि तीही त्यांची मर्यादा

१. Position of Women etc. Dr. Altekar pp. 78, 79
२. Position of Women etc Dr. Altekar pp 49
३. Position of Women etc. Dr. Altekar pp. 85, 87
४. Position of Women etc. Dr. Altekar pp. 87

राही. नवपरिणीता वधू पतिगृही कशी वागत असे व आपल्या वागणुकीने ती सर्वांची फार आवडती कशी होत असे, याची अनेक वर्णने आहेत. तिला जरी अनेक सवती असल्या तरी तिची आपल्या पतीवर निष्ठा व भक्ती असे. त्याचप्रमाणे सवतीमत्सराची व वाईट वागणुकीचीही अनेक उदाहरणे आहेत. बहुपत्नीत्व बंद होईपर्यंत हे सहज होते. यामुळे कित्येक स्त्रियांना मुख्यपत्नीत्वपदाचा लाभ घडे, तर केव्हा केव्हा पतीची नावडती होण्याचा प्रसंग ओढवून त्यांना दूर जावे लागे. ध्रुवाची गोष्ट या दृष्टीने उद्बोधक आहे. पुष्कळ जणींना समान व मानाची वागणूक मिळे. पण प्रत्येकीला हे सुख कोठून मिळणार! अर्थातच यामुळे कित्येक जणींना फार वाईट वागणूक मिळाल्याची, व पुढे पतीला पश्चात्ताप झाल्याचीही अनेक उदाहरणे आहेत. पत्नीचा घरावर पूर्ण अधिकार असे. पैसाअडका, घरखर्च तीच पाहात असे. आल्यागेल्याचे स्वागत करणे, आदरातिथ्य करणे, अतिथिसेवा करणे हा तिचाच अधिकार होता. पतीची आज्ञा मानून आपल्या अधिकाराच्या मर्यादेत राहणाऱ्या स्त्रीलाच पतिव्रता म्हणत. प्रतिव्रतेचा अधिकार मोठा मानलेला आहे. वेळेवर पतीला देखील तिचे म्हणणे ऐकावे लागे. परंतु सर्वच पती सद्गुणी वा सदाचारी नसत. अशा वेळी पत्नीला फार जाच सहन करावा लागे, पण पातिव्रत्याच्या चिवट कल्पनांनी बहुसंख्य स्त्रिया त्या काळी तो त्रास सहन करीत.

## सती, नियोग आणि पुनर्विवाह

त्या काळात सतीची चाल रूढ होती.[1] इ. स. पूर्व १५० ते इ. स. २५० पर्यंत उत्तर हिंदुस्थानात ही चाल सर्वत्र मान्य होती. राजे, सरदार, सेनापती यांच्या शवाबरोबर त्यांच्या राण्या सती गेल्याची अनेक उदाहरणे आहेत. पुढेही इ. स. १२०० पर्यंत बहुतेक सर्व उत्तर हिंदुस्थानात ही चाल प्रचलित होती. तथापि इ. स. १००० पर्यंत दक्षिणेत महाराष्ट्रात ही चाल रूढ नव्हती.* दक्षिण भारतात तर इ. स. ९०० पर्यंत सतीचे एकही ऐतिहासिक उदाहरण नाही.

संतती नसणाऱ्या पतिपत्नींना, विधवा स्त्रियांना (पतीच्या अनुज्ञेने) दत्तक घेता येई. नियोगानेही संतती प्राप्त करून घेता येई. नियोगाला दीर फार प्रशस्त मानलेला होता. दीर भावजय संबंधापासून पुढे वंश चाले. पौराणिक काळात ही पद्धती इ. स. २०० पर्यंत चालू होती. पुढे ही देवर (दीर) नियोग पद्धति हळूहळू प्रचारातून जाऊ लागली. इ. स. ६०० च्या सुमारास ही पद्धती पूर्ण बंद झाली.[2]

---

१. भर्तारं या चितारूढा सापि स्वर्गनवाप्नुयात् ॥ अग्निपुराण २२२, २३

* नव्या संशोधनाने ही चाल इ. स. ५ व्या किंवा ६ व्या शतकात महाराष्ट्रात व दक्षिण भारतात रूढ होती असे आढळून आले आहे.

२. ऊढायाः पुनरुद्वाहं ज्येष्ठांशं गोवधस्तथा ।
कलौ पञ्च न कुर्वीत भ्रातृजायां कमण्डलुम् ॥ आदित्यपुराणः १२: ७

विधवापुनर्विवाहाच्या चालीला एकंदरीने मान्यता कमी कमीच होत गेली. इ. स. २०० पासून पुनर्विवाहांना सामान्यतः विरोध होऊ लागला. तथापि इ. स. ६०० पर्यंत बालविधवांना पुनर्विवाहाची काही मोकळीक होती. पुढे ती कमी कमी होत जाऊन नंतरच्या तीनचारशे वर्षांत ही चाल अजिबात बंद झाली. त्याचबरोबर तिचा वारसा हक्कही संपुष्टात आला. अशा रीतीने तिची मोठीच कुचंबणा झाली. आणि मग नाइलाजाने पुष्कळ विधवांना सतीचा मार्ग (कित्येकदा जबरदस्तीने, अनिच्छेनेही) स्वीकारावा लागला.[1]

## व्यवसाय, वारसा, पेहराव इत्यादी

व्यवसायाच्या दृष्टीने कित्येक स्त्रिया शिक्षकिणींची कामे करीत. त्यांना 'आचार्या' म्हणत. वेदांत, तत्त्वज्ञान हे व असले विषय, कला विषय (गायन, नृत्य) वगैरे त्या शिकवीत. पुष्कळ जणींना चित्रकला, भरतकाम येई. सूत काढणे, विणणे ही कामेही स्त्रिया करीत. इ. स. च्या ८ व्या शतकात रुपा नावाची एक हिंदू स्त्री वैद्य होती. प्रसूतिशास्त्र हा तिचा विशेष होता. अशाच पुष्कळ वैद्यक जाणणाऱ्या व तो व्यवसाय करणाऱ्या स्त्रिया त्या काळात होत्या. कित्येक स्त्रिया गाणारणी व नाचणारणीही झालेल्या आढळतात.[2]

स्त्रियांच्या वारसा हक्काबद्दल पुराणात प्रत्यक्ष वर्णन अथवा कथाभाग नाहीत. मुलासाठी किंवा भावासाठी त्यांनी कारभार पाहिलेला आहे. पण इतर स्पष्ट उल्लेख नाहीत. इ. स. पूर्व ३०० ते इ. स. १२०० पर्यंत इतर इतिहासांवरच अवलंबून राहावे लागेल. स्त्रीधनाबद्दल वर्णने आहेत.[3]

पुराणकालातील स्त्रिया एक कटिवस्त्र व एक उत्तरीय वस्त्र वापरीत. कंचुकी वापरण्याची चाल होती. अलंकार डोक्यापासून पायापर्यंत वर्णन केलेले आहेत. नाकात मोती असे. पण संपूर्ण नथ हा अलंकार आढळत नाही. गळ्यातले दागिने सोन्याचे, चांदीचे, हिरा, पाचू, माणिक, मोती यांचेही असत. पायात साखळ्या, नूपुरे असत. कमरेला पट्टा असे. शिवाय कंकणे, बाजूबंद वगैरे असत. केशरचना विविध प्रकारची असे. अंगरंग, मुखरंग, कपोलरंग कितीतरी प्रकारचे होते.

---

१. Position of Women etc. Dr. Altekar pp. 151-153

२. त्रीणि देवाय दातव्या धीरेणाक्लिष्टकर्मणा । कल्पकालं महेन्द्रस्य नृपो वसेत् महाधनी ॥
पद्मपुराण : सृष्टिखंड: अ. ५२:९७
वेश्या वृन्दकं यस्तु दद्यात्सूर्याय भक्तितः । स गच्छेत्परमं स्थानं यत्र तिष्ठति भानुमान् ॥
भविष्यपुराणः ब्राह्मपर्वः अ. ९१:६७

३. मातृदत्तं तथा शुल्कं मन्वाधेयकमेव च । पितृमातृपतिभ्रातृदत्तमध्यग्न्युपागतम् ॥
आधिवेदनिकं चैव स्त्रीधनं परिकीर्तितम् ॥ अग्निपुराण अ. २५६ : १०-११

## समाजाचा स्त्रीविषयक दृष्टिकोण आणि त्यातील बदल

एकूण समाजाचा दृष्टिकोण स्त्रियांबद्दल सहानुभूतीचा आणि आदराचा असे. परकीयांच्या आक्रमणांना सुरुवात झाल्यानंतर या दृष्टिकोणात फरक पडू लागला. बाहेरचे व्यवसाय बंद करण्यात आले आणि चूल व मूल एवढेच स्त्रियांचे क्षेत्र ठरले. परकीयांच्या आक्रमणात जबरीने धरून नेलेल्या, बाटवलेल्या स्त्रियांना इ. स. च्या ८व्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत परत वैदिक समाजात घेतले जात असे.[1] आठव्या शतकाच्या उत्तरार्धापासून बाराव्या शतकापर्यंत अशा स्त्रियांना विकल्पाने वैदिक समाजात घेतले जात असे. पण इ. स. च्या १३ तेराव्या शतकापासून हा दरवाजा स्त्रियांना कायमचा बंद झाला.

स्त्रियांना फार आदराचे व मानाचे स्थान एकेवेळी होते. 'न मातुः परदैवतम्।' अशी भावना होती. 'कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति' अशी दृढ समजूत होती. युद्धात स्त्रियांवर हात टाकीत नसत. शत्रूच्या पकडून आणलेल्या स्त्रियांना मानाने वागवीत असत. परंतु ही स्थिती बाह्यांच्या आणि भिन्न संस्कृतीच्या आणि रानटी लोकांच्या स्वाऱ्यांनंतर राहिली नाही.

स्त्रियांचे शिक्षण बंद पडणे व त्यांना समाजात फारसा मान न राहणे याला कारण आर्यांचे बाह्यांशी विवाहसंबंध झाले हे एक आणि दुसरे कारण परकीयांचे आक्रमण. परकीयांच्या आक्रमणाचे दुष्परिणाम हेच महाभयानक व स्त्रियांच्या उन्नतीला मागे खेचणारे ठरले. परंतु शत्रूच्या स्त्रिया या आपली हक्काची लूट व मालमत्ता अशी जेत्यांची भावना होती—नव्हे आजही आहे. नादिरशहा, तैमूर किंवा त्यापूर्वी शक, हूण यांची गोष्ट तर सोडाच पण अगदी परवा दुसऱ्या महायुद्धात सुद्धा जेत्या सैन्यांनी जितांच्या स्त्रियामुलींवर अनन्वित अत्याचार केल्याचे अधिकृत वृत्तांत प्रसिद्ध झाले आहेत. मग त्या प्राचीन काळी काय झाले असेल त्याची कल्पनाच केलेली बरी. समाजाचा हा नाश याप्रकारे होत समाजातल्या नेत्यांची पहिली काळजी होती. नव्हे त्यांचे ते आद्य परम पवित्र कर्तव्य होते. म्हणून त्यांनी स्त्रीला घरातच राहण्यास लावले व तिचे बाह्य आपत्तीपासून रक्षण केले.

अर्थात या राजकीय स्थितीमुळे तिचे (मुलीचे) शक्य तितक्या लवकर लग्न केलेले बरे असेच समाजात वाटू लागले. घरातच राहणे भाग पडल्यानंतर स्त्रीचे शिक्षण बंद पडणे अगदी साहजिकच होते. संसाराचा गाडा ओढताना आजसुद्धा सामान्य स्त्री किती मेटाकुटीस येते हे आपण रोज पाहतो. त्यातल्या संतति-संगोपन. मग हा परिणाम परिस्थितीचा नव्हे काय !

---

१. बलान्नृपर्यैवस्तु परभार्यां नरः क्वचित् ; वधो दण्डो भवेत्तस्य नापराधो भवेत्स्त्रियः ॥

मत्स्यपुराण : अ. २२७, १२६

अर्थात अशी स्त्री समाजबहिष्कृत होत नसे.

आणि शिक्षण म्हणजे लिहिणे वाचणे एवढाच अर्थ अभिप्रेत धरला तर लिहिता वाचता न येणारी निरक्षर व्यक्ती म्हणजे काही अडाणी व्यक्ती नव्हे. जगातले कितीतरी विख्यात सेनापती निरक्षर होते. फार काय विख्यात कवि होमर किंवा विख्यात तत्त्वज्ञानी सॉक्रेटीस यांना लिहिताच काय पण वाचताही येत नव्हते![1] पुराणकाळी सर्वसाधारण स्त्री ही आजच्यापेक्षा अधिक समाधानी, आरोग्यपूर्ण, श्रद्धायुक्त व म्हणून सुखी होती.

१. 'Believe it or not' Fifth Series. Ripley p. 20

४

# अभिजात संस्कृत वाङ्मयातील स्त्री

वसन्त गजानन राहूरकर

डॉ. वसन्त गजानन राहूरकर, एम्. ए., पीएच्. डी. (जन्म २०-२-१९१९) संस्कृत प्राकृत भाषांचे आचार्य, पुणे विद्यापीठ. पदवी परीक्षेत प्रथम श्रेणीत प्रथम. भाऊ दाजी व आचार्य पारितोषिकांचे मानकरी. 'वंगीय संस्कृत मंडळा'च्या परीक्षात व्याकरण व साहित्यात प्रथम श्रेणीने उत्तीर्ण. डेक्कन कॉलेज, भांडारकर प्राच्य विद्या संशोधन संस्था, पुणे विद्यापीठ यांच्या विद्यमाने व अखिल भारतीय प्राच्य विद्या परिषदेच्या निमित्ताने ग्रंथ निर्मिति व संशोधनपर विपुल लेखन. (युनिव्हर्सिटी टीचर्स हॉस्टेल, पुणे विद्यापीठ, पुणे ७)

## स्त्रीविषयक दृष्टिकोण : सांस्कृतिक उच्चनीचतेचे गमक

कोणत्याही समाजाची सांस्कृतिक उच्चनीचता ठरवावयाची असेल तर त्या समाजात स्त्रीला कोणते स्थान दिले गेले आहे ते पहावे असे सर्वसामान्यपणे म्हटले जाते. या दृष्टीने ज्या समाजात स्त्रीला मानसन्मान होत नाही किंवा तिला स्वातंत्र्य नाही तो समाज मागासलेला आणि असंस्कृत ठरतो. तथापि काही प्रगत व सुसंस्कृत समाजांनी (उदा० – ग्रीक, हिंदू इ.) स्त्रीला समाजात बरेच खालचे स्थान दिले असल्याचे आढळून येते. म्हणून स्त्रीच्या सामाजिक स्थानावरून त्या समाजाची सांस्कृतिक उच्चनीचता ठरते असे म्हणण्याऐवजी हे समाजातील स्थान तिला पुरुषाने कोणत्या दृष्टिकोनातून दिले आहे यावरून ती ठरते असे म्हणणे अधिक सयुक्तिक होईल.

समाजाच्या प्राथमिक अवस्थेमध्ये स्त्रीला पुरुषावर फारच मोठ्या प्रमाणात अवलंबून राहावे लागे. ज्या समाजाने हळू हळू तिचे हे पारतंत्र्य स्वेच्छेने दूर केले तो समाज सांस्कृतिक दृष्ट्या अधिक न्यायी व उदार होऊ लागला आहे असे म्हणता येईल. या दृष्टीने विवाहविषयक कायदे व रूढी यावरून पुरुषाचा स्त्रीकडे पाहाण्याचा दृष्टिकोण चटदिशी ध्यानात येतो. स्त्री एकादी परदेशीविक्रीची वस्तू आहे किंवा युद्धात जिंकून आणलेली लूट आहे एवढाच पुरुषाचा दृष्टिकोण आहे, की पत्नी ही पतीची सुखदुःखात सहभागी होणारी मैत्रीण आहे असे तो समजतो, यावरून समाजाच्या संस्कृतिक श्रेष्ठकनिष्ठतेची कल्पना येऊ शकते. म्हणूनच स्त्रीला समाजात कोणते प्रतिष्ठेचे

स्थान होते व ते कोणत्या हेतूंनी दिले होते हे पाहाणे भारतीय संस्कृतीच्या इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. प्रस्तुत लेखात अभिजात संस्कृत वाङ्मयात स्त्रीला कोणते स्थान दिले गेले होते हे पाहावयाचे आहे.

प्राचीन काळी वैदिक समाजात मुलगी होणे दुःखाचे व दुर्भाग्याचे समजले जात असे.[1] अथर्ववेदामध्ये मुलीऐवजी मुलगाच व्हावा यासाठी काही मंत्र व विधी सांगितले आहेत.[2] उपनिषत्काळी हा दृष्टिकोण बदलला व विदुषी कन्या व्हावी म्हणून गृहस्थाला विशिष्ट विधी करावयास सांगितले आहे.[3] अर्थात हा विधी पुंसवनाइतका मान्यता पावला नाही.

अभिजात संस्कृत वाङ्मयात मात्र हा दृष्टिकोण बदलल्याचे स्पष्ट दिसते. कुमार-संभवाच्या सहाव्या सर्गातील त्रेसष्टाव्या श्लोकात 'कन्येयं कुलजीवितम्' असे स्पष्ट म्हटले आहे. मुलीपेक्षा मुलगा बरा असे जे त्या काळच्या समाजाला वाटे ते स्त्रीद्वेष म्हणून नव्हे, तर मुलगी सुस्थळी कशी पडेल याची चिंता मुलीच्या बापाला संत्रस्त करीत असे हे त्याचे कारण होय.[4] कथासरित्सागरामध्ये तर 'पुत्र म्हणजे मूर्तिमान आनंद आणि मुलगी म्हणजे दुःखाचा कंद' असे म्हटले आहे.[5] अर्थात् हा दृष्टिकोण सर्व समाजाचा असावा असे म्हणता येणार नाही. उपनिषत्काळी तर विद्वान स्त्रिया आत्म्याच्या अमरत्वाबद्दल चर्चा करीत असत असे दिसते.[6] अध्यापन करणाऱ्या विद्वान स्त्रिया समाजामध्ये बऱ्याच मोठ्या प्रमाणात असत म्हणूनच संस्कृत व्याकरणकारांनी 'उपाध्यायानी' व 'उपाध्याया' अशा दोन वेगळ्या संज्ञा रूढ केल्या. ज्या स्वतः अध्यापन करीत त्यांना 'उपाध्याया' असे म्हणत व ज्या अध्यापकाच्या पत्नी असत त्यांना 'उपाध्यायानी' असे म्हणत.

## खेळ, शिक्षण आणि कलानैपुण्य

अभिजात संस्कृत वाङ्मयात स्त्रीशिक्षणाचा सार्वत्रिक उल्लेख सापडतो. त्या काळी सहशिक्षण होते काय असा प्रश्न साहजिकच जिज्ञासूंच्या मनात आल्यावाचून राहणार नाही. भवभूतीच्या उत्तररामचरितामध्ये लव व कुश यांच्याबरोबर आत्रेयी वाल्मीकींच्या जवळ शिकावयास राहिली होती असा उल्लेख आहे. मालतीमाधव या नाटकात (इ. स. चे ८ वे शतक) कामन्दकी ही भूरिवसु व देवरात यांच्याबरोबर

---

१. कृपणं ह दुहिता । ज्योतिर्हि पुत्रः परमे व्योमन् । ऐ. ब्रा. ७–१३
२. अथर्ववेद ३–२३; ६–११
३. बृ. उ. ६ . ४ . २७
४. दारिद्र्य दुरपदारिद्र्य पितुः किंवा कन्यापितृत्वं खलु नाम कष्टम् । पंचतंत्र – मित्रभेद
५. शोकक्रन्दः खलु कन्या हि आनन्दः प्रपदान् सुतः । २८- ६
६. येनाहं नामृता स्यां किमहं तेन कुर्याम् । बृ. उ. २. ४

शिक्षण घेत असल्याचे भवभूती सांगतो.[1]

अतिथिसत्काराचे महत्त्वाचे काम सुशिक्षित मुलींच्याकडे सोपविले जात होते असे दिसते. कालिदासाने आपल्या अभिज्ञानशाकुंतलात कण्व हे शकुंतलेकडे अतिथि-सत्काराचे काम सोपवून सोमतीर्थाला गेले असल्याचे सांगितले आहे.[2]

शीलभट्टारिका, विजयांका इत्यादी अत्यंत निपुण कवयित्रींचा उल्लेख राजशेखराने सूक्तिमुक्तावलीत केला आहे. कालिदासानंतर वैदर्भी रीतीने लिहिणारी विजयांका ही साक्षात सरस्वतीच होती असे त्याने म्हटले आहे.

मुलींच्या बालपणीच्या करमणुकीच्या साधनांविषयी अभिजात संस्कृत वाङ्मयात काय माहिती मिळते हे आता पाहावयाचे आहे. घरगुतीखेळ म्हणून 'कंदुकक्रीडा' फारच रूढ होती असे दिसते. कुमारसंभवात (१-२९) उमेच्या बाल्यावस्थेत कालिदासाने या खेळाचा उल्लेख केला आहे. लपंडाव, शिवाशिवी इत्यादी खेळांचा उल्लेख कामसूत्रात आहे (३.३). इसवी सनाच्या नवव्या शतकाच्या सुमारास मुलींच्या विवाहाचे वय ९ किंवा १० असावे असे शास्त्रकारांनी ठरविले. त्यामुळे मुलींच्या शिक्षणाला रोध बसू लागला. मात्र शंकराचार्य व मंडनमिश्र यांच्या विवादात मध्यस्थ म्हणून मंडनमिश्रांची पत्नी सरस्वती हिने काम केल्याचे उदाहरणही याच कालातील आहे. सासरी गेल्यानंतरही कौटुंबिक परिस्थिती व घराण्याची परंपरा असेल त्याप्रमाणे मुलींचे शिक्षण होत असावे.

अभिजात संस्कृत नाटकांतील जवळजवळ सर्व नायिका चांगल्या शिक्षित व नृत्य, गीत, वाद्य, चित्रकला या कलांमध्ये निपुण असल्याचा उल्लेख आहे. मालविका, शकुंतला, उर्वशी, प्रियंवदा, अनसूया, मालती, रत्नावली, प्रियदर्शिका, मलयवती या नायिका आणि सखी ललितकलांमध्ये निपुण असल्याचे उल्लेख संस्कृत नाटकांत आहेत. नवव्या शतकातील काव्यमीमांसा या ग्रंथात उच्च कुलातील स्त्रियांना विविध विषयांचे उच्च शिक्षण दिले जात असे असा उल्लेख आहे.[3]

कालिदासाच्या मालविकाग्निमित्र या नाटकामध्ये मालविकेला नृत्यगीतादी कलांचे शिक्षण देण्यासाठी नाट्याचार्यांची नेमणूक झाली होती असे दिसते. परंतु हे श्रीमंत, सुसंस्कृत कुटुंबात व राजघराण्यापुरतेच मर्यादित होते असे दिसते. राजकुटुंबात राजकारण व राज्यकारभारविषयक शिक्षण मुलींना दिले जात असे. शाकुंतलात यवनींचा उल्लेख आहे. त्या धनुर्विद्येत व खड्गादी शस्त्रांच्या वापरात निपुण असत.

---

१. अयि किं न वेत्सि यदेकत्र नौ विद्यापरिग्रहाय नानादिगन्तवासिनां साहचर्यमासीत् । अंक पहिला.

२. इदानीमेव स्वदुहितरं अतिथिसत्काराय नियुज्य सोमतीर्थं गतः । अंक पहिला.
महाभारतातही कुंतीकडे असे काम आले होते व दुर्वासासारख्या अतिथीला तिने संतुष्ट केले होते असा उल्लेख आहे.

३. पुरुषवद्योषितोऽपि कवीभवेयुः । श्रूयन्ते दृश्यन्ते च राजपुत्र्यो महामात्रदुहितरो गणिकाः कौटुंबिकभार्याश्च शास्त्रप्रहितबुद्धयः कवयश्च ।

## पतिपत्नी-संबंध

पती व पत्नी हे एकमेकांचे पूरक भाग आहेत. यांपैकी केवळ एक हा अपूर्णांकच होय ही कल्पना वेदकालापासून रूढ होती. त्यामुळे दंपतीचे आनुकूल्य म्हणजे स्वर्गसुख व प्रातिकूल्य म्हणजे नरक अशी कल्पना पद्मपुराणात आढळते. भार्याहीन गृहस्थाचे घर म्हणजे ओसाड अरण्य; सर्व दुःखांवर भार्येसारखे औषध नाही; या महाभारतातील विचारांचा प्रतिध्वनि अभिजात संस्कृत वाङ्मयातही ऐकू येतो. रघुवंशात कालिदास म्हणतो, 'गृहिणी ही पतीचा सचिव, मित्र, सल्लागार व प्रियशिष्या आहे.'[1] पत्नी ही पतीचा मित्र आहे अशी कल्पना वेदकालापासून चालत आली आहे. ऐतरेय ब्राह्मण म्हणते—'सखा ह जाया' (७-३-१३); महाभारत म्हणते—'भार्या दैवकृतः सखा' (१-२७४-७३); आणि म्हणूनच मनुस्मृतीने 'अन्योन्यस्याव्यभिचारो भवेदामरणान्तिकः' (९-१०१) असे सांगितले आहे. पत्नी ही गोड शब्दांनी हितकर सल्ला देणारी मैत्रीण आहे, असे काव्यप्रकाशात मम्मटाने 'कान्तासंमिततयोपदेशयुजे' या पदाने सुचविले आहे.

पतिपत्नीच्या अद्वैताचे सुंदर चित्र भवभूतीने उत्तररामचरित्रात रेखाटले आहे. 'सुखदुःखातील एकरूपता, जी सर्व अवस्थांत अनुकूल, जीत प्रत्येकाच्या अंतःकरणाला अपूर्व दिलासा मिळतो, वृद्धापकाळीही जीत कमतरता आणू शकत नाही व जिचे कालांतराने चिरस्नेहात रूपांतर होते, अशी भद्र एकरूपता मोठ्या भाग्याने प्राप्त होते.'[2] मालतीमाधवाच्या सहाव्या अंकात भवभूति म्हणतो—'पतीला पत्नी व पत्नीला पती म्हणजे प्रियतम मित्र, सबळचा नातलग, सर्व आशांची पूर्ती, सुखनिधान, जीवितसर्वस्व होय.' (६-१८)

अद्वैताच्या या जोडीपैकी पती आपल्या पत्नीशी निःव्याजप्रेमाने एकनिष्ठ राहात असे काय या प्रश्नाचा विचार करणे आवश्यक आहे. भासाच्या मध्यमव्यायोगामध्ये स्वतःचा किंवा कुटुंबियांचा प्राण वाचविण्यासाठी पत्नीला बळी द्यावे असे पतीच्या मनात येत नाही असे दाखविले आहे. सर्वसामान्यपणे हिंदु समाजात एकपत्नीत्व रूढ होते. 'दंपती' या शब्दाचा अर्थच 'एका घराचे दोन संयुक्त मालीदार' असा आहे. विवाहविधीतही एकपत्नीत्व अभिप्रेत आहे.

प्रत्यक्षात मात्र, विशेषतः श्रीमंत लोकांत व राजेलोकांत बहुपत्नीकत्व रूढ होते असे दिसते. राजे व सरदार राजकीय संबंध दृढ करण्यासाठी बहुपत्नीकत्वाचा उपयोग करून

---

१. गृहिणी सचिवः सखी मिथः प्रियशिष्या ललिते कलाविधौ । रघुवंश ८-६७

२. अद्वैतं सुखदुःखयोरनुगुणं सर्वास्ववस्थासु यद्
विश्रामो हृदयस्य यत्र जरसा यस्मिन्नहार्यो रसः ।
कालेनावरणात्ययात्परिणते यत्स्नेहसारे स्थितं
भद्रं तस्य सुमानुषस्य कथमप्येकं हि तत्प्राप्यते ॥ १ ३९

घेत. अशा वेळी त्यांच्या पत्नींपैकी कोणाही पत्नीला लोकनिंदेमुळे वेगळे राहाता येत नसे. शाकुंतलाच्या पाचव्या अंकात याचा उल्लेख आहे.[1] एवढेच नव्हे तर पत्नीवर सर्वस्वी पतीचाच ताबा असणे योग्य असेही तेथ म्हटले आहे.[2]

## सतीची चाल, तिचा प्रसार व निषेध

विधवा स्त्रीला समाज कसा वागवितो हे पाहिले म्हणजे त्याच्या स्त्रीवर्गविषयक दृष्टिकोणाची योग्य कल्पना येऊ शकते. प्राचीन वैदिक काळी विधवेने सती जावे असा दंडक असावा. परंतु तो पुढे टिकला नाही व पुढे खि. पू. ४०० पर्यंत आपणास सती पद्धतीचा मागमूसही दिसत नाही. साधारणपणे खि. पू. ३०० पासून सती जाण्याच्या रूढीचा उल्लेख दिसतो. याच काळात रचल्या गेलेल्या महाभारतात माद्री सती गेल्याचा उल्लेख आहे. पण याही बाबतीत, जमलेल्या ऋषींनी तिला परावृत्त करण्याचा प्रयत्न केला असे म्हटले आहे.

भट्टनारायणाच्या वेणीसंहार नाटकात चौथ्या अंकात कुरुक्षेत्राच्या रणभूमीवर एक स्त्री सती गेल्याचा उल्लेख आहे. पण हा नाटककाराचा कालविसंवादात्मक प्रमाद आहे. सती जाण्याची रूढी विशेषतः क्षत्रियांमध्ये इ. स. ४०० च्या सुमारास लोकप्रिय होऊ लागली होती. वात्स्यायनाच्या कामसूत्रांत या रूढीचा उल्लेख आहे. दूतघटोत्कच व ऊरुभङ्गः या नाटकात भासाने उत्तरा, दुःशला व पौरवी या अनुक्रमे अभिमन्यू, जयद्रथ व दुर्योधन यांच्या मृत्यूनंतर सती गेल्याचे सांगितले आहे. या बाबतीत त्याने महाभारतातील मूळ वृत्तांतात फरक केलेला दिसतो. कुमारसंभवाच्या चौथ्या सर्गात रती पतिमरणानंतर सती जाण्याच्या तयारीत असता त्या वेळी झालेल्या आकाशवाणीमुळे ती आपला निश्चय बदलते असे कालिदास सांगतो. रघुवंशाच्या सतराव्या सर्गात कुश युद्धात मारला गेला तेव्हा त्याची पत्नी कुमुद्वती सती गेली असे वर्णन सहाव्या श्लोकात आहे. मृच्छकटिक नाटकात दहाव्या अंकात चारुदत्ताची पत्नी धूता पतीला वधस्तंभावर चढविल्याची वार्ता ऐकताच मरणाची तयारी करीत असल्याचे शूद्रकाने दाखविले आहे.

या रूढीला बुद्धिनिष्ठ विरोध करण्याचे श्रेय बाणभट्टाकडे (इ. स. ६२५) जाते. तो म्हणतो, 'प्रिय व्यक्तीच्या पाठोपाठ मरण स्वीकारणे निष्फळ होय. मूर्ख लोक अशी रूढी पाळतात. मोहाने घडत असलेला हा प्रमाद होय. घाईगर्दीत बेधुंदपणे स्वीकारलेला

---

१. सतीमपि ज्ञातिकुलैकसंश्रयां जनोऽन्यथा भर्तृमतीं विशङ्कते ।
अथ तु वेत्सि शुचिव्रतमात्मनः पतिकुले तव दास्यमपि क्षमम् । (५-१९,२७)

२. उपपन्ना हि दारेषु प्रभुता सर्वतोमुखी । (५-२६)
(मनुस्मृतीच्या 'प्रदानं स्वाम्यकारणम् (५-१५२)' या नियमाचाच हा परिपाक आहे हे उघड आहे.)

हा मार्ग होय. या रूढीपासून मृतव्यक्तीचा काहीच लाभ होत नाही. मृत व्यक्ती आपल्या कर्मानुसार नियोजित स्थळी जात असेल तर आत्महत्येच्या पातकामुळे सती जाणारी व्यक्ती नरकात जाते...'[1]. महानिर्वाण तंत्रामध्येही सती जाणारी स्त्री नरकात जाते असे म्हटले आहे.[2]

इ. स. ७०० ते ११०० या काळात उत्तर हिंदुस्थानात व विशेषतः काश्मीरात ही रूढी दृढमूल होत असलेली दिसते. कल्हण आपल्या राजतरंगिणीत (८·३६६) म्हणतो की प्रसिद्ध कुल्टा देखील पतीच्या चितेवर सती जात असत. इ० स० ११०० त लिहिल्या गेलेल्या कथासरित्सागरात ही रूढी सर्वत्र प्रचलित दिसते.

## बुरख्याचा अभाव : वागणुकीतील मोकळेपणा

संस्कृत नाटकात स्त्रियांच्या बुरख्याचा कोठेच उल्लेख नाही. अभिज्ञानशाकुंतल व मालतीमाधव या नाटकांची कथावस्तू बुरखापद्धती रूढ असलेल्या समाजात दाखविताच आली नसती. शाकुंतलाच्या पहिल्या अंकात शकुंतला व तिच्या मैत्रिणींनी बुरखा घेतल्याचा उल्लेख नाही. मात्र शाकुंतलातील एका (५·१३) उल्लेखावरून विवाहित स्त्रिया क्वचित् 'अवगुंठन' म्हणजे तोंड झाकणारे वस्त्र वापरीत असाव्यात असे वाटते. मालतीमाधव नाटकात मालती व तिच्या मैत्रिणी देवळात जात असता बुरखा घेतलेल्या दाखविल्या नाहीत. बाणभट्टाच्या कादंबरीत महाश्वेता, कादंबरी व त्यांच्या सख्या बुरख्यात हिंडत होत्या असा उल्लेख नाही. मेघदूतातील १·२६ या श्लोकावरून उज्जयिनीतील स्त्रिया स्नानकाळी जलविहारासाठी शिप्रानदीकडे जात, असे दिसते. बुरखा पद्धती रूढ असती तर हे शक्य झाले नसते. राजतरंगिणीमध्ये काश्मीर दरबारचे व राजप्रासादांचे इ. स. ७०० ते ११५० या काळांतील वर्णन आहे. तेथेही बुरख्याचा कोठेही उल्लेख नाही.

मात्र विधवा व निराधार स्त्रिया व ज्यांचा पती प्रवासाला गेला आहे अशा स्त्रिया परपुरुषदर्शन टाळीत असत असे दिसते.[3] श्रीमंत व राजकुटुंबातील स्त्रिया अंतःपुरात वावरत व तेथे परपुरुषास मज्जाव असे.

## कालिदासीय वाङ्मयातील स्त्रीजीवनाचे चित्र

कालिदासवाङ्मयात कन्या, स्त्री व त्यांचे शिक्षण याबद्दलचे कोणते चित्र दिसते

१. यदेतदनुमरणं नाम तदतीवनिष्फलम्। अविद्वज्जनाचरित एष मार्गः। मोहविलसितमेत-द्रभसाचरितमिदं यदुपरते पितरि भ्रातरि भर्तरि वा प्राणाः परित्यज्यन्ते। उपरतस्य तु न कमपि गुणमावहति........ नरकम् लोकमपयाति। — कादम्बरी, पूर्वभाग

२. मोहाद् भर्तृचितारोहाद् भवेन्निरयगामिनी।

३. प्रोषितभर्तृका परपुरुषदर्शनं परिहरत्यार्या। स्वप्नवासवदत्तम् अंक ६ वा

ते पाहावयाचे आहे. पुरुषस्वभावापेक्षा स्त्रीस्वभाव कालिदासाने अधिक बारकाईने व वास्तवतेने रंगविला आहे. कालिदासाने रघुवंशात रेखाटलेले सीतेचे शब्दचित्र वाल्मीकीचा अपवाद सोडता इतर कोणासही इतक्या परिणामकारक रीतीने रेखाटता आलेले नाही. कालिदासाने कुमारसंभवात रेखाटलेले कन्या उमेचे चित्र म्हणजे एका आदर्श कन्येचे चित्र आहे. तिच्या लहानपणाच्या क्रीडांचे वर्णन कालिदासाने केले आहे. तिचे वाढते सौंदर्य कालिदासाने फार हृद्य रीतीने वर्णिले आहे. ती आपल्या पित्याला आपल्या मुलाहूनही अधिक प्रिय वाटे व तिच्या जन्माने पित्याला धन्य धन्य वाटत असे. हे वर्णन वाचून कन्या जन्माला येणे आताइतके दुःखदायक वाटत नव्हते असे दिसते.

आध्यात्मिक उन्नतीसाठी मुलगा हवा हवासा वाटत असेल तर सुंदर, कलावती अशी कन्या व्हावी अशीही आंतरिक इच्छा हिंदूंच्या मनात असे. शाकुंतलाच्या चौथ्या अंकात शकुंतला सासरी जात असता कण्वाच्या हृदयाची झालेली कालवाकालव 'यास्यत्यद्य शकुंतलेति हृदयं' या श्लोकात व्यक्त झाली आहे. त्याच अंकात 'अर्थो हि कन्या परकीय एव' या श्लोकात एखादी मोलाची ठेव ज्याची त्याला परत केल्यावर मनाला जे हलके वाटते त्याचे वर्णन वाचून पिता व कन्या यांच्यातील एक आगळाच जिव्हाळा प्रत्ययास येतो.

कुमारसंभवात उमेच्या शिक्षणाचे वर्णन करताना पूर्वजन्मीच्या कला आणि शास्त्रे या जन्मातही तिच्यामध्ये विशेष तेजाने तळपू लागली,[1] असे कालिदासाने म्हटले आहे. वनकन्या शकुंतला ही देखील सुशिक्षित, गृहकृत्यात दक्ष व आतिथ्यशीलतेत निपुण अशी दाखविली आहे. इतकेच नव्हे तर प्रसंग पडल्यास भर सभेत तोंड टाकून बोलणाऱ्याला बाणेदार उत्तर देणारी स्त्री म्हणूनही तिचे चित्र रेखाटले आहे. मेघदूतातील यक्षपत्नी ही शारीरिक व मानसिक सौंदर्याने विनटलेली अशी रंगविली आहे. चित्रकला, काव्यकला व संगीत यांमध्ये ती निपुण होती असे कालिदास म्हणतो.

मालविकाग्निमित्र नाटकात मालविकेच्या कलाध्ययनातील प्रगतीचे वर्णन करताना कालिदास म्हणतो, 'गीत व नृत्य यांत ती असे काही विशेष नैपुण्य दाखवी की, ती आपल्या नृत्यशिक्षकाला जणू परत शिकवीत आहे, असे वाटे.'[2] त्यामुळे, ज्ञान आत्मसात करण्यात स्त्रिया स्वभावतः निपुण असतात, असेही तो म्हणतो.[3]

कन्या योग्य घरी पडली म्हणजे मग चिंतेचे कारण उरत नाही असे कुमारसंभवात कालिदास म्हणतो.[4] वैवाहिक बाबतीत पती आपल्या पत्नीच्या सल्ल्याने

---

१. कुमारसंभव १.३०

२. तत्तद् विशेषकरणात् प्रत्युपदिशतीव मे बाला । मालवि०

३. निसर्गनिपुणाः स्त्रियः । मालवि० २

४. अशोच्या हि पितुः कन्या सद्भर्तृप्रतिपादिता । कुमार० ६.७९

वागतात व पत्नी देखील पतीच्या इच्छा बोलून दाखवीत असतात. कन्या म्हणजे जणू काय ईश्वराने पूर्वनियोजित पतीला दिलेली प्रेमाची भिक्षाच होय,[1] इत्यादी विचारही कुमारसंभवात आढळतात. पहिल्या सर्गाच्या अठराव्या श्लोकात हिमालयाची पत्नी मेना ही मुनींना देखील माननीय अशी होती असे म्हटले आहे. स्त्री असो किंवा पुरुष असो, सच्चारित्र्याचाच लोक आदर करतात असाही विचार सहाव्या सर्गात आला आहे.[2] ज्याचे आचरण तपःपूत असते त्यांना ऋषीदेखील वंदन करतात असे पाचव्या सर्गात म्हटले आहे.[3]

रघुवंशामध्ये सीता ही पतिदेवता स्त्रियांमध्ये अग्रगण्य होती असे म्हटले आहे (१४·७४). शाकुंतलाच्या चौथ्या अंकात सासरी निघालेल्या शकुंतलेला कण्वांनी केलेला उपदेश अत्यंत स्मरणीय आहे. भरभराटीतही गर्विष्ठ न होणे, नम्र राहाणे हा श्रेष्ठ सद्गुण असल्याचे शाकुंतलात सांगितले आहे.[4] उत्तम स्त्रीचे वर्णन कालिदास गृहिणी शब्दाने करतो. (यान्त्येवं गृहिणीपदं युवतयो वामाः कुलस्याधयः।) सपत्नी या सत्कृत्याच्या मूलकारण होत (कुमार० ६·१३) असेही कालिदासाने म्हटले आहे. गृहिणी पतीवर आपली छाप पाडतात आणि विशेष कारण घडले तरच रागावतात (मालवि० १.१८). धीरपत्नी व वीरमाता होणे हे श्रेष्ठ सार्थक आहे असे कालिदासाने सुचविले आहे.[5] कण्वाश्रमातील वृद्ध स्त्रियांनी शकुंतलेला सासरी जाताना दिलेले आशीर्वादही हीच गोष्ट सुचवितात.[6]

उमा आणि सीता या पात्रांच्या चित्रणातून कालिदासाने आदर्श स्त्री रंगविली आहे. रामाने ज्या वेळी लक्ष्मणाकरवी सीतेची वनात पाठवणी केली त्यावेळी सीतेने लक्ष्मणाबरोबर जो संदेश पाठविला आहे त्यात स्त्रीप्रेमाचा उत्कट आविर्भाव व तिच्या आकांक्षेचे आविष्करण दृष्टीस पडते. ती स्वतःच्या दैवालाच दोष देते (रघु० १४·६२) व राम 'कल्याणबुद्धि' आहेत असे म्हणते. इतकेच नव्हे तर आमरण तप आचरण्याची व पुढील जन्मीही रामाची पत्नी होण्याची आपली इच्छा असल्याचा निरोप ती रामाकडे पाठविते (रघु० १४·६६).

प्रा. डॉ. के. ना. वाटवे म्हणतात, 'कुमारसंभवात कालिदासाने नवला पार्वती,

---

१. कुमार० १.८५, ८६ आणि ८८

२. स्त्रीपुमानित्यनास्थैषा वृत्तं हि महितं सताम्। कुमार० ६.१२

३. न धर्मवृद्धेषु वयः समीक्ष्यते। कुमार० ५.१६

४. भाग्येष्वनुत्सेकिनी, अंक ४ था

५. भर्तासि वीरपत्नीनां श्लाघ्यायां स्थापिता धुरि।
वीरसूरिति शब्दोऽयं तनयात् त्वामुपस्थितः॥ मालवि०

६. जाते, भर्तुर्बहुमानसूचकं महादेवीशब्दं लभस्व। वत्से वीरप्रसविनी भव। वत्से भर्तुर्बहुमता भव। (अभिज्ञानशाकुंतल, अंक ४ था)

उत्कट पार्वती, विरहिणी पार्वती, भग्नप्रेम पार्वती, तपस्विनी पार्वती, विवाहवेषभूषित पार्वती, विलासिनी पार्वती आणि माता पार्वती अशा आठ निरनिराळ्या अवस्थांतील पार्वतीच्या रेखेतील विकासशील आणि रम्य छटांचे आणि प्रतिच्छटांचे अमर चित्रण मोठ्या विस्ताराने, कल्पकतेने आणि पूर्ण तन्मयतेने केले आहे.'[1]

स्त्रीने आकर्षक वेषभूषा का करावयाची तर पतीने ती पहावी म्हणूनच. (स्त्रीणां प्रियालोकफलो हि वेषः। कुमार० ७-२२) असे कालिदासाने म्हटले आहे. कोणत्या वीरमातेला पुत्राचा पराक्रम पाहून आनंद वाटणार नाही? (सुतविक्रमे सति न नन्दति का खलु वीरसूः। कुमार० १२-५९) असे म्हणून वीरमातृत्वाची त्याने प्रशंसा केली आहे.

रघुवंशीय राजांचे वर्णन करीत असता कालिदासाने तत्कालीन राजे व घटना यांची वर्णने सूचक रीतीने केली आहेत. डॉ. वाटवे म्हणतात, 'पोटात तत्काल व ओठावर प्राचीन काल' अशी कालिदासाची व्यवस्था दिसते.[2] रघुवंश हे काव्य नायकप्रधान आहे. त्यामुळे त्यात नायिकांच्या स्वभावचित्रणाला फारसा वाव नाही. रघूच्या पत्नीचा तर उल्लेखही नाही. सुदक्षिणा ही पतिव्रतेचा एक आदर्श नमुना आहे. उत्कट व चतुर इंदुमती आणि तिची मैत्रीण यांचा संवाद मोहक आहे. कौसल्या व सुमित्रा आदर्श माता आहेत. कैकेयीची दुष्टता त्या मातांच्या पार्श्वभूमीवर उठून दिसते. सीतेचा त्याग, संयम, बाणेदार वृत्ती, वात्सल्य आणि पतिभक्ती, यांमुळे सीतेचे हे चित्र रामायणापेक्षाही उठावदार झाले आहे.[3]

## इतर काव्यनाटकांमध्ये चित्रित झालेली स्त्री

किरातार्जुनीयात भारवीने रंगविलेले मानिनी द्रौपदीचे चित्र चटकन् चित्त वेधून घेते. शत्रूंनी केलेले अपमान व हालअपेष्टा शांतपणे सहन करणाऱ्या आपल्या पतिदेवांना – धर्मराजाला – चेतविण्यासाठी ती म्हणते, 'मला विपत्ति व पराजय यांचे एवढे काही वाटत नाही. ज्यांचा मानीपणा व तेज कायम आहे त्यांचा पराभवही मला उत्सवासारखा वाटेल. पण तुमचे ते तीव्र क्षात्रतेजच मंदावले आहे, आणि शांती व क्षमा यांना जर तुम्ही चालविले आहे. मी तुम्हाला निक्षून सांगते की, यानंतरही तुम्हांला क्षमा हेच सुखाचे साधन वाटत असेल तर क्षात्रतेजाचे चिन्ह असलेले हे धनुष्य या फेकून आणि हातात समिधा व डोक्यावर जटाभार धारण करून अग्नीला हवि समर्पण करीत बसा.'[4] त्याच्या सांगण्याप्रमाणे अर्जुन जेव्हा तपश्चर्येला निघतो

१. संस्कृत महाकाव्याचे पंचप्राण, पृ. ३५

२. संस्कृत महाकाव्याचे पंचप्राण, ८

३. वाङ्मनः कर्मभिः पत्यौ व्यभिचारो यथा न मे।
   तथा विश्वंभरे देवी मामन्तर्धातुमर्हसि॥ रघु० १५-८१

४. अराधरः सन् जुहुधीह पावकम्।

तेव्हा तेजस्विनी द्रौपदी त्यांना म्हणते, 'ज्याचे स्मरण देखील असह्य आहे असा माझा केशकर्षणाने झालेला अपमान तुमच्या या विरहाने आज पुन्हा ताजा झाला आहे.' स्वतःचा अपमान व दुःस्थिती आणि शत्रूची सुस्थिती यामुळे डिवचलेल्या नागिणीप्रमाणे खवळलेल्या द्रौपदीने धावतेजाला दिलेली ही विषारी जागृति साहित्यसंसारात अमर होऊन राहील.

उत्तररामचरित नाटकात भवभूतीने रामाच्या चरित्राच्या दोन बाजू रंगविल्या आहेत: एक प्रजानुरंजन करणारा कर्तव्यकठोर आदर्श राजा व दुसरा पत्नीचा त्याग करणारा पति. या दोन्ही बाजू त्याने चांगल्या रंगविल्या आहेत. परंतु स्वभावतःच भवभूति स्त्रियांचा कनवाळू असल्यामुळे राम देखील कनवाळू, सहृदय, प्रेमळ होता असे त्याने दाखविले आहे. कालिदासाची सीता रामाला 'भुनस्य किं तत् सदृशं कुलस्य'[1] असा टोमणा मारते, परंतु भवभूतीची सीता काही बोलत नाही. कारण भवभूतीने रामाच्या पश्चात्तापदग्ध हृदयाचे दर्शन तिला घडविले आहे. कालिदासाच्या नाटकात सवती-मत्सराचा जो आविष्कार आहे आणि नायकांच्या स्त्री-दाक्षिण्याची जी दांभिकता आहे ती भवभूतीच्या नाटकात नाही. भवभूतीची सीता अगतिक झालेली नाही. तिने निस्सीम प्रेमामुळेच रामाला जिंकले आहे.[2] वासंतीची व्यक्तिरेखा सीतेवरील अन्याय स्पष्टपणे व्यक्त करण्याकरिताच निर्माण केली आहे. ती मोकळ्या मनाची, साधी, सौजन्यशील आणि आतिथ्यशील आहे. आत्रेयीचे ती मोठ्या प्रेमाने स्वागत करते.

भट्टनारायणाच्या वेणीसंहारातील द्रौपदी म्हणजे अग्निशिखाच आहे. ती तेजस्विनी आहे व म्हणूनच तेजस्वी भीमालाच ती 'नाथ' म्हणून संबोधते. युद्धाचा मुहूर्त ठरल्याबरोबर भीमाप्रमाणे तिलाही आनंद झाला आहे. असे असले तरी ती एक प्रेमळ पत्नीही आहे. 'रणांगणावर शत्रुसैन्यात वेधावध हिंडू नका' असे ती भीमाला सांगते.

दुर्योधनाची पत्नी भानुमती ही व्यक्तिरेखा भट्टनारायणाने आपल्या प्रतिभेतून निर्माण केली आहे. द्रौपदीला जिव्हारी लागणारा टोमणा तीच मारते. मात्र तिचे दुर्योधनाशी जे वर्तन झाले आहे त्यात तिचे आदर्श पतिव्रतेचे गुण प्रकट झाले आहेत. द्रौपदी एक तेजस्वी वीरपत्नी आहे तर भानुमती एक सोज्वळ, सोशीक पतिव्रता आहे.

शूद्रकाच्या मृच्छकटिकात वसंतसेना हे एक प्रमुख पात्र आहे. इतर नाटकांतल्याप्रमाणे वसंतसेना ही सामेवंद नायिका नाही. ती वेश्या असूनही चारुदत्त सोडून परपुरुषसंबंध नित्य माहीत नाहीत. वेश्या असूनही तिला धनाचा लोभ नाही. नित्य

---

१. मा लोकवादश्रवणादहासीः श्रुतस्य किं तत् सदृशं कुलस्य। रघु० १४-६१

२. डॉ. के. ना. वाटवे यांचे 'संस्कृत-नाट्यसौंदर्य'

गुणांचे आकर्षण आहे. तिचे प्रेम वारांगनेचे नसून कुलांगनेचे आहे. ती मनाने उदार आहे. आपल्या दासीचीही ती पारतंत्र्यातून मुक्तता करते. चारुदत्ताच्या औदार्याचे व थोर मनाचे दर्शन झाल्यामुळे तिचे प्रेम वाढत जाते. धूतेबद्दल तिला सवतीमत्सर वाटत नाही. तिच्या एकनिष्ठतेमुळे ती कुलवधू होते. अभिजात संस्कृत नाटकातील ठराविक ठशाच्या राजकन्यानायिकांच्या पार्श्वभूमीवर वसंतसेनेची रेखा वास्तवतेमुळे चिरस्मरणीय झाली आहे.

कालिदासाचे 'गृहिणी, सचिवः सखी मिथः प्रियशिष्या ललिते कलाविधौ' हे वर्णन जिला संपूर्णपणे लागू पडते अशी नायिका म्हणजे भासाच्या स्वप्नवासवदत्त नाटकातील वासवदत्ता. पद्मावतीशी वागताना सवतीमत्सर तर नाहीच पण ती भगिनीप्रेम दाखविते. हर्षाने 'रत्नावली' व 'प्रियदर्शिका' या नाटिकांत रंगविलेली वासवदत्ता मत्सरी व आढ्यताखोर आहे. स्वप्नवासवदत्त नाटकातील उपनायिका पद्मावती ही शांत, सद्गुणसंपन्न, निर्मत्सर, क्षमाशील आणि निष्पाप आहे तर वासवदत्ता ही भावनाप्रधान, त्यागी, दृढनिश्चयी आणि प्रेमळ आहे.

## स्त्रीजीवनाचे संकलित दर्शन

समाजचित्रणाच्या दृष्टीने कालिदास वाङ्मय अभ्यसनीय आहे. कालिदासाच्या काव्यनाटकांवरून त्याला प्रौढविवाह संमत होता याविषयी वाद नाही.[1] मालविका, पार्वती, शकुंतला, इंदुमती या मुख्य नायिका विवाहकाली विविधकलांमध्ये निपुण व प्रौढ अशा दाखविल्या आहेत. या सर्वांनी स्वतःच्या पतीची निवड केली आहे. त्यावरून कालिदासाला प्रीतिविवाह संमत होता असे काही प्रतिपादितात, तर काही शाकुंतलाच्या पाचव्या अंकातील, 'एकान्तातील मैत्री विशेष विचार करून करावी नाहीतर ज्यांच्या मनाची पूर्ण ओळख झाली नाही अशांच्या बाबतीत प्रेमाचे पर्यवसान वैरात होते,'[2] या शार्ङ्गरवाच्या उक्तीकडे बोट दाखवून कालिदासाला त्याचे दुष्परिणाम दिसत होते असे म्हणतात. या दोहोंतील सुवर्णमध्य खरा वाटतो. कालिदासाने रघुवंशातील राजांचा सर्वत्र प्रीतिविवाहच वर्णिला नाही. बरेचसे विवाह हल्लीप्रमाणे ब्राह्मविवाह होते. राम, कुश इत्यादिकांना पराक्रमामुळे विशिष्ट स्त्रिया मिळाल्या असे दाखविले आहे. यावरून प्रीतिविवाह कौटुंबिक सुखाला आवश्यकच आहे असे त्याचे मत दिसत नाही. परंतु त्याचे त्याला वावडेही नव्हते. नाही तर त्याने आपल्या सर्व नाटकांत त्यांची रम्य चित्रे रंगविली नसती. उर्वशी व शकुंतला यांच्यावर विवाहानंतर घोर आपत्ती येतात. पण त्या भवितव्यतेमुळे. केवळ बाह्य सौंदर्यावर बसलेले प्रेम टिकाऊ नसते,

---

१. कालिदास - वा. वि. मिराशी. पृ २६९

२. अतः परीक्ष्य कर्तव्यं विशेषात्संगतं रहः ।
अज्ञातहृदयेष्वेवं वैरीभवति सौहृदम् ॥ शाकुंतल, अंक ५ वा.

म्हणून प्रेमी जीवांनी विवाहापूर्वी आपल्या मातापित्यांची संमती घ्यावी व त्यांनीही योग्य तो सल्ला द्यावा असे कालिदासाचे मत दिसते.[1]

अभिजात संस्कृत वाङ्मयात, विशेषतः कालिदासीय वाङ्मयात, तत्कालीन स्त्रियांचे बरेचसे स्पष्ट दर्शन आपणास होऊ शकते असे म्हणता येईल. कालिदासाच्या पात्रांत राजस्त्रिया, ऋषिपत्नी, ऋषिकन्या, स्वर्गीय अप्सरा, दासी, तपस्विनी अशा बहुविध स्त्रियांचा समावेश आहे. त्यात सुशिक्षित व अशिक्षित असेही प्रकार दिसतात. विवाहाशिवाय इतर कोणत्याही संस्काराचा उल्लेख कालिदासाने स्त्रियांच्या वर्णनात केलेला नाही. नाही म्हणायला पार्वतीच्या वर्णनात तिच्या नामकरणाचा उल्लेख आहे (कु. १·२६). सर्वसामान्य स्त्रीवर्गाला त्याकाळी लिहिण्यावाचण्याचे शिक्षण मिळत असे, असे म्हणता येणार नाही. परंतु पार्वती, शकुंतला, प्रियंवदा आणि अनसूया, मालविका, उर्वशी, यक्षपत्नी या सुशिक्षित व ललितकलानिपुण दाखविल्या आहेत. वाल्मीकीच्या आश्रमातील मुली 'बोलण्यात चतुर असत' असा उल्लेख आहे.[2]

'अर्थो हि कन्या परकीय एव'[3] या उद्गारात 'स्त्रियांना विवाह सामान्यतः आवश्यक' हा कालिदासाचा अभिप्राय स्पष्ट होतो. प्रियंवदा व अनसूया यादेखील 'प्रदेय' आहेत,[4] या उल्लेखानेही तेच सुचविले आहे. परंतु स्त्रियांनी जन्मभर अविवाहित राहण्याच्या 'वैखानस' व्रताचाही तो उल्लेख करतो.[5] गौतमी आर्या ही अविवाहित प्रौढ स्त्री दिसते.

मुलीचे विवाहाचे वय म्हणजे अनुरूप वर पसंत करण्याइतके प्रौढ वय असा कालिदासाचा अभिप्राय दिसतो. मात्र विवाहाला मातापित्यांची संमती आवश्यक आहे, असे त्याचे मत होते.

कालिदासकाली कुटुंबात किंवा समाजात स्त्रियांना जे बहुमानाचे स्थान असल्याचे दिसते ते सहानुभूतीमुळे व प्रेमामुळेच होते. म्हणजे पुरुष सहृदय व प्रेमळ असतील तरच स्त्रियांची धडगत. एरव्ही तिला कोणी वाली नसे, असे दिसते. आणि आजच्या परिस्थितीची त्या परिस्थितीशी सहज तुलना करता येते. शाकुंतलातील हंसपदिकेच्या गाण्यातील 'अभिनवमधुलोलुप मधुकर' म्हणजे त्या काळचा मधुकरवृत्ती पुरुष होय हे ध्यानात येते. पतीचा संपूर्ण ताबा स्त्रीवर अशी परिस्थिती असल्यामुळे तत्कालीन स्त्रियांचे समाजातील व कुटुंबातील स्थान गौणच होते असे म्हणावे लागेल. स्त्रीवर्गामध्ये विविध प्रकारची मनोवैफल्ये असत असे दिसते. उदाहरणार्थ, शकुंतलेचे

१. अथ: सान्निध्यमपि गुरोरनुज्ञां धीरेव कन्या पितुराचचक्षे । रघु० ५·३८
२. विनोदयिष्यन्ति नवाभिषङ्गामुदारवाचो मुनिकन्यकास्त्वाम् । रघु० १४·७७
३. शाकु० ४–३–२
४. शाकु० ४–१८
५. शाकु० १·२२

'सौभाग्यदेवतार्चन',[1] धारिणीचे पुत्रकल्याणार्थ व्रत, औशीनरीचे 'प्रियप्रसादनव्रत'. विवाहानंतर मुलीचे नाव बदलण्याची आजची रूढी त्या काळात दिसत नाही.

अभिजात संस्कृत वाङ्मयात प्रतिबिंबित झालेल्या समाजचित्रणाचा व त्या वाङ्मयातील पात्रांच्या स्वभावपरिपोषातून झालेल्या समाजदर्शनाचा हा धावता आढावा झाला.

## सारांश

सारांशरूपाने आपल्याला असे म्हणता येईल की, कालिदासाच्या सर्व ग्रंथात स्वकालीन परिस्थितीविषयी संतोष व समाधान दिसते आणि ते गुप्तकालीन सार्वत्रिक संपन्नतेचे द्योतक असावे. एकूण अभिजात संस्कृत वाङ्मयात शिक्षण व कलाध्ययन हे श्रीमंत व राजे लोक यांच्या कुटुंबीयात झालेले दिसते. याच समाजाच्या जीवनाचे दर्शन अभिजात संस्कृत वाङ्मयात होते. विवाहाचे स्मृत्युक्त वय क्षत्रिय कुलात व श्रीमंत घराण्यात पाळण्यात येत नव्हते. बुरखा व पडदा पद्धती जवळ जवळ नव्हतीच. सर्वसामान्य स्त्री देखील आईवडिलांच्या छायेत, पतीच्या प्रेमात व मुलांच्या आदरयुक्त पाहुणचारीत सुखी असावी. क्वचित् विधवाविषयक दृष्टिकोणामुळे, सतीपद्धतीमुळे, बहुपत्नीकरणाच्या चालीमुळे स्त्रीची परिस्थिती असहाय होत असावी. विवाहविधीचे स्वरूप सामान्यतः आजच्या सारखेच असावे. विवाहाच्या अनेक प्रकारांपैकी गांधर्व व ब्राह्म यांचाच उल्लेख आढळतो. स्वयंवरविवाह हे ब्राह्मविवाहासारखेच समजले जात. सवर्ण विवाहाविषयी कालिदासाचा थोडा आग्रह दिसतो (असंशयं क्षत्रपरिग्रहक्षमा). मात्र असवर्ण विवाह निदान क्षत्रियात तरी रूढ असावेत असे वाटते.[2]

◊

---

१. हे व्रत म्हणजे आजची मंगळागौर असावी असे वाटते.

२. भर्तुः वेश्या वर्णावरो भ्राता वीरसेनो नाम। मालवि० १.६

८

# ऐतिहासिक कालातील स्त्री

## राजाराम विनायक ओतुरकर

प्रा. राजाराम विनायक ओतुरकर, एम्. ए. (जन्म १८-१०-१९०८) निवृत्त प्राध्यापक, सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणे. माजी प्राचार्य, कॉलेज ऑफ कॉमर्स, मुंबई. ऐतिहासिक ग्रंथांचे संपादक. कलकत्ता येथील अखिल भारतीय इतिहास परिषदेच्या अर्वाचीन इतिहास शाखेचे अध्यक्ष (१९५५). पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळाचे सभासद. ('गवानंद', ७६७।११ शिवाजीनगर, पुणे, ४)

### वेदकालात स्त्रीपुरुषांची समानता

प्रस्तुत लेखात इ. स. १२०० पासून इ. स. १८०० पर्यंतच्या कालखंडातील भारतीय स्त्रीजीवनाचे स्वरूप रेखाटण्याचा यत्न करावयाचा. हा काळ म्हणजे सामान्यतः दिल्लीस मुसलमान राज्यकर्ते आले तेव्हापासून तो पेशवाईअखेरपर्यंतचा काळ. भारताच्या इतिहासात या कालास 'मध्ययुग' असे नाव आहे. या काळातही विषय अधिक मर्यादित करण्यासाठी भागवत धर्मीय संत स्त्रियांची परंपरा व त्यांचे कार्य यांचा विचार वगळलेला असून स्त्रियांचे राजकीय व सामाजिक जीवन एवढ्यापुरतेच विवेचन कर्तव्य आहे. डॉ. अळतेकरांनी आपल्या 'हिंदु संस्कृतीतील स्त्रियांचे स्थान'[1] या विद्वत्तापूर्ण इंग्रजी ग्रंथात इतिहासकालातील स्त्रीजीवनाचे जे मोटके समालोचन शेवटच्या भागात केले आहे, त्यात ते असे म्हणतात की रानटी समाजात स्त्री ही पुरुषाचे मानाने अबला असल्याने ती केवळ उपभोग्य वस्तू मानली जात असली तरी वेदकाळी म्हणजे आर्य भारतात आले त्या सुमारास आर्यसमाज बराच सुसंस्कृत होता व स्त्रीचे समाजातील स्थान पुरुषाशी बरोबरीचे असे होते. विवाह हा संस्कार मानला जात असून घराची व्यवस्था व मालकी दंपतीकडे सामायिकीने असे. वेदकालानंतर येणाऱ्या उपनिषद्कालातही (इ. स. पूर्व १५०० ते ५००) स्त्रीचा समाजातील दर्जा खालावलेला दिसत

१. The Position of Women in Hindu Civilisation.

नाही. उलट काही बाबतीत तिची स्थिती सुधारल्याचे आढळते. कारण या काळात स्त्रीधनाची कल्पना निर्माण होऊन तिला विवाह वा अन्य प्रसंगी मिळणाऱ्या देणग्यांवर सर्वस्वी तिचा मालकी हक्क असावा ही कल्पना समाजात मान्यता पावली. रुद्रयाग, सीतायाग या सारखे यज्ञ केवळ स्त्रियाच करीत असे दिसते. तसेच पुरुषांच्या गैरहजेरीत गृहकृत्ये, धार्मिक आचार व प्रार्थना वगैरे चालविण्याची संधी स्त्रियांना प्राप्त होई. क्षत्रियांत कन्येच्या स्वयंवराची कल्पना रूढ होऊन त्याप्रमाणे तिचे वय, तिला वराची निवड करण्याची पात्रता असेल एवढे हवे, म्हणजे सुमारे सोळा असले पाहिजे हे उघड आहे. स्त्रिया पूर्वीप्रमाणे दरबारसमारंभात भाग घेत. त्या पडदानशीन नसत. पुनर्विवाहास मान्यता होती आणि सतीची चालही या काळात सुरू झाली नव्हती.

## पुराणकालात स्त्रीचा दर्जा घसरत चालला

तेथून पुढील कालात म्हणजे इ. स. पू. ५०० ते इ. स. ५०० या पुराणकाळात स्त्रीचा समाजातील दर्जा अनेक कारणांनी घसरत चालला.[1] याचे कारण त्यांच्या मते असे की आर्यांनी आर्येतरांवर विजय संपादन केल्यावर त्यांनी जितास गुलाम केले. त्याचा शूद्रांचा वर्ग निर्माण झाला आणि आर्य जेते त्यांच्याकडून हरएक प्रकारची कामे करून घेऊ लागले. त्यातील अनेक कामे पूर्वी स्त्रिया करीत. स्त्रीचे कार्यक्षेत्र संकुचित होऊन ती दिवसेंदिवस घरातील एक पोकळ मानाचे स्थान बनत गेली. पुढील काळात आर्यांचे आर्येतरांशी विवाहसंबंध घडून आले. अर्जुनाचा उलूपी नागकन्येशी व भीमाचा हिडिंबेशी विवाह झाला. अशा स्त्रिया धर्मकृत्यात पुरुषांच्या बरोबरीने भाग घेण्यास अपात्र होत्या. तेव्हा स्मृतिकारांनी त्याचा निषेध केला. या आर्येतर स्त्रीचे संस्कृतचे अज्ञान, संस्कृतीची भिन्नता, भाषेच्या उच्चारातील भ्रष्टता यामुळे तिजकडे समाज तुच्छतेने पाहू लागला व तिला धर्माचारात सहभागी होण्याची परवानगी नाही असे स्मृतिकारांनी सांगितले. परंतु एखाद्या बलदंड क्षत्रियाची आर्येतर स्त्री आवडती असल्यास व तिने तसा हट्ट धरल्यास पुरोहितवर्गास तिचा हट्ट चालवून घ्यावा लागे. यातून पळवाट काढण्यास एकच मार्ग होता तो म्हणजे सर्वच स्त्रियांना धर्माचारातून वगळणे. भारतात गंगायमुनाच्या क्षेत्रात बंगालपर्यंत व दक्षिणेकडे आर्यांनी आपले वर्चस्व प्रस्थापित केल्यावर त्यांचे वैभव वाढले, ते सुखलोलुप बनले. पूर्वीप्रमाणे हरएक बाबतीत स्त्रीने पुरुषास सहाय्यासाठी साह्य करण्याची जरूरी राहिली नाही. कारण श्रमाची कामे गुलामांकडे गेली. स्त्रिया या उपभोग्य वस्तु बनल्या. या कारणाने त्यांच्या शिक्षणाची आवश्यकता वाटेनाशी झाली; व अशिक्षित विवाहित स्त्रीस विवाहोत्तर गृहव्यवस्थेत पूर्वीचा दर्जा राहिला नाही. स्त्री ही उपभोग्य व शूद्र हा सेवक असे स्त्री शूद्र वर्ग उच्चवर्णीय पुरुषांच्या सुखोपभोगाची साधने बनली. पूर्वी स्त्रीपासून

---

१. डॉ. अळतेकरांचा उपरोक्त ग्रंथ. पृ. ३४३

होणारी संतती लढाईसाठी हवी असे. आता सर्वत्र आर्यांचे साम्राज्य पसरल्यावर लढाईंनी तितकी जरूरी राहिली नाही. परंतु पिंडदानासाठी मात्र संततीची आवश्यकता कायम राहिली. अशा स्थितीत मोक्षसाधनेच्या आकांक्षेसाठी जितक्या लवकर संतती प्राप्त होईल तितके अधिक इष्ट असे समाजास वाटू लागले. मुलगी जन्मास आल्यावर तिचा विवाह करणे व तिला संतती झालेली पहाणे हेच पित्याचे मुख्य कर्तव्य आहे असे वाटून स्त्रीस रजोदर्शन होण्यापूर्वी तिचा विवाह होणे इष्ट वाटू लागले.

## स्त्रियांवर अधिकाधिक बंधने

क्षत्रियांत अजूनही स्वयंवराची चाल चालू राहिली तरी विवाहाचे वय घसरत गेल्यामुळे ब्राह्मणांत व इतर वर्गांत ती मागे पडली व बंद झाली; प्रेमविवाह दुर्मिळ झाले. रजोदर्शनापूर्वी कन्येचा विवाह उरकून घेतला पाहिजे या काळजीमुळे केव्हा केव्हा विजोड विवाह होत असत. अल्पवयीन स्त्री व वयात आलेला पुरुष यांतील विषमते-मुळे आणि स्त्री ही अशा वयात उपभोगक्षम नसल्यामुळे अन्य स्त्रीसंबंध होऊ लागले. अशा वेळी पुरुषाचे वर्तन कसेही असले तरी स्त्रीने त्याला देवासमान मानावे अशी शिकवण स्मृतिकारांनी दिली. पुरुषवर्चस्वाच्या या काळांत विधवाविवाह मागे पडला व तिने कर्मठ आचाराने व संन्यस्त वृत्तीने राहावे अशी शिकवण दिली गेली. पुरुषांनी मात्र एक स्त्री मृत झाली असता दुसरी किंवा तिच्यामागून तिसरीशी लग्न लावणे धर्म्य ठरले. या सर्वांचा स्त्रीजीवनावर फार अनिष्ट परिणाम झाला. साम्राज्य-वैभव उपभोगणारे राजे अनेक स्त्रियांचा जनानखाना बाळगू लागले. यामुळे जनानखान्यातील स्त्रियांच्या जीवनात आपसातील मत्सर, भांडणे व चुगलखोरपणा यांची भर पडली. आपल्या स्त्रिया कुणाच्या नजरेस पडू नयेत व त्यांचे पातिव्रत्य कायम राहावे या इच्छेच्या प्रभावामुळे स्त्रियांचा पडदानशीनपणा हे कुलीनतेचे लक्षण ठरले. परंतु हे साम्राज्यउपभोगाचा व विलासाचा काळ पुढे टिकला नाही. इ० स० पू० च्या दुसऱ्या शतकापासून तीनशे वर्षांत भारतावर ग्रीक, शक, पार्थियन इत्यादी परकीयांनी स्वाऱ्या केल्या व कुशानांनी तर उत्तर भारताच्या बऱ्याच मोठ्या प्रदेशावर आक्रमण केले. या स्वाऱ्यांनी भारतीय समाज उध्वस्त होऊन त्याच्यात ऐहिक गोष्टींकडे उदासीनतेने पहाण्याची व संन्यासप्रियतेची वृत्ती प्रबळ झाली. विरक्तिप्रधान वैफल्याच्या या काळात स्त्रियांनी पुनर्विवाह करून संसारसुख उपभोगण्यापेक्षा संन्यस्त वृत्तीने राहून मोक्षमार्ग अनुसरावा असे तत्वज्ञान प्रबळ होऊन पुनर्विवाह मागे पडले व पुरुष हाच स्त्रीचा स्वामी असल्याने त्याच्या मरणोत्तर जी स्त्री आत्मसंतोषाने सती जाईल ती मोठी पुण्यवान अशी भावना निर्माण झाली. यानंतच पुढे स्त्रीची खुषी, पुढे तिच्वर खुषीची सक्ती, लोकमताचे दडपण, जननिंदेची टोचणी, तरुणवयात वैधव्य आल्यास वाकडे पाऊल पडण्याचा संभव टाळण्याची आवश्यकता या सर्व कारणांनी सतीचे महत्त्व व केशवपनाची चाल समाजात वाढत चालली. या वैराग्यप्रधान तत्त्वज्ञानाच्या

प्रकारामुळे पुनर्विवाह न करणे हे उच्च कुलीनतेचे लक्षण मानले गेले व ज्या जातीत पुनर्विवाह नसतील ती उच्च व जिच्यात ती चाल असेल ती हलकी आणि एकाहून अधिक पुरुषांनी उपभोगलेली स्त्री ही हलक्या दर्जाची असे समाज मानू लागला. या तत्त्वज्ञानाच्या पुष्ट्यर्थ स्त्री हे क्षेत्र व पुरुष हे बीज ही कल्पना बळावून क्षेत्र विविध बीजांनी बिघडते, परंतु बीज हे मात्र क्षेत्रविविधतेने बिघडण्यासारखे नाही असे म्हणून स्त्रीने पुनर्विवाह करू नये, पण पुरुषास तो वर्ज्य नाही असे धर्मशास्त्रज्ञ प्रतिपादू लागले.

स्त्रियांच्या परावलंबनाच्या या काळात अपत्यहीन विधवांचा वर्ग निर्माण झाला. पूर्वी नियोग व पुनर्विवाह रूढ असल्याने हा वर्ग अस्तित्वात नव्हता, पण नियोग मागे पडला, तरी विषयसुखलोलुप दिराची नजर पूर्वीचा शास्त्राधार दाखवून तिजवर कित्येकदा आपत्प्रसंग आणी. अशा वेळी तिला स्वतःच्या पायावर उभे राहण्याची पाळी आली. या काळात स्वावलंबनासाठी तिचा स्त्रीधनावरील हक्क समाजाने मान्य केला. नवऱ्याने मिळविलेल्या मालमत्तेची मात्र स्त्री हीच वारसदारीण होऊ शके व पुढील काळात म्हणजे इ. स. १२०० नंतर मुलगा पतीकडे कुळातील वारसदारीने आलेल्या स्थावरजंगमावर तिच्या पत्नीचा हक्क समाजाने मान्य केला. अशा रीतीने स्त्रीच्या समाजातील स्थानाची इ. स. ५०० नंतरच्या काळात घसरगुंडी होत असता तिच्या स्त्रीधनावरील हक्कास मात्र समाजाकडून अधिकाधिक मान्यता मिळत गेली.[1] परंतु कित्येकदा अशा स्त्रीच्या पतीच्या भाऊबंदांचे लक्ष तिच्या मालमत्तेवर असल्याने मल्याबुऱ्या मार्गांनी ते तिच्यावर सती जाण्याची सक्ती करीत असल्यास नवल नाही. यामुळे स्त्रीची मालमत्ता ही तिच्या सुरक्षिततेचे साधन बनण्याऐवजी एक प्रकारे गुंडांच्या बारस्थानास कारणीभूत होई.

## मुसलमानांचे आगमन : सुलतानशाही

इ. स. १२०० नंतर हळूहळू मुसलमान, राज्यकर्ते म्हणून भारतात आले. मुसलमान स्त्रिया पडदानशीन असत. त्यांचे अनुकरण उत्तरेतील राजघराण्यांनी केले व हळूहळू पडदानशीनपणा हा उच्च कुलाचे लक्षण समजला जाऊ लागला. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी भारतीयांत ब्रिटिश राज्यकर्त्यांचे सर्वत्र अनुकरण करण्याची जशी प्रवृत्ती दिसत आली तसाच हा प्रकार होय. या प्रवृत्तीबरोबरच परकीयांच्या अत्याचारामुळे परधर्मात गेलेल्या व भ्रष्ट झालेल्या स्त्रीस परत हिंदु समाजात घेणे हे धर्मनिषिद्ध ठरले.

मध्ययुगाच्या प्रारंभी स्त्रीचे समाजातील स्थान कसे घसरत जाऊन हीन दशेस पोहोचले याचा धावता इतिहास डॉ. अळतेकर यांच्या ग्रंथाचे आधारे वर सांगितल्याप्रमाणे आहे.

मध्ययुगात स्त्रीचे समाजातील स्थान कशा प्रकारे होते याचा विचार करण्यास

---

[1] तित्ना ३५३–५४

मध्ययुगाचे इ. स. १२०० ते १५०० म्हणजे सुल्तानशाही काल, १५०० ते १७०० हा मुघल बादशाहीचा काल व इ. स. १७०० ते १८०० मराठेशाहीचा काळ असे तीन विभाग पाडून एक एक भागाबद्दल उपलब्ध होणारी माहिती वाचकांपुढे ठेवणे सोयीचे होईल. सुल्तानशाही काळात मुसलमान राज्यकर्ते म्हणून येथे स्थायिक झाल्यावर हिंदु समाजाने आपले जातिभेद व धर्मनिर्बंध अधिकाधिक घट्ट करून स्वतःस सुरक्षित राखण्याचा प्रयत्न केला आणि बदलत्या परिस्थितीस तोंड देण्यासाठी जाणीवपूर्वक जरूर ते बदल समाजात घडवून आणण्यापेक्षा ग्रंथप्रामाण्य व शब्दप्रामाण्य याचे महत्व वाढविले. समाजास हितकारक काय आहे याच्या विचारापेक्षा स्मृतीत काय सांगितले आहे हे अधिक महत्त्वाचे मानले जाऊ लागले.[1] या काळात झालेल्या स्मृतिग्रंथात जुन्या ग्रंथाचा हवाला देऊन स्त्रीच्या पूर्ववयात मातापिते, तरुणपणी पतीने व पुढे मुलाने रक्षण करावे व तिने पुरुषाची आज्ञा पाळावी या नियमाचे समर्थन केले आहे. या कालातील मदन पारिजात व पाराशरमाधव स्मृतिग्रंथात असे म्हटले आहे की फार पूर्वीच्या काळी स्त्रियांचे दोन वर्ग केले जात. पहिला वर्ग ब्रह्मवादिनी म्हणजे उपनयन होऊन अध्ययन करणाऱ्या व दुसरा 'सद्योवधू' म्हणजे ज्यांचे वयात येण्यापूर्वीच विवाह होत असा. पण हे वर्गीकरण पूर्व कालास लागू असले तरी ते आता लागू नाही.[2] आता सर्वच स्त्रिया 'सद्योवधू' या वर्गात असणे इष्ट आहे असा त्याच्या प्रतिपादनाचा अर्थ आहे. या स्मृतिग्रंथांतून स्त्रियांकडून अधर्माचरण किंवा जातिनियमाचे उल्लंघन झाल्यास त्यांना कोणते प्रायश्चित असावे याचा अतिशय बारकाईने तपशीलवार विचार केला आहे. त्रैवर्णिक स्त्री शूद्राशी रममाण झाली तर ती परित्यक्ता मानवी. परंतु अन्य प्रकारे तिचे पाऊल वाकडे पडल्यास तिचे प्रायश्चितपूर्वक परावर्तन करावे. या बाबतीतही सर्वच स्मृतींचे एकमत आहे असे समजण्याचे कारण नाही. स्त्रीस पुरुष गुन्हेगाराइतकेच प्रायश्चित असावे असे मदन पारिजात म्हणतो तर कोणी स्मृतिकार ते निम्मे असावे असेही प्रतिपादन करतात. मात्र स्त्री गुन्हेगारास पुरुष गुन्हेगाराहून अधिक प्रायश्चित असावे असे कोणी प्रतिपादन केल्याचे प्रस्तुत लेखकास माहीत नाही. तरी स्त्रियांचे पुरुषावलंबन ध्यानात घेता तिला सांगितलेली शिक्षा भोगणे हे पुरुषाहून अधिक कठीण होत असले पाहिजे यात शंका नाही. पुढे पुढे कित्येक स्मृतिकारांनी स्त्रीचा चांडाळाशी संसर्ग झाला तरी तिला प्रायश्चित्तपूर्वक पावन करून घ्यावे असेही म्हटले आहे. स्त्री गुन्हेगाराबाबत अशी विविध प्रायश्चित्ते स्मृतिकारांनी सांगितली असली तरी प्रसंगानुरूप कोण कोणत्या स्मृतींचा आधार

[1] एकोणिसाव्या शतकात पेशवाईनंतर इंग्रजी राज्य आले तेव्हा देखील सनातनी समाजाची हीच प्रवृत्ति दिसून आली. हे पुनर्विवाह व पतितपरावर्तन या विषयावर शास्त्र्यांचे जे वाद झाले त्यांवरून दिसून येईल.

[2] भारतीय विद्याभवन प्रकाशित भारताचा इतिहास खंड ६ वा पृ ५९३

घेईल व एखाद्या प्रसंगातून सुटण्यास कशी पळवाट काढील याचाही नियम नसे. पुष्कळ वेळा हे सर्व न्यायालयाच्या व अखेर राज्यकर्त्यांच्या मर्जीवर अवलंबून राही हे उघड आहे.

## शास्त्रकार आणि नृपति यांचा उदार दृष्टिकोण

स्त्री सुव्हेगारांच्या नियमनाप्रमाणेच स्त्रियांच्या वारसा-हक्कांचा स्मृतिकारांनी फारच बारकाईने विचार केला आहे तो साकल्याने लक्षात घेतल्यास स्त्रीच्या काही विशिष्ट धनावरील मालकीस काळजीपूर्वक मान्यता देण्याकडे समाजाची प्रवृत्ती होती यात शंका वाटत नाही. याज्ञवल्क्य स्मृतीमध्ये पतीने मुले व स्त्री यात आपली मालमत्ता विभागून द्यावी, पण तिचे स्त्रीधन असेल तर तिला तिच्या वाट्याचा निम्मा हिस्सा द्यावा असे सांगितले आहे. परजातीच्या स्त्रीच्या मुलांना वारसा हक्क पुढीलप्रमाणे : ब्राह्मणास क्षत्रिय स्त्रीपासून झालेल्या संततीस ब्राह्मण-पुत्राच्या निम्मा, वैश्य स्त्रीसंततीस १/३ व शूद्र स्त्रीसंततीस १/४ असे वारसा हक्क असावे. आईच्या मालकीची संपत्ती तिच्या पश्चात तिच्या मुलींनी आईचे जे कर्ज असेल ते प्रथम वारून नंतर ती आपसात वाटणी करून घ्यावी. संततीहीन विधवेला मृतपुरुषाच्या मालमत्तेबाबत अग्रवारसा हक्क प्रदान केला आहे. पण तिने विधवाधर्माचे आचरण सोडल्यास तिला फक्त पोटगी मिळण्याचा हक्क असावा असे प्रतिपादन आहे. तसेच पतीने स्वस्त्रीचा त्याग करून दुसरे लग्न केले तर परित्यक्ता स्त्रीस आपल्या मालमत्तेच्या एकतृतीयांश अंश द्यावा.[1] स्त्रीच्या सती जाण्याबद्दल सक्तीपेक्षा अनुमतीदर्शक व पसंतीदर्शक नियम घालून देण्याचा स्मृतींचा कल आहे. सुल्तान मुहंमद तुघ्लख याने सतीचे कायदेशीर नियमन करण्याचा प्रथम प्रयत्न केला व सती जाणाऱ्या स्त्रीने सरकारी परवाना घेतला पाहिजे असा निर्बंध घातला. वेश्याव्यवसायाबाबत अल्लाउद्दीन खल्जीने निर्बंध घातला की वेश्यांनी लवकरच लग्ने करावी. पण हा त्याचा नियम कागदोपत्री राहिला. कबीर व नानक हे सतीच्या चालीविरुद्ध होते. नानक म्हणतो 'विधवेवर सतीत्वाची सक्ती काय म्हणून ? प्रिय पतीच्या विरहाचा दुःखाग्नि अगोदरच तिला होरपळून काढतो त्यात हा सहानुभूतीशून्य निर्दयपणा आणखी कशाला ? वरं ती तशी विरहाग्नीने होरपळत नसेल तर नुसत्या शरीरदहनात तरी अर्थ काय !'

त्या काळी पडद्याच्या चालीचेही मोठे प्रस्थ होते. परंतु कबीरासारख्या संतांनी पडदानशीनतेविरुद्ध तक्रार केली व स्वतःच्या सुनेस पडदा पाळण्यापासून परावृत्त केले.[2] या काळात वधूपित्याने वरास द्यावयाच्या हुंड्याची चाल रूढ झाली व उत्तर हिंदुस्थानापेक्षा दक्षिणेत ती अधिक जाचक होती, असे दिसते. या चालीचा स्त्रीच्या

१. किता पृ. ६०४.

२. रामकृष्ण मिशन प्रकाशित कल्चरल हेरिटेज ऑफ इंडिया—खंड २, पान ६१०

समाजातील स्थानावर परिणाम होणे अपरिहार्य होते.[1] हुंड्याच्या चालीस आळा घालावा म्हणून विजयनगरच्या दुसऱ्या देवरायाने सर्व ब्राह्मणवर्गाशी विचारविनिमय करून ब्राह्मण कन्येचा विवाह यापुढे कन्यादान विधीने व्हावा व जो कोणी ठरावापेक्षा हुंडा देईल किंवा घेईल तो गुन्हेगार समजावा असा नियम केला. असेच नियम कोंडापल्ली ते राजमहेंद्री या प्रदेशांत व इतरत्र दुसऱ्या जातींबद्दल पुढे करण्यात आले. त्यांनी अंमलबजावणी कशी झाली ते कळण्यास मात्र मार्ग नाही. नीलकंठ संन्याल म्हणतात, वल्लभाचार्यांस आपली मुलगी चैतन्यास कशी देऊ करावी याबद्दल शंका वाटत होती, कारण त्याच्याजवळ तिच्या विवाहसमयी देण्यास पुरेसे द्रव्य नव्हते. या सर्व प्रतिपादनाचा व उदाहरणांचा साकल्याने विचार केला तर असा निष्कर्ष निघतो की स्त्रीचे पुरुषदास्य, तिचे गृहक्षेत्रात निमग्न रहाणे, परंतु तिच्या स्त्रीधनाच्या पावित्र्याची कदर राखणे या प्रवृत्ती स्मृतीग्रंथांच्या प्रतिपादनातून दिसून येतात.[2]

येथपर्यंत इ. स. १२०६ ते १५२६ या सुल्तानशाही काळातील स्त्रीविषयक निर्बंध व चालीरीती यांचे समालोचन करून तिचे समाजातील स्थान याबद्दल अंदाज घेतला. परंतु या काळातील कित्येक तेजस्वी स्त्रियांच्या पराक्रमाचा ओझरता उल्लेख केल्यावेरीज हा विषय पुरा होणार नाही.

## सुल्तानशाही काळातील तेजस्वी स्त्रिया

अशा स्त्रियांत जयचंदकन्या व पृथ्वीराजपत्नी संयोगिता हिचा कालक्रमाने प्रथम उल्लेख केला पाहिजे. तिने स्वयंवरात आपल्या पित्याच्या मनाविरुद्ध पृथ्वीराजास वरले, निदान पृथ्वीराजाने तिचे अचानक हरण केले, ही इतिहासप्रसिद्ध गोष्ट सर्वांस ठाऊक आहे. पुढे तिने पृथ्वीराजास महमद घूरीच्या विरुद्ध लढण्यास उत्तेजन दिले. उभयतांचे युद्ध स्थानेश्वरनजिक तरायन येथे झाले असता पृथ्वीराज धारातीर्थी पतन पावला, संयोगिता त्याजबरोबर स्वर्गाची वाट धरण्यासाठी श्रद्धेने सती गेली. या सर्व गोष्टींत संयोगितेचे विवाहसमयीचे प्रौढ वय, पतीच्या कार्याशी समरस होण्याची पात्रता व पतीधर्मावरील अढळ श्रद्धा ही स्पष्ट दिसून येतात. दुसरे उदाहरण अल्लाउद्दीन खल्जीची चितोडवर स्वारी झाली असता पद्मिनी व अनेक राजपूत स्त्रियांनी केलेला जोहार. पद्मिनीच्या परिचित कथानकात काहीसा अतिरंजित भाग असला तरी पद्मिनी व राजपूत स्त्रिया यांचा स्वतःचे पावित्र्य रक्षण करण्यासंबंधीचा कटाक्ष हा सर्वमान्य असा आहे. राजपूतांप्रमाणेच या काळात गुलाम घराण्यातील शमसुद्दीन इल्तमिशची मुलगी सुल्ताना रेझिया या इस्लामी स्त्रीचे राज्यकर्तेपण सर्वांस परिचित आहे. गादीवर

---

१ कित्ता, पृष्ठ ६३०

२. या काळच्या सर्व प्रादेशिक स्मृतींचा अभ्यास करून स्त्रीचे मध्ययुगीन समाजातील स्थान या विषयावर शोधनिबंधलेखनाची अत्यंत आवश्यकता आहे.

बसल्यावर तिने थोड्या दिवसांनी पडदा झुगारून दिला अशी माहिती मिळते. तत्पूर्वी मात्र 'ती सिंहासनावर असताना तिचा मुखचंद्रमा पडद्याआड झाकलेला असे आणि तिची तलवार मात्र विजेप्रमाणे तळपत असे' असे काव्यमय वर्णन जुन्या इस्लामी ग्रंथात आढळते. तिने अनेक लढायांत भाग घेतला. तुर्की सरदारांचे श्रेष्ठत्व कमी करण्यासाठी तिने एका हबशी सरदारास जवळ केले पण दरबारी लोकांनी त्यास ठार मारले. पुढे दरबारी लोकांचा स्त्रीराज्यकर्तीविरुद्ध रोष टाळण्यासाठी तिने एका तुर्की सरदाराशी लग्न केले. शेवटी इल्तुमिशचा जावई बहरम तिच्या विरुद्ध उठला, व त्या झगड्यात ती अखेर ठार झाली. रेझियाचे हे चरित्र ज्याप्रमाणे तिच्या व्यक्तिगत कर्तृत्वावर प्रकाश टाकते त्याचप्रमाणे येथील तत्कालीन तुर्की समाजाचा स्त्रीविषयक दृष्टिकोन समजण्यास साह्य करते. किस्येक लेखक कुराणातील व अन्य आधारग्रंथातील वचने दाखवून इस्लामी समाजातील स्त्रीच्या उच्च स्थानाची तरफदारी करतात, परंतु त्या समाजात अनेक पत्नी करण्याची परवानगी, पडद्याची चाल व स्त्रीवर्गावर घालून दिलेले निर्बंध हे लक्षात घेता मध्ययुगीन कालातील भारतातील इस्लामी स्त्रीचे स्थान अजमावताना नुसता शास्त्राचा आधार घेऊन चालणार नाही हे मान्य केले पाहिजे. मात्र इस्लामी कन्येला आपल्या बापाच्या मिळकतीत हिंदू कन्येपेक्षा अधिक हक्क शास्त्राने व समाजाने प्रथम पासूनच मान्य केले आहेत हे लक्षात ठेवले पाहिजे.

या काळाच्या थोडे आधी म्हणजे बाराव्या शतकात गुजरातेत होऊन गेलेल्या कर्तृत्ववान स्त्रिया उल्लेखनीय आहेत. अनहिलवाडापट्टण उर्फ पाटण येथे राज्य करणारा सिद्धराज जयसिंह (१०९४–११४३) याची आई मयणल्ला हिने सिद्धराजाच्या बाल्यपणात मोठ्या हुषारीने राज्यकारभार केला. तिने विरमगाव व धोल्का नजीक तलाव बांधले, सोमनाथच्या यात्रेकरूवरील कर रद्द केला, अशी माहिती मिळते. परंतु या काळात श्वेतांबर व दिगंबर या दोन जैनपंथांत ज्या विषयावर वाद पडला होता तो या वेळच्या स्त्रीविषयक दृष्टिकोनावर प्रकाश टाकणारा आहे. वादाचा विषय स्त्रीला मुक्ती मिळू शकते की नाही असा होता. हा वाद सिद्धराजाच्या समक्ष झाला. यादात मयणल्लाचा उल्लेख होऊन तिच्यासारख्या स्त्रिया या मोक्षास अधिकारी आहेत असे श्वेतांबर पक्षाने सांगितले, त्यास कोणी विरोध केला नाही. गुजरातच्या आणखी एका कर्तृत्ववान राणीचे नाव नाइकीदेवी. ही पाटणचा राजा (११७६–७८) मूळराज याची आई. मूळराज अगदी लहान असता राज्यावर मुसलमानांची, बहुधा मुहंमद घूरीची स्वारी झाली. त्या प्रसंगी तिने आपल्या मुलास मांडीवर घेऊन लढाईत भाग घेतला व मोठ्या शौर्याने शत्रूस पाठ दिली आणि त्याचा पराभव केला असे वर्णन आहे. या नाइकीदेवीखेरीज तेजपाल व वास्तुपाल या जोडीपैकी तेजपालाची स्त्री अनुपमा हिच्या अनुज्ञेने अबूच्या पहाडातील अप्रतिम व अमर असे शिल्पकाम निर्माण झाले. ती मोठी तत्त्वज्ञ होती, व षड्दर्शनमाता म्हणून इतिहासात प्रसिद्ध आहे. यांखेरीज, कंगणकाव्य या ग्रंथाचे कर्तृत्व तिचेच असे मानले जाते.

गुजरातेतील या वीर स्त्रियांखेरीज काश्मीरची लल्लादेवी, दक्षिणेतील कुमार कंपन याची स्त्री गंगादेवी, तेलुगु कवयित्री मोल्ला, महाराष्ट्रातील महानुभाव कवयित्री महदंबा, भक्तिमार्गपरायण मुक्ताबाई व जनाबाई, पूर्वेकडील तिरहुतच्या राजघराण्यातील विश्वास-देवी, साधु चैतन्याची आई शचीदेवी या सर्व स्त्रिया संत, तत्त्वज्ञ आणि कवयित्री म्हणून नाव घेण्यासारख्या आहेत. या सर्वांची अधिक तपशीलवार माहिती भारतातील थोर स्त्रिया (इंग्रजी) या श्रीशारदादेवीच्या जन्मशताब्दीनिमित्तच प्रसिद्ध झालेल्या ग्रंथात सापडेल. त्याचे मराठी भाषांतरही डॉ. सौ. शरयू बाळ यांनी प्रसिद्ध केले आहे.

मध्ययुगाच्या या प्रथम खण्डात प्रसंगाने प्रसिद्ध झालेल्या ऐतिहासिक स्त्रियांची अशी नामावली दिली तरी तेवढ्यावरून तत्कालीन स्त्रीजीवनविषयी सामान्य नियम बांधता येत नाहीत. उलट तत्कालीन स्त्रीजीवन हे पुरुषावलंबीच असून वरील उदाहरणे केवळ अपवादभूतच मानावी लागतात व हा काल वाचीत असता अभ्यासकापुढे असा प्रश्न उभा राहतो की जर फार प्राचीन काळी धाडशी आर्यांना आर्येतरांशी झगडण्यासाठी बाहेर जावे लागल्याने घरी असलेल्या स्त्रियांना स्वातंत्र्य द्यावे लागले व काळाच्या गरजेमुळे त्यांच्यात पुनर्विवाह व प्रौढविवाह हे रूढ झाले, तर या काळातील भारतीयांना बाहेरून आलेल्या मुसलमानांविरुद्ध तोंड देण्यात सिद्ध होण्यात आपल्या समाजात जरूर ते बदल करून स्त्रीस स्वातंत्र्य देण्याचे का सुचू नये? प्रस्तुत लेखकाच्या मते या प्रश्नाचे उत्तर असे आहे की आर्य भारतात आले ते विजिगीषू व आक्रमक असे आले. याच्या उलट मुसलमानकालीन भारतीयांना बाहेरून आलेल्या आक्रमकांशी तोंड द्यायचे होते व त्यांचे धोरण संरक्षक, संकुचित व बचावाचे असे होते. आक्रमण-शील समाज हा स्वतःभावतः स्वातंत्र्यप्रिय व सुधारणाप्रिय असतो. उलट बचावाचे धोरण स्वीकारणारा समाज हा कांहीसा भीतिग्रस्त व कर्तव्यपरायणतेने धारातीर्थी पतनास सिद्ध झालेला असतो. अर्थात हे विधान केवळ तर्काधिष्ठित असून यावर अधिक विचारमीमांसा होणे अगत्याचे आहे.

## सम्राट अकबराचे स्त्रीजीवनविषयक विचार

मध्ययुगातील द्वितीय कालविभाग इ. स. पू. १५२६ ते १७०७ हा होय. हा मुसलमानशाहीचा काळ. विवेचनाच्या सोयीसाठी मराठी रियासतीतील स्त्रीजीवन अंमळ बाजूस ठेवून प्रथम मुघल राजवटीतील स्त्रीजीवनाचा प्रश्न विचारात घेता त्या संबंधात अकबराचे व्यक्तिमत्त्व प्रामुख्याने नजरेसमोर उभे राहाते. कारण त्याच्याएवढा सामाजिक प्रश्नांचा स्वतंत्रपणे विचार करणारा पुरुष भारताच्या मध्ययुगीन इतिहासात झालेला आहे, असे वाटत नाही. त्या विचारांची कल्पना येण्यासाठी अबुल फजलने लिहिलेल्या 'ऐने अकबरी' ग्रंथात अकबराच्या तोंडची काही वचने ग्रथित केलेली आहेत.[1]

१. ऐने अकबरीचे जॅरेटकृत इंग्रजी भाषांतर खं. ३ रा, पृ. ४४८-४४९

त्यातील काही स्त्रीजीवनाविषयक वचने येथे उद्धृत करतो.

बालविवाह हा परमेश्वरास नापसंत आहे. कारण त्याने विवाहाचा हेतू तादृतोस साधणे शक्य नाही; उलट उभयतांचे एकत्र येणे अपायकारकच ठरणार.

ज्या धर्मात विधवेच्या पुनर्विवाहास मान्यता नसेल त्या धर्मीयांना फार हाल सोसावे लागतात.

एकमेकांचा नात्याचे संबंध नसलेल्या स्त्रीपुरुषात विवाह होणे इष्ट होय. कारण त्यायोगे हे लोक विवाहापूर्वी जितके एकमेकापासून दूर असतात तितकेच ते विवाहोत्तर निकट येतात. परंतु चुलत भावाबहिणीतील विवाह इस्लामी कायद्यास मान्य आहे तेव्हा त्यास हरकत नाही. कारण तो पूर्वीपासून चालत आलेला आहे.

केवळ कामविकाराने प्रेरित होऊन किंवा सुखलालसेने पुरुषाने एखाद्या अल्पवयी किंवा वयातीत स्त्रीशी संबंध ठेवणे योग्य नाही. कारण वयातीत स्त्रीस मुले होणार नाहीत. तसेच पुरुषाने गरोदर स्त्रीशी किंवा तिच्या मासिक रजोदर्शन काळात संबंध ठेवणेही अयोग्य आहे.

एकापेक्षा अधिक स्त्रियांशी लग्न करणे म्हणजे स्वतःवर संकट ओढवून घेणे होय.[1] पहिल्या स्त्रीस संतती न झाल्यास तसे करणे कदाचित आवश्यक ठरेल.

मला जरा लवकर समज लागले असते तर मी माझ्या राज्यातल्या कुणाही स्त्रीशी लग्न केले नसते; कारण माझी प्रजा ही माझी मुले आहेत.

हिंदुस्थानातील स्त्रिया आपले बहुमोल जीवित तुच्छ मानतात. (म्हणजे पुरुषाच्या चरणी वाहण्यास तयार असतात असा अर्थ.)

भारतात स्त्री सुपी असो या नासुप असो तिने पतीमरणोत्तर सती जाण्याची व आपले बहुमोल प्राण अशा रीतीने त्याच्यासाठी वाहण्याची प्राचीन चाल आहे; कारण त्यायोगे पतीस मुक्ती मिळते अशी सर्वांची कल्पना आहे. अशा रीतीने स्त्रीच्या प्राणत्यागाने पुरुषास मोक्ष मिळतो असा समज असणाऱ्या उदारबुद्धीची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे!

## अकबराने केलेल्या सुधारणा

अशा रीतीने अकबराने सतीच्या चालीस प्रतिबंध केला. पुनर्विवाहास मान्यता दिली. मुलांचे १६ व्या वर्षापूर्वी व मुलींचे १४ व्या वर्षापूर्वी विवाह होऊ नयेत असे फर्माविले, आणि नूतन विवाहेच्छु स्त्रीपुरुषांचे वय नियमाप्रमाणे आहे की नाही हे पाहाण्याचे काम कोतवालाकडे सोपविले. बदाउनी म्हणतो की, 'या नियमामुळे लाचखाऊ कोतवालांचे मात्र बरेच फावले!' तसेच अकबराने निकटच्या नात्यातील लोकांतील विवाहसंबंध मना केले आणि विषम विवाहास — विशेषतः एखाद्या पुरुषाचा

[1] अकबर स्वतःच या त्याच्या विधानास अपवाद होता.

त्याच्याहून बारा वर्षांहून अधिक मोठ्या असलेल्या स्त्रीशी विवाहाला आळा घातला. कारण असे विवाह मुस्लीम समाजात त्या काळी कित्येकदा होत. परंतु वयस्कर पुरुषांच्या अल्पवयीन स्त्रीबरोबर होणाऱ्या विवाहाविरुद्ध अकबराचा तेवढा कटाक्ष होता असे दिसत नाही. एकपत्नी विवाहाबाबत त्या काळी अशी स्थिती होती की सामान्यतः हिंदू जनतेत एकपत्नीविवाहच प्रचलित होता, याबद्दल अल्बेरुनी (अकरा वे शतक), मंडेस्लो (सतरावे शतक), ऑर्म (अठरावे शतक) इत्यादी युरोपियन लेखकांचे पुरावे देता येतील. परंतु मुसलमानात मात्र तशी स्थिती नव्हती. याबाबत उलेमाचा विचार घेण्यासाठी अकबराने त्यांना आपल्या इबादतखान्यात (पूजामंदिरात) बोलावून घेतले. परंतु त्यांनी अशा एकपत्नी विवाहनिर्बंधाचा कायदा करणें हे मुस्लिम धर्माविरुद्ध होईल असे सांगितले. परंतु त्यांच्या या विरोधास न जुमानता अकबराने फर्माविले की सामान्य स्थितीतील मुसलमानाने देखील एकपत्नीव्रताचे आचरण केले पाहिजे. मात्र पत्नीस संतती न झाल्यास गोष्ट निराळी. अकबराने म्हटले आहे की, अनेकपत्नीविवाह हे मनुष्याच्या प्रकृतीस अपायकारक व गृहसौख्यविघातक ठरतात. याखेरीज अकबराने हुंड्याच्या चालीस आळा घातला व वेश्यागमनाचे नियमन केले. यासाठी वेश्यांनी शहराच्या एका वेगळ्या पुऱ्यात (विभागात) वस्ती करावी असे फर्माविले. अशा स्त्रियांनी आपल्या व्यवसायाचा परवाना काढला पाहिजे, असे सांगून त्यांच्या पुऱ्यावर एका दरोग्याची नेमणूक केली व कोणासही वेश्यागमन करावयाचे असेल तर त्याने आपले नाव दरोग्याचे कचेरीत नोंदविले पाहिजे व फी दिली पाहिजे असे ठरविले. या प्रकरणी अकबराने अनेक गुन्हेगार भेंडांना शिक्षा दिल्याचे नमूद आहे. तसेच त्याने वयस्कर स्त्रियांनी निरनिराळ्या सम्मेलनप्रदर्शनादी समारंभात बुरखा न वापरता भाग घ्यावा अशा प्रथांस उत्तेजन दिले. या संबंधीचे बरेच तपशीलवार वर्णन व्हिन्सेन्ट स्मिथकृत अकबरचरित्रात दिले आहे. तरी या बाबतीत अकबर काहीसा सनातनीच होता असे म्हणावेसे वाटते. कारण त्याने असे म्हटले आहे की जर एखादी तरुण स्त्री रस्त्यातून या बाजारातून बुरखा न घेता किंवा आपल्या तोंडावरचा पडदा खाली पडू देऊन खुशाल धावत जाताना दिसली तर तिची वेश्या वस्तीत रवानगी केली जाईल. अकबराने आणखी एक असा नियम केला की, जर एखाद्या हिंदू मुलीचा जबरदस्तीने मुसलमानाबरोबर विवाह झाला असेल तर त्या मुलीला परत सुरक्षितपणे तिच्या पित्याच्या स्वाधीन करण्यात यावे.

## अकबराचा बुद्धिवादी दृष्टिकोण

अकबराने स्त्रीजीवनविषयक केलेल्या सुधारणा प्रत्यक्ष किती कसोशीने अमलात आल्या ते कळण्याजोगा पुरावा उपलब्ध नाही. पण या सुधारणांच्या बुडाशी असलेला अकबराचा मानसिक दृष्टिकोण लक्षात घेण्यासारखा आहे. अकबराचा बुद्धिवाद, त्याची वैचारिक सहिष्णुता, दुर्बलांबद्दल त्यास वाटणारी कणव, मानवाच्या व्यक्तिमत्वाची जाणीव

आणि लोकमतास वळण लावीत लावीत सामाजिक सुधारणा करीत जाण्याचे त्याचे धोरण या सर्वांचा नीट विचार केला तर युरोपातील पंधराव्या सोळाव्या शतकातील इरॅस्मस, मार्टिन ल्यूथर यांसारख्या बुद्धिवादी समाजक्रांतिकारकांशी त्याचे काहीसे साम्य लक्षात येते. फरक एवढाच की, अकबरास त्याच्या भोवतालच्या वातावरणामुळे समाजात आमूलाग्र सुधारणा घडवून आणणे अशक्य झाले व त्याचा बुद्धिवादी प्रागतिक सुधारणावादी दृष्टिकोण त्याच्याबरोबरच अस्तंगत झाला.

अकबराच्या समग्र सुधारणांचे विवेचन करण्याचे हे स्थळ नव्हे. परंतु समाजातील पोथीबद्ध विचारास बाजूस सारून व परंपरेने पटल दूर करून बुद्धिवादाने समाजास आवश्यक वाटणाऱ्या सुधारणा, समाजास रुचेल व पचेल अशा बेताने समाजाच्या गळी उतरविण्याचा त्याचा मोठा प्रयत्न होता व त्यात स्त्रीजीवनात सुधारणा घडवून आणणे या कार्यक्रमास स्थान होते याबद्दल जी माहिती मिळते त्यायोगे जसे अकबराचे मोठेपण मनात भरते त्याचप्रमाणे तत्कालीन स्त्रीजीवनाच्या मर्यादाही अभ्यासकाच्या लक्षात येतात.

## सामान्य स्त्रीजीवनात पुरुषांचे वर्चस्व

डॉ. आर. सी. मुजुमदार आदीकरून प्रसिद्ध इतिहासकारांच्या मते या काळच्या मुख्य सामाजिक चालीरीती म्हटल्या म्हणजे सती, बालविवाह, विवाहसंबंधात कुळ-गोताचा विचार, व वरदक्षिणा ह्या होत. अकबराने यास निर्बंध घालण्याचा यत्न केला. विवाहास वधूवरांची व त्यांच्या आईबापांची मान्यता असावी. रजोदर्शनापूर्वी स्त्रीचा विवाह होऊ नये व अनेकपत्नीविवाहास आळा घालावा वगैरेसारखे नियम घालून दिले. पण प्रत्यक्ष व्यवहारात त्याची परिणामकारक अंमलबजावणी झालीसे दिसत नाही. विशेषतः बंगालमध्ये तर त्याची अंमलबजावणी न झाल्याचे अनेक पुरावे सोळाव्या सतराव्या शतकातील पेल्सर्ट, फॉफर्ड, स्ट्रॅफटनसारख्या युरोपियनांच्या लेखनातून व समकालीन एतद्देशीय साहित्यातून हवे तेवढे मिळू शकतात.[1] महाराष्ट्रात मात्र ब्राह्मणेतरात विधवा-विवाहाची चाल होती तशीच ती पंजाबात व यमुनाकाठच्या प्रदेशात जाटांतही होती. परंतु जाटात अनेकपत्नी विवाह मात्र होत असत. अठराव्या शतकात बंगाल्यात ढाक्क्याचा प्रमुख राजवल्लभ याने विधवाविवाह सुरू करण्याचा यत्न केला, परंतु तो निष्फळ झाला. काही अपवादभूत थोड्या स्त्रिया त्या काळच्या राजकारणात चमकलेल्या इतिहासात नमूद असल्या तरी तत्कालीन स्त्रिया एकंदरीत पुरुषांच्या वर्चस्वाखालीच असत.[2]

---

१. चंडी मंगल या प्रसिद्ध काव्याचा कर्ता मुकुंदराम या सोळाव्या शतकात होऊन गेलेल्या लेखकाने म्हटले आहे की जर मुलीच्या बापास आपल्या कन्येचा विवाह नवव्या वर्षी उरकून घेता आला तर तो मोठा सुदैवी व ईश्वरकृपेस पात्र असा प्रथम समजावा. 'कल्चरल हेरिटेज ऑफ इंडिया' खंड २ रा पान ६२७

२. 'ॲडव्हान्स्ड हिस्टरी ऑफ इंडिया' पान ५६८

इ. स. १५२६ नंतर अठराव्या शतकापर्यंतच्या काळात उत्तर भारतात किंवा तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील भारतीय प्रदेशात कोणकोणते धर्मशास्त्रकार झाले, त्यांनी घालून दिलेले स्त्रीजीवनविषयक निर्बंध कशा प्रकारचे होते व त्यांचे व्यवहारात कितपत पालन होई यासंबंधीची पुरेशी माहिती उपलब्ध नसल्याने त्याच्या आवश्यकतेबद्दल नुसता उल्लेख करूनच पुढे जाणे भाग आहे. मात्र उत्तर भारतीय स्त्रीजीवनाच्या वर दिलेल्या वर्णनावरून व प्रा. नीलकंठशास्त्री यांच्या हिस्ट्री ऑफ साउथ इंडिया या ग्रंथाच्या आधारे दक्षिणेच्या जीवनाची जी तुटपुंजी माहिती मिळते त्यावरून स्त्रीजीवनाबाबत प्रागतिक असा विचारप्रवाह कोठेही वाहत नसावा असे वाटते. स्त्रीचे जीवन एकंदर समाजस्थितीप्रमाणे गतानुगतिक असेच असले पाहिजे यात संशय नाही. नीलकंठ शास्त्री म्हणतात, 'एकंदर समाजजीवनात ब्राह्मणांचे वर्चस्व होते, परंतु त्यांनी राज्याचे प्रमुख होण्याची कधी इच्छा धरली नाही. आणि समाजातील प्रत्येक व्यक्तीच्या हक्कापेक्षा त्याचे समाजातील स्थान व तदनुसार त्याचे कर्तव्य या संबंधीचाच विचार महत्त्वाचा गणला जाई आणि वादप्रसंगी समाजातील बहुतेक निर्णय विज्ञानेश्वराच्या मिताक्षरास धरून करण्याची प्रथा असे.'[1]

## मध्यकाळातील काही विख्यात महिला

मराठी स्त्रियांचा विचार वगळून तदितर स्त्रीजीवनातील या दुसऱ्या कालखंडाचे समालोचन पुरे करण्यापूर्वी या काळात भारतात आपल्या गुणांनी व पराक्रमाने इतिहासात चमकलेल्या स्त्रियांची थोडक नोंद करणे अवश्य आहे. अशा स्त्रियांत चितोडची राणी कर्णावती व आपल्या अपत्याचा बळी देऊन बाल उदयसिंहाचे रक्षण करणारी इतिहासप्रसिद्ध पन्नादाई, गोंडवनाची राणी दुर्गावती व मुरादच्या हल्ल्यास निकराने तोंड देणारी अहमदनगरची शूर स्त्री चांदबिबी यांची नावे सर्वश्रुत आहेत. कर्णावती ही राणा संगाची पत्नी. त्याच्या पश्चात तिने आपला मुलगा विक्रमजित याच्या कारकीर्दीत गुजरातचा बहादुरशहा याच्या विरुद्ध निकराचा लढा लढविला आणि अखेर चितोड पडणार हे लक्षात येताच निर्वाणीचा उपाय म्हणून राजपूत स्त्रीचे शीलरक्षण करण्यासाठी अनेक स्त्रियांसह जोहार केला. यानंतरच्या काळात विक्रमजितचा त्याच्या चुलत भावाने — बनवीरने — खून केला व विक्रमजितचा धाकटा भाऊ तान्हा उदय यासही मारण्याचा विचार केला असता पन्नादाईने त्याला वाचविले. राणी दुर्गावतीचे चरित्र तर फारच रोमांचकारी आहे. गोंडवनाच्या स्वातंत्र्यासाठी ती मुघलांच्या बरोबर शौर्याने लढली व अखेर रणांगणात घायाळ होऊन पडली असता शत्रूच्या हातून आपली दुर्दशा वाचविण्यासाठी तिने पोटात खंजीर खुपसून आत्महत्या केली. व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो गोंडवनाच्या स्वातंत्र्यरक्षणाची आवड हाच काय तो (अकबराच्या दृष्टीने)

---

१. हिस्टरी ऑफ साउथ इंडिया, पृ. ३०७

तिचा गुन्हा होता. त्याचे प्रायश्चित्त अकबराने तिला दिले. याशिवाय अकबराच्या कारकीर्दीत चितोडच्या वेढ्याचे प्रसंगी जयमल हा लढाईत पडल्यावर असवयी पट्टा हा राजपुतांना पुढारी झाला व त्यास त्याच्या आईने खुषीने रुकार देऊन युद्धास पाठविले. याबद्दलचे वर्णन स्मिथच्या पुस्तकात दिले आहे ते वाचण्यासारखे आहे. अहमदनगरच्या रक्षणासाठी मुरादविरुद्ध लढणाऱ्या चांदबिबीचे शौर्य सर्वांस परिचित असल्याने त्याचा अधिक विस्तार करीत नाही. चांदबिबीप्रमाणेच जहांगीरची कर्तृत्ववान राणी नूरजहा हिचे चरित्र विस्ताराने सांगण्याची आवश्यकता नाही. शाहजहानची मुलगी जहानआरा बेगम ही देखील मोठी कर्तृत्ववान स्त्री होती. तिने बापाच्या आजारीपणात अनेक जबाबदारीची कामे केली. दक्षिणेत विजयनगर साम्राज्याचा शेवट झाल्यावर म्हैसूरच्या पायथ्येस असलेल्या केळदी संस्थानचे नायक जवळजवळ स्वतंत्र रीतीने कारभार करीत. त्या घराण्यात चेनम्मा ही स्त्री इ. स. १६७७ पासून पुढील काळात राज्य करीत असता संभाजीच्या वधानंतर रायगडहून निसटून निघालेला राजाराम दक्षिणेस तिच्या राज्यात आला असता तिने त्यास आश्रय देऊन औरंग-जेबाच्या फौजेस मोठ्या शौर्याने तोंड दिले व राजारामास बिदनूरपासून जिंजीपर्यंत सुरक्षित पोहोचविले. तिच्या शौर्याने औरंगजेब चकीत होऊन त्याने तिचा गौरव केला. तिने अखेरपर्यंत आपल्या राज्याचे स्वातंत्र्य कायम राखले. दुसरी स्त्री त्रावणकोरची उमयम्मा. मुघल सरदाराने त्रावणकोरवर आपला अंमल बसविला असता तिने लाख लढाईत ठार मारले व त्रावणकोरचे रक्षण केले. तिने इ. स. १६७८–८४ या काळात त्रावणकोरवर राज्य केले. तिसरी स्त्री मदुरेची मंगम्मा हिने इ. स. १६८९ ते १७०७ या काळात मदुरेचे रक्षण केले. मुघल सैन्याचा प्रभाव पाहून तिने औरंगजेबाचे वर्चस्व मान्य करून आपल्या राज्याचे रक्षण केले. परंतु इतर आजूबाजूच्या राज्यांपासून आपल्या राज्याचा बचाव केला. ती धर्मशील व न्यायी होती. काठेवाडचे विणकर तिच्या राज्यात होते ते धार्मिक बाबतीत काही निर्णयासाठी तिजकडे गेले असता तिने त्याचे समाधान केले.

या काळात बंगालमध्ये उत्तरेकडील प्रदेशात नाटोर येथील जहागिरीची व्यवस्था पहाणारी राणी भवानी ही फार प्रसिद्ध आहे. इ. स. १७४६ साली आपला पती रमाकांत याच्या मृत्यूनंतर तिने कारभार आपल्या हाती घेतला. तिचे एकंदर चरित्र वाचले व तिची न्यायी व धार्मिक वृत्ती पाहिली म्हणजे मराठी वाचकास अहिल्याबाई होळकरची आठवण होते.

राजकारणात भाग घेणाऱ्या स्त्रियांखेरीज इतर क्षेत्रांत नमकलेल्या स्त्रियांचाही संक्षेपाने उल्लेख करणे जरूर आहे. त्यात हुमायूनची बहिण व हुमायूननामा या ग्रंथाची लेखिका गुलबदन बेगम, राजपुतान्यातील प्रसिद्ध साध्वी–राणा सगाची सून–मिराबाई या उल्लेखनीय आहेत. याखेरीज दक्षिणेकडे विजयनगरच्या राज्यात अच्युतदेवरायाच्या पदरी ओडुव तिरुमलम्मा नांवाची कवयित्री होऊन गेली. म्हैसूरच्या राज्यात होनम्मा

ही स्त्री वेदान्तात पारंगत होती. त्याच राज्यात इ. स. १७२५ साली चेळुवांबा या स्त्रीने वरनंदीकल्याण नामक मोठे काव्य लिहिले. याखेरीज तेलगु कवयित्री वेंगम्मांबा, तंजावर येथील रामायणाची लेखिका मधुरवाणी, तसेच विजयनगरच्या इतिहासावर प्रकाश टाकणारे रघुनाथाभ्युदयम् नावाचे काव्य लिहिणारी रामभद्रांबा व अठराव्या शतकातील मुद्दुपळणी यांची नावे सांगता येतील. याखेरीज बंगल्यातील चंद्रावती व आनंदमयी या लेखिका व गंगामणी ही कीर्तनकार या प्रसिद्ध आहेत. या सर्वांची सविस्तर माहिती मागे उल्लेखिलेल्या 'ग्रेट वुइमेन ऑफ इंडिया' या ग्रंथात वाचकास मिळू शकेल. या काळातील प्रसिद्ध राज्यकर्त्या, लेखिका, कवयित्री अशा स्त्रियांची त्रोटक माहिती वर दिलेली असली तरी जे विधान सुल्तानशाही काळाबद्दल प्रस्तुत लेखकाने केले आहे तेच मुघल काळासही लागू आहे. याचा अर्थ असा की इतिहासात प्रसिद्धी पावलेल्या स्त्रिया या अपवादभूत असून या काळातील सामान्य स्त्रीचे जीवन पुरुषावलंबी असेच होते व शास्त्रांचीही अशा परावलंबनास मान्यता होती. डॉ. अळतेकरांनी इ. स. ५०० नंतरच्या काळातील स्त्रीजीवनाचे जे वर्णन केले आहे त्यावरून सुल्तानशाही व मुघली अंमल या काळात फारसा फरक पडला नाही किंवा तो पडला असेल त्याने तिचे जीवनक्षेत्र अधिक संकुचित मात्र झाले असे सामान्य विधान करावेसे वाटते. सारांश, इतिहासात गाजलेल्या स्त्रियांवरून त्या काळातील स्त्रीजीवनासंबंधी सामान्य विधान करणे बरोबर होणार नाही, असे म्हटले पाहिजे.

## मराठेशाहीतील स्त्रीजीवन

यानंतर मराठेकालीन स्त्रीजीवनाचा म्हणजे महाराष्ट्रातील सतराव्या व अठराव्या शतकातील स्त्रीजीवनाचा प्रश्न विचारात घेऊ. मुसलमानी अंमल नाहीसा करून तेथे मराठी राज्याची स्थापना करणे हे नुसते बचावाचे धोरण नसून चढावाचे व आक्रमक स्वरूपाचे होते. मराठे आक्रमक नसते तर त्यांना सुल्तानचे नसलेले राज्य निर्माण करता आले नसते. दुसरी गोष्ट म्हणजे ते राज्य पूर्वीचे चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, अशा कुलाचे राज्य नसून स्वतःस मराठा म्हणविणाऱ्या 'महाराष्ट्र राज्य' स्थापन करण्याच्या कल्पनेने भारावलेल्या जनतेचे होते. या जनतेतील अगदी खालच्या थरातील लोक यामध्ये भारावलेले असल्याचे अस्सल पुरावे उपलब्ध नसले तरी देशमुख, देशपांडे, देसाई, पाटील, कुलकर्णी अशा लोकांना शिवाजीने व त्याच्या नंतरच्या राज्यकर्त्यांनी हाती घेतलेले कार्य कसे प्रशस्त होते याची कल्पना आलेली असल्यामुळे तत्कालीन समाज वर सांगितलेल्या चढाऊ वृत्तीने भारावलेला होता याबद्दल हवे तेवढे अस्सल पुरावे देता येतील. अशा समाजापुढे निराळेच प्रश्न उभे होते व ते आपोआप सुटण्याच्याही पंथास लागत. वर्षांतून ७-८ महिने मुलुखगिरीवर गेलेल्या कर्त्या पुरुषाची स्त्री नुसती घराच्या चार भिंतीआड कोंडून स्वस्थ राहू शकेल हे संभवत नाही. तसेच स्वारीशिकारीच्या वेळी निरनिराळ्या सरदारशिपायांचे तंबू

व राहुख्या शेजारी शेजारी पडत. लढाईत यशस्वी झालेल्या सरदाराकडे मेजवान्या होत. लढाईवर गेलेला एखादा घरधनी अजिबात बेपत्ता होई. तो मृत झाला की जिवंतच आहे हे कळत नसे. अशा काळात वावरणाऱ्या स्त्रीचे जीवन तत्पूर्वीच्या काळापेक्षा काही वेगळ्या प्रकारचे असणार यात शंका नाही. युद्ध हे त्या काळी मराठ्यांच्या पाचवीला पुजलेले असे. अशा वेळी एखादा बरेच दिवस बेपत्ता झालेला इसम मृत आहे असे गृहीत धरून त्याच्या स्त्रीने दुसरा पाटाचा नवरा केल्यावर पुढे अनेक वर्षांनी अनपेक्षितपणे तो इसम दत्त म्हणून उभा राहणे व त्याने आपले जुने हक्क उगवून घेण्याचा आग्रह धरल्यामुळे अनेक पेचप्रसंग उभे राहणे, असे प्रकार त्यावेळी हमेशा होत. त्याबद्दलची तत्कालीन माहिती बारकाईने वाचल्यास त्या समाजाच्या वास्तववादी दृष्टीचा प्रत्यय येतो. इ. स. १७६९ च्या एका पत्रात सोडचिठ्ठीची माहिती आहे. सोडचिठ्ठी म्हणजे त्याच्या बायकोवरील नवरेपणाचा हक्क सोडल्याचा कागद. सासवडचा एक तेली पानपतावर लढाईस गेला तो कित्येक वर्षे परत आला नाही. त्याच्या बायकोस शुद्ध चारित्र्याने राहणे कठीण वाटून तिने पहिला नवरा मयत झाला असे समजून आपल्या बापाच्या संमतीने दुसरा घरोबा केला. या दुसऱ्या जावईबुवांनी मुलीच्या बापाला याबद्दल ३० रुपये दिले. काही दिवसांनी तेली परत आला व त्यास घडलेली हकीकत कळली. तेव्हा त्यातून मार्ग काढण्यासाठी गोतपंचायत बोलावली गेली. तेथे तेल्याने कबुलायत दिली की 'हे बायको विटाळलेले भांडे, आपल्या कार्याचे नाही.' असाच एक कागद इ. स. १७६१ चा आहे. कोकणातील नागवे गावचा शिदनाक महार नागपुरास नोकरीस गेला असता नागवे गावी एका येसनाक नावाच्या महाराने त्याच्या बायकोस फितविली व तिला त्याचेपासून मुले झाली. याची वार्ता कानी येताच शिदनाकने पेशव्याकडे फिर्याद गुदरली. तेव्हा पेशव्यांनी प्रतापगडचे हवालदारास गोतपंचायत भरवून या गोष्टीचा निवाडा करण्याची आज्ञा दिली. त्याप्रमाणे भरलेल्या पंचायतीत शिदनाकने सिद्ध वस्तूस (fait accompli) आपली मान्यता दिली. गोताने ती मंजूर केली व पेशव्यांनी त्यावर पसंतीचे शिक्कामोर्तब केले. पाट किंवा दुसरे लग्न करताना बहुधा सरकारला ही गोष्ट कळवावी लागे व सरकारी अधिकारी पाटास मंजुरी देताना थोडीबहुत फी आकारीत असले पाहिजेत, असे इ. स. १०९६ च्या एका पत्रावरून दिसते. कित्येक वेळा पाटाची बायको करणारास आपण बायकोस्या व मुले लेकरे होतील त्यांना सांभाळू असे आश्वासन जमातीस किंवा सरकारी अधिकाऱ्यासमोर द्यावे लागे. स्त्रीपुरुष व्यवहार हे इतर शारीरिक गरजांप्रमाणे सुरळीत पार पडण्याची व्यवस्था झाली पाहिजे, पण स्त्रीपुरुष संबंध ही व्यक्तीव्यक्तींमधील खाजगी बाब नाही, उभयतांनी आपली सामाजिक जबाबदारी ओळखून ती पार पाडली पाहिजे व त्यासाठी सरकारचे जरूर ते नियंत्रण असले पाहिजे, ही दृष्टी तत्कालीन व्यवहारावरून प्रत्ययास येते. लग्नप्रसंगी वऱ्हाड्यांचे रिघी नीट न झाल्यास त्याबद्दल जात व सरकार सारखीच दखल घेई. जातीला जातीभाय

## शास्त्रार्थ आणि रूढि यांनी जखडलेला समाज

मराठेकालीन समाजाच्या प्रागतिक वृत्तीबद्दल वर व्यक्त केलेले विचार बरोबर असले तरी प्रजा व राज्यकर्ते उभयताही त्या त्या काळातील शास्त्र व परंपरा यांनी अधिष्ठित अशा विचारसरणीने व चालीरीतींनी भारावलेले असत व तत्कालीन राज्यकर्ते व सरदारही आत्मसुखासाठी कोणत्याही काळी समर्थनीय ठरू शकणार नाही अशा पद्धतीने वागत हे कबूल केले पाहिजे. त्या काळी बालविवाह तर सर्रास होत. अशा वेळी अल्पवयी मुलीवर तिच्या पतीकडून अतिप्रसंग घडत. असले कृत्य होण्याचा संभव श्रीमंत कुटुंबात जास्त.[१] बालविवाहाप्रमाणे त्या काळी अनेकपत्नी विवाह होत व विषमविवाहही होत. नानासाहेब पेशव्याने देशस्थ कुटुंबातील वाखरे याची मुलगी करून घेतली. या त्याच्या ब्राह्मण पोटजातीतील विवाह घडवून आणण्याच्या प्रागतिकतेबद्दल केव्हा केव्हा स्तुती केली जाते; पण हा विवाह झाला तेव्हा नाना चाळिशीच्या घरात होता व मुलगी ८/९ वर्षांची होती व नानाच्या मनगटाला मनगट शोभेल अशी प्रथम पत्नी गोपिकाबाई ही जिवंत होती! विजवर नवरा कितीही मोठा असला तरी त्याला नऊ वर्षांहून मोठी वधू मिळणे त्या काळी सामान्यतः अशक्य होते. नाना फडणीसाने चाळिशी उलटल्यावर पाच लग्ने केली व तो अठ्ठावन्नाव्या वर्षी मृत्यू पावला, तेव्हा त्याची एक स्त्री जिऊबाई हिचे वय नऊ वर्षांचे होते.[२] कित्येकदा अल्पवयी मुली दूर पळविल्या जाऊन त्यांचे एकांतस्थळी कोणा सरदाराकडून जबरदस्तीने शास्त्रोक्त विवाह होत व त्यातून अनेक प्रश्न उत्पन्न होत. स्त्रीच्या सत्त्वाने सती जाण्यावर निर्बंध होते हे वर सांगितले खरे, पण सती जाणाऱ्या स्त्रीबद्दल समाजात आदराची भावना होती हे पहिला माधवराव पेशवा याची स्त्री रमाबाई हिच्या उदाहरणावरून कळण्यासारखे आहे व दुसरेही अनेक दाखले देता येतील. गलमर्तुकेचे केशवपन हे धर्म्य समजले जाई. या सर्व पेशवेकालीन सामाजिक घटनांकडे दुर्लक्ष करून पेशव्यांच्या उदार सामाजिक धोरणाबद्दल अवास्तव प्रशंसा करणे बरोबर होणार नाही. एकूण मराठेकालीन स्त्रीजीवनासंबंधी एवढेच म्हणावेसे वाटते की, स्वातंत्र्यकालातील स्वारीशिकारींच्या त्या युगात सामान्य स्त्री घरात कोंडून राहणे शक्य नव्हते व शास्त्राने निर्माण केलेले अडचणीचे प्रश्न परिस्थितीनुसार सोडविण्याचा तत्कालीन समाजाचा दृष्टिकोन होता. हे खरे असले तरी त्या काळात बालविवाह हे शास्त्रोक्त मानले जात, त्यास कोणी विरोधही केला नाही, किंवा तसा विरोध करण्याचा विचार कुणास सुचला नाही. याचा अर्थ राज्यकर्तेही तत्कालीन शास्त्रार्थ व धर्मसमजुतींच्या कक्षेबाहेर फारसे जाऊ शकले नाहीत.

मराठेकालीन स्त्रियांच्या शिक्षणाबद्दल विचार करता त्या काळातील कथापुराणाच्या साहाय्याने स्त्रीच्या मनावर काही विशिष्ट संस्कार होत. अशी कथापुराणे शहरात जिकडे

१. वा. कृ. भावे : पेशवेकालीन महाराष्ट्र पृ. २७९.
२. कित्ता २८२.

होत असतील तितकी खेड्यात होत नसणार. तरी परंपरेने माहीत असलेल्या गोष्टी, ओव्या, गाणी यांचे संस्कार स्त्रीच्या मनावर होत असत. पुरुष विद्यार्थी पाठशाळेत जाऊन गुरुजीकडे शिक्षण घेत. तसा प्रकार मुलींच्या बाबतीत घडत असल्याचा एखादा अस्सल कागद प्रस्तुत लेखकाच्या वाचनात नाही. परंतु बाजीरावाचा एक मुलगा जनार्दन अल्पवयातच मृत्यू पावला असता त्याची स्त्री सगुणाबाई हिने प्रौढ वयात आपल्या पुस्तकशाळेत जमा केलेल्या पुस्तकांची यादी पेशवे दप्तर ३२ पृ. २२ वर दिली आहे. या उताऱ्याची मिती ११-१-१७८४ अशी आहे. त्या यादीत अध्यात्मरामायण, योगवासिष्ठ, पंचदशी, चित्रदीप, ध्यानदीप, तृप्तिदीप, शिवाष्टक स्तोत्र, भागवत दशमस्कंद, सप्तशती, यमगीता, गणेशसहस्रनाम अशा सुमारे दोन-अडीचशे ग्रंथांची नोंद आहे. याशिवाय पार्वतीबाईचे नारायणरावास किंवा गोपिकाबाईचे सवाई माधवरावास असे जे अनेक पत्रे प्रसिद्ध आहेत त्यावरून महाराष्ट्रातील उच्च स्त्रीवर्गास लिहिण्याचाचण्याचे चांगले ज्ञान होते व सामान्य स्त्रीवर्ग कदाचित निरक्षर असला तरी बहुश्रुत व सुसंस्कृत होता असे म्हणावेसे वाटते.

### काणखी कित्येक पराक्रमी स्त्रिया

याप्रमाणे मराठेकालीन स्त्रीजीवनासंबंधी अस्सल पत्रांच्या आधारे विचार मांडल्यावर, सुल्तानशाही कालातील व मुघलकालीन कर्तृत्ववान स्त्रियांचा जसा यापूर्वी थोडक उल्लेख केला तसा मराठेकालीन स्त्रियांचा करावयाचा. मागील विवेचनाच्या ओघात जिजाबाई, राधाबाई, गोपिकाबाई, इत्यादिकांचे उल्लेख आलेलेच आहेत. या शिवाय येसूबाई, ताराबाई, आनंदीबाई, अहल्याबाई, कोल्हापूरच्या दुसऱ्या संभाजीची बायको जिजाबाई (१७६०-७२) व झाशीची राणी लक्ष्मीबाई यांच्यासंबंधी तपशिलाने पुष्कळच सांगता येणे शक्य आहे. संभाजीची पत्नी येसूबाई हिचा आपल्या पुत्रासह औरंगजेबाच्या कैदेतील दीर्घकालीन निवास, इ. स. १७०७ नंतर आपल्या पुत्रास सुटू देऊन आपण एकटीनेच पत्करलेला कारावास व तिची इ. स. १७१९ त बाळाजी विश्वनाथाच्या कर्तृत्वाने झालेली सुटका या सर्वांची हकीकत चित्तास चटका लावणारी आहे. तसेच राजाराम जिवंत असता व पुढे त्याच्या मृत्यूनंतर महाराष्ट्रात विजेप्रमाणे तळपणारी, आपल्या सरदारास स्फुरण देणारी व मृत्यूच्या दाढेतून महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याचे निग्रहाने रक्षण करणारी ताराबाई हिची वीरवृत्ती पाहून 'दिल्ली झाली दीनवाणी। दिल्लीशाचे गेले पाणी। ताराबाई रामराणी। भद्रकाली कोपली॥' असे एका तत्कालीन कवीने तिचे वर्णन केले आहे ते सार्थ वाटते. राघोबाची बायको आनंदीबाई पेशवाईत दुही माजविण्यास कारणीभूत झाली असली तरी ती कर्तृत्ववान होती हे नाकारता येणार नाही. अहल्याबाई होळकर हिच्या चरित्राचा तपशिलाने अभ्यास करणारास तिच्या धैर्याबद्दल व राज्य चालविण्याच्या कुशलतेबद्दल अभिमान वाटेल आणि तिच्या धार्मिक वृत्तीची वर सम्राट अशोकाशीच तुलना होऊ शकेल हे लक्षात येईल.

झांशीच्या रक्षणार्थ धारातीर्थी पतन पावणाऱ्या राणी लक्ष्मीबाईबद्दल काय लिहावे? शेवटच्या लढाईपूर्वी तिने काही पांथस्थ ब्राह्मणांजवळ काढलेले उद्गार पुढे देण्यासारखे आहेत. ती म्हणते 'मी अर्धा शेर तांदळाची धनीन, मजला XXX विधवाधर्म सोडून हा उद्योग करण्याची काही जरूर नव्हती. परंतु हिंदुधर्माचा अभिमान धरून ह्या कर्मांत (लढण्यास) प्रवृत्त झाले व याजकरिता वित्ताची, जीविताची, सर्वांची आशा सोडिली'.[१] हे उद्गार काढून राणीने निष्काम कर्मयोगाचा आदर्श जगापुढे ठेवला व महाराष्ट्राची स्त्री कशी असू शकते याचे जिवंत उदाहरण इतिहासात ठेवून ती चिरंजीव झाली. कोल्हापूरच्या दुसरा संभाजी यांची स्त्री जिजाबाई हिनेही पेशव्यापासून आपले राज्य सुरक्षित ठेवण्याची मोठी दक्षता ठेवली.

मराठेकालीन इतिहासप्रसिद्ध स्त्रियांचे वर्णन यापेक्षा अधिक विस्ताराने सांगण्याची आवश्यकता नाही. परंतु त्यांच्या उदाहरणावरून मराठेकालीन सामान्य स्त्रीच्या जीवनाबद्दल निष्कर्ष काढणे धोक्याचे असले तरी ती पूर्वकालीन स्त्रीइतकी शास्त्र व रूढी यांच्या बंधनांनी जखडलेली नव्हती हे पूर्वीच्या विवेचनावरून स्पष्ट झालेच असेल. त्या काळी केवळ स्मृतीसारख्या आणखी कोणकोणत्या स्मृति प्रमाण मानल्या जात, याचा वास्तविक अधिक बारकाईने विचार व्हावयास पाहिजे. तसेच मध्ययुगीन काळात पूर्वीपासून पैठण हे धर्मपीठ मानले जाई. तेथील पंडितांनी वेळोवेळी कोणकोणते शास्त्रार्थ काढले व निर्णय केले आणि त्यांचा स्त्रीजीवनावर कसा परिणाम झाला याचाही तपशिलाने अभ्यास केला पाहिजे. परंतु माहितीच्या अभावी या मुद्द्याचा केवळ उल्लेख करून येथेच हा विषय पुरा करतो.

## परकीय भांडवलशाहीमुळे सामाजिक क्रांति

मध्ययुगीन ऐतिहासिक कालातील स्त्रीसंबंधीचे हे समालोचन पुरे करण्यापूर्वी एक सामान्य विधान करणे जरूर आहे. कार्ल मार्क्स हा ऐतिहासिक दृष्ट्या सामाजिक घटनांचा मीमांसक होता हे सर्वांस माहीत आहे. त्याने भारतासंबंधी जे लेखन केले आहे त्यात असे म्हटले आहे की, *'भारतात जी एकच समाजक्रांती घडून आली ती परकीय भांडवलशाहीमुळे घडून आली.'* (**'Alien capitalism brought about the only social revolution in India'**) त्याच्या म्हणण्याचा अर्थ असा की, भारतात फार प्राचीन काळापासून अनेक राजकीय किंवा धार्मिक क्रांत्या झाल्या. राजपुतांचा पराभव व सुल्तानशाही किंवा मुघलशाहीचा उदय या राजकीय क्रांत्या होत. हिंदु-बौद्ध, शैव वैष्णव, हिंदु-मुसलमान यांच्यातील वाद किंवा झगडे व पडझड यांना धार्मिक क्रांत्या म्हणता येईल. परंतु भारतात पूर्वीच्या काळी एकदार जी कृषिप्रधान सरंजामशाही, चातुर्वर्ण्यप्रधान समाजव्यवस्था निर्माण झाली त्या समाजव्यवस्थेस कधी

---

१. महाराष्ट्राचा धावता इतिहास, पृष्ठ २७६

धक्का लागला नाही. राजपूत आले व गेले, मुसलमान आले व गेले. तसेच राष्ट्रेंना चालुक्य वगैरेही. पण कुणासही भारतातील सरंजामशाहीस धक्का लावावासा वाटला नाही. पूर्वीचे हिंदू सरदार गेले पण त्या जागी नवाब आले. पण दोघेही सरंजामी वृत्तीचेच ! तसेच कुणासही जातिबंधने, चातुर्वर्ण्य, स्त्रियांवर शास्त्राने घातलेले निर्बंध हे जाचक आहेत व त्यात बदल केला पाहिजे असे तीव्रतेने वाटले नाही. किंवा अस्पृश्यता हा हिंदू समाजावरील कलंक आहे असेही वाटले नाही. सारांश, व्यक्तिस्वातंत्र्यप्रधान सामाजिक चळवळ व क्रांती भारतात गेली आठशे हजार वर्षे झाल्याचे आढळून येत नाही. परंतु पाश्चिमात्य व्यापाऱ्यांच्या आगमनाने भारतात आलेल्या भांडवलशाहीने सरंजामशाहीस धक्का दिला व आपले जुने शास्त्रार्थ व समाजनिर्बंध हे पुनः एकवार बुद्धीच्या कसोटीवर घासूनपुसून परीक्षून घेणे समाजास आवश्यक वाटले. या समाज क्रांतीचे महाराष्ट्रातील अध्वर्यु लोकहितवादी, जोतीराव फुले, रानडे, आगरकर व महर्षि अण्णासाहेब कर्वे हे होत.

या मुद्द्याचा कितीतरी विस्ताराने विचार करता येईल. परंतु प्रस्तुत लेखकास दिलेल्या नियोजित विषयाची कक्षा येथे संपली असल्याने मध्ययुगीन इतिहासकालीन स्त्रीचे हे त्रोटक समालोचन या सर्व समाजधुरीणांच्या स्मृतीस वंदन करून येथेच पुरे करतो.[1]

१. या निबंधाचे लेखन करीत असता माझे मित्र प्रा. सरदेशपांडे व के. सी. कॉलेजचे ग्रंथपाल श्री. थोरात यांचे साह्य झाले त्यांचा साभार उल्लेख करणे उचित होईल.

६

# लोकसाहित्यातील स्त्री

सरोजिनी बाबर

डॉ. कु. सरोजिनी कृष्णराव बाबर, एम्. ए., पीएच्. डी. (जन्म ७-१-१९२०)
प्रबंध, निबंध, कथा, कादंबरी, कविता, बालवाङ्मय, इत्यादी बरेच लेखन.
प्रौढ नवसाक्षरांसाठी वाचनसाहित्य निर्मिति व अनेक प्रकारचे सामाजिक कार्य.
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती. संपादिका, समाजशिक्षणमाला.
(१४८६, सदाशिव, पुणे २)

उगवत्या सूर्यदेवानं लाल डोंगराच्या रांगांच्यामधून वर मान करीत आणि पूर्व दिशेनं उमळलेल्या गुलालाच्या राशीला मागं सारीत पहिल्यांदा आपल्या घरी यावं असं आमच्या मराठी मुलखातील बायका माणसांना नेहमीच वाटतं. म्हणून भल्या पहाटे उठून दारी सडासंमार्जन करावं, पुढं रांगोळी घालावी, फुलांच्या पायघड्या घालाव्यात, धुपारती फिरवावी, पंचारती ओवाळावी, रत्नजडित सिंहासनाचं, चंदनाच्या पाटाचं आसन घालावं असल्या गोष्टी त्या मोठ्या हौसेनं करतात. घरी येणाऱ्या सूर्यदेवाला दिसेल अशा बेतानं तुळशीची पूजाअर्चा करावी, तुळशीवृंदावनाला प्रदक्षिणा घालीत गीतं म्हणावीत, पान धुवून काढीत पुष्प पदरात घ्यायची मजा करावी, आणि प्रसंगी आपल्या मुलांच्या पंगतीला बसवून त्याला दुधातुपाची न्याहारी पण द्यावी याचा देखील त्यांना भारी सोस. तुळशी सतीच्या शेजारी बसून कृष्णदेवाची चाललेली रासक्रीडा डोळ्यांनी बघावी आणि त्याच्या बासरीच्या नादानं भारावून जाऊन आपल्या तान्ह्याला पण कृष्णदेवाच्या नावानं हाकारा घालीत घरोघर दूध प्यायला बोलवावं या हौसेनेच त्यांना विलक्षण छंद. म्हणून भल्या पहाटेच्या रामप्रहराच्या या सात्त्विकजनांचं दर्शन घ्यायचं झालं तर पाय न वाजवता, आवाज न करता हळूच माजघरात जाता आलं पाहिजे आणि त्यांची गीतं ऐकून तृप्त होता आलं पाहिजे. अशा वेळी शक्य झालंच तर घरोघरच्या बायकांच्या सुरात सूर मिसळून ती गीतं आळविता आली तर आपल्यासारख्या भाग्यवान आपणच. यातला आनंद उपभोगता आला पाहिजे. तिथल्या त्यावेळच्या प्रसन्न वातावरणात दंग होऊन जगाचं भान विसरायची किमया साधता आली म्हणजे

जात्याच्या पाळ्याची शीग पिठानं माखत उंचावल्यानं होणारं समाधान अनुभवता येणार आहे. म्हणून या मायबहिणींच्या या आनंदाचे वाटेकरी होणारानं त्यांच्या मनोभावनांशी एकजीव व्हायला शिकलं पाहिजे. त्याशिवाय त्यातली गोडी मुळी चाखताच येणार नाही.

मालकीत चंद्रमौळी घर, दारात कोंबड्यांचा खुराडा, गोठ्यात चारदोन गाई-म्हशी न् त्यांची वासरं, शेतात चिघासर जमीन, उतरंडीत थोड्याफार पैशांची पुरचुंडी, देव्हाऱ्यात देवादिकांचं वास्तव्य, घराच चार रातीं तोंडं आणि एकला मिळवणारा अशा परिस्थितीतील सखुबाई मुरण आपली ओळखपाळख सांगताना मोठी तालेवारी सांगते हं ! म्हणते कशी —

"चांदीचं घंगाळ आंघोळीला. चंदनाचा पाट बसायला. केशरी गंध लावायला. जरीकाठी धोतर नेसायला. चांदीचे गडवे पेले. आत गंगाभागिरथीचं पाणी. राजगिरी अत्तर. तारु बिल्वराचं. उशा किनखापाच्या. गाद्या गझनीच्या. हंड्या-झुंबरांचा झगझगाट. समया लावल्या तीनशेसाठ..." म्हणजे आहे की नाही डामडौल? आणि ही कुणाची कोण म्हणून विचाराल तर "ताग वागाची. मिशी बाघाची. लेक नाना बपाळांची..." असं सांगून मोकळी होते. हिला आपल्या माहेरचा भारी अभिमान. म्हणून भरल्या घरात जरा कुठं खुट्ट झालं तरी ती रुणझुणत्या पायवाबरोबर सांगावा धाडीलच. म्हणेल की, "कमानी दरवाजा आहे. चिरेबंदी वाडा आहे. झाडावर पारवे घुमताहेत. तर त्या खुणेनं जायचं. पंचमीला घेऊन जा म्हणून सांगावा द्यायचा. यमना जमना काठाचं इरकली लुगडं नेसलेली, झुंदळपोत घातलेली, आई तिथं आहे. दंडी तिच्या बाजूबंद, मनगटात गोठपाटल्या आणि बारा बिघ्याच्या शेतावर भल्या थोरल्या विहिरीवर मोट धरलेला भाऊ आहे. त्याच्या हाती खिलार नंदीची दोरी न् गळ्यात गीत आहे. तर म्हणावं की, ये तू मला घेऊन जायला; तट्टाची गाडी आण; बैलांच्या गळ्यात घुंगूरमाळा बांधू देत."

परंतु मनात आलं की, थोडंच जायला मिळणार? घर संसारातून मुक्तता व्हायला नको? दादाराया न्यायला आले तरी सासऱ्याची परवानगी? मोठं अवघड काम. दारी मूळ आलंय तर माहेरी जायला परवानगी द्या असं कुणाकुणाला विनवायचं! तर तक्कीर धरल्या सासुला, चिलीम ओढत्या मामंजींना, सोन्याच्या सुपलीने खेळत्या नणंदेला, सोन्याच्या विटीदांडूनं खेळत्या भाऊजींना, सोन्याच्या रवीनं ताक करत्या जावेला आणि घरात आणखी कोण असेल नसेल त्याला न् सरतेशेवटी आरशात बघत्या पतीला. मोठ्या मिनतवारीनं स्वारी दीड दोन दिवसाची रजा देत राणीला जा म्हणते. पण सासूबाई? छे! त्या कारल्यानं आळं करून वी लावायला सांगीत पार त्याची कारली येऊन भाजी करून होईतोवर थांबच म्हणते! तशातूनही जर का ही रंभा गेलीच माहेरी तर शंभर वेळा 'तुझं माहेर दुबळं आहे, तू लवकर ये' असं हिचा नवरा सांगेल. पण मग हीही म्हणेल की, "असू दे असू दे. दुबळं असलं तरी तुपात भिजवलेल्या शेवया केळीच्या

पानावर खाऊन येईन न् हिवाच्या का होडींना सावळ्या ठेवून येईल तरच नावाची."

अशी ही राधा मनाची मोकळी. आई भेटली की, दुधाला उकळी फुटावी तशी बोलत सुटते. गुजाच्या गोष्टी उसवल्या जातात. चंद्र अस्ताला बाहेरील खामणीवर चिमणी चळते पण गुजाचा झाडा म्हणून होतच नाही. शुक्राची चांदणी उगवली तरी हे हितगुज चालूच हं! ह्या राजसवाळीला आई म्हणजे खजिन्याची पेटी वाटते. सारा मनोभाव तिथं ठेवायचा. कडीकुलुपात. किल्लीची मालकीण फक्त आई. तिचेची पत्रावळी करून देव त्यावर जिरेसाळीचा भात खाणाऱ्या ह्या लेकीचं आईला भारी कवतीक. दारावरून गेलेल्या राघूच्या रंगाची चोळी लेकीनं पाहिजे म्हणायचा अवकाश की, सर्पाच्या पाताळातून हुडकून आणील. बाजारपेठेत कोणती पण घाटणी येऊं दे. ह्या लेकीसाठी तिनं नवा थाण घेतलाच म्हणावा. अगदी. लेकीची लेक म्हणजे हिला दुधावरची साय. तिचं कवतीक तर विचारू नका. भिंगाच्या चोळीपासून न् घारवाटी कचीचाच्या परकरापासून तो पार नथीच्या चूळबोळक्यापर्यंत झाडून सगळी हौस दर्शन ती आपली जमवीतच असते. म्हणून तिच्या चंद्रावळीला ती गंगा वाटते न् बडील सागर. त्या दोघांच्या सावलीत आपल्या भावाप्रमाणे हिला देखील गाढ झोप घेत पवित्र व्हायचं असतं. म्हणून दारी मूळ येतेल्या भावाची वाट बघताना हिचा जीव कावराबावरा होतो. एका डब्यातील हे दोन मोती एकत्र आले, जवळ लावले तरीही ती आपली हुरहुर घोळून वाखवतेच. आपल्या भावाची चाल वाकडीतिकडी, पायतीपळवी, घांदरट. तर नागिणीपद्मिनींना ही वाटेत येऊ नका म्हणून हात जोडील आणि काजव्यांची विनवणी करून वाटेवर चंद्रज्योती पाजळा म्हणून गळ घालील. अशा वेळी येदी कल्पना मनात आणून वळचणीच्या पालीलाही चुकचुकू नको म्हणायला ही मागंपुढं पहात नाही. भावाच्या एकी सगळं काही हिला चांगलं पाहिजे असतं. त्यासाठी त्याच्याबद्दल नेहमीच शुभ वर्तमान यावं असं तिचं म्हणणं. म्हणून ढगांच्या संगतीनं वाऱ्यांचे पंख लावून जाणाऱ्या मनमोराला ही म्हणते कशी, "दोन्ही पाण्याचा ढग डोंगराच्या शेतावर उतरव. तिथं पाण्याचे सागर पसरू देत. आणि लवलवत्या वीजबाईला म्हणावं की, तू राखण कर हं शेताची. लक्ष्मीआई अमृताचा कलश घेऊन बांधावर आली की, तिचा धरला पालव सोडू नको असं सांग दादारायांना."

आपल्या बाळांनी चग बांधलेल्या वानड्या सोडीन मामांची नगरी वेढून टाकावी आणि झाडाझुडपावर चढून दोजीवाईंची तक्रार आणीत आजी आजोबांच्या कवनिकाला उन यावा असा हिचा ध्यास. म्हणून माहेरी जायच्या अगोदर ही आपल्या लेकीला मामानी आणलेली टेंगसाठी नेसून गावाच्या वेशीवरील बुरजावर उभी राहिलेली पाहील! तर हो! माहेरच्या एकी हिचा वेगळा विचारच नसा. हिला राजसवाळ व्हायचं हे कळल्यापासूनच सोनाराच्या घरी भिंदुल्या घडवताना ठिणग्या उडणार तर!

पण बाई जर का मलकडे नार तिगट मिळाली तर मग झालंच! जिथं रत्नासारखादि

ही नाजुक नार खेळली तिथं मूठभर माती घ्यायची देखील सत्ता नाही अशी वेळ येते मग. आई-वडिलांना वेगळं ठेवून ही भावजई आपला संसार मांडील न् पाहिजे त्यावर पाहिजे ते कुभांड घेईल. पंचमीच्या सणाला चुकून नणंद आलीच तर तिच्यावर ल्यायला नेसायला काही नाही या सबबीवर घरातलं काय पण दिलं म्हणेल आणि नणंदेनं सारं वाटोळं केलं असा दंगा करून सोडील. एखादी भावजई तिच्यापेक्षा वरचढ निघेल. कुणी सांगावं! तिचा तोरा आणखीनच वेगळा. दारी नणंद आलेली दिसली रे दिसली की लगेच बोलून दाखवील, "काय करू वैन्सं, बसाय जागा दीन म्हटलं तर जागा हाय वला न् भाकरी करीन म्हटलं तर तवा चाळूनं खाल्ला! आता वो?" भैन बिचारी काय ते त्यातलं ओळखती न् घरी निघून जाती आपल्या.

इकडे तोवर भाऊ घरी येतो. अशानं असं झाल्याचं त्याच्या कानावर जातं. म्हणताना तो चिंताग्रस्त होतो. विचार करतो न मग दिवस देतो बात ठोकून! अगदी!! गाडीबैलं जुंपून घरी येतो न् आपल्या नाटकसाळ बायकोला म्हणतो कसा घाबऱ्याघुबऱ्या, "अग अग, तुझ्या बाच्या घराला आग लागली!" तशी मग ही हंबरडा फोडून "आता कसं करायचं?" असं म्हणून विचारते. मग हा सगळं घर उलथंपालथं करतो. सगळं सामान उचलून गाडीत भरतो न् थेट जातो आपल्या भैनीकडं. भावाला बघून तिला केवढा आनंद दाटलेला. हारखून गेली बिचारी. भावाला जेवण केलं. शिकरण चपाती. आंबेमोहोराचा भात, खारवडे कुरवडे तळले. तर भाऊ आनंदानं जेवला. पण हातावर पाणी पडलं न् गेला की गाडी तिथंच ठेवून धूम पळत! आता वो? बहीण बावरीबावरी झाली. तिन मोठ्यान ओरडून भावाला हाकलं. तर हा म्हणतो कसा, "तुझ्या बाचं हाय. असू दे." आणि गेला की! इकडे तोवर बायको वाट बघतेली. नवरा आला म्हणताना तिनं घाईघाईनं विचारलं, "कशी हाईत माणसं?" तर "बेस हाईत" म्हटला. मग तिनं गाडीबैलांची चौकशी केली तर कसा म्हणतो, "काय सांगू? असा वारा आला, असा वारा आला की, बैल उडून गेली न् असा पाऊस आला, असा पाऊस, की गाडी वाहून गेली." पण तिला ते खरं वाटेना. आश्चर्य आहे म्हणाली. म्हणताना मग ह्यानं पण टोमणा मारला तिच्या बोलण्यावर, "बसायला जागा दीन म्हटलं तर जागा हाय वला न् भाकरी करीन म्हटलं तर तवा चाळूनं खाल्ला, ह्या बोलण्याला काय म्हणत्यात?" तशी ती गप का गार झाली.

तर ह्या सालूबाईचं काय म्हणणं की, अशी वेळ येण्याइतकं आपण वागावंच का? भाऊबीजेला दारात हा चन्द्र उगवला की पुरे. बाकीचं ह्वंच कशाला काय? देऊन घेऊन काही एक पुरव नाही. म्हणून ती बांगडीवरल्या काचेत चमकणाऱ्या दर्पणात भाऊ दिसला की, खुशालीचा सांगावा आण म्हणून माहेरच्या आसुदाला हात जोडते. दाण्या वाघावारखा भाऊ मनेत असू दे एवढंच तिचं म्हणणं.

त्यामुळं रुपकईवाणाचं लुगडं न् मुगाच्या रंगाची चोळी माहेरपणाला लेवून नेसून आल्यावर ही भेटेल त्याच्याजवळ तारीफ करीत सुटते. किती चोळू न् किती नको होतं

मिला. कृष्णदेवाच्या रुक्मिणीला भिल्लराजांनी सागर आंदण दिला तर आपल्याला पण पलंगभर आंदण दिलेल्या वडिलांच्याबद्दल बोलताना ही अशी हवेतूनच चालते बाई. जमिनीला म्हणून पाय टरतच नाही. चन्द्रमौळी घरात लंकेचं वैभव सांगणाऱ्या हिला ऐकावं कुणी जरा दमानं घे म्हणून!

हिरव्या चोळीने रसरसलेल्या देहाचा दिमाख दाखवीत हावऱ्या कांताबद्दल तर ही काय कमी बोलते म्हणता? छे! इथं तर तिची आणखीन् कळी खुलते. अगदी नजर रहावी अशी.

घरात सासुरवास कसा तर विनायकाच्या घाणा स्वाचा तसा म्हणून नशिबाला दोष देणारी ही कंबळसा. पण प्रीतीच्या मनोरथाची डाव्या डोळ्याची दराडनी आणि नागाच्या पुस्वान्यापाव रात विसरून त्याचा चांगुलपणाच तेवढा लक्षात घेते. गावा गेलेल्या वकिलाची रतीबाची पानं सुकली, बागेतील जाई-मोगऱ्याची दरवळ कोमेजली, भिंत्यातील चित्रं कोम्पावली, उठता बसता पाल कुचकुचली अशा जीव अस्वस्थ करणाऱ्या गोष्टी कधी कुणाजवळ बोलली असली तरी घरधनीनर त्या बाजूला ठेवते. त्यानं आणलेल्या पानरोटीची, कोल्हापुरी साजाची, दादगुरणाऱ्या कंगन्यांची हिला मारी ऐट. अंगावर तिवाचं, खुंटीवर उिशाचं, दळवणीवर पत्राशाचं आणि पेटीत मंदिलांचं लुगडं आहे. मनाने सा सज्यांची होत सांगताना तो हटावणार नाही ना याबद्दल ती दक्षता घेते. म्हणून पाननळ्याच्या शेतरीला, मोटेवरच्या नाड्याला, दङ्गावरच्या नवऱ्याला, नांगरल्या बैलाला, पेरल्या कुरीला अशी ही भारली नवस बोलतेहीच. हिचा हा चंद्रहिलाळ आनंद लाड फेवडा करतो म्हणून विचारलं तर ही राधा म्हणते कशी, "सऱ्या नर्याचा वाडा सल्याच्या दुडारीत वांकुरानं लाव झाला!" दया बाई! चार-चौघींत मुरके मारून असल्या गोष्टी करीत ही मग अशी रंगात येते की, भर दिवसा सुर्यान माथ्यावरच उभं राहून मिटक्या मारीत हे गोड मनांचं सुख ऐकताना ऐकावं!! हिला मग केवढा अभिमान या गोष्टींचा. स्वतः एका क्षणात राधा होईल न् नवऱ्याला कृष्णदेव करून रासक्रीडेत दंगून जाईल. मी मत्मोळी झाले तर तू मोठा होऊन आला चाळं फेकित पकडायला ये सांगणारी ही चोनवळी दशी मुलवानं हाड. नाही दमवते नवऱ्याला. उगीचच काहीतरी खुसपट काढून हे अन का न् ते दसं का म्हणून जीव नको करील त्या रायमनाचा! पण चावडीवर दर्शी जाणार नाही हं! अंहं! ही गरतीची लेक. कारी चुकलेच तर अशी लवेल निजेसरमी आणि काळराजाच अदचितच मालकांच्या माडीवर नेऊन टेवील की पाहातच राहावं बाई. तिच्या आणि बाळराजाच्या गोड हसन्यानं मग पतिदेवही राग विसरून जातील. दिव्याच्या उजेडात चौकोनी विडा बांधायची खटपट करणाऱ्या राणीवर राग धरी कसा धरणार हा धनी! ही ते ओळखून असते. म्हणूनच संसारातल्या सुखदुःखाला टक्का बाळाच्या स्पर्शाने करताना हिचा जीव सुखावतो.

आरलं बाळराज म्हणजे हिचा जीव की प्राण. काळजाचा तुकडा. हिच्या

रत्नामोत्यांचं हिरेमाणिकं. म्हणून हाताच्या न दंडांचा पाळणा, नेत्रांचा दिवा, मांडीचा चौरंग आणि काळजाचं अंथरुण घालीत ती बाळाला खेळविते. उगवत्या नारायणागत रूप घेऊन आलेल्या बाळराजाला गुडघ्यावर रांगताना पाहिला की, हिला सोन्याचा ढीग दिसतो. म्हणून खेळून खेळून दमलेल्या राजाला चक्कर मोवरा जाणून यायचं आश्वासन देत ती नीजबाईला बोलावते. बाळाच्या डोळ्यात येऊन येस पण त्याला दुखापत करू नको म्हणते. घरातल्या वडील वहिणीची, मावशीची, आत्याची, आजीची, काकीची, अगर आईची जागा घेऊ नको म्हणून बजावते. हिचा बाळ म्हणजे जणु कृष्णदेवाचा अवतार. आणि ही ? यशोदा न् देवकीही आपणच. गंजकावर बसून दंडी बाजूबंद न् मुद्रिका करां ल्यालेली ही भामिनी आपला बाळ हीच धनदौलत मानते आणि त्याच्या जिवावर उद्या मोठी होईन म्हणते. अशा वेळी हसऱ्या नाजुक बाळाला दृष्ट होऊ नये म्हणून घरात येसबंदाचा धुरा बांधते. मीठमोहऱ्या उतरून टाकते. रानभांजरांचं कवतीक करते. शेजाराणीच्या जाईन्चाफ्यांना गोंजारते. मोडवा खेळ उचलून टाकते. आपलं आयुष्य बाळाला दे म्हणून देवाच्या पाया पडते. रात्रंदिवस बाळाला मोठा कसा करीन हा एकच ध्यास या गौळणीला.

म्हणून खानानवंशाच्या बाळाला कुठं ठेवू न् कुठं नको करीत त्याला कडेवर घेऊन ती मोठ्या हौसेनं कामाचा रगाडा उपसते. त्याच्या शिणजोडीचे साथीदार गोळा करून त्याच्याबरोबर आपणही खेळते. बाळाला सुखी ठेवावं म्हणून कुलदैवताला किती साकडं घालावं या भेतेनं त्याला काही माप ?

बयनी आणि बाळराज सुखी असावेत म्हणून ही रोज तुळशीची पूजा करते. घरातले देव पुजते. वार असेल त्याप्रमाणं देवदेवतांचं दर्शन घेऊन येते. सणावारी कुळाचार पाळते. घरची ही दौलत सुखी ठेव नाहीतर रक्ताचं शिंपणं घालीन म्हणते देवाला ! पाहिजे तर देवानं हिला ऱ्यावं पण ही दम्म म्हणणार नाही. अंगारा धुपारा लावताना देखील घरात अमूक एक सुख आण म्हणून देवीला बजावील सख्य मावची म्हणावी हिला.

सणावाराला पुरण शिजायला घालून हिची उडणारी धांदल बघावीच एकदा. उन्हाळ-काम म्हणून केलेले पापड, कुरडया, लोणची, शेवया, गव्हले, नकुले, ह्यांचा उरसा तर सणावारी ही करतेच. पण सुग्रणपणा पणाला लावीन म्हणते. पुरणपोळी ओठांनी खावी अशी करेल ही यमुना. जेवणारानं हिची आठवण पुन्हा काढलीच पाहिजे. *दसऱ्याला कडवणी आणि दिवाळीला फराळाचं असं काही चवीचं बनवील की* जिभेवर त्या चवीनं ठाण मांडलंच पाहिजे ग्यागाराच्या. पुढाच्या चक्या मराव्यात तर ह्याच सखुबाईमाळनं असा हिचा बोलबाला.

त्यामुळं लगीनदेवाकारणानं हिच्या घरी मदतीसाठी दूत धाडायची म्हणजे देखील चर्कार्त्यांना फेरदा धाक ! हिच्यापेक्षा वरचढ राहू देत पण निदान हिच्या इतपत तरी सुग्रीणपणा हिला यावा असे जिचे तिचे म्हणणं. त्या कारणानं हिने हळद दळायला

घातली आणि पानवंतांच्या नायकांना चोळवलं की, सगळ्याजणी गीतांची पोथी संगं घेऊन हुडकडून टळवात बसा. कारण हिच्याजवळ पोऱ्यानं गातं आणि दिगानं 'गळे'! मग तालेवारी करावी कुणी हिच्याजवळ? जिच्या त्रिल्या हिचा थथकाच. म्हणताना, “मोत्यांनी गुंफला पाळणा, रेशमानं विणली दोर न् ह्यांनी कोणचं मंगलनावं धराव काढलंय आज?” असा पुकारा करीतच गटविनी गोळा होतात हिच्या घरी.

पण ही कुळवंतांची लेक मनाची मोकळी. सगळ्यात सगळी. प्रेमळ. आगत स्वागत दांडगं. एक घास कुणाला सोडून खायची नाही.

त्यामुळं हिच्यावर सगळ्यांचा जीव. हिचा एक शब्द खाली पडणार नाही याचीच प्रत्येकाला काळजी. म्हणून ही सदैवच तोंडानं काढलं न् हातानं पेरलं या दिमाखात राहाते. तर तिची बरोबरी कुणी न् कधी करावी देवा! तिचं निळच हे सारं लडलाम. नव्हं तिच जे दंडतंय ते आम्ही लायकी नसताना आपल्याला लाभून घ्यावं हे कसं गा!

॥

७

# आधुनिक मराठी साहित्यातील स्त्री

दुर्गादास काशीनाथ संत

डॉ. दुर्गादास काशीनाथ संत, एम्. ए., पीएच्. डी. (जन्म ९–५–१९१६) शिवाजी विद्यापीठातील गोखले कॉलेजमध्ये मराठीचे प्राध्यापक. मराठीच्या अत्युच्च पदवीकरिता मार्गदर्शक. 'साहित्य आणि संस्कृति' व 'मराठी स्त्री' हे प्रबंध लिहून दोनदा तर्खडकर पारितोषिकाचे मानकरी. याशिवाय 'साहित्य संमेलने आणि साहित्यिक प्रश्न' व 'संशोधन पद्धती, प्रक्रिया अंतरंग' या ग्रंथांचे, संशोधक अभ्यासू वृत्तीचे लेखक. ('मातृ-पितृ-छाया', १४३९ व, मंगळवार पेठ, कोल्हापूर)

## र्वकालीन भारतीय जीवनरथ एकचाकी

राठी स्त्रीची आधुनिक काळात — विशेषतः ब्रिटिश राजवटीच्या कालखडात — प्रगतीच्या दिशेने झालेली वाटचाल, साहित्यात त्या प्रक्रियेचे पडलेले प्रतिबिंब, तसेच हित्याने त्या प्रगतीस लावलेला हातभार ह्याचे विवेचन एक दशकापूर्वी प्रकाशित ह्या 'मराठी स्त्री' या प्रबंधात प्रस्तुत लेखकाने केले आहे. त्यातील विवेचनामागे विशिष्ट भूमिका आहे. ती भूमिका ऐतिहासिक दृष्टीने पाहणी करताना अत्यंत युक्त ठरणारी अशी आहे. तीमुळेच तेथील विवेचनात एक प्रकारचा नेमकेपणा ला आहे. त्याचबरोबर एक प्रकारचे परिमाणही लाभले आहे. प्रस्तुत लेखाचे उद्दिष्ट असल्याने तीच भूमिका याही ठिकाणी उपयुक्त ठरण्यासारखी वाटल्याने तिचा कार केला आहे.

ब्रिटिश राजवटीने आम्हां भारतीयाच्या जीवनविषयक जाणिवांत जर कोणती स्वाची भर घातली असेल तर ती म्हणजे व्यक्तिविषयक जाणिवेची होय. म्हणूनच क्तिवाद वा व्यक्तिस्वातंत्र्यवाद हे ब्रिटिश राजवटीचे अपत्य म्हटले जाते. आमचे टिशपूर्वकालीन जीवन इतर बाबतीत जरी सरळनिरस असले तरी ह्या जीवनात क्तिवादाला स्थान नव्हते, पुरुषांच्या व स्त्रियांच्याही. ब्रिटिशांनीच दीक्षा दिलेल्या वादाचा स्वीकार पुरुषांनी पायरीपायरीने केला व स्वातंत्र्य प्राप्त करून घेतले. नीय स्वातंत्र्यलढ्याचे हे महत्त्वाचे अंग आहे.

पण स्त्रियांच्या बाबतीत ही प्रक्रिया अधिक गुंतागुंतीची होती, जटिल होती.

कारण ब्रिटिश राजवटीच्या पूर्वीच्या काळात येथील स्त्री-पुरुषांच्या जीवनात फार मोठी तफावत होती. स्त्रीचे जीवन हे पुरुषाच्या जीवनापासून पूर्णतया भिन्न होते. जीवनाच्या रथाला स्त्री व पुरुष ही दोन चाके आहेत असे म्हटले जाते. पण भारतीयांचा जीवनरथ ब्रिटिश राजवटीपूर्वी सूर्याच्या रथाप्रमाणे एकचाकी होता. म्हणजे, दोघांची जीवनविषयक ध्येये, कार्यक्षेत्रे इत्यादी संपूर्णतया भिन्न होती. त्या जीवनाची धारणा पूर्णतया पुरुषप्रधान होती. स्त्रीला ते जीवन सह्य वाटावे म्हणून तिनेच स्वतःसाठी पातिव्रत्यासारखे जीवनमूल्य निर्माण करून घेतले होते. आधुनिकतेचा सुवर्णस्पर्श होण्यापूर्वी प्रत्येक राष्ट्रात जवळजवळ अशीच परिस्थिती असते. युरोपमध्ये सुद्धा वेगळी परिस्थिती होती असे नव्हे. 'He for God, She for God in him' हा विचार युरोपातही मध्ययुगात प्रबळ होता.

अशा रीतीने ब्रिटिश राजवटीच्या सुरवातीला स्त्री व पुरुष हे एकाच समाजाचे घटक असले तरी त्यांच्यात जीवनविषयक दृष्टी, कार्यकक्षा एवढेच नव्हे तर पारमार्थिक ध्येये इत्यादी बाबतीत पूर्णपणे भिन्नपण होते. स्त्रीचे कर्तृत्व हे गृहजीवनापुरतेच मर्यादित होते. जीवनाला सार्थकत्व प्राप्त होण्यासाठी जी जीवनविषयक ध्येये होती ती इतकी पुरुषासाठीच होती की, त्यांना 'पुरुषार्थ' हेच अभिधान प्राप्त झालेले होते. याचा प्रत्यक्षातला परिणाम म्हणजे भारतीय समाजात तिचे कार्यक्षेत्र कुटुंबापुरतेच मर्यादित झाल्यामुळे म्हणा अगर इतर कारणांनी म्हणा, स्त्रीला कोणतेच — आर्थिक, सामाजिक, राजकीय इत्यादी — अधिकार नव्हते.

## ब्रिटिश अमलातील स्त्रीविषयक जागृति

ब्रिटिश राजवटीचे मुख्य कार्य म्हणजे स्त्री आणि पुरुष यांची जीवनध्येये, कार्यकक्षा इत्यादी बाबतची ही तफावत कमी करणे, व त्या दोघांना समान भूमिकेवर आणणे हे होय. हे 'कार्य' ब्रिटिश राजवट संपुष्टात आली तेव्हा 'सिद्धीस' गेले असे सामान्यतः म्हणावयास हरकत नाही. निदान या बाबतीतला वैचारिक वा ध्येयात्मक अडथळा स्वातंत्र्यप्राप्तीबरोबर दूर झाला. त्याचे एक गमक म्हणजे आपण स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर तयार केलेल्या आपल्या राज्यघटनेत स्त्रियांच्या सर्व प्रकारच्या समानतेस कायदेशीर मान्यता दिलेली आहे. त्यानंतर झालेल्या कायद्यानी बरेचसे व महत्त्वाचे आर्थिक, राजकीय व सामाजिक अधिकारही स्त्रियाना आज दिलेले दिसतात.

याबाबतीत स्त्रीचे अवलोकन करीत असताना ही व्यापक व ऐतिहासिक दृष्टी धारण करणे आवश्यक आहे. त्याशिवाय स्त्रीजागृतीचे मर्मच कळणार नाही. ब्रिटिशपूर्व काळात भारतीय पुरुषाला जे सामाजिक, राजकीय, धार्मिक इत्यादी प्रकारचे हक्क होते त्यांतील राजकीय हक्कांचा परकीय राजवटीत संकोच झाला. त्यामुळे आपल्या मनात स्वातंत्र्याकांक्षा निर्माण झाल्यानंतर त्याच्याशी संघर्ष होणे प्राप्त होते. तसा तो संघर्ष झालाही. त्यात आपण आपल्या, तसेच ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या ग्रहाणपणामुळे

व कर्तृत्वामुळेही स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्यात अपेक्षेपेक्षा लवकर यशस्वी झालो. ब्रिटिशांशी आपला प्रामुख्याने राजकीय झगडा होता. ते अतिशय प्रबल प्रतिस्पर्धी होते म्हणून म्हणा, अगर आपल्या एकंदर धार्मिक, सामाजिक, राजकीय परंपरेचे दडपण म्हणून म्हणा, ब्रिटिश राजवटीच्या काळात सामाजिक उन्नयनाकडे आपले दुर्लक्ष झाले. कित्येक वेळा आपल्यापैकी अनेक नेत्यांनी ते जाणूनबुजूनही केले. ह्याचा परिणाम मात्र असा झाला की, स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर भारतीय पुरुष हा सर्वाधिकारसंपन्न झाला पण भारतीय स्त्रीची जागृतीच्या बाबतीत परफरच झाली.

याचा अर्थ स्त्रीला स्वातंत्र्यकाळात अधिकार प्राप्त झाले नाहीत असे नव्हे, पण ते अशा रीतीने प्राप्त झाले आहेत की तसले अधिकार मिळाले आहेत याची बहुसंख्य स्त्रियांना जाणीव आहे असे दिसत नाही. काहींना जाणीव होत असली तरी बहुसंख्य पुरुषांची त्यासाठी तयारी नाही व त्यांची मनोवृत्ती ही सर्वस्वी प्रतिकूलच आहे. अशा अनुभव आल्याने अर्धजागृत स्त्री मांबावून गेली आहे. मांबावण्याचे आणखी एक कारण म्हणजे स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर आपल्याला प्राचीन संस्कृतीचा एवढा उमाळा आलेला आहे की, त्या संस्कृतीतील, आधुनिकतेला पूर्णपणे विरोधी अशा जीवनध्येयांचा पण तितक्याच कंठरवाने पुरस्कार आपण करीत आहोत. त्यामुळे त्या अर्धजागृत स्त्रीला आपण खरोखरच कोठे आहोत, आपली खरोखरीच कर्तव्ये कोणती आहेत हे समजेनासे झाले आहे.

एका मोठ्या व विविध प्रकारच्या घडामोडींनी भरलेल्या विशाल कालखंडातील स्त्रीचे साहित्यातील जीवनचित्रण तपासताना कुठून निघालो व कुठपर्यंत आलो हे निश्चित करणे आवश्यक वाटले, त्यासाठी हे विवेचन केले. ह्यावरून हे स्पष्ट होईल की, ब्रिटिश राजवटीपूर्वीच्या काळातील स्त्रीदास्यापासून तो स्वातंत्र्य प्राप्त होईपर्यंतच्या काळात समानतेपर्यंत व नंतरच्या काळात विविध अधिकारांची प्राप्ती होऊनही आजची मांबावलेली अवस्था प्राप्त झाली आहे. हा जो स्त्रीजीवनाच्या गतिविधीचा आलेख आहे, तो साहित्यातून कसा पहावयास मिळतो व साहित्याने त्यात कोणती भर घातली आहे हे पहाणे बरेच उद्बोधक होईल. तेच येथले मर्यादित उद्दिष्ट आहे.

साहित्यातील स्त्रीजीवन-चित्रणाचे स्वरूप पहाण्यासाठी ही वैचारिक पार्श्वभूमी विचारात घेणे आवश्यक आहे. ब्रिटिश राजवटीबरोबर भारतीय पुरुषाने आधुनिक काळात प्रवेश केला. त्याच्या जीवनात आधुनिक वृत्ती व जीवननिष्ठा याचा प्रादुर्भाव सुरू झाला. त्याच्या जीवनाची मध्ययुगीन साचेबंद घडण मोडली. त्याची दृष्टी पारमार्थिकावर केंद्रित झालेली होती, ती हलके हलके इहलोकाभिमुख – ऐहिक – होऊ लागली. नवी राजकीय, सामाजिक, वैचारिक ध्येये साकार होऊ लागली.

## जागृतीचे भिन्न रूपे

परंतु स्त्रियांच्या जागृतीची प्रक्रिया एवढी साधी व सरधोपट नव्हती. त्यांच्या

स्त्र्याचे ठोनतीन टप्पे पडतात. पहिल्या अवस्थेत स्त्री स्वतः मूक आहे. आपल्या पदक हा तिच्याप्रत आलेलाच नाही. पुरुषाच्याच नवविचारांचे व ध्येयांचे दर्शन घडल्यामुळे तो नव्या दृष्टीने आपल्या सहचरीकडे, बहिणीकडे, आईकडे पहावयास लागला, तेव्हा त्याच्या दृष्टीला तिच्या जीवनाची पदोपदी होणारी ससेहोलपट, अवहेलना दिसली, व त्याचे मन एक प्रकारच्या कारुण्याने भग्न आले. ही भूतदया होती. तीत न्याय, अन्याय, योग्य-अयोग्य इत्यादी निकषांना फारसे स्थान नव्हते. लोकहितवादी, ज्योतिबा फुले यांचे कार्य मुख्यतः या अवस्थेचे द्योतक होय. आगरकरांच्या विचारांच्या प्रभावाची दुसरी अवस्था होय. या अवस्थेत स्त्रीला थोडी जागृती येत आहे असे दिसते. विविध नागरी हक्कांसाठी व व्यक्ति म्हणून विशिष्ट मान्यतेसाठी तिची धडपड या अवस्थेची द्योतक होय. समाजवादाच्या प्रभावाच्या स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्योत्तर अशा पुढच्या दोन अवस्था होत.

प्रत्येक युगाचा (कालाचा) जीवनाच्या प्रत्येक बाजूकडे किंवा अंगाकडे पहाण्याचा दृष्टिकोण वेगवेगळा असतो. स्त्रीजीवनही त्याला अपवाद नाही. ज्या कालखंडातील साहित्यातील स्त्रीचा आपण येथे विचार करीत आहोत तो कालखंड भारतीय इतिहासात अनेक दृष्टींनी, अत्यंत खळबळीचा, घडामोडींचा, विविध प्रकारच्या जागृतींच्या उप-क्रमानी भरलेला व वैविध्यपूर्ण असा आहे. या कालात जीवनाच्या प्रत्येक अंगात एक प्रकारची अभिनव जागरूकता प्रत्ययास येते. उदाहरणार्थ, वृत्तपत्रे, शाळा इत्यादी संस्था, तसेच राजसंघटना, ग्रंथालये, मंडळे इत्यादींना जीवनात स्थान प्राप्त झाले. मध्ययुगीन दीर्घकालीन निद्रेतून समाज जागृत झाल्याची सर्व लक्षणे या कालातील जीवनात व त्यामुळे साहित्यातही दिसून येतात.

## साहित्यात पडणारे जीवनाचे प्रतिबिंब

साहित्यात समाजजीवनाचे जे प्रतिबिंब उमटते, त्याची काही वैशिष्ट्ये व काही मर्यादा पण असतात. साहित्यात येणारे जीवनाचे अंग हे लेखकाच्या द्वारे येत असते. त्यामुळे लेखकाचे व्यक्तिमत्व, त्याच्या कालाचा त्याच्यावर उमटलेला ठसा, त्याचे समाज, साहित्य, जीवन, समकालीन परिस्थिती इत्यादी गोष्टींबाबतचे विचार, निष्ठा, समकालीन वैशिष्ट्यपूर्ण विचार, तसेच एकंदर वाङ्मयीन वा वैचारिक वातावरण (क्लायमेट ऑफ द एज) या सर्वांचा परिणाम त्या त्या कालातील लेखकांच्या लेखनावर होत असतो. याशिवाय लेखनाचा प्रकार जर ललित वाङ्मयात मोडणारा असेल तर लेखकाचे वाङ्मयविषयक आदर्श, उद्दिष्टे, संस्कार इत्यादींचाही भाग त्याच्या लेखनास विशिष्ट घाट देण्यास कारणीभूत असतो. त्याच्या सृजनशीलतेमुळे जीवनचित्रणास वेगळाच अर्थ प्राप्त होत असतो.

या दृष्टीने ह्या विशाल कालखंडातील स्त्रीचे स्वरूप पाहात असता युगाचे वैशिष्ट्य कोणते होते, त्यातील एकंदर विविधप्रकारच्या हालचालींचा, घडामोडींचा रोख कोणत्या

दिशेने होता हे लक्षात येण्यासाठी ब्रिटिश राजवटीच्या कालखंडात स्त्रीजीवनविषयक जाणिवांच्या व कल्पनांच्या कोणत्या नव्या परिसीमा दृग्गोचर झाल्या हे समजून घेणे आवश्यक होते. पूर्वकालीन साहित्यातील जीवनचित्रणापासून ब्रिटिश राजवटीतील साहित्यातील जीवनचित्रण कसे भिन्न आहे, हे त्या विवेचनाच्या आधारे समजू शकेल.

## पहिल्या पिढीतील सुधारक : भूतदयावादी दृष्टिकोण

यांपैकी विचारात घ्यावयाचा पहिला कालखंड म्हणजे ब्रिटिश राजवटीच्या प्रारंभापासून तो आगरकर, टिळकांच्या उदयकालापर्यंतचा, म्हणजे सामान्यतः इ. स. १८८० पर्यंतचा होय. ह्या कालखंडात आधुनिकतेचा महाराष्ट्रास परिचय करून देणारे प्रमुख विचारवंत व समाजसुधारक म्हणजे लोकहितवादी, ज्योतिराव फुले, न्यायमूर्ती रानडे, व विष्णुशास्त्री पंडित आदी होत. आधुनिक मराठी वाङ्मयातील स्त्रीजीवनाचे हे सारे जण प्रारंभीचे भाष्यकार होत. प्रत्येकाचा दृष्टिकोण भिन्न होता तरी एकत्र्मयावच्छेदेकरून असे म्हणता येते की, महाराष्ट्रीय स्त्रीच्या जीवनातील विविध शल्ये, रूढिग्रस्ततेमुळे तिच्या जीवनाची झालेली परवड, व तिच्या जीवनाला आलेली अगतिकता या गोष्टी, या सर्वांनी आपापल्या परीने व आपापल्या मार्गाने समाजाच्या निदर्शनास आणल्या. पुरुषाच्या व एकंदर समाजाच्या ठायीच्या भूतदयावादी वृत्तीला आवाहन केले. विविध प्रकारच्या युक्तिवाद, वादविवादादी मार्गांनी समाजाची स्त्रीविषयक मनोधारणा बदलण्याचा प्रयत्न केला. पराकोटीच्या परस्वाधीनतेतून बाहेर काढण्यासाठी या सर्वांनी प्रामुख्याने स्त्रीशिक्षणाचा पुरस्कार केला आणि समाजाच्या रूढिग्रस्ततेवर प्रहारही केला.

सतीसारखी मानव्याच्या व व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीने घृणास्पद असलेली चाल बंद होण्यासाठी राजा राममोहन रॉय यांनी प्रयत्न केले. तेथून भारतीय स्त्रीच्या आधुनिक कालातील जागृतीस सुरुवात झाली. स्त्रीच्या दुःखांना प्रभावीपणाने वाचा फोडणारे महाराष्ट्रातील पहिले विचारवंत लोकहितवादी ऊर्फ गोपाळराव देशमुख होत. लोकहितवादींना स्त्रियांची अवनत अवस्था पाहून अपार दुःख होत होते. त्यांच्या उन्नतीच्या उपायांचा विचार करून लोकहितवादींनी बालविवाहप्रतिबंध, विधवाविवाह इत्यादी सुधारणांचा पुरस्कार केला. किंबहुना या कालखंडात स्त्रियांच्या जीवनविषयक प्रश्नांत ह्यान गोष्टींना अतिरिक्त महत्त्व प्राप्त झाले होते. या सुधारणांसाठी समाजाचे मन कसे वळवावे व त्याला या गोष्टी मान्य कशा करावयास लावाव्या हा या कालातल्या सुधारकांपुढचा महत्त्वाचा प्रश्न होता.

लोकहितवादींचे स्त्रीजीवनविषयक विचार आधुनिकतेला अतिशय जवळचे आहेत. ते आजही अनपेक्षित वाटावेत इतके दूरदृष्टीचे आहेत. स्त्रियांच्याविषयीच्या अथांग सहानुभूतीवर ते आधारलेले आहेत. पण त्यांची दृष्टी प्रामुख्याने भूतदयावादीच आहे. त्यामुळे विधवा स्त्रीला कुटुंबात सहानुभूतीने, माणुसकीने वागवावे असे त्यांनी आवर्जून प्रतिपादले आहे.

तथापि स्त्रियांच्या दृष्टीने या काळातला महत्त्वाचा प्रश्न म्हणजे स्त्रीशिक्षण होय. हिंदू समाज मुलींना शिक्षण द्यावे या गोष्टीलाही प्रारंभी अनुकूल नव्हता. सुधारकांना अनेक प्रकारचे युक्तिवाद करून, थोडे पटवून मुलींना शिकविण्याचे महत्त्व समाजाच्या गळी उतरवावे लागले आहे. लोकहितवादी व विशेषतः ज्योतिराव फुले यांचे कार्य या संबंधात विशेष लक्षणीय आहे.

स्त्रियांच्या उन्नतीबाबत वाङ्मयेतर क्षेत्रात अनेक प्रयत्न सातत्याने करणाऱ्यात या काळात न्यायमूर्ती रानडे यांचे कार्य अनोखे आहे. 'स्त्रीविचारवती सभा' यासारखी संघटना त्यांनी अस्तित्वात आणली. राजकीय स्वरूपाचे कार्य करण्यासाठी त्यांनी 'राष्ट्रीय सभा' स्थापन केली, त्या सभेला जोडून सामाजिक परिषद असावी असा त्यांचा आग्रह प्रयत्न होता. यांच्या जोडीलाच आपल्या न्यायक्षेत्रातील विविध प्रकरणांत स्त्रियांच्या हक्कांना मान्यता मिळेल, तिला न्याय मिळेल ही आधुनिक दृष्टी एतद्विषयक निर्णय देताना त्यांनी ठेविली होती. संमतिवयाच्या वादाच्या प्रकरणात तसेच पुनर्विवाहसंबंधी झालेल्या प्रसिद्ध वादविवादात त्यांनी केलेले प्रयत्न उल्लेखनीय आहेत.

## सुधारकांची पुढची पिढी : व्यक्तिस्वातंत्र्यवादी विचार

या मिळांच्या व इतर अनेक सुधारकांच्या प्रयत्नांनी सुशिक्षितांच्या समाज स्त्रियांच्या स्थितीविषयी एक व्यापक सहानुभूती निर्माण झाली होती. सुशिक्षितांचे प्रमाण जसजसे वाढत गेले तसतसे नवनवे विचार पुढे येऊ लागले. केवळ मूलभूतच न थांबता स्त्रीचे काही विशिष्ट व महत्त्वाचे हक्क मान्य झाले पाहिजेत, अशी काही सुशिक्षितांना आवश्यकता वाटू लागली. स्त्रीजागरणाचे काही तात्त्विक अधिष्ठान असावे, या दिशेने उपक्रम सुरू होण्याची अवस्था निर्माण झाली. या दृष्टीने या अवस्थेत आगरकरांचे कार्य लक्षणीय आहे. ते प्रामुख्याने वैचारिक आहे. स्त्री व पुरुष यांच्यात एक प्रकारची समता असावी, जे जे अधिकार पुरुषाला आहेत ते सर्व स्त्रीला प्राप्त व्हावयास हवेत, स्त्री म्हणून कोणतीही बंधी तिच्या वाट्याला जाऊ नये. जीवनातही स्त्रीचे केवळ सहानुभूतीच्या आधारावर नव्हे तर मानाने व हक्काने जगता यावयास हवे; कोणतेही क्षेत्र तिला प्रतिबंधित असता कामा नये, शिक्षणातही कोणत्याही प्रकारचा पक्षपात नसो. थोडक्यात स्त्रीविषयक आजची सारी तत्त्वे महाराष्ट्रात तरी आगरकर-प्रणीत आहेत. या साऱ्या गोष्टींमुळेच आगरकरांबरोबर स्त्रीजीवनविषयक जागृतीचे दुसरे पर्व सुरू झाले असे म्हणता येते.

या अवस्थेत स्त्रीच्या, कौटुंबिक, शिक्षणविषयक, विवाहविषयक हक्कांबरोबर तिच्या सामाजिक व राजकीय हक्कांची, कार्यक्षेत्राची इत्यादी चर्चा सुरू झाली. परंतु स्वातंत्र्या-पासून्या प्रमुख राजकीय हक्काला पुरुषच वंचित झालेला असल्याने आणि स्वराज्य त्याचा परकीय सत्तेशी लढा सुरू झाल्याने, स्त्रियांच्या राजकीय हक्कांना प्रश्न निर्माण होणे शक्य नव्हते. सामाजिक हक्कांबाबतही तेच म्हणता येईल. आपले समाजिक

अधिकार कोणते हा प्रश्न सामाजिक न्यायाचा विचार उद्भूत झाल्यानंतर निर्माण होतो. ती अवस्था अद्याप दूर होती. स्त्रीजीवनविषयक आस्थेची ही सारी चर्चा, प्रामुख्याने मिल, स्पेन्सर आदी आद्य व्यक्तिस्वातंत्र्यवादी विचारवंतांच्या एतद्विषयक विचारांवर आधारलेली होती. सामाजिक हक्कांचा प्रश्न हा समाजवादी विचारांच्या प्रसाराबरोबर जो सामाजिक न्यायाचा आग्रह सुरू होतो त्याच्याशी संबद्ध आहे. ती अवस्था अद्याप दूर होती. अशा परिस्थितीमुळे ह्या कालात विधवाविवाह, बालविवाह, स्त्रीशिक्षण, विवाहविच्छेदनाचा स्त्रीचा अधिकार इत्यादी प्रश्नांनाच महत्त्व प्राप्त व्हावे हे क्रमप्राप्तच होते. या कालातील स्त्रियांचे प्रश्न हे पुनर्विवाह वा शिक्षण ह्यासारख्या आज क्षुल्लक वाटणाऱ्या सुधारणांवर का केंद्रित झाले व त्या प्रश्नांचीही व्याप्ती केवळ पुढारलेल्या वर्गातील (विशिष्ट जमातीतील) स्त्रियांपुरतीच का मर्यादित होती, याचे उत्तर वरील युक्तिवादात मिळू शकेल. सुधारकांचे विचार हे व्यक्तिस्वातंत्र्याच्या मूल्यावर आधारलेले होते. पुढे व्यक्तिस्वातंत्र्याच्या विचाराच्या मर्यादा स्पष्ट झाल्या; व सामाजिक न्यायाची कल्पना जीव धरू लागली. पण हे सारे पुढे स्पष्ट झाले. ती अवस्था १९३० च्या पुढे इकडे आली.

साहित्यविषयक पाहणीच्या दृष्टीने ही अवस्था अतिशय महत्त्वाची आहे. ह्या (१८८० नंतरच्या) कालखंडात व्यक्तिवादी विचारांची मुहूर्तमेढ रोवली गेली (आगरकरांसारख्यांचे तेच महत्त्वाचे कार्य) हे वर पाहिलेच. पुढल्या अवस्थेच्या दृष्टीने (जरी हे व्यक्तिस्वातंत्र्याचे विचार तकलुपी होते, आभासमय होते, तरी) तो कालोचित अशा प्रकारचा आविष्कार होता, तो युगविचार होता हे अमान्य करण्यात अर्थ नाही. ह्या युगविचार असल्याने संवेदनाशील व्यक्तींना त्याचे जबरदस्त आकर्षण असणे क्रमप्राप्त होते. त्यामुळे त्यांच्या ठायीच्या विविध शक्तींना आवाहन पोचले. आपापल्या प्रवृत्तीप्रमाणे, परिस्थितीप्रमाणे त्यांनी आपापली कार्यक्षेत्रे निवडली. आगरकरांच्या प्रवृत्तीला निबंध जवळचा वाटला. हरिभाऊ आपटे यांना कथाकादंबरी हे वाङ्मयप्रकार जवळचे वाटले. श्रीपाद कृष्णांना नाटक विनोद हे प्रकार जवळचे वाटले. व्यक्तिस्वातंत्र्याच्या विचाराचे आवाहन केवळ सुधारकांना पोचले असे नव्हे, तर खाडिलकर, देवल, गडकरी आदी भिन्न भिन्न प्रवृत्तीच्या, प्रकृतीच्या लेखकांनाही पोचले. त्यांच्या ठिकाणची प्रतिमा, सृजनशीलता जागृत झाली व दर्जेदार तेजस्वी असे साहित्य या कालात निर्माण झाले. व्यक्तिस्वातंत्र्याच्या विचाराची ही सारी किमया होय. हे सारे लेखक आंग्लविद्याभूषित असल्याने त्यांच्यापुढे इंग्रजी वाङ्मयातील विविध ग्रंथकारांचा आदर्श असावा हे क्रमप्राप्त होते. केशवसुतांनी शेले मुख्यस्थित आद्य दैवत मानून नव्या विचारांचा प्रत्यय काव्यप्रांतातही आणून दिला.

## हरिभाऊ आपटे : वास्तवाबरोबरच स्त्रीजीवनाचे नवे आदर्श

साहित्याच्या व स्त्रीजीवन चित्रणाच्या दृष्टीने या कालखंडातील अत्यंत महत्त्वाचे ग्रंथकार म्हणजे हरिभाऊ आपटे हे होत. आगरकरांची प्रतिमा चिंतनशील होती

तर हरिभाऊंची प्रतिमा सर्जनशील होती. आगरकरांच्या तसेच मिल, स्पेन्सर आदी विचारवंतांच्या लेखनामुळे, त्यातील युगप्रभावाच्या आवाहनामुळे हरिभाऊंच्या सृजनशील मनात एक नवीनच स्त्रीजीवनविषयक जाणीव निर्माण झाली. त्या नव्या दृष्टीतून त्यांनी आपल्या भोवतालच्या स्त्रीचे जीवन पाहिले व आपल्या प्रतिभेच्या आधाराने ते समूर्त केले. प्रतिभेचे लेणे लाभल्याने ते व्यक्तिस्वातंत्र्याच्या विचाराशी न थांबता मानवतेपर्यंत त्यांची झेप गेली. हरिभाऊंची स्त्रीसृष्टी म्हणजे एक वास्तवाधिष्ठित जग आहे. समकालीन स्त्रीजीवनातील सर्वच प्रवृत्ती त्यांनी साकार केल्या. मुग्ध, दुष्ट, बिचारी, विकारी, हळव्या, प्रेमळ, कजाग, मावश्या, कावेबाज इत्यादी. प्रत्येकीच्या बाबतीत त्यांची सहानुभूती गाढ आहे. हरिभाऊंच्या कादंबरीविश्वातील सर्व वा महत्त्वाच्याही स्त्रीरेखाची पाहाणी करणे येथे अशक्य आहे. पण त्यांच्या दोनतीन स्वभावरेखा (किंवा दोनतीन कादंबऱ्यातील प्रमुख स्वभावरेखा) लक्षणीय आहेत. 'पण लक्षात कोण घेतो' मधील यमुना, दुर्गी, यमूची आई, या तसेच 'मी'मधील तारे, सुंदरी इत्यादी स्वभावरेखा उल्लेखनीय आहेत. या दोन्ही कादंबऱ्यांतून हरिभाऊंनी वास्तवाबरोबरच स्त्रीजीवनाचे विविध नवे आदर्श निर्माण केले आहेत. आदर्श कन्या, पत्नी, माता, समाजसेविका, मैत्रिणी, भगिनी, ह्या तर निर्माण केल्या आहेतच, पण त्या सर्व वास्तवाधिष्ठित असल्याने समाजमानसाची पकड त्यांनी घेतली आहे. मध्यम वर्गातील का होईना समकालीन स्त्री हरिभाऊंच्या प्रतिभेतून साकार झाली, चिरंजीव झाली आहे.

म्हणून मराठी स्त्रीच्या भाष्यकारांत तसेच शिल्पकारात हरिभाऊंचे स्थान फार वरचे आहे. त्यांनी सुशिक्षित पुरुषाच्या मनात आपल्या आईविषयी, बहिणीविषयी, सहचरीविषयी, कन्येविषयी एक व्यापक व अथांग सहानुभूती निर्माण केली आहे. त्याचा परिणाम समकालीनच नव्हे तर उत्तरकालीनांवरही झालेला आहे. स्त्रियांच्या उन्नतीसाठी आपण काही करावयास हवे अशी बुद्धी समकालीनांत निर्माण झाली. भारतरत्न अण्णासाहेब कर्वे हे अशांपैकीच होत. मराठी स्त्रीच्या दृष्टीने पाहता तिला आपले प्रतिबिंब प्रथम वास्तवपूर्ण रीतीने हरिभाऊंच्या कथासृष्टीतच पाहावयास मिळाले. ते विविध व्यक्तींचे वा कुटुंबाचे चित्र असले तरी एका परीने ते समाजाचे चित्र आहे. या ठिकाणी प्रथमच महाराष्ट्रीय स्त्री आपले हृदगत, आपली दुःखे बोलून दाखवीत आहे. तिचे ते हृदगत तिच्या जीवनातून सहजगत्या उत्क्रांत झाले असल्याने आपल्या अंतरंगाचा ठाव घेते. अशा रीतीने पूर्वीच्या काळात पूर्णपणे मूक असणारी अशी स्त्री हरिभाऊंनी जागृत करून तिची दुःखे तिच्या तोंडून वदविली आहेत.

## वामन मल्हारांचे मननीय कार्य

हरिभाऊंच्या नंतरचे स्त्रीजीवनाचे भाष्यकार म्हणजे प्रसिद्ध तत्त्वज्ञ, कादंबरीकार व टीकाकार वामनराव जोशी हे होत. हरिभाऊंच्या वाङ्मयातील स्त्री ही दिवाणाच्या

एका अवस्थेची द्योतक आहे. सामान्यतः इ. स. १९१५-२० पर्यंतच्या कालाचे प्रतिनिधित्व हरिभाऊंनी केले. वामनरावांच्या कादंबऱ्यातील स्त्रीपात्रे आज कित्येकांना वाङ्मयीन दृष्ट्या फारशी प्रत्ययकारी वाटणार नाहीत. पण वामनरावांपुढे चित्रणासाठी असणारी स्त्री ही सुशिक्षित आहे. हाही वर्ग त्यावेळी अल्पसंख्य होता. किंबहुना या वर्गाविषयी समाजात एक प्रकारचे औत्सुक्य होते. बहुसंख्यांचे मत स्त्रीशिक्षणाविषयी अतिशय प्रतिकूल होते. शिक्षणाने स्त्रिया बिघडतात, त्यांच्यामधील स्नेह, शालीनतादी गुण कोळपून जातात, व्यक्तिस्वातंत्र्याच्या जाणिवेने त्यांच्यात वेगळ्याच व्यक्तिगत आकांक्षा निर्माण होतात व पर्यायाने हा वर्ग समाजाला पारखा होतो. अशा प्रकारचे मत अगदी दुसऱ्या महायुद्धाच्या कालापर्यंत जवळजवळ सर्वत्र रूढ होते. ही वस्तुस्थिती लक्षात घेतली तर वामनरावांनी आपल्या 'रागिणी', 'सुशिलेचा देव', 'इंदू काळे आणि सरला भोळे' इत्यादी कादंबऱ्यांनी विशेषतः त्यातील त्यागपूर्ण विवेकी, कोमल अशा प्रमुख स्त्रीपात्रांच्या निर्मितीने मराठी स्त्रियांची व मराठी समाजाची फार मोठी सेवा केली आहे, हे मान्य करावे लागेल. आगरकरांच्या मृत्यूनंतरच्या काळापासून तो महात्मा गांधींच्या उदयापर्यंतच्या दीर्घकालात महाराष्ट्रातला सुधारणावादी विचार मागे पडला होता. राष्ट्रीय वृत्तीच्या नावाखाली टिळकांच्या युगात फक्त परंपरावादच पोसत होता; हे जर लक्षात घेतले तर वामन मल्हारांचे महनीय कार्य डोळ्यात भरल्याविना राहत नाही. 'इंदू काळे आणि सरला भोळे' या कादंबरीत आलेल्या 'स्त्री ही पुरुषाच्या मार्गातली धोंड आहे' या विधानाने तत्कालीन सुशिक्षित समाजाला खूप विचार करावयास लावले होते. त्यांची सरला, इंदू, काशी ही पात्रे अमर आहेत.

इ. स. १९३० नंतर महाराष्ट्रात समाजवादी विचार वाटीला लागायला सुरुवात झाली. ह्या विचारामुळे जीवनाच्या आर्थिक, सामाजिक, राजकीय, नैतिक इत्यादी क्षेत्रांतील रूढ विचारांचे, संकेतांचे, बंधनांचे पुनर्मापन सुरू झाले. त्याचा परिणाम स्त्रीजीवनविषयक जागृतीला एक वेगळीच कलाटणी मिळण्यात झाला. स्त्रियांचा लढा हा पुरुषांविरुद्ध नसून दलितांचा स्वतःच्या हक्कासाठी जो लढा सुरू आहे, त्याचा एक भाग आहे, असे नवे अधिष्ठान स्त्रीजागृतीच्या चळवळीला मिळाले. सर्व समाजातच एकप्रकारची जागृतीची लाट निर्माण झाली. समाजवादी विचाराच्या नेतृत्वाखाली स्त्रीजागृतीची चळवळ त्यातच एक प्रवाह म्हणून सामावली गेली.

तथापि व्यापक, सखोल, मूलभूत स्वरूपाचे असे सामाजिक चिंतन मोठ्या प्रमाणात सुरू झाले. त्यात उलटसुलट विचारही मोकळेपणाने पुढे आले. समाजवादी विचाराच्या या प्रारंभकाळी निर्माण झालेल्या विविध वाङ्मयीन व सामाजिक प्रवृत्तींचे जर अवलोकन केले तर या नव्या कालखंडात स्त्रीजीवनाच्या कोणत्या प्रश्नांना, समस्यांना, जाणिवांना महत्त्व प्राप्त झाले याची कल्पना येऊ शकेल. या विविध प्रवृत्तींच्या प्रातिनिधिक लेखकलेखिकांत वामनरावांबरोबर डॉ. केतकर, विभावरी शिरूरकर, प्रो. फडके, खांडेकर, माडखोलकर, वरेरकर, वा. वि. जोशी आदी अनेकांचा समावेश करावा लागेल. त्यांनी

आपल्या ललित लेखनाच्या द्वारे स्त्रीजीवनाचे जे चित्रण केले त्याच्या स्थूल अवलोकनाने महाराष्ट्रीय स्त्रीची झेप कोठपर्यंत आली होती, याची कल्पना येऊ शकेल.

## डॉ. केतकर : स्त्रीजीवनाचे व्यापक दर्शन

वामन मल्हाराचे समकालीन डॉ. केतकर यांनी आपल्या कादंबऱ्यांमधून स्त्रीजीवनाचे वैशिष्ट्यपूर्ण चित्रण करून मराठी समाजाला व सुज्ञ माणसांना स्त्रीजीवनाविषयी वेगळ्या दृष्टीने विचार करावयास लावले. डॉ. केतकरांचे व्यक्तित्वच वेगळ्या प्रकारचे होते. ते समाजशास्त्राचे अभ्यासक होते. परदेशात राहून त्यांनी त्याविषयीचे शिक्षण घेतले होते. त्यामुळे त्यांच्या कादंबऱ्यांत त्यांनी काही प्रश्न अधिक व्यापक स्वरूपात मांडले. हरिभाऊंनी स्त्रीचे क्षेत्र कुटुंब हे मानले व त्याच्या पार्श्वभूमीवरच स्त्रीचे जीवन चित्रित केले. डॉ. केतकरांनी स्त्रीजीवनाचे अधिक व्यापक दर्शन घडविले. समाजाच्या विविध थरांतील, विविध व्यवसायांतील, विविध प्रवृत्तींच्या स्त्रियांचे जीवन चित्रित करून अनेक विषयांवर समाजाला विचार करावयास लावले. वेश्या, कलावंतिणी अशा वर्गांचे जीवन त्यांनी अतिशय सहानुभूतीने रंगविले. त्यांच्या जीवनात काही उदात्तता आहे, काही श्रेष्ठ नीती आहे हे त्यांनी दाखवून दिले. अनुलोमावरचारखा प्रश्नही काही कादंबऱ्यांतून त्यांनी धीटपणे मांडला आहे. मराठी स्त्रीच्या जीवनाची व्याप्ती केतकरांनी खूप वाढविली. वैजनाथस्मृतीसारखी 'स्मृती' रचून एका अभिनव समाजनीतीचे सूतोवाचही त्यांनी एका कादंबरीत (ब्राह्मणकन्येत) केले आहे. तीतील विचारांची झेप आजही दिपवून टाकणारी आहे. वामन मल्हार जोशी व डॉ. केतकर यांच्या कादंबऱ्यांनी व त्यांतील चित्रणाने स्त्री व पुरुष यांच्यामधील जीवनध्येये, कार्यकक्षा इत्यादींबाबतचे अंतर गळून पडले. दोघांची ध्येये, समस्या, नैतिक धारणा ही समान झाली. मराठी स्त्रीच्या जागृतीमधला फार मोठा टप्पा गाठला गेला. स्त्री ही केवळ मानवदेहधारी प्राणी, भोगदासी न राहता तिचे काही व्यक्तित्व आहे, हक्क आहेत, तिची कर्तव्ये पुरुषाइतकीच व्यापक आहेत ही गोष्ट समाजाच्या गळी उतरविली गेली. विचारवंतांनी जे काम सुरू केले होते त्याला या थोर कथाकारांनी आपल्या कथा-कादंबऱ्यांतील चित्रणाद्वारे व्यापक सामाजिक व नैतिक अधिष्ठान प्राप्त करून दिले.

## स्त्रीला बोलके केले

वामनराव जोशी, डॉ. केतकर यांच्या लिखाणाने, समाजवादी विचारांच्या उद्भवाने व प्रसाराने, डॉ. अण्णासाहेब कर्वे यांच्या प्रयत्नाने प्राप्त होत असलेल्या शिक्षणाने, तसेच महात्मा गांधींच्या स्त्रीविषयक सहानुभूतिपूर्ण धोरणाने भारतीय — विशेषतः महाराष्ट्रीय — स्त्रीच्या ठिकाणी वेगळीच अस्मितेची जाणीव निर्माण झाली. तिला स्वतःची दुःखे स्वतःच्या भूमिकेवरून स्वतःच्या शब्दांत, स्वतःच्या पद्धतीने बोलून दाखवावी अशी फार प्रबळ इच्छा निर्माण झाली. ती विभावरी शिरूरकर यांच्या तेजस्वी

साहित्याने मुखरित झाली. त्यामुळे मराठी स्त्रीच्या साकारतेत विभावरी शिरूरकरांच्या साहित्याला फार महत्त्वाचे स्थान आहे. त्यांचे लेखन विस्ताराच्या दृष्टीने, तुलनेने अल्प पण त्यातील आशयाच्या दृष्टीने अतिशय सघन असल्याने त्यावेळी ते घरेच गाजले. जी सुशिक्षित स्त्री हरीभाऊंनी कल्पनेने पाहिली, जिच्यापुढील नवध्येयांचे व प्रमुख मूलभूत समस्यांचे चित्रण वा. म. जोशी व डॉ. केतकर यांनी केले, तिचीच दुःखे, वेदना, आवेग, विविध नव्या समस्या, ही विभावरींनी साकार केली. स्त्रीच्या विकासक्रमातील ही पुढची व फार महत्त्वाची पायरी होय.

सुशिक्षित स्त्रीपुरतेच त्यावेळपर्यंतचे चित्रण मर्यादित होते. याचे कारण वाङ्मयाचा वाचक असा हाच वर्ग होता. त्याला आपलेच जीवन परिचित असणे व आपलेच प्रश्न महत्त्वाचे वाटणे स्वाभाविक होते. लेखकही याच वर्गातून पुढे येत असल्याने दीर्घकाल अशी परिस्थिती राहणे स्वाभाविक होते. तथापि आतापर्यंत झालेल्या वैचारिक जागृतीचा परिपाक म्हणून म्हणा, अगर अन्य प्रवृत्तींचा उद्भव म्हणून म्हणा वाङ्मयात स्त्रीचे जीवनचित्रण जरी मध्यमवर्गीयांपुरते अगर सुशिक्षित स्त्रीपुरतेच मर्यादित असले तरी ते, जीवनचित्रण अपुरे आहे, एकांगी आहे, बरेचसे काल्पनिकही आहे याची जाणीव वाचकांना तसेच लेखकांनाही झाली होती. तथापि त्यांच्यावरील संस्कारांमुळे, त्यांच्यापुढील वाङ्मयीन आदर्शांमुळे आहे तीच परिस्थिती काही काल चालणे अपरिहार्य होते. आपल्या मर्यादांची जाणीव ठेवून त्याच्याबाहेर पडण्याचा प्रयत्न जर कोणी केला असेल तर तो वि. स. खांडेकरांनी होय. खांडेकरांनी प्रामुख्याने मध्यमवर्गीय स्त्रीचेच जीवन चित्रित केले, तरी समाजजीवनातील विविध प्रकारच्या संघर्षात्मक पार्श्वभूमीचा त्यांना कधीच विसर पडला नाही. स्त्रीला समाज-वादाभिमुख करून समाजातील आर्थिक, सामाजिक, राजकीय, धर्मीय संघर्षांची जाण मराठी स्त्रीच्या कक्षेत आणून ठेवण्याचे कार्य खांडेकरांनी फार चांगल्या रीतीने केले आहे. समाजवादी, गांधीवादी ध्येये, त्यांच्यामधील विरोध लेखकाने समजून घेतली, जाणून घेतली व त्यांच्यामधील लेखकाने ती चित्रित केली. त्यात लेखकास कितपत स्वातंत्र्य लाभले, यश लाभले हा प्रश्न चिंतनास अवसर देणारा असला तरी लेखकाच्या ठायीचा ध्येयात्मक आक्षेप, उदात्त व्यापक सहानुभूती, मानवता व एक प्रकारची अदम्य तळमळ यामुळे खांडेकरांनी स्त्रीला पुष्कळच बोलके केले आहे. महाराष्ट्रीय स्त्रीच्या विकासात त्यांना विशिष्ट स्थान आहे.

खांडेकरांच्या बरोबरीने प्रा. फडके व माडखोलकर यांचा विचार करणे योग्य होईल. आपल्या कादंबऱ्यांतून विविध प्रवृत्तींची अनेक पात्रे रंगवूनच हे कादंबरीकार थांबले नाहीत, तर काही स्त्रीजीवनविषयक समस्या सर्जनशीलतेच्या पातळीवरून मांडण्याचा प्रयत्न या लेखकांनी केला आहे. सुशिक्षित स्त्री आर्थिक दृष्ट्या जरी स्वावलंबी झाली तरी तिच्या जीवनातील इतर अनेक प्रश्न अनुत्तरितच राहतात. 'उद्धार' व 'भग्नलेले देऊळ' या कादंबऱ्यांच्या नायिकांच्या व्यथा चित्रित करून फडके व माडखोलकर यांनी

आपली समाजमनस्कता सिद्ध केली आहे. तर वा. वि. जोशी यांनी कायद्याच्या पातळीवरून कादंबरीतील जीवनचित्रण केले.

## वरेरकर : झगडणाऱ्या स्त्रीचे आगळे दर्शन

मराठी स्त्रीच्या वाङ्मयीन चित्रणात कै. भा. वि. ऊर्फ मामा वरेरकर यांना वैशिष्ट्यपूर्ण स्थान द्यावे लागेल. वरेरकरांची साहित्यविषयक, जीवनविषयक व विशेषतः स्त्रीजीवनविषयक विशिष्ट मते होती. त्यांच्या साहित्यातील जीवनचित्रणाची मीमांसा करताना त्यांच्या मतांचा मागोवा घेणे अत्यावश्य होईल. वरेरकरांनी निर्माण केलेली स्त्री ही सर्वाहून आगळी वेगळी आहे. जीवनाच्या संघर्षात ती अतिशय निर्धाराने सिद्ध झालेली आहे. कितीही संकटे आली तरी निराशा, रडत हे तिला माहीत नाही. वरेरकरांनी स्त्रीचे चित्रण सहानुभूतीने केले, पण हळवेपणाने केले नाही. स्वतःच्या व्यक्तिगत हक्कांच्या संरक्षणासाठी वरेरकरांनी निर्मिलेली वाङ्मयीन स्त्री सिद्ध झालेली आहे. जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत तिने पुरुषाच्या बरोबरीने स्थान स्वकर्तृत्वाने पटकाविले आहे. केवळ नोकरी नव्हे तर व्यापार, उद्योग, स्वतंत्र व्यवसाय इत्यादी क्षेत्राचाही तिने स्वीकार केला आहे. व्यक्तित्वाला प्रतिष्ठा प्राप्त झाल्यावर स्त्रीने कसे वागणे शक्य आहे, ह्याचे दर्शन वरेरकरांच्या प्रतिभेला कितीतरी पूर्वी घडलेले आहे. स्त्री म्हणजे केवळ मार्दव, सौंदर्य, हळवेपणा, कारुण्य यांची मूर्त अशी ज्यांची समजूत झाली आहे, त्यांना वरेरकरांचे जीवनचित्रण कमालीचे आक्षेपार्ह वाटणे स्वाभाविक आहे. या आक्षेपात काही तथ्य आहे हे मान्य करूनही महाराष्ट्रीय स्त्रीच्या जीवनविकासाचे एक आगळेवेगळे आविष्करण वरेरकरांच्या लेखनात झाले आहे, हे अमान्य करता येणार नाही. ज्या स्त्रीला न्याय मिळावा म्हणून हरिभाऊंनी महाराष्ट्रीय पुरुषांच्या दयेच्या स्नेहशीलतेस आवाहन केले, वामनरावांनी व डॉ. केतकरांनी ज्या स्त्रीच्यापुढे कालोचित नवीन ध्येये, कर्तव्ये मांडून त्यांच्यासाठी जीवन कंठण्यास बद्धपरिकर केले, शिक्षण घेतल्यानंतर तिच्या ठिकाणी ज्या नव्या जाणिवा झाल्या, जे नवे जीवन व मावसंघर्ष तिच्या वाट्याला किंवा वाट्यास आले त्याचे प्रतिबिंब प्रा. फडके, खांडेकर, माडखोलकर आदी अनेकांच्या ललितसाहित्यातून उमटले; त्याच स्त्रीच्या जीवनभागाचा एक पैलू वरेरकरांनी आपल्या लेखनातून साकार केला आहे.

स्वातंत्र्यकालातील साहित्यातील स्त्रीजीवनाची पाहणी करताना अनेक गोष्टी विचारात घ्याव्या लागतात. वाङ्मयेतिहासातील कालखंड हे काटेकोरपणे घ्यायचे नसतात, तसे शक्य नसते. कोणतेही कालमान अगर कोणताही कालखंड घेतला तरी त्यात पूर्वकालीन प्रवृत्ती जिवंत असतातच. जुन्या पिढीतील लेखकांची मनोधारणा अगोदरच्या कालखंडातच निश्चित झालेली असते. नव्या प्रवृत्तीचा विशेषसा परिणाम त्यांच्यावर जाणवत नाही. प्रा. फडके, खांडेकर, वरेरकर आदी लेखक याच प्रकारचे होत. त्यांच्या मनाची ठेवण, जीवनविषयक तत्त्वज्ञान, साहित्यविषयक भूमिका इत्यादी पूर्वकालीन परिस्थिती, संस्कार

इत्यादींचा परिणाम होऊन ठरलेली असणे स्वाभाविक आहे. नव्या प्रवृत्तींची किंवा जाणिवांची बीजे नव्या परिस्थितीत असू शकतात. त्यातील काही प्रवृत्ती प्रयोगावस्थेत अस्फुट असतात तर काही स्थिरावयाच्या असतात. काही प्रवृत्तींमागे एकप्रकारची सखोल चिंतनशीलता असते. उलट कित्येक वेळा त्या केवळ अनुकरणाने आलेल्या असतात. समाजाची विशिष्ट विकासावस्था तसेच विवक्षित वाङ्मयीन ध्येयेही प्रभावीपणाने आपला संस्कार त्या प्रवृत्तींवर उमटवू शकतात. पण या सर्व गोष्टींच्या संमिश्र म्हणजेच गुंतागुंतीच्या प्रभावामुळे वाङ्मयातील जीवनचित्रणाची तऱ्हा या प्रकार तपासणे वगळीचे विवाद्य तसेच केवळ तर्काच्या स्वरूपाचे होऊ शकते. काळाच्या जवळ असल्याने अभ्यासकालाही तटस्थ किंवा भयस्थपणाची भूमिका घेणे कठीण होते. जो जो आपण आपल्या काळाच्या जवळ जवळ येत जातो, तो तो जीवनचित्रणातील व्यापकपणा एवढ्या प्रचंड प्रमाणात वाढलेला असतो की त्याचे विवेचन वा विवरण करणे कठीण होते.

## स्वातंत्र्योत्तर काळ : विषमतेचा अस्त

स्वातंत्र्योत्तर म्हणजेच आजकालच्या वाङ्मयातील स्त्रीजीवनाच्या चित्रणाचे स्वरूप तपासतांना अशा प्रकारच्या अनेक अडचणी येतात. महाराष्ट्रीय स्त्रीने जीवन-विकासाचा जो पल्ला गाठला आहे त्याचाही विचार करणे अवश्य आहे. स्त्रीपुरुषांमधली विविध प्रकारची अंतरे या काळात मळून पडलेली स्पष्टपणे दिसून येतात. नागरिक राजकीय, सामाजिक इत्यादी सर्व प्रकारचे हक्क प्राप्त झाल्याने एक वेगळेच वातावरण निर्माण झालेले आहे. थोडक्यात ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या आगमनाबरोबर जी प्रक्रिया सुरू झाली ती या कालखंडात पूर्णावस्थेस गेली असे म्हणता येईल. या व यापुढच्या काळात स्त्रीपुरुषांची ध्येयात्मक, कार्यात्मक, नैतिक इत्यादी क्षेत्रातील विभिन्नता संपूर्णतया तत्वतः व बव्हंशाने प्रत्यक्षात निकालात निघालेली आहे, असे दिसून येते. म्हणजे स्त्रीची, समाजजीवनातील एक घटक, व्यक्ती, जाणीवपूर्ण नागरिक या दृष्टीने विविध प्रकारची मूर्ती साहित्यात यापुढे साकार होऊ लागली. तिच्या जीवनाची जडण-घडण ही संपूर्णतया बदलल्याने तिच्यापुढील प्रश्न व पुरुषापुढील प्रश्न यांतील काटेकोर भिन्नता यापुढे नष्ट झालेली दिसते. निदान पुष्कळ प्रमाणात कमी झालेली आहे त्यामुळेच तिच्या जीवनचित्रणातली व्यापकता, सखोलता लक्षणीयतेने वाढलेली दिसते.

ब्रिटिश राजवटीतील विशिष्ट इतिहाससिद्ध विकासक्रमामुळे स्वातंत्र्यकालाच्या आगमनापर्यंत स्त्रियांचे प्रश्न म्हणजे केवळ मध्यमवर्गीय स्त्रियांचे प्रश्न होत असे एक समीकरण होते. डॉ. केतकरांसारख्यांनी त्यावर आक्षेप घेऊन ते व्यापक करण्याचा प्रयत्न केला तरी परिस्थितीत फारसा फरक पडलेला नाही. याचे कारण या वाङ्मयाचा वाचक वा लेखक हा प्रामुख्याने सुशिक्षित वर्गातीलच होता. त्याचे लक्ष स्वतःवरच केंद्रित झालेले होते. स्वातंत्र्यकालात समाजाच्या सर्वच थरांना एक विलक्षण चैतन्ययुक्त अशी जाग येत आहे. विविध समाजस्तरातून लेखक-लेखिका पुढे येत आहेत. त्यामुळे

साहित्यातील जीवनचित्रणाचा कल वाढत आहे. अण्णाभाऊ साठे, शंकरराव खरात, उद्धव शेळके, शंकर पाटील, दल्हार, नेमाडे, रणजीत देसाई इत्यादींचे साहित्य या दृष्टीने लक्षणीय आहे. इतर गोष्टींबरोबर या विशिष्ट प्रकारच्या लेखकांच्या लेखणीतून उतरलेले स्त्रीजीवनचित्रणही बरेच रेखीव आहे असे म्हणता येईल.

## आजच्या लेखकांचा आत्मकेंद्रित व्यक्तिवाद

आजच्या स्त्रीपुढील विविध समस्यांचे चित्रण आजच्या वाङ्मयात होत आहे काय? हा या संदर्भात विचारात घेण्यासारखा प्रश्न आहे. याचे उत्तर पूर्णपणे होकारार्थी देता येणे अशक्य आहे. असे का व्हावे, हे शोधावयास गेले तर त्याचे उत्तर आज सर्वत्र रूढ असलेल्या विशिष्ट वाङ्मयीन ध्येयवादात, तसेच बहुसंख्य लेखक-लेखिकांच्या विकसित आत्मकेंद्रित व अतिरिक्त व्यक्तिवादी प्रवृत्तीत सापडेल. आजचे साहित्य हे लेखकांकडून प्रामुख्याने साहित्य म्हणूनच निर्माण होत आहे, व तसेच ते निर्माण व्हावे असा विचार आज चांगलाच बद्धमूल झाला आहे, आणि त्याला तसा विरोध करण्याचे काही कारण नाही. पण साहित्याचे साहित्यत्व कशात असते? ते सभोवती असलेल्या जीवनदर्शनात असते, का लेखकात प्रकट होत असलेल्या मानसिक कोलाहलात असते? आजच्या बहुसंख्य लेखकांचे मत दुसऱ्या बाजूने पडेल. आज व्यक्तिवादाला व त्यातही आत्मकेंद्रित व्यक्तिवादाला उधाण आले आहे. हा व्यक्तिवादही आमच्या जीवनातून निर्माण झालेला नाही तर परकीय वाङ्मयाच्या अनुकरणात त्याची बीजे आहेत. तो समाजविन्मुखच आहे. त्यामुळे राज्यसंस्थेने समाजवादी समाजरचनेचे ध्येय पुढे ठेवलेले आहे, पण बहुसंख्य लेखकांना त्याचे आवाहन पोचत नाही. त्याऐवजी आत्मकेंद्रित व्यक्तिवादच त्यांना जवळचा वाटतो. कारण त्यांच्यापुढे ठेवल्या जाणाऱ्या वाङ्मयीन ध्येयवादाला तो जवळचा आहे. पूर्ण विकसित देशांना कदाचित हे आक्षेपार्ह वाटणार नाही, पण आमच्यासारख्या अल्पविकसित देशाला ही जीवनविन्मुखता कशी भोव व किती काळ परवडणार आहे याची शंका वाटते. यामुळे सामाजिक दृष्टीतून विचार करणारे विचारवंत तरी आज चिंताक्रांतच झालेले आहेत.

आजच्या साहित्यात जीवनचित्रण विशेषतः समाजजीवनचित्रण हे विरळ्याने येते. समाजाच्या निरनिराळ्या थरांतील व्यक्तींचे चित्रण आजच्या कथा-कादंबरीत येते. नाही असे नाही. पण ते सारे चित्रण केवळ पार्श्वभूमीरूप आलेले असते. लेखकाला त्याबाबत आग्रहाने काहीही म्हणावयाचे नसते, प्रतिपादावयाचे नसते. त्याचा भर प्रामुख्याने मानसिक आंदोलनांवर, पात्रांच्या अन्तर्यामातल्या मानसिक ठेवणीवर, विविध प्रकारच्या मानसिक संघर्षांवर वा क्लिष्ट विकृतिचित्रणावर असतो. त्यांच्याकडे लक्ष केंद्रित व्हावे म्हणूनच सामाजिक किंवा तत्सम पार्श्वभूमी आलेली असते. समाजजीवन वा तत्सम जीवनचित्रण करणे हे आजच्या कथाकारांचे उद्दिष्ट नाही. साहित्यात सर्वत्र वातावरणच असे आहे की, साहित्यातून सामाजिक जीवनचित्रणासारखी

काही अपेक्षा करणे हे नुसते सनातनीपणाचेच नव्हे तर अडाणीपणाचे लक्षण गणले जाते. त्यामुळे आजकाल सामाजिक-समस्याप्रधान काव्य, कथा, कादंबरी, नाटके जवळ जवळ निर्माणच होत नाहीत. साहजिकच स्वातंत्र्यकाळात स्त्रीजीवनचित्रणाकडे, स्त्रियांच्या जीवनातील प्रमुख व खऱ्या समस्यांकडे लेखकाचे जवळ जवळ दुर्लक्ष होत आहे असे दिसते. समाजजीवनाचा व साहित्याचा केवळ पार्श्वभूमीपलीकडे कसलाही संबंध नसतो, अशा प्रकारच्या विचारांचा स्वीकार या प्रकारच्या वाङ्मयामागील प्रवृत्तीच्या मुळाशी आहे. समाजजीवनाचे चित्रण करणे हा लेखकाचा हेतू नसतो, पण समाजजीवनाचे स्वतःला दिसलेले स्वरूप तो विवेकाने दाखवीत असतो (निदान दाखवावे). त्यातून नकळत समाजपरिवर्तनाची नवी दिशा दृग्गोचर होते. अर्थात हा कलाकृतीपासून होणाऱ्या परिणामांचा भाग असतो. पण तो अत्यंत महत्त्वाचा असतो.

आजच्या कथाकादंबरी या वाङ्मयप्रकारांतून मनाच्या निरनिराळ्या व्यथा, विवंचना, विविध अनुभव इत्यादी गोष्टींना प्राधान्य असते. त्याच्या अनुषंगाने आलेले जीवनचित्रण इतके व्यक्तिनिष्ठ असते की त्यामागील सामाजिक जीवनातील विशिष्ट समस्यांचा पूर्ण संकोच होतो. साहजिकच त्या जीवनचित्रणाला कोणतेही प्रातिनिधिक स्वरूप असत नाही. इतके की या भागाबाबत लेखक पूर्णपणे उदासीन असावा असेही कित्येक वेळा वाटते. 'रथचक्र' ही अलीकडच्या काळातील एक गाजलेली कलाकृती, विशेष म्हणजे स्त्रीजीवनाला प्राधान्य असलेली कादंबरी. पण कादंबरीतल्या प्रमुख व्यक्तिरेखा पराकाष्ठा आत्मनिष्ठ आहेत की त्या सामाजिकता पूर्णपणे हरवून बसल्या आहेत. या कादंबरीतील पात्रांची दुःखे, वेदना, विवंचना ह्या सर्व त्यांच्या व्यक्तिगत आहेत. त्यांना काही सामाजिक कारणे आहेत, ती विशेष लक्षणीय आहेत, असे लेखकाला वाटत नाही. आजच्या लेखकांमधील ही एक प्रबल प्रवृत्ती.

ह्या प्रवृत्तीच्या प्रभावामुळे असे दिसते की, आजच्या कथाकादंबऱ्यांतून स्त्रीजीवन-विषयक प्रश्नांना कोणतेही महत्त्वाचे असे स्थान राहिलेले नाही. कारण कलाकाराच्या चिंतनाचे विषयच वेगळे झालेले आहेत. आजचे वाङ्मय पाहून ह्या देशातील सारे सामाजिक व स्त्रीजीवनविषयक प्रश्न सुटलेले आहेत, आता उरलेले आहेत ते विविध मानसिक वा मनोवैज्ञानिक ज्ञानाच्या आधारे उलगडणारे विविध प्रश्न किंवा संघर्ष; हे अर्थातच सदैव तसेच राहणार आहेत; मानवजातीचे ते प्रारंभापासूनचे सांगाती आहेत, व पुढेही अनंतकाळ तसेच ते राहणार आहेत; अशी एकप्रकारची कल्पना होते. ही प्रतिक्रिया कितपत वास्तव आहे, व ती होणे योग्य आहे काय? हा विचारात घेण्यासारखा प्रश्न आहे.

## मराठी स्त्रीच्या भाष्यकारांची परंपरा कुंठित?

त्यामुळे हरिभाऊ आपटे, वा. म. जोशी, डॉ. केतकर, मामा वरेरकर, खांडेकर, विभावरी शिरूरकर आदी लेखक-लेखिकांनी निर्माण केलेली विशिष्ट परंपरा आज खंडित

झाली आहे असे वाटते. कित्येकांना असेही वाटते की, या ग्रंथकारांनी निर्माण केलेले प्रश्न, समस्या काल्पनिक होत्या. वास्तवात त्यांना स्थान नव्हते. तेव्हा त्यांची वासलात अर्थात लागावयाची. तसेच विविध राजकीय, सामाजिक सुधारणांनी पूर्वीचे स्त्रीजीवन-विषयक प्रश्न जवळजवळ सर्व सुटले आहेत. उरलेल्या आहेत त्या व्यक्तिगत विवंचना व दुःखे. हे दोन्ही युक्तिवाद वास्तवाधिष्ठित आहेत काय हे ज्याचे त्याने ठरवावे.

तथापि वाङ्मयाकमित्र दृष्ट्याही कधीही पडत असतात. तसेच येथे आहे. अर्थात येथेही सामाजिक भेदाभेद आढळतो. मागासलेल्या व उपेक्षित लोकांचे जीवन अण्णाभाऊ साठे, शंकरराव खरात, उद्धव शेळके आदी लेखक एक प्रकारच्या पोटतिडिकेने वर्णन करीत आहेत. त्याचप्रमाणे डॉ. इरावती कर्वे, मालतीबाई दांडेकर, डॉ. सुमती क्षेत्रमाडे, विजया राजाध्यक्ष, शांता शेळके, दुर्गा भागवत, वसुंधरा पटवर्धन, डॉ. सरोजिनी बाबर आदी लेखिकांकडून स्त्रीजीवनाचे विविध प्रश्न, विविध संघर्ष मोठ्या ताकदीने व सूक्ष्मतेने चित्रित होतात, चर्चिले जातात. तसेच सखोल सामाजिक चिंतन विभावरींच्या लेखनात दिसून येते. त्यांच्या स्त्रीचे दुःख व्यक्तिगत असून पूर्णपणे सामाजिकही आहे. या दृष्टीने 'रथचक्र' व 'शबरी' या दोन प्रमुख स्त्रीजीवनविषयक कादंबऱ्यांची तुलनात्मक पाहाणी चांगलीच उद्बोधक होईल. आजचे बहुसंख्य लेखक व लेखिका आत्मनिष्ठ भूमिकेवरून लेखन करीत असल्याने व्यक्तिगत सुखदुःखे, आशानिराशा, विवंचना इत्यादींना काही सामाजिक अंग वा अधिष्ठान असते, ही गोष्ट त्यांच्याकडून पूर्णपणे दुर्लक्षित होत आहे. त्यामुळे बऱ्याच प्रमाणात विकृत व एकांगी जीवनचित्रण आजच्या कथाकादंबऱ्यांतून होत असते. मागासलेल्या वर्गांतून आलेल्या लेखकांना हे परवडणे शक्य नसते. पण वाङ्मयीन वातावरणात ह्या गोष्टींना एवढे महत्त्व प्राप्त झालेले आहे की तेही विशेष अलिप्त नसतात. तथापि त्यांच्या लेखनातूनच उद्याच्या श्रेष्ठ साहित्याची पाऊलवाट जाणार आहे असे दिसते.

त्यामुळे सामाजिक दृष्टीने पाहता आजच्या स्त्रीचे जीवन थोडेसे प्रगत पण निरनिराळ्या प्रकारच्या कौटुंबिक, सामाजिक, व्यक्तिगत समस्यांनी पूर्णपणे ढवळून गेले आहे. वाङ्मयात तिच्या दुःखाला वाचा प्रामुख्याने प्रमुख लेखिकांकडूनच फुटते, कित्येकदा ती अतिशय हृद्यही असते, पण विशिष्ट साहित्यविषयक भूमिकेमुळे त्याचे जीवनचिंतन कोठेतरी कमी पडत आहे, अशी जाणीव होते. हरिभाऊ आपटे, वा. म. जोशी, डॉ. केतकर, मामा वरेरकर, खांडेकर, विभावरी शिरूरकर या मराठी स्त्रीच्या भाष्यकारांची परंपरा आज कुंठित झाली आहे, असे म्हणणे फारसे चूक होणार नाही.

कादंबरीचे क्षेत्र सोडून नाट्याचे क्षेत्र घेतले तरी आपणास हेच आढळून येते. देवल, गडकरी, कोल्हटकर यांच्यानंतर वरेरकर, आचार्य अत्रे, रांगणेकर, मुक्ताबाई दीक्षित, मालतीबाई बेडेकर इत्यादि कालच्यापरवाच्या पिढीतल्या नाटककारांनी मराठी स्त्रीच्या जीवनातील कित्येक समस्या आपापल्या नाटकातून मुखरित केल्या आहेत. तशा प्रकारचे प्रयत्न आज होताना दिसत नाहीत. नाट्यवाङ्मयाला आज विशेष बहर

आलेला आहे. प्रयोगांच्या आकड्यावरून त्यांच्या लोकप्रियतेचे मोजमाप करता येईल. पण वाङ्मयीन गुणांच्या दृष्टीने व विशेषतः सामाजिक आशयाच्या दृष्टीने आजचे नाट्यही मराठी नाटककारांनी निर्माण केलेली परंपरा हरवून बसले आहे की काय अशी शंका यावी अशी एकंदर परिस्थिती आहे.

काव्याच्या बाबतीत तर परिस्थिती अधिकच स्पष्ट आहे. केशवसुतांच्या तुतारीत स्त्री दास्यमुक्तीला महत्त्वाचे स्थान होते. त्यांच्या संप्रदायातील कवींमध्ये तसेच नंतरच्या रविकिरण मंडळाच्या कालखंडात माधवराव पटवर्धन, गिरीश, यशवंत, इत्यादी सर्व कवींच्या ठिकाणी याबाबत जागरूकता स्पष्टपणे दिसत होती. कुसुमाग्रज, अनिल, बोरकर इत्यादींच्या काव्यात एक प्रकारच्या उदात्ततेत व मानवतेत तिचे रूपांतर झाले. पण आजच्या काव्यात पडणारे स्त्रीमनाचे प्रतिबिंब इतके क्षुद्र आहे की वरील वाङ्मय-प्रकारासारखीच परिस्थिती याही ठिकाणी आहे. संजीवनी मराठे यांची 'स्त्री माझे नाव असे' अशा कवितेचा अपवाद विरळाच.

मराठी लघुकथा ही या गोष्टीस अपवाद आहे असे कित्येकांना वाटते. पण या अपवादभूततेत लेखकाच्या स्वभाव मनुष्य इत्यादींपेक्षा लघुकथेचे विशिष्ट स्वरूपच जबाबदार आहे. तरीही मामा वरेरकरांसारखा वारंवार नवे सामाजिक विषय शोधणारा वा समस्याप्रधान कथा लिहिणारा कथाकार आज प्रयत्नाने शोधावा लागेल.

## सामाजिक चिंतनातून वाङ्मयाची निर्मिती नाही

हे असे का ? याचे उत्तर आजच्या वाङ्मयीन ध्येयवादात आहे, हे वर आलेलेच आहे. त्यामुळे असे झाले आहे की, पर्वतातून उगम पावलेली एखादी नदी नित्यानु-भवाप्रमाणे एखाद्या दुसऱ्या नदीस अगर समुद्रास न मिळता तिचा सारा प्रवाह एखाद्या वाळवंटात जिरून जावा तसा प्रकार मराठी वाङ्मयातील स्त्रीजीवनाविषयक परंपरेबाबत झाला आहे. स्वातंत्र्यप्राप्तीच्या कालापर्यंत स्त्रीने सारे अधिकार प्राप्त करून घेतले; पण पुढे काय ? याचे उत्तर हे असे मन खिन्न करणारे मिळते.

यात कोणालाही दोष देण्याचा हेतू नाही. प्राचीन मराठी वाङ्मयात आध्या-त्मिकतेला विशेष स्थान आहे. पण आजच्या कवितेत ते पाहावयास लागले तर जसे काही प्रयत्न येईल तसेच येथे झाले आहे. स्त्रीजीवन त्यातील विशिष्ट समस्या ह्या आजच्या काळातील लेखक-लेखिकांच्या तसेच बहुसंख्य वाचकांच्याही चिंतनाचा वा अपेक्षेचा विषय राहिला नाही. हरिभाऊ आपटे, वा. म. जोशी, डॉ. केतकर, वरेरकर, आचार्य अत्रे, खाडिलकर इत्यादींच्या चिंतनाचा विषय तो होता. त्याप्रमाणेच, आजच्या लेखकांना साहित्यातील समाजचिंतनाबद्दल विशेष रुचिलेला दिसत नाही. त्यामुळे या विषयाला फारसे महत्त्व द्यावेसे त्यांना वाटत नाही. असे होण्याला अनेक कारणे असतील. मराठी वाङ्मय कधी तर पूर्वदृष्टीने सामाजिक वाङ्मय ह्या अशा अवस्थेत पडलेले आहे.

याचे कारण आजच्या वाङ्मयाची निर्मिती समाज वा व्यापक मानवी जीवन यांच्या चिंतनातून होत नसून विविध अनुभूतींच्या अभिव्यक्तीकरणासाठी होते. या अनुभूती व्यक्तिगत असतात वा असाव्यात अशी अपेक्षा असते. तसेच साहित्याचा समाजजीवनाशी असणारा संबंध हा केवळ दुरची दुरान्वयाचा, प्रतीकात्मक वा पार्श्वभूमित्वरूपाचा असतो असे मत आज जवळजवळ सर्वसंमत झालेले आहे. त्यामुळे असे झाले आहे की, समाजजीवनाचा रोख वर्धिष्णुतेकडे आहे, समाजजीवनात अनेक दुःखे, विवंचना, संघर्ष असले तरी विधायक व प्रगतिशील प्रवृत्ती निश्चयाने चळवळीने कार्यवाही झालेल्या आहेत, सर्वत्र नव्या समाजाची उभारणी चालू आहे, नव्या इमारती होत आहेत संस्था, संघटना अस्तित्वात येत आहेत, विधायकताही वाढत आहे. पण आजचा लेखक त्याच्या मनाच्या विशिष्ट ठेवणीमुळे अगर अन्य परिस्थितीमुळे या वर्धिष्णू जीवनातून चैतन्यही घेऊ शकत नाही व जे नवे घडत आहे त्याला नवे नैतिक अधिष्ठानही देऊ शकत नाही. सामाजिक विचारवंतांना वेदनाकुल करणारी ही वस्तुस्थिती आहे!

## यातून मार्ग कसा काढावा?

या परिस्थितीतून मार्ग काढण्यासाठी एक सूचना करून हे आजच्या साहित्यातील स्त्रीचित्रणाबाबतचे चिंतन पुरे करतो.

महर्षी अण्णासाहेब कर्वे हे आधुनिक भारतातील एक श्रेष्ठ स्त्री-उद्धारक होते, हे सर्व विदित आहे. त्यांनी निर्माण केलेली समाजसेवकपरंपरा कालपर्यंतच्या वाङ्मयाने प्रमाण मानली व तिला आपापल्या परीने साथही केली. आज स्त्रीजीवनविषयक प्रश्नांचे शास्त्रीय संशोधन वा चिंतन सामाजिक लेखनाच्या पातळीवर चालू असेल. पण आजवर पाहिल्याप्रमाणे वाङ्मयाच्या क्षेत्रात एकंदरीने सामसूम दिसते. म्हणजे आजचे वाङ्मय वाङ्मयीन दृष्ट्या कमी वा हलक्या दर्जाचे आहे असे नव्हे पण त्याला ही विशिष्ट परिमिती (डायमेन्शन) लाभलेली नाही एवढेच. काही अपवाद मानावे लागतील हे खरे. सामाजिक वा स्त्रीजीवनविषयक प्रश्नांची ललितवाङ्मयाच्या क्षेत्रातील उपेक्षा थांबवायची असेल तर एखाद्या संघटनेने वर्षातील अगर काही विशिष्ट कालखंडातील स्त्री-जीवन-विषयक चित्रणाच्या दृष्टीने महत्त्वाच्या ठरणाऱ्या वाङ्मयीन कलाकृतींस अगर प्रबंध इत्यादींस काही श्रेष्ठ पारितोषिके ठेवावीत. म्हणजे या विषयाबाबत लेखकांच्या ठायी जे सामाजिक औदासीन्य आहे ते कदाचित कमी होईल. निदान नवीन लेखकांपुढे सामाजिक स्वरूपाचे नवे आविष्कारक्षेत्र उपलब्ध करून दिल्यासारखे होईल. असे काही केले तरच आजची ही कोंडी फुटण्याची शक्यता आहे.

# ८

# स्त्रीजीवनातील संक्रमण


चंद्रकला हाटे

डॉ. श्रीमती चंद्रकला आनंदराव हाटे, एम्. ए., पीएच्. डी. (जन्म १२-९-१९०२) सेवानिवृत्त प्राध्यापिका, श्री. ना. दा. ठा. महिला पाठशाळा, मुंबई. संशोधनाकरिता युनिव्हर्सिटी ग्रँट्स् कमिशनचे अध्यासन. आर्थिक व सामाजिक विषयांवर संशोधन व लेखन, (स्नेहसदन, मंगलवाडी, गिरगाव, मुंबई ४).


## सुरवातीपासून स्त्री ही पुरुषावलंबित

अंदाजे दशलक्ष वर्षांपूर्वी हिमकालातील पूर्वाश्मयुगात मानवाचा जन्म पृथ्वीतलावर झाला असा शास्त्रज्ञांचा कयास आहे. अनेक शतके मानवापुढे एकच समस्या होती आणि ती म्हणजे निसर्गाच्या तडाख्यातून व इतर वन्य प्राण्यांपासून आपल्या जीविताचे संरक्षण करावयाचे. पुरुषांबरोबर स्त्री पण ह्या समस्येला तोंड देत होती. त्याबरोबर मातृत्वाची जबाबदारीही तिला पार पाडावी लागे. सर्व प्रकारच्या प्रतिकूल परिस्थितीत जीवनकलहाला तोंड देता देता वरचेवर येणाऱ्या गरोदरावस्था व प्रसूतिकाल येणेकरून जीवितरक्षणार्थ तिला पुरुषावर विसंबून राहावे लागत असल्यास नवल नाही. शिकार करणे, आपले व आपल्या कुटुंबाचे रक्षण करणे, त्याकरिता जरूर तेव्हा लढणे ही पुरुषवर्गाची कामे आणि ह्या पुरुषाच्या कामात जमेल तितकी आपली मदत करून प्राप्त परिस्थितीत स्वतः व स्वतःची अपत्ये ह्यांना जगवून धरणे हे स्त्रीच्या वाट्यास येई. अशा तऱ्हेने मूलभूत श्रम-विभाजन स्त्रीपुरुषांमध्ये जे झाले ते अगदी गेल्या शतकापर्यंत कायम होते.[1] जीवनाच्या धकाधकीला पुरुषाने तोंड द्यावयाचे व स्त्रीने जीवन संवर्धित करावयाचे असे कार्यक्षेत्राचे विभाजन झाल्यावर स्त्री ही बरीचशी पुरुषावलंबित झाल्यास नवल नाही.

---

१. "अगदी प्राथमिक अवस्थेतील लोकांचे योग्य असे हे श्रमविभाजन प्रत्येक सामाजिक संस्थेचे मुख्य लक्षण बनले आहे." सोशल एनसायक्लोपीडिया व्हॉल्यूम ५ पान ४४२

ह्या प्राथमिक अवस्थेतून मानवी जीवनाला थोडीफार स्थिरता येण्यास हवामान अधिक समशीतोष्ण व्हावे लागले आणि तो बदल होईपर्यंत हजारो वर्षांचा काळ निघून गेला. मानव स्थायिक झाल्यानंतर हळूहळू समाजात दोन वर्ग निर्माण झाले. श्रमजीवी व राज्यकर्त्यांचा वर्ग. कालांतराने त्यात आणखी एका वर्गाची भर पडली. ती म्हणजे बुद्धिजीवी अगर मध्यम वर्ग. वर्गनिर्मितीबरोबर स्त्रीच्या जीवनात वर्गावर्गानुसार निरनिराळे बदल झाले. श्रमजीवी वर्गातील स्त्री ही श्रमजीवीच राहिली. पूर्वीप्रमाणे तिला दोन आघाड्या संभाळाव्या लागत. पिता अगर पती यांच्या कामात सहभागी होऊन आपल्या कुटुंबाच्या उदरनिर्वाहाकरिता मदत करणे व निसर्गाने टाकलेल्या अपत्यजन्म आणि बालसंगोपन ह्या जबाबदाऱ्या पार पाडीत राहणे हेच स्त्रीचे ठरलेले जीवन होते. त्यामुळे त्याही अवस्थेत तिचे अवलंबित्व कायम राहिले.

मानवी इतिहास हा सदा संघर्षाने भरला आहे. त्या संघर्षात जो समाज विजयी होई तो जित समाजातील स्त्रियांना आपले गुलाम बनवीत आला आहे. ह्या स्त्रियांना आपल्या सुखोपभोगार्थ राबविणे म्हणजे पुरुषार्थाचे लक्षण समजले जाई. किंबहुना जेत्याशी आपले सख्यसंबंध राहाण्याकरिता जित लोक आपल्या कन्याही अर्पण करीत. सुमित्रा–दशरथ, हिडिंबा–भीम, जोधपूरची कन्या व अकबर ही उदाहरणे आपल्या नजरेसमोर आहेत. ह्यामुळे जित स्त्रीचे स्थान नेहमीच दुय्यम असे.

राज्यकर्ते आदिवरून समाजात जो सरंजामी धरचा वर्ग उदयास आला त्या वर्गाला उदरनिर्वाहाकरिता प्रत्यक्ष शारीरिक कष्ट करण्याची जरुरी नसे. राज्यरक्षण, उद्योगधंदे, कलासंवर्धन वगैरे वरच्या दर्जाची कामे ह्या वर्गाकडे आली. अर्थातच हा वर्ग अधिक सधन व सुखवस्तू बनला. त्या वर्गाला समाजात मानप्रतिष्ठा, संपत्ती, सुखसाधने उपलब्ध झाली. त्याचा फायदा त्या वर्गातील स्त्रीलासुद्धा झाला. अतःपर तिला शारीरिक कष्ट करण्याची जरुरी राहिली नाही. तिचे कार्यक्षेत्र घरापुरते नव्हे घराच्या आतच मर्यादित झाले. अनुषंगाने तिच्यावरील बंधनेही वाढू लागली. बंधनांची पराकाष्ठा म्हणजे तिला गोषात राहावे लागले. वैदिक ब्रह्मवादिनी भरसभेत विश्वोत्पत्ती-सारख्या गंभीर विषयावर पुरुषांबरोबर चर्चा करू शके. तीच महाभारतकाळात दरबारामध्ये वमताना पडद्याआड बसू लागली. कण्वाश्रमात मुक्तविहार करणारी शकुंतला दुष्यंतपत्नी म्हणून राजदरबारी प्रवेश करते तेव्हा ती अवगुंठित असते.

## स्त्री उपभोग्य वस्तु–वेश्यावर्गाचा उदय

समाजाच्या ह्या अवस्थेमध्ये वरिष्ठ वर्गाचा स्त्रीकडे पाहाण्याचा दृष्टिकोण बदलला. जीवनसंग्रामात आपणास साथ देणारी जोडीदारीण हे तिचे स्थान नष्ट होऊन उपभोग्य वस्तु ह्या निकृष्टावस्थेपर्यंत ती अवनत झाली. म्हणूनच वेश्यावर्ग निर्माण झाला. केवळ पुरुषाच्या विषयवासनेचे स्थान बनून स्वतःचा उदरनिर्वाह करावयाचा. समाजाने बाजूला सारलेली, खऱ्या प्रेमाच्या ओलाव्यास मुकलेली, अनेक रोगांचे आश्रयस्थान

झालेली ही दुर्दैवी स्त्री! त्यात आणखी विशेष हे की एकदा ह्या गर्तेत ती जाऊन पडली की तिलाही त्यातून वर यावेसे वाटत नाही.' सुधारलेल्या विसाव्या शतकातसुद्धा हा वर्ग कायम असून त्याला अधिक संघटित स्वरूप प्राप्त झाले आहे. आमच्या देशातच नव्हे तर आंतरराष्ट्रीय पातळीवर मुलींचा व्यापार करणारे हरीचे लाल आहेत! ह्या पतितावस्थेतून केव्हातरी स्त्री वर येईल का?

सुधारणेच्या वाटचालीबरोबर मनुष्य आपली ज्ञानक्षेत्रे वाढवू व व्यापकही करू लागला. कुठे चित्रकलेची वृद्धी कर तर कुठे वाङ्मयाची निर्मिती कर तर केव्हा विश्वाचे गूढ उकलण्याचा प्रयत्न करून तत्त्वज्ञानाची निर्मिती कर. तत्त्वज्ञानाच्या जोडीला इतरही शास्त्रांची प्रगती झाली. पण हात स्त्रीला फार थोडा हातभार लावता आला. मातीच्या भांड्यावर चित्रे चितारण्यापलीकडे तिने फारशी चलोपासना केली नाही. भास्कराचार्यांच्या लीलावतीबरच्या अपवादात्मक स्त्रिया सोडल्यास सर्वसामान्य स्त्रीचे कार्यक्षेत्र मर्यादितच राहिले. धार्मिक विधीतसुद्धा स्त्रियांना क्वचितच भाग घेता येई. आमच्याकडे मात्र यज्ञाकरिता सोमरस पिळण्यापासून तो आजवर हरएक धर्मकृत्य 'दम्पती'ने मिळून केले पाहिजे अशी शास्त्राज्ञा आहे.'

## निरनिराळ्या प्राचीन संस्कृतींमध्ये स्त्रीचे स्थान

असे हे सर्वसामान्य विवेचन केल्यावर आजपर्यंत ज्या निरनिराळ्या संस्कृती उदयास आल्या त्यांमध्ये स्त्रीचे स्थान काय होते ते पाहू.

बॅबिलोनियन संस्कृतीमध्ये पितृसत्ताक, क्वचित् मातृनामी कुटुंब आढळते व तेथेसुद्धा मामाच्या हातात सर्व कारभार असतो. कुटुंबपद्धती मातृनामी होती. पण पत्नीचे रक्षण व पालनपोषण करण्याची जबाबदारी पतीवर असे. तसेच काही विशिष्ट परिस्थितीत तिला आपली मालमत्ता विकता येई. उद्योगधंद्यातही ती भाग घेऊ शके. ग्रीक स्त्रियांना हरएक प्रकारचे कायदेशीर व धार्मिक अधिकार असत. कुटुंबातील पत्नी, मुले व गुलाम यांना एका पातळीवर वागविले जाई. ग्रीक नगरराज्यांपैकी अथेन्समध्ये मुलींना जेमतेम शिक्षण देत असत परंतु स्पार्टामध्ये मुलींच्या शिक्षणाची चांगली व्यवस्था होती. मात्र 'Hetaerae' (सुसंस्कृत वेश्या) म्हणून जो अस्पृश्य स्त्रीवर्ग असे तो बराच हुशार असून थकेल्या पुरुषांना करमणूक देण्याचे काम करीत असे. ग्रीक तत्त्वज्ञांपैकी प्लेटो हा फार ध्येयवादी होता. स्त्री-पुरुष असा भेद केलेला पसत नसे. उभयतांचे हक्क समान व कर्तव्येही समान, असा त्याचा ध्येयवाद होता. त्याच्या उलट ॲरिस्टॉटलच्या मते पुरुष हा श्रेष्ठ व स्त्रीने त्याच्या कह्यात असले पाहिजे. ग्रीक संस्कृतीच्या पाठोपाठ

युरोपमध्ये रोमन संस्कृती उदयास आली. रोमन संस्कृतीचा काल ख्रि. पू. ७५४ पासून दीड हजार वर्षांपर्यंत होता. तेथे विवाहानंतर कन्या पतीच्या घरी जाई तेव्हा तिच्यावर त्याला संपूर्ण अधिकार गाजविता येत असे. नंतर हळूहळू विवाहाला तिच्या अनुमतीची आवश्यकता मान्य झाली. पतीपत्नीचे न पटल्यास तिला घटस्फोट घेता येऊ लागला. तिला वाटल्यास विभक्त राहून पोटगी मागता येत असे. असे करता करता त्या संस्कृतीच्या उत्तरकालात स्त्री ही कायद्याने पूर्ण स्वतंत्र झाली. पण अनेक कारणांमुळे ही रोमची स्थिती दीर्घ काळपर्यंत टिकली नाही व रोमन साम्राज्यही लोकरच संपुष्टात आले.

त्याच सुमारास ख्रिश्चन धर्माचा उदय झाला आणि त्या धर्माने स्त्री ही पुरुषाला मोह घालणारी, ॲडमला 'मना केलेले फळ' खाण्यास लावणारी ईव्ह आहे अशी विचारसरणी प्रसृत केली. त्यामुळे रोमन कायद्याने स्त्रीला दिलेले हक्क काढून घेण्यात आले. जरी ख्रिश्चन चर्चने प्रियाराधन व विवाहास कन्येच्या अनुमतीची आवश्यकता मान्य केली असली तरी ती पूर्णपणे पराश्रयी होती. ह्या कालातील युरोपमधला सरदार पराकाष्ठेचे स्त्री-दाक्षिण्य दाखवीत असला व तिच्या रक्षणार्थ प्राणार्पण करण्यास तयार असला तरी ही प्रथा फक्त वरच्या वर्गापुरतीच मर्यादित होती. आमचे रजपूत व मराठे सरदार नव्हते का स्त्रीच्या पातिव्रत्याच्या संरक्षणार्थ स्वतःचे प्राण पणास लावीत?

सोळाव्या शतकात ख्रिश्चन धर्माच्या सुधारणाचळवळीची सुरुवात झाली. ह्या चळवळीमुळे प्रॉटेस्टंट पंथ उदयास आला आणि तदनंतर स्त्रीविषयक दृष्टिकोणही अनुकूल झाला. तिला क्रूरता आदिकरून काही कारणांकरिता घटस्फोट घेता येऊ लागला. परंतु एकंदरीने तिला कायदेशीर हक्क फारसे नव्हते.

## फ्रेंच राज्यक्रांतीने दिलेला हादरा

धर्मसुधारणाचळवळीपूर्वी पंधराव्या शतकात आणखी एक महत्त्वाची घटना घडून आली. इ. स. १४४० मध्ये मुद्रणकलेचा शोध लागला. त्याच कॉन्स्टॅन्टिनोपल हे शहर मुसलमानांनी इ. स. १४५३ मध्ये जिंकल्यामुळे ख्रिश्चन पंडित युरोपभर सर्वत्र पसरले. त्यांनी ठिकठिकाणी विद्येचा प्रसार केला. त्यामुळे युरोपियन संस्कृतीला उजाळा आला. विविध विचारप्रवाहांनी मानवी हक्काबद्दल जागृती झाली. त्याचे पर्यवसान फ्रेंच राज्यक्रांतीत झाले. स्वातंत्र्य, समता व बंधुभाव ह्यांची घोषणा १७८९ मध्ये फ्रेंच आमसभेने करून त्यास अनुकूल अशी राजवट बनविण्याचा प्रयत्न केला. फ्रेंच राज्यक्रांतीच्या आधीच स्त्री ही थोडीफार जागृत होत होती. परंतु निश्चही खडबडून हादरा दिला असा ह्या क्रांतीनेच. १७९२ मध्ये मेरी वुल्स्टोनक्राफ्ट ह्या बाईने "Vindication of the Rights of Women" (स्त्रियांच्या हक्काचे समर्थन) हा ग्रंथ प्रसिद्ध करून अठराव्या शतकात स्त्रियांना आपल्या हक्काबद्दल जागृत करून दिली. ह्या ग्रंथाचे व ग्रंथकर्तीचे स्वागत त्या काळात कसे झाले असेल त्याची वाचकांनीच कल्पना करावी.

औद्योगिक क्रांतिपूर्व काळात अनंतींनी स्त्रियांना नाव घेण्यासारखा व्यवसाय

म्हणजे सूतकताई व हातमागावर कापड विणण्यास मदत करणे. शेती व इतर व्यवसायातही ती पुरुषाला हातभार लावीत असे. पण त्या व्यवस्थेत पुरुष काय व स्त्री काय घड्याळाचे दास नव्हते. त्यामुळे स्त्रीला आपले अपत्यविषयक कर्तव्य सुलभ रीतीने पार पाडता येई. औद्योगिक क्रांतीने तिला घराबाहेर काढून कारखाने व गिरण्या ह्यांतून काम करावयास लावले. नव्या व्यवस्थेची झळ पहिल्या पहिल्यांदा स्त्रीलाच अधिक सोसावी लागली. राज्यकर्ते तटस्थ धोरणाचे पुरस्कर्ते, त्यामुळे मजूर-मालक ह्यांच्या परस्पर संबंधावर नियंत्रण नव्हते. पुरुष व स्त्रिया ह्यात श्रमविभागणी झाली. त्यात कमी वेतनाचे काम स्त्रीच्या वाट्यास आले. मजूर-संघटनेतही स्त्रीला शिरता येत नसे. तसेच स्त्रिया स्वतःची वेगळी मजूर-संघटना स्थापू शकत नव्हत्या.

ही झाली श्रमजीवी वर्गाच्या स्त्रीची स्थिती. परंतु पूर्वापार चालत आलेला व्यापारी वर्ग औद्योगिक क्रांतीनंतर बराच पुढे आला आणि त्यातील काहीजण तर मोठे उद्योगपती होऊन मातब्बर झाले. ह्या वर्गाच्या महत्त्वाच्या व धनतेच्या मानाने सरंजामशाही वर्ग काहीच नव्हे. ह्या नव्या वरच्या वर्गातील स्त्री सामान्यतः सुखासीन बनल्यास नवल नाही. वरच्या वर्गाला समाजात मिळणारा मान, सधनता, सुखोपभोग हे पुरुषाबरोबर स्त्रीच्याही वाट्यास येत. मात्र तिचे कायदेशीर स्थान शून्यच. १८८९ सालापर्यंत एखाद्या इंग्लिश सरदाराच्या कन्येस जर पुरुष वारसामागे पित्याचा वारसा मिळाला तर तो लग्नानंतर जावयाच्या वाट्यास जाई. प्रत्यक्ष तिला मिळत नसे.

## एकोणिसाव्या शतकातील स्त्रीस्वातंत्र्याच्या चळवळी

श्रमजीवी वर्गाच्या अनेक दुःसह अडचणींना तोंड फोडण्याचे काम इंग्लंडमधील चार्टिस्ट चळवळीने केले. इतर मागण्यांबरोबर स्त्रियांना मतदानाचा हक्क असावा हीही मागणी केली. त्या मागणीची उपेक्षा झाली नसती तरच नवल! पुढे दहा वर्षांनी स्त्रियांची पहिली परिषद १८४८ मध्ये अमेरिकेत भरविण्यात आली. अमेरिकन स्वातंत्र्य युद्धाच्या वेळी जसा मानवी हक्कांचा जाहीरनामा काढण्यात आला त्याच धर्तीवर या परिषदेने स्त्री-हक्क-करार (विमेन्स राइट्स् कन्व्हेन्शन) तयार केला. ह्या करारानुसार स्त्रियांना सामाजिक, कायदेशीर व धार्मिक समान हक्क असावेत अशी मागणी करण्यात आली. अशा तऱ्हेने इंग्लंडप्रमाणेच अमेरिकेतही स्त्रीचळवळीचा जन्म झाला.

आमच्याकडे ज्याप्रमाणे राजा राममोहन रॉय, आगरकर, जगन्नाथ शंकरशेठ, महर्षी कर्वे वगैरे स्त्रियांचे कैवारी होऊन गेले तसे इंग्लंडमधील पहिले स्त्रीकैवारी म्हणजे जे. एस. मिल्. १८६७ मध्ये पार्लमेंट सुधारणा बिल प्रथमतः मांडण्यात आले त्याला श्री. मिल् ह्यांनी स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळावा अशी पुस्ती जोडली. ही पुस्ती पास होणार नाही हे ठरलेलेच होते. पुढे १८९७ मध्ये राष्ट्रीय स्त्री-मतदान हक्क संघ (नॅशनल युनियन ऑफ वुइमेन्स सफ्रेज) ही संस्था स्थापन करून व्यासपीठावरून आरडर न बोलणारी स्त्री पुढे जाहीर सभा घेऊन स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळावा

म्हणून चळवळ करू लागली. या संघटनेमुळे ह्या चळवळीला धार चढली. पण पार्लमेंटच्या मतदारगटात ती समाविष्ट होईना. १९०७ मध्ये फक्त स्थानिक संस्थांच्या मतदारगटात तिला स्थान मिळाले. १९१४ त महायुद्ध सुरू झाले आणि स्त्रियांनी स्वतःचा प्रश्न मागे टाकून राष्ट्राच्या स्वातंत्र्यरक्षणार्थ तनमनधन अर्पण करण्यास सुरुवात केली. भारताच्या स्वातंत्र्यप्राप्तीकरिता नाही का स्त्रिया पुढे आल्या!

## पहिल्या महायुद्धाने केलेली क्रांती : मतदानाचा हक्क

१९१४ ते १९१८ पहिले महायुद्ध झाले. स्त्रीच्या दृष्टीने ह्या काळात व तदनंतरही अनेक घडामोडी घडून आल्या. १९१७तल्या रशियन क्रांतीनंतर जी साम्यवादी समाजरचना झाली तिने स्त्रीला पूर्ण स्वातंत्र्य व समानता दिली. विवाहनोंदणी व घटस्फोटास कोर्टांच्या मान्यतेची अनावश्यकता, गर्भपातास मंजुरी, पुरुषाच्या बरोबरीने जडभारी शारीरिक कामे करणे वगैरे बराच अतिरेकही करण्यात आला. पण कालांतराने अनिष्ट परिणाम दिसून आल्याबरोबर तेथे सुधारणाही झाली.

महायुद्धाचा आणखी एक परिणाम म्हणजे इंग्लंडमध्ये १९२१-२२ च्या कायद्यांनी स्त्रियांना मतदानाचा व उमेदवार म्हणून उभे राहण्याचा हक्क दिला गेला. युरोप व अमेरिकेतही हळूहळू ह्या दृष्टीने वाटचाल झाली. मात्र अजूनही स्वित्झर्लंड-सारख्या पुरोगामी लोकशाही देशात स्त्रियांना मतदान करता येत नाही. १९२१ मध्ये भारताला ज्या सुधारणा ब्रिटिश सरकारने दिल्या त्यांत स्त्रियांच्या मताच्या हक्काला मान्यता देण्यात आली होती. महायुद्धातील पराभवामुळे जर्मनीत लोकशाही स्थापन झाली. पण ती फार दिवस टिकून राहिली नाही. हिटलरने आपल्या महत्त्वाकांक्षेसाठी श्रमजीवी वर्गातल्या स्त्रियांना रोजगारास लाविले परंतु वरच्या हुद्द्यावरून मात्र त्यांना काढून टाकले.

## बौद्धिक उपासमार दूर करण्याकरिता लढा

केवळ राजकीय आघाडीवरच नव्हे तर इतर क्षेत्रातही स्त्रीला हक्कसंपादनाकरिता लढा द्यावा लागला. फ्लॉरेन्स नाइटिंगेलने म्हटले आहे, "जर आपणांस खावयास अन्न नसले तर आपण किती ओरड करतो आणि ती जगाच्या दुसऱ्या टोकाला ऐकू जाते. 'उपासमारीने मृत्यू' असा ठळक मथळा देऊन वर्तमानपत्रे त्याची प्रसिद्धी करतात! परंतु तेच 'उपासमारीने विचाराचा मृत्यू किंवा नैतिक चळवळीचा मृत्यू', असा मथळा टाइम्समध्ये द्या की सारे वाचक टक लावून वाचतील आणि हसत सुटतील!"[१]

१८७० पर्यंत इंग्लंड आदिकरून पाश्चात्त्य देशात स्त्रियांची जी बौद्धिक उपासमार होत होती तिचे वर्णन वरील उद्गार आहेत. विद्यापीठांच्या परीक्षेस स्त्रियांना जेव्हा

---

१. बिमेन — विमिकेन हॉस्टरी पा. ५१

प्रथमतः बसता येऊ लागले तेव्हा त्यांच्यात 'आत्मविश्वास व स्वतंत्रवृत्ती निर्माण होईल आणि स्वतःची दुय्यम पायरी त्या विसरतील' अशी भीती व्यक्त करण्यात आली. विद्यापीठाची द्वारेसुद्धा सहजी उघडली गेली नाहीत. स्त्री लढतच राहिली आणि त्या लढ्याचे सार्थक म्हणजे शास्त्रीय, तांत्रिक व इंजिनिअरिंग क्षेत्रातही ती शिरू लागली आहे. परंतु स्त्रियांच्या समान हक्कांचा यक्षप्रश्न किंवे भगर विज्ञानशास्त्राने सोडविला आहे काय? विज्ञानशास्त्रे, तांत्रिकशास्त्रे (टेक्नॉलॉजी), राजकारण, संरक्षणखाते ही आजवर केवळ पुरुषांची क्षेत्रे म्हणून समजण्यात आली होती. त्यापैकी एकेका क्षेत्रात ती आज कुठे आहे आणि मानवतेच्या प्रगतीला ती कितपत हातभार लावू शकते हे थोडक्यात पाहू.

## स्त्रीपुरुष-समानतेचे युग

राजकारणाचाच प्रथम विचार करू. भारत हा सर्वांत फार विस्तृत लोकशाही देश. त्या देशाच्या स्वातंत्र्यप्राप्तीनंतर स्त्रीला समानता देण्यात आली. कोणत्याही क्षेत्रात तिला मज्जाव नाही. पंतप्रधानकीपासून तो इतर अनेक महत्त्वाच्या पदावर ती आज विराजमान झालेली दिसते. पण भारतातल्या ५० कोटी जनतेचा हा किती अल्पांश आहे हे आकड्याने सिद्ध करण्याची जरुरी नाही. ज्यांना परिस्थिती, शिक्षण व संधी अनुकूल आहे त्या पुढे येत आहेत. मात्र त्या करीत असलेल्या त्यांच्या कार्याचे मूल्यमापन येथे करणे पुरेशा माहितीच्या अभावी अयोग्य व अकाली ठरेल.

इतर लोकशाही देशांतील स्त्रियांच्या राजकीय कामगिरीचे मूल्यमापन १९५५ मध्ये युनेस्कोच्या समितीने केले होते. पुरुषांइतक्याच स्त्रियाही मतदानाचा अधिकार उपयोगात आणतात. परंतु उमेदवार म्हणून फार कमी संख्येने उभ्या राहातात व निवडून आल्यानंतरही त्या त्या देशाच्या लोकसभेत त्यांनी आपले कार्य क्रिया व मुद्दे इतकेच मर्यादित ठेवले आहे. म्हणजे मतदानाचा हक्क मिळविण्याकरिता पन्नास पंचावन्न वर्षांपूर्वी ज्या काही ब्रिटिश स्त्रियांनी प्राणार्पण केले त्यांच्या आजच्या वंशज तो अधिकार मिळालेला असूनही फारसा उपयोग करीत नाहीत. राजकारणास स्त्रिया अपात्र की त्यांच्याआड पुरुषवर्ग येत आहे? दुसऱ्या प्रश्नास वरील पाहाणीत होकारार्थी उत्तर दिले आहे.[1]

दुसऱ्या महायुद्धानंतर इस्राएल हे एक नवे राष्ट्र उदयास येत आहे. युरोपमधील ख्रिश्चन राष्ट्रांमध्ये ज्यू लोकांबद्दल सर्वसाधारणतः असूयेची व थोडी शत्रुत्वाची भावना दिसून येते. अशा देशांतल्या निर्वासित ज्यू लोकांचे हे स्वतंत्र राज्य आहे. तेथे स्त्रीवरील अपत्यसंगोपनाची जबाबदारी सरकारने आपणाकडे घेतली आहे. शेतकरी स्त्रीला मूल होताक्षणीच त्याची जोपासना सांघिकरीत्या केली जाते. आईवडिलांना दररोज थोडा वेळ मुलाजवळ घालविता येतो. अशा तऱ्हेने मुक्त झालेली स्त्री सर्व क्षेत्रात—

---

१. पोलिटिकल रोल ऑफ विमेन — युनेस्को पा. १२३–२४

संरक्षक दलातही — पुरुषांबरोबर काम करीत आहे. पण त्याचे दूरगामी परिणाम कोणते ते अजमावण्यास थोडा कालावधी जावा लागेल.

भारतातील परिस्थितीविषयी बोलावयाचे तर स्वातंत्र्योत्तर काळात विद्यार्थिनींची संख्या वाढत आहे. १९४७ साली विद्यापीठात २ लक्ष ४४ हजार मुलगे व २३ हजार मुली शिकत होत्या तर १९६६ साली त्यांची संख्या १६ लक्ष ८९ हजार व ३ लक्ष २१ हजार झाली.[1] स्त्रियांच्या शिक्षणाच्या वाढीबरोबर त्यांच्यामधील बौद्धिक श्रम करणाऱ्यांना अधिक वाव मिळत आहे.

## संततिनियमनामुळे स्वातंत्र्य

विसाव्या शतकातील आणखी एका महत्त्वाच्या घटनेचा स्त्रीच्या जीवनाशी फार निकट संबंध आहे आणि ती म्हणजे कृत्रिम उपायांनी संततिनियमन करणे ही होय. आपण लोकसंख्येच्या वाढीला निरोधन करण्याच्या दृष्टीनेच कुटुंबनियोजनाचा विचार करतो. तसे पाहिले तर लोकसंख्या रोखून धरण्याकरिता पूर्वापार अनेक मार्ग चालत आलेले आहेत. सामाजिक व धार्मिक अशी पतीपत्नीसंबंधावर अनेक नियंत्रणे होती. मुले जन्मल्यानंतर वर्ष दोन वर्षेपर्यंत त्याला दुग्धपान करीत राहिल्याने गर्भधारणा होत नाही अशी समजूत होती व भारतात अजूनही प्रचलित आहे. ह्या योगाने निश्चित गर्भधारणा होणार नाही असे मात्र म्हणता येत नाही.

आज भारतालाच काय पण सर्व जगाला भेडसावणारा एक प्रश्न म्हणजे वाढत्या लोकसंख्येचा. ह्या प्रश्नाकडे प्रथम लक्ष वेधण्याचे श्रेय इंग्लंडमधील धर्मगुरू थॉमस माल्थसकडे जाते. त्याने १७९८ मध्ये आपला प्रबंध प्रसिद्ध केला. १८२२ मध्ये "नैतिक नियंत्रण हे मनुष्यस्वभावाशी विसंगत आहे. तेव्हा प्रतिबंधक उपाय हाच एक मार्ग आहे." असे उद्गार फ्रॅन्सिस प्लेसनी काढले. १८३२ मध्ये डॉ. नोल्टन यांनी 'दि प्रायव्हेट कम्पॅनियन ऑफ यंग मॅरिड पीपल' ही पुस्तिका प्रसिद्ध केली. त्याच्या ४००० प्रती लगेच खपल्या. पुढे ह्या पुस्तिकेवरून खटलाही झाला. ब्रॅडला व ॲनी बेझंट हे लोकांचा रोष पत्करूनही कुटुंबनियोजनाचा प्रचार करीत होते. पहिल्या महायुद्धानंतर संततिनियमनास लोकमत अनुकूल होऊ लागले. त्याच सुमारास भारतात व विशेषतः महाराष्ट्रात प्रा. र. धों. कर्वे यांनी संततिनियमनाच्या प्रचारास सुरुवात केली. मिसेस सँगर ह्या बाईने १९२२ मध्ये ह्या प्रचाराकरिता जगभर दौरा काढला. त्यात भारतालाही भेट दिली. परंतु महात्मा गांधी ह्यांचा यास विरोध असल्यामुळे पहिल्या पंचवार्षिक योजनेपर्यंत त्या चळवळीला सरकारी पाठिंबा मिळाला नव्हता. आज ह्या बाबतीतले सरकारचे प्रयत्न सर्वश्रुत आहेत. परंतु स्वातंत्र्यानंतरची पहिली दहा वर्षे फुकट घालविल्याचे परिणाम आज दिसत आहेत.

---

१. रिपोर्ट ऑफ द एज्युकेशन कमिशन

संततिनियमनाचा विचार सर्वजण लोकसंख्येच्याच दृष्टिकोणातून करतात. परंतु त्यामुळे स्त्रीच्या जीवनात कोणती क्रांती झाली आहे, ही गोष्ट फारच थोड्यांच्या लक्षात येते. मानवतेच्या जन्मापासून जीवशास्त्राच्या नियमानुसार ती ज्या बंधनांमुळे असहाय बनली होती त्यातून ती आज स्वतंत्र झाली. आपल्याला हवी तेव्हा व तितक्याच अपत्यांना जन्म देणे तिच्या हातात आले आहे. मातृत्व ही ऐच्छिक बाब झाली आहे. मोजकी अपत्ये झाल्याने त्यांचे संवर्धन अधिक चांगल्या प्रकारे करता येते. तिच्या प्रकृतीवरही इष्ट परिणाम झाला असून तिचे आयुर्मान वाढले आहे. मुले शाळेत जाऊ लागण्याइतकी मोठी झाली की तिला अधिक फुरसत मिळते आणि हा फुरसतीचा वेळ वरच्या वर्गातील स्त्री इतर कार्याकरिता देऊ शकते तर मध्यम व खालच्या वर्गातील स्त्री अशा वेळात अर्थोत्पादन अधिक सुलभतेने करू शकते. अमेरिका आदिकरून पाश्चात्य देशांत तरी आज अशी स्थिती आहे.

## नव्या परिस्थितीतील संधी आणि समस्या

अमेरिकेत आयुर्मान बरेच दीर्घ आहे. तसेच तेथील सुबत्तेमुळे आरोग्यमान अधिक त्यामुळे अर्थोत्पादनाची सुरुवात करण्यास लागणारे वयोमान ५० पर्यंतही असू शकते. तीच गोष्ट सेवानिवृत्तीची. अशा परिस्थितीत कुटुंबातील मुले मोठी झाली की बाईच्या मनात आणल्यास नोकरीस सुरुवात करता येते. याचा अर्थ असा नव्हे की अविवाहित अगर लहान मुलांच्या माता तेथे काम करीत नाहीत. तोही वर्ग आहेच. पण भारतात सरकारी नोकरीची सुरुवात अधिकात अधिक २५ पर्यंतच करता येते. त्यामुळे आज मध्यम वर्गातील स्त्री, एस. एस. सी. अगर पदवीधर झाल्याबरोबर नोकरीचा विचार करू लागते. नोकरी धरल्याने येणारे तिचे लग्न लांबणीवर पडते, अगर सर्वच कुटुंबाची जबाबदारी तिच्यावर पडते. घरची वडील मुलाप्रमाणे ती आनंदाने ही जबाबदारी स्वीकारते. भावंडे मोठी होतात. पण ही एकाकी होऊन मागे पडते. अशा प्रौढ कुमारिका कितीतरी दिसतात. त्यांचे लग्न होते त्यापुढील समस्या म्हणजे केलेली नोकरी सोडावीशी वाटत नाही, आणि मुलाची तर आबाळ होते. त्यातून एकत्र कुटुंब असून घरी कोणी पाहाण्यास असले तर मुलाची चिंता कमी असते. पण अशा सर्वच भाग्यवान असतात असे नाही. येथे संततिनियमन तिला मदत करते. एक-दोनपेक्षा अधिक मुले झाल्यास जरूर तर शस्त्रक्रिया करूनही ती मोकळी होते. कारण आजकाल तीच गोष्ट प्रशंसनीय समजली जाते. एकूण काय की संततिनियमनामुळे तिला आपले जीवन हवे तसे आखता येते.

संततिनियमनाचा गैरफायदा घेतला जात नसावा असे म्हणणे धार्ष्ट्याचे होईल. अग्नीचा उपयोग विधायक व विध्वंसक दोनही मार्गांनी करता येतो. तसेच कोणत्याही शास्त्रीय शोधाबद्दल म्हणता येईल. तोच नियम संततिनियमाला लागू पडतो. जर समाजाने विशिष्ट नैतिक मूल्ये घट्ट धरून ती शिक्षणद्वारे प्रसृत केली–नव्हे करणे

अत्यंत आवश्यक आहे—तर ती समाजधारणा इष्ट मार्गाने चालू राहाणे शक्य आहे.

थोडक्यात समालोचन केल्यास भारतीयच काय परंतु जागतिक स्त्रीला आज सर्व जग खुले झाले आहे.[1] अर्थात् पुरुषाप्रमाणे तिच्याही राजकीय प्रतिबंध आहेतच. तिचे नैसर्गिक बंधन तिच्या स्वभावात आले आहे. आपल्या स्वातंत्र्याचा व संधीचा ती आज फायदा घेत आहे. "केवळ आर्थिक अगर धार्मिक परिवर्तनच नव्हे तर आधुनिक सुधारणेमुळे स्त्रियांना समाजात नवे स्थान प्राप्त झाले असून स्त्रीपुरुषसंबंध अजिबात पालटले आहेत."[2]

स्त्रीने घराबाहेर पडावे की न पडावे! अर्थोत्पादन करावे की न करावे! शास्त्रे व तंत्रविज्ञान व संरक्षक दल ह्यांची कास धरावी की न धरावी! हे सारे प्रश्न आता भूतकाळात जमा झाले आहेत.

## स्त्री ही स्त्री आहे

पण स्त्री ही स्त्री आहे. मानवतेची माता आहे. तिचे हे प्राथमिक कार्य चालूच राहाणार. नव्हे, प्रगत ज्ञानाच्या मदतीने तिने हे कार्य अधिक कार्यक्षमतेने पार पाडले पाहिजे. त्याचबरोबर ती पुरुषाची—पतीची—सखी आहे. त्याचे विश्रांतिस्थान आहे. कुटुंबाची अर्धमध्यकेंद्र आहे. पण स्वातंत्र्याबरोबर व हक्कांबरोबर तिला राष्ट्राची नागरिक, उद्योगधंद्यातील श्रमिक म्हणूनही जबाबदारी उचलावयाची आहे. आधुनिक स्त्रीच्या जीवनात कर्मातक्रमी संघर्षाव हा मेळ कसा साधता येईल! 'प्रश्न असा आहे की, स्त्रीच्या जन्मजात प्रवृत्तींचा (व कार्यांचा) भाग उद्याच्या स्त्रीला चिरंतन स्वाभाविक वाटेल आणि त्याचे ती संवर्धन करील! येथे स्वाभाविक कार्य म्हणजे तीनही—माता, श्रमिक व नागरिक—क्षेत्रातील कार्य सतत चालू ठेवता येईल!'[3]

एकविसाव्या शतकातल्या स्त्रीला आणखी एक सवाल टाकावासा वाटतो. 'चढा-ओढीच्या प्रचंड गतीने आणि तंत्रज्ञानाच्या अघाट प्रगतीने आज आम्हाला अर्ध्या मानवतेने संपन्न केले असले तरी राक्षसी दरीच्या काठावर नेऊन सोडले आहे.'[4] त्यातून दुसरी अर्धी मानवता वाचविणार आहे, की पहिल्या अर्ध्यांला त्याच्या चढा-ओढीच्या संघर्षाला हातभार लावणार आहे!'

0

---

१. १९४९च्या मानवी हक्कांच्या जाहीरनाम्याने मानवाचे मूलभूत हक्क मान्य केले असून त्या सम्बन्धात स्त्री व पुरुष या उभयतांचाही समावेश केला आहे.

२. सोसायटी—मॅकआयव्हर व पेज, पान—२५८

३. विमेन अँड द सायंटिफिक प्रोफेशन : मॅटफेल्ड व व्हॅन आकेन २०, किता पा. १४४ (१९६५) पा. २४२

४. किता—२४४

९

# ग्रामीण स्त्रीजीवनातील परिवर्तन

विनायक महादेव दांडेकर
मल्हारराव भाऊराव जगताप

प्रा. विनायक महादेव दांडेकर, एम्. ए. (जन्म ६-७-१९२०), डायरेक्टर, गोखले इन्स्टिट्यूट ऑफ पॉलिटिक्स अॅण्ड इकॉनॉमिक्स, पुणे. सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ. महाराष्ट्र व भारत सरकार, एफ्. ए. ओ., यूनो, वगैरेंच्या अनेक समित्यांचे सभासद, सल्लागार व त्यानिमित्त जगभर पुष्कळ प्रवास. अर्थशास्त्रीय प्रश्नांवर विपुल लेखन. श्री. मल्हारराव भाऊराव जगताप (जन्म १०-५-१९१९) गोखले संस्थेत १९३५ पासून फील्डमन्. अलीकडे पंधरा वर्षे फील्ड इन्स्पेक्टर. 'महाराष्ट्राची ग्रामीण समाजरचना' व 'गावगाडी' या पुस्तकांचे लेखक, संस्थेच्या त्रैमासिकात स्फुट लेख. (गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र संस्था, पुणे ४)

## विवाहाचे वाढते वय

गेल्या पन्नास-साठ वर्षांत ग्रामीण स्त्री-जीवनात जे परिवर्तन घडून आले त्यात मुलींच्या विवाहाचे वाढते वय हे प्रामुख्याने नजरेत येते. पन्नासाठ वर्षांपूर्वी मुलींच्या विवाहाचे वय साधारणपणे ६ ते १० असावयाचे, असे जुन्या लोकांकडून समजते. क्वचित मुलीच्या पाळण्यालाच बाशिंग बांधल्याची उदाहरणेही ऐकिवात आहेत. तसे आता होत नाही. आता मुलगी दहाचे आत असतानाच विवाह झाल्याची उदाहरणे क्वचितच घडतात. सामान्यपणे मुलगी वयात आली, किंवा १४ वर्षांच्या पुढे गेली म्हणजे बाप मुलीच्या लग्नाचा विचार करू लागतो. त्यानंतर दोनचार वर्षे जातात, आणि मुलगी १७-१८ वर्षांची होण्याच्या आत तिचा विवाह होतो. अजूनही ग्रामीण भागात अठरा वर्षांच्या पुढे गेलेल्या मुली विवाहाच्या सहसा आढळून येत नाहीत. विवाहाचे वयाबाबत हा जो फरक झाला त्याला बालविवाह प्रतिबंधक कायद्यापेक्षाही सार्वजनिक, राजकीय आणि सामाजिक जागृती हीच कारणीभूत असावी असे वाटते.

## वधूवरसंबंधाचे पारडे उलटले

विवाहाच्या वयाबरोबरच विवाहपद्धतीत, विशेषेकरून विवाहसंबंधित देण्याघेण्याच्या व्यवहाराबाबतही मुलीच्या दृष्टीने काही महत्त्वाचे फरक झाले आहेत. पूर्वी नवऱ्या-मुलाकडून म्हणजे नवऱ्यामुलाच्या बापाकडून मुलीच्या बापाला 'ठेवायला' म्हणून काही पैसे मिळत असत. असे पैसे 'ठेवायला' म्हटले तरी हुंडा दिल्यासारखेच असत.

त्याखेरीज सारा लग्नखर्च नवरदेवाला करावा लागे. मुलीच्या घरी लग्न करावयाचे झाले तरी लग्नखर्चाकरिता धान्य, कपडालत्ता, व इतर खर्चास रोख पैसे नवरदेवाकडून मुलीच्या बापास 'देज' म्हणून मिळत असत. धान्यात ज्वारी, गहू, तांदूळ, डाळ, गूळ इत्यादी वस्तू असत आणि त्या किती लागतात त्याचा निरख ठरलेला असे. तसेच कपड्यालत्यात मुलीसाठी लुगडी, चोळ्या, मानपानाची लुगडी इत्यादी कपडे असत. शिवाय किराणा माल, वाजंत्री इत्यादींसाठी रोख पैसे लागत तेही मिळत असत. अशा प्रकारे लग्नाचा सर्व खर्च नवरदेवास करावा लागे. मुलीच्या बापाला लग्नासाठी पैनाही खर्च नसे. उलट थोडीफार प्राप्तीच असे.

आता ही पद्धती जवळजवळ नाहीशी झाली आहे. आता मुलीच्या बापाला नवरदेवाकडून काही मिळत नाही. हा फरक होण्याची कारणे नीटशी कळत नाहीत. परंतु मुलीचा पैसा घेऊन आपल्या संसाराला लावणे हे कमीपणाचे मानले जाऊ लागले, आणि मुलीचे बाप 'ठेव' वा 'देज' घेईनासे झाले, एवढे खरे. गरीब मुलीचा बापही पैसे न घेता फक्त मुलगी स्वाधीन करू लागला. मुलीचा आणि त्या अनुषंगाने स्त्रीचा कुटुंबातील दर्जा उंचावल्याचेच हे लक्षण मानावे लागेल. कारण एका दृष्टीने पूर्वीचा व्यवहार ही मुलीची विक्रीच होती आणि म्हणूनच मुलीचे पैसे घेणे कमीपणाचे समजले गेले. स्त्रियांचा कुटुंबातील दर्जा सुधारण्याच्या दृष्टीने झाला हा फरक योग्यच म्हणावा लागेल.

परंतु एवढ्यावरच थांबले नाही, तर पारडे पार उलटले. मुलीचा बाप मुलीचे पैसे घेईनासा झाला आणि उलट मुलीसाठी पैसे खर्च करू लागला. आज नवरदेवाला थोडाफार रोख हुंडा, सायकल, घड्याळ, किंवा सोन्याची अंगठी देऊन शिवाय सारा लग्नखर्च मुलीच्या बापास सोसावा लागतो. मुलाची परिस्थिती जेवढी बरी तेवढा हुंडा जास्त द्यावा लागतो. विशेषकरून मुलगा नोकरदार असेल तर हुंड्याशिवाय मागतच नाही. आर्थिक परिस्थिती बरी नसेल तर मुलाला हुंडा मिळत नाही; उलट येनकेन प्रकारेण मुलीलाच थोडेफार पैसे द्यावे लागतात. तात्पर्य मुलीकडून हुंडा न घेणे हे गरिबीचे म्हणून कमीपणाचे मानले जाते. त्यामुळे गरीब मुलीच्या बापाची कुचंबणा होऊ लागली आहे.

या पद्धतीने मुलगी नवऱ्याच्या घरी गेल्यानंतर तेथे तिचा दर्जा पूर्वीच्या मानाने उंचावण्यास मदत झाली की नाही हे सांगणे कठीण आहे. कदाचित झाली असेल. कारण पूर्वीच्या पद्धतीत एका अर्थाने एखादी वस्तू विकत आणावी तशी नवरी विकत आणली जात असे; आणि त्या कारणाने थोडीफार बटकीसारखी वागणूक मिळत असणे असंभवनीय नाही. आता परिस्थिती बदलली. मुलीला पैसे देण्याऐवजी मुलगी स्वतः बरोबर पैसे घेऊन नवऱ्याच्या घरी जाऊ लागली. याचा अर्थ नवऱ्याघरी तिला पूर्वीपेक्षा मानाने वागणूक मिळावयास हवी. परंतु तिच्या बापाने हुंडा दिला तो तिचे लग्नच होईना म्हणून, नाइलाजाने दिला, असाही अर्थ लावणे अशक्य नाही. तात्पर्य, हुंडा घेऊन घरात आली एवढ्याच कारणाने मुलीचा दर्जा नवऱ्याच्या घरी सुधारलाच असेल असे खात्रीपूर्वक सांगता येत नाही.

## बापाच्या घरी मुलीची कुचंबणा

मात्र बापाच्या घरी मुलीची परिस्थिती काहीशी अवघडच झालेली असण्याचा संभव आहे. गेल्या काही वर्षांत मुलगे व मुली यांच्या शिक्षणात जी प्रगती झाली त्यावरून हे उघड दिसते. ग्रामीण भागात पुरुषांमध्ये साक्षरतेचे प्रमाण ५०–६० टक्के झाले आहे. परंतु स्त्रियांत ते अजूनही १०–२० टक्के एवढेच आहे. ग्रामीण भागातील शाळांतून सुद्धा मुलींचे प्रमाण अजून तिसरा किंवा चवथा हिस्साच आहे. ग्रामीण भागात मुलांच्या शिक्षणाकडे जारीने लक्ष देण्यात येत आहे. मुलाला शिकवून कोठेतरी नोकरीस लावून द्यावा या हेतूने मुलाच्या शिक्षणावर लक्ष आहे. परंतु मुलीस शिकवून काय उपयोग? ती दुसऱ्याच्या घरी जाणार आणि जाताना हुंडा घेऊन जाणार; मग त्यात आणखी तिच्या शिक्षणावर खर्च कशाला करा? या भावनेने अजूनही मुलींच्या शिक्षणाकडे दुर्लक्षच आहे.

लग्नाचे वय वाढल्यामुळेही अविवाहित मुलींची तिच्या बापाच्या घरी काहीशी केविलवाणीच परिस्थिती आहे. पूर्वीच्या काळी लहानपणीच वरसंशोधनास सुरुवात होत असल्याने योग्य वराकरता शोधाशोध करण्यास भरपूर फुरसत असे. आता मुलगी वयात आल्याखेरीज कोणी लग्नाच्या खटपटीस लागत नाही. त्यामुळे एकेक वर्ष जाईल तसे बापावर मुलीच्या लग्नाचे दडपण येते. त्यामुळे शेवटी कमीअधिक खर्च करून मुलगी कशीतरी उजवावी म्हणून तो धडपडीस लागतो. अशा परिस्थितीत उपवर मुलीची परिस्थिती साहजिकच केविलवाणी झालेली असते.

## मुलीला सासरी मिळणारी वागणूक : पूर्वी व आता

लग्न होऊन नवऱ्याच्या घरी गेलेल्या मुलीला सासरी मिळणाऱ्या वागणुकीत मात्र आता पुष्कळच फरक पडला आहे. पूर्वीच्या कुटुंबातील सून म्हणजे शेतकामासाठी विकत घेतलेली एक मोलकरीणच होती. पूर्वी स्त्रियांप्रतिबंधक कायदाही नव्हता. त्यामुळे ज्याच्या घरी शेती असत असे तो दोन किंवा तीन बायकासुद्धा करीत असे. या बायका म्हणजे शेतीत राबणारी हक्काची माणसे होती. सासूसुद्धा सुनेला नेहमी धाकात ठेवून राबवीत असे. काम नसले तरी सुनेने दुपारी थोडा घेतलेला झोपा सासूला खपत नसे. सुनेने सकाळी उठल्यानंतर तोंड धुतलेले सासूला चालत नसे. जेवणापूर्वीच सुनेने तोंड धुवावे असे होते. आजची नवविवाहित सून सकाळी उठल्याबरोबर घरातून निघून दात घासून, तोंड धुऊन, चहा घेऊन मग कामास लागते. पूर्वी चहा नव्हताच. पहाटे चांदणी आली की लगेच उठून सुना जात्याच दळणास बसत. आता गावोगावी पिठाच्या गिरण्या झाल्याने दळणाचे काम सोपे झाले आहे. काहीजण अजून पुष्कळ स्त्रियांनी घरीच करतात. परंतु तेही अधिकाधिक पिठाच्या गिरणीतील दळणावर जाऊ लागले आहे. दळणकांडणाचे काम कमी झाल्याने सुनेला सकाळी उठून तोंड धुण्यास आणि चहा पिण्यास फुरसत असते.

आहे की 'शेत गेलं आळशानं आणि लक्ष्मी गेली विटाळानं'. पूर्वापार चालत आलेली ही रूढी आजही चालत आहे. एकत्र कुटुंबात या गोष्टीचा त्रास वाटत नव्हता. परंतु विभक्त कुटुंबात याचा त्रास होतो. नवऱ्याला हाताने स्वैपाक करून घ्यावा लागतो, किंवा दुसऱ्याकडून करून आणावा लागतो. असे झाले तरी बायकोने विटाळात स्वैपाक करणे खेडेगावातील पुरुषांनाही सहसा पटणार नाही. मासिक विटाळाच्या निमित्ताने पुरुषांना स्त्रियांच्या स्वैपाकघरातील जीवनाचा महिन्यातून चार दिवस जो थोडाबहुत अनुभव येतो त्यामुळेही स्त्री-पुरुषांचे संबंध समान नात्याने दृढ होण्यास मदतच होत आहे.

पूर्वीच्या मानाने आता सासूचे वर्चस्व कमी होत असल्याचे सांगितलेच आहे. त्यात डिंभार्यप्रतिबंधक कायद्याचा जसा उपयोग झाला तसा स्त्रियांच्या वाढत्या नीटनेटक्या राहाणीचाही उपयोग होत आहे. स्त्रियांची राहाणी ज्या मानाने नीटनेटकी त्या मानानं पुरुषाचे लक्ष घरात राहाते आणि त्याच प्रमाणात सासूचे वर्चस्व कमी होते. सासूनंतर आज घराचा कारभार साहजिक सुनेकडे जाऊ लागला आहे. कुटुंब एकत्र असले तर थोरली सून कारभार पाहाते आणि धाकट्या जावा मदत करतात. थोड्याच दिवसात सगळ्यांची स्वतंत्र घरे सुरू होतात. पूर्वी असे होत नसे. घरात सहसा एखादी विधवा नणंद असावयाची आणि सासूनंतर नणंदेकडे कारभार जावयाचा. सान्या भावजया तिच्या धाकात असत.

## विधवेची परिस्थिती : पूर्वी व आता

आता परिस्थिती उलटी झाली आहे. आता विधवा नणंद घरात अडचण वाटू लागली आहे आणि तिला पोटच्या पायाची म्हणू लागल्या आहेत. विधवा नणंदांना माहेरी नीट वागणूक मिळत नाही. यामुळे विधवाही आता पूर्वीच्या मानाने माहेरी परत न येता सासरीच राहाणे पसंत करू लागल्या आहेत. हा फरक पडण्याचे आणखी एक महत्त्वाचे कारण म्हणजे विधवांना सासरच्या स्थावरात वाटणी मागण्याचा मिळालेला हक्क होय. पूर्वी विधवा स्त्रीला एकत्र कुटुंबाच्या जमिनीत वाटणी मागता येत नसे. सासरची माणसे फार तर तिला पोटगीपुरते धान्य व अंगाला वस्त्र देत असत. पोटगी घेऊन ती माहेरी भावाकडे राहाण्यास जात असे. आता विधवा भावजयींना जमिनीत वाटणी मागण्याचा हक्क मिळाल्यामुळे वाटणीसाठी त्या सासरी राहू लागल्या आहेत. सासरी राहाण्याने भावजयांची मानहानीकारक बोलणी ऐकून घ्यावी लागत नाहीत. दिरांशी प्रेम असेल तर एकत्र कुटुंबात हक्काने आणि मानाने, नाही तर स्वतंत्रपणे त्या राहू लागल्या आहेत.

विधवा निपुत्रिक असली तरी एकत्र कुटुंबाच्या स्थावरात तिला वाटणी मिळत असल्याने ती दिराचा मुलगा दत्तक घेऊन नवऱ्याचे नाव चालू ठेवण्याचा प्रयत्न करते. त्यामुळेही विधवेला सासरच्या कुटुंबात मानाने राहाता येते. मात्र त्याबरोबर निपुत्रिक विधवेने दत्तक घेण्यासाठी अनेक उपद्व्यापी भाऊबंदांच्या खटपटी सुरू

होतात, त्यांना शहाणपणाने तोंड द्यावे लागते. बाई शहाणी असेल तर म्हातारपणीच दत्तक घेते, आधी घेत नाही. परंतु अविचारी स्त्रिया तरुणपणीच कोणाच्या तरी भिडेखातर दत्तक घेऊन बसतात आणि पुढे पस्तावतात. विधवांचे स्थावर आणि त्यांना दिलेले किंवा द्यावयाचे दत्तक यांचे भोवती आज खेड्यांतून असंख्य भांडणे आणि दिवाणी दावे चालू आहेत. या दृष्टीने दत्तक कायद्यात अलीकडे झालेली दुरुस्ती शहाणपणाची आहे. या दुरुस्तीनुसार विधवा स्त्रीला ४०-४५ वयानंतर दत्तक घेता येईल आणि त्यावेळी दत्तकाचे वय १५च्या आतच असावे लागेल; म्हणजे दत्तक आईमुलांत आईमुलाइतका वयात फरक राहील अशी तरतूद आहे.

विधवा स्त्रीला सासरच्या स्थावरात मिळालेली वाटणी तिला विकता येत नाही. तिने त्या मिळकतीचा उपभोग घ्यावा परंतु तिची विल्हेवाट लावण्याचा तिला हक्क नाही. एकत्र कुटुंबाच्या कारणा-परताच तिला आपली मिळकत विकता येते. या निर्बंधामुळे अनेक उघरी दत्तकपत्रके होत असतात की जी वास्तविक खरेदीपत्रके असतात. अशाच्या दत्तकप्रकरणाचे राजकारणही खेड्यांमधून चालू असते. तसेच विधवेच्या जमिनी एखाद्या अडाणी माणसास विकत देऊन मग विधवेस दत्तक घालून जुन्या विकलेल्या जमिनी उखविणे असले उपद्व्यापही काही मंडळी करीत असतात. तात्पर्य विधवेस कायद्याने हक्क मिळाले आणि तिला सासरीच मानाने जगणे शक्य झाले हे खरे. परंतु त्याबरोबर शहाणपणाने वागण्याची जबाबदारीही विधवांवर पडली आहे. ती त्यांनी सांभाळली नाही तर स्थानिक राजकारणी, उपद्व्यापी आणि व्यसनी माणसांच्या कारस्थानात सापडण्याचा धोका निर्माण झाला आहे.

## ग्रामीण स्त्रीजीवनातील मूलगामी फरक

वर केलेल्या विवेचनावरून हे लक्षात येईल की ग्रामीण स्त्रीजीवनात गेल्या पाचपन्नास वर्षांत जे फरक झाले त्या सर्वांत महत्त्वाचा आणि मूलगामी फरक असा : पूर्वी ग्रामीण स्त्री लग्न झाल्यानंतरही माहेरास चिकटून असे. सासरी शेत आणि घरकाम करण्याकरता आवश्यक म्हणून विकत घेतलेली एक दासी असेच तिचे स्वरूप होते. तिला स्वतःला मुलेबाळे होऊन तिचे मुलगे मोठे होऊन त्यांच्या सुना घरात येऊन तिला स्वतःला सासूपण लाभेपर्यंत तिच्या जीवनाला स्वास्थ्य आणि सुरक्षितता नव्हती. प्रसंगाला संकटात उपयोगी पडेल हा भरंवसा तिला प्रत्यक्ष नवऱ्याबद्दलही वाटत नव्हता. दुर्दैवाने नवरा वारला आणि वैधव्य आले तर मग सासरी तिला थाराच नव्हता. मग माहेराखेरीज तिला गत्यंतरच नव्हते. जुन्या ग्रामीण स्त्रीजीवनात माहेर आणि भाऊ याना असलेले महत्त्व, आणि त्याविषयी स्त्रीस वाटणारा जिव्हाळा अनेक ग्रामीण स्त्रीगीतात ओतप्रोत भरलेला आहे. माहेर व भाऊ याजबद्दल जुन्या स्त्रीगीतांतून व्यक्त होणारा हा जिव्हाळा व प्रेम ही ग्रामीण स्त्रीस तिच्या सासरी न मिळालेली आत्मीयता आणि सुरक्षितता याचीच द्योतक आहेत.

ही परिस्थिती आता बदलत आहे. सणासुदीच्या निमित्ताने ग्रामीण स्त्रिया आजही सतत माहेरी जातात येतात. परंतु माहेराकडे बघण्याची त्यांची दृष्टी आता बदलत आहे. जुन्या स्त्रिया माहेराला हक्काचे घर मानीत आणि त्यामुळे सासरी त्यांचे रुसणे-फुगणे फार होई. जरा बिनसले की बाई बोचके बांधून माहेरी निघून जाई. आता माहेराचा हा आसरा कमी झाल्याने रुसणे-फुगणे कमी होऊन सांभाळून घेण्याचा समजूतदारपणा वाढत आहे. माहेरचा किंवा भावाचा संसार हा आपल्या भावजयीचा आहे आणि आपणास संसार करावयाचा तर तो आपल्या नवऱ्याचा संसार असावयास हवा याची तिला जाणीव होत आहे. त्यामुळे सासरच्या संसारात ती अधिक जबाबदारीने आणि आत्मीयतेने लक्ष घालू लागली आहे. एकूण ग्रामीण स्त्रीचा माहेरचा ओढा कमी होऊन सासरच्या संसारात मान व दर्जा वाढत आहे.

## घरात व बाहेर स्त्रीचा दर्जा वाढत आहे

सासरच्या घरात ग्रामीण स्त्रीचा जो दर्जा वाढत आहे त्याच अनुषंगाने गावात आणि समाजातही तिचा दर्जा वाढत आहे. पूर्वी खेडेगावातील स्त्री गावातून विशेषतः गावाच्या मुख्य रस्त्याने जाताना पायात चपला घालून जात नसे. हातात चपला घेऊन अनवाणी गावाच्या बाहेर गेल्यावर शिवारात तिने पायात चपला घालावयाच्या, अशी पद्धत असे. शिवारात सुद्धा कोणी ओळखीचा प्रतिष्ठित पुरुष रस्त्याने समोरून आल्यास स्त्रीने रस्त्याच्या कडेला एका बाजूला तोंड फिरवून उभे राहावयाचे आणि त्या पुरुषाला एका बाजूने रस्ता करून द्यावयाचा अशी रीत होती. समोरून येणारा पुरुष पुढे निघून गेल्यानंतर स्त्री पुढे चालू लागत असे. विवाहित स्त्रीच्या दासीपणाचीच ही लक्षणे होती. ही बंधने झपाट्याने नाहीशी होत आहेत. आता नवीन लग्न होऊन आलेल्या मुलीसुद्धा पायात चपला घालून चावडीसमोरून, हमरस्त्याने सरसकट जाऊ लागल्या आहेत. रस्त्यातून जाताना समोर कोणी गडीमाणूस आला म्हणून बाईमाणसाने बाजूला होऊन त्याला वाट देण्याची आता गरज राहिलेली नाही. पूर्वीच्या स्त्रिया घरातून बाहेर पडताना डोक्यावरून एवढा पदर घेत असत की त्याचे सारे कपाळ पदराने झाकलेले असावयाचे. आजकाल स्त्रिया पदर घेतात परंतु पदराने कपाळ झाकत नाहीत. तसेच पूर्वीच्या स्त्रिया लुगड्याच्या पदराने सारे अंग नीट झाकून घेत असत. त्यांच्या अंगातील चोळी सहसा दिसत नसे. आजकाल स्त्रियांना इतके झाकून घ्यावे लागत नाही.

ग्रामीण स्त्रियांचा समाजातील दर्जा वाढण्याचे एक कारण शाळांतून आणि आरोग्यखात्यात या दोन खात्यांत नोकरी करणाऱ्या स्त्रियांचे वाढते प्रमाण हे आहे. या नोकरीच्या निमित्ताने समाजात स्वतंत्रपणे वावरणाऱ्या स्त्रियांचे प्रमाण दिवसेंदिवस वाढत आहे. त्यांच्या अनुकरणाने नोकरी न करणाऱ्या स्त्रियांच्याही वागणुकीत फरक पडत आहे. पडणारा हा फरक सामान्यतः वावगा मानला जात नाही हे [illegible] बदलत्या सामाजिक जाणिवांचे द्योतक आहे.

ग्रामीण स्त्रीजीवनात होणाऱ्या ह्या परिवर्तनाची मुख्य कारणे म्हणजे शिक्षणाचा प्रसार, सर्वसामान्य आर्थिक विकास, शहरांशी वाढते दळणवळण व संबंध आणि ग्रामीण समाजात झपाट्याने पसरत चाललेले सामाजिक व राजकीय नेतृत्व ही होत. परंपरेने आणि रूढीने स्त्रीवर घातलेली बंधने नाहीशी व्हावीत आणि स्त्रीस घरात आणि समाजात पुरुषाबरोबर समान दर्जा मिळावा ही कल्पना समाजातील सर्व जाणत्या आणि नेत्या पुरुषांना मान्य आहे हीही या प्रश्नाबाबत फार मुद्देयाची गोष्ट आहे. घटनेने स्त्रियांना पुरुषाबरोबर दिलेला समान मतदानाचा हक्क हाही स्त्रियांचे समान हक्क दृढतर परंतु निश्चितपणे प्रस्थापित करण्यास उपयोगी पडत आहे. असे असले तरी स्त्रीजीवनाची प्रगती आणि उन्नती होत आहे यापेक्षा अधिक झपाट्याने व्हावी, स्त्रियांचे आर्थिक स्वातंत्र्य आणि सामाजिक समता शक्य तितक्या लवकर प्रस्थापित व्हावी आणि स्त्रियांनी देशाचे समाजकारण, राजकारण आणि अर्थकारण यांत पुरुषांच्या बरोबरीने भाग घेण्यास सिद्ध व्हावे म्हणून सरकारने काही विशेष प्रयत्न करावयास हवे होते तसे अजून केलेले नाहीत. ते करणे आवश्यक आहे.

### विकासयोजनेत स्त्रियांचे स्थान अत्यल्प

आजच्या सरकारी विकासयोजनेत स्त्रियांकरिता म्हणून जे खास कार्यक्रम आहेत त्यांत भजनी मंडळे, महिला-मंडळे अशा तऱ्हेचे कार्यक्रम आहेत. ते आपापल्या परीने उपयुक्तही आहेत. पूर्वीच्या काळी स्त्रिया नागपंचमी, संक्रांत, लग्नकार्य, यात्रा, जत्रा इत्यादी निमित्ताने समाजात एकत्र येत असत; आणि याच निमित्ताने त्यांना घराबाहेर पडता येत असे. आता भजनी मंडळे, महिला-मंडळांच्या निमित्ताने सुद्धा थोड्याच का होईना परंतु काही स्त्रिया घराबाहेर पडतात. परंतु स्त्रीजीवनाची प्रगती झपाट्याने व्हावयाची असेल तर एवढ्याने भागणार नाही. आर्थिक स्वातंत्र्य हा सामाजिक व राजकीय स्वातंत्र्याचा आणि समतेचा पाया आहे. या दृष्टीने अर्थ-व्यवहारातील काही क्षेत्रे स्त्रियांकरिता राखून ठेवणे किंवा काही क्षेत्रांत त्यांना अग्रहक्क देणे उपयुक्त ठरेल. प्राथमिक शिक्षण हे असे एक क्षेत्र आहे. आज ग्रामीण भागात प्राथमिक शिक्षणाचा प्रसार होत आहे. प्राथमिक शिक्षकांची संख्या दिवसेंदिवस वाढत आहे. यात स्त्रीशिक्षकही आहेत. परंतु आज प्राथमिक शिक्षकांत स्त्रियांचे प्रमाण जेमतेम दहा टक्केच आहे. थोड्या प्रयत्नाने हे सहज वाढविता येईल आणि वाढविणे इष्ट ठरेल. कारण घराबाहेर स्त्रियांनी करण्यासारखी जी कामे आहेत त्यांत प्राथमिक शिक्षण सर्वांत महत्त्वाचे आहे. आरोग्य खात्यातील दुय्यम दर्जाच्या कामाचेही असेच आहे, ही कामे पुरुषापेक्षा स्त्रियांनी करण्यासारखी आहेत. या खात्यांतील नोकऱ्यात स्त्रियांना अग्रहक्क दिला आणि या खात्यांतील नोकऱ्यांचे नियम स्त्रीजीवनाच्या गरजा आणि सोयी-गैरसोयी लक्षात घेऊन ठरविले तर ग्रामीण स्त्रीजीवनाची प्रगती होण्यास पुष्कळच मदत होईल.

प्राथमिक शिक्षण आणि सार्वजनिक आरोग्य या दोन खात्यांतील नोकऱ्यां-प्रमाणेच दुसरी अनेक क्षेत्रे स्त्रियांना अनुरूप आहेत. उदाहरणार्थ, कुक्कुटपालनाचा व्यवसाय. आज खेडेगावांतून कोंबड्यांचा व्यवहार हा बहुधा स्त्रियांच्या हाती आहे. असे असूनही या धंद्यासंबंधीच्या विकासयोजनेत स्त्रियांना मुळीच स्थान नाही असे का? या धंद्यात निव्वळ स्त्रियांच्या सहकारी संस्था निर्माण करून त्यांना प्रोत्साहन देणे सहज शक्य आहे. तीच गोष्ट गावोगावी असलेल्या पिठाच्या गिरण्यांची. अशीच आणखीही स्त्रियांना अनुरूप अशी आर्थिक क्षेत्रे निवडता येतील. अशा सर्व क्षेत्रांत स्त्रियांच्या सहकारी संस्था निर्माण करून त्यांना अग्रहक्क दिला गेला तर ग्रामीण स्त्रियांच्या प्रगतीस निःसंशय मदत होईल.

## ग्रामीण भागात बुद्धिपुरस्सर प्रगतीचे प्रयत्न केले पाहिजेत

स्त्रियांनी सामाजिक व राजकीय क्षेत्रातही पुरुषांच्या बरोबरीने भाग घ्यावा म्हणून घटनेने त्यांना समान मतदानाचे हक्क दिले आहेत. असे असूनही ग्रामीण समाजातील स्त्रिया याबाबत अजून म्हणावी तशी प्रगती करू शकलेल्या नाहीत. ग्रामपंचायत समित्या किंवा जिल्हा परिषदा इत्यादी लोकनियुक्त संस्थात स्त्रियांचे प्रमाण अगदीच कमी आहे. पुष्कळ ठिकाणी एकही स्त्री निवडणुकीस उभी राहून निवडून न आल्याने मुद्दाम निमंत्रण देऊन आणून बसवावी लागते. ही परिस्थिती सुधारावयाची तर केवळ घटनेने आणि कायद्याने अधिकार आणि हक्क दिले, आता तुमचे तुम्ही पाहा असे म्हणून भागणार नाही. सामाजिक आणि राजकीय क्षेत्रात स्त्रियांना अनुरूप अशी क्षेत्रे कोणती ती हुडकून ती स्त्रियांकरता राखून ठेवणे किंवा निदान त्यांत स्त्रियांना अग्रहक्क देणे हे योग्य आणि आवश्यक ठरेल. या दृष्टीने ग्रामपंचायतीच्या कारभाराचा विचार करावयास हवा. सध्याच्या ग्रामपंचायत कायद्यान्वये ग्रामपंचायतीस अनेक कामे दिली आहेत. तरीसुद्धा गावाची स्वच्छता आणि पाणी व दिवाबत्तीची सोय हीच महत्त्वाची कामे आहेत. ही कामे सर्वस्वी स्त्रियांनी करण्याजोगी आहेत. पुरुषांना या कामांची आस्था नाही. ती हातात घेऊन पुरुषांनी त्याचे केवळ राजकारण केलेले आहे. तरी चालू ग्रामपंचायत कायदा दुरुस्त करून ग्रामपंचायतींचा कारभार सर्वस्वी स्त्रियांच्या हाती देता येईल का याचा अवश्य विचार करावा.

आपल्या समाजातील परंपरागत आर्थिक आणि सामाजिक विषमतेमुळे समाजातील *अनेक वर्ग मागे राहिलेले आहेत. त्यांत संख्येने मोठा वर्ग स्त्रियांचा आहे.* विषमतेने खाली दडपून ठेवलेले हे वर्ग उन्नत करावयाचे तर त्याकरिता हेतुपुरस्सर धोरण आणि कार्यक्रम असावयास हवेत.

# स्त्रीस्वातंत्र्याची वाटचाल

कृष्णाबाई मोटे

सौ. कृष्णाबाई मोटे, बी. ए. डिप्लोमा इन् सोशल सायन्स (लंडन) (जन्म १८-७-१९०३) सरकारी मजूर विभागातील सेवानिवृत्त अधिकारी. त्यानंतर काही वर्षे महाराष्ट्र राज्य बालकल्याण समितीच्या संस्थेच्या चिटणीस. 'दृष्टीआडच्या सृष्टीत', 'मोलकरणीचे जीवन' वगैरे पुस्तकांच्या आणि अनेक लेखांच्या व कथांच्या लेखिका. समाजकार्याची आवड. (३ वेस्ट व्ह्यू, दादर, मुंबई १४)

"In demanding equal status and opportunity we desire to achieve for woman the possibility of development under favourable circumstances of education and opportunity."

"In order to help woman to become useful citizen and productive worker, she must be assured of her Fundamental Rights and those are Right to Educate; Right to Work; Right to Freedom of Association Right to Property, Equality of Rights and Obligations arising out of Marriage, Right of Franchise, Right to Identical Moral Standars; Right to Health; Right to Leisure."

## पश्चिमेकडून आलेले हक्काचे वारे

योजना समितीपुढे स्वतंत्र स्त्रीचे कार्यक्षेत्र विशद करीत असता अखिल भारतीय स्त्रीसंघटनांनी स्त्रीचे स्वातंत्र्य म्हणजे काय ही गोष्ट वरील अवतरणात सुसंगतता-पूर्वक इतक्या स्पष्ट शब्दांत मांडूनच पुढील विचाराला सुरुवात केली आहे. त्यामुळे स्त्रीस्वातंत्र्याची वाटचाल म्हणजे काय हे पाहणे बरेच सुगम झाले आहे.

एकदा स्त्रीस्वातंत्र्याची ही कल्पना आल्यावर एक गोष्ट स्पष्ट होते ती म्हणजे ही कल्पना मुळातच आपल्याकडील नाही. हे वारे हक्काचे वारे पश्चिमेकडून आलेले आहेत. ब्रिटिश अंमलानंतर युरोपियन लोकांच्या सहवासाने चालू झालेले आहेत. तेव्हा ही चळवळ तेथे कशी सुरू झाली याचा थोडक्यात आढावा घेणे आवश्यक आहे.

युरोप व इंग्लंडमध्ये या कल्पनेची पीछे प्रथम अठराव्या शतकाच्या अखेरी-अखेरीस कळत नकळत झाली असे म्हणण्यास हरकत नाही. युरोपियन इतिहासात ही काळ

फार मोठ्या वैचारिक संक्रमणाचा व सामाजिक परिवर्तनाचा होता. वैज्ञानिक, यांत्रिक व नव्या जगाच्या शोधांनी समाजाचे आमूलाग्र परिवर्तन होत होते. आर्थिक उत्पादनमार्गांत तर क्रांतीच झाली होती.

अठराव्या शतकाच्या मध्यापासूनच हे नव्या युगाचे वारे वाहू लागले होते. सामाजिक, राजकीय, आर्थिक इत्यादी सर्व्या क्षेत्रांतून नवे विचार, नव्या कल्पना आकार घेऊ लागल्या होत्या. ब्रिटनमध्ये बेकन, बेन्थम इत्यादी, फ्रान्समध्ये रूसो, व्होल्टेअर इत्यादी विचारवंत उत्वज्ञांनी या नव्या युगाची बांग केव्हाच दिली होती. त्यानंतर फ्रेंच राज्यक्रांती झाली आणि सामान्य मनुष्याच्या स्वातंत्र्ययुगाचा जणू काय उदय झाला.

फ्रेंच राज्यक्रांतीनंतर सामाजिक, राजकीय, आर्थिक सऱ्या क्षेत्रांत व्यक्तिस्वातंत्र्याच्या, समानतेच्या, बंधुभावाच्या कल्पना उफाळून उठल्या. त्याच्या आधीपासूनच विचारवंत तत्त्वज्ञानी, समाजात होणाऱ्या परिवर्तनाने, आपल्या तत्त्वविचारांना मानव-कल्याणाचा निकष लावून पाहण्यास सुरुवात केली होती. पण प्रत्यक्ष फ्रेंच राज्यक्रांतीनंतर तर जगातील दुःख कमी करून पुष्कळांचे पुष्कळ सुख कशाने साध्य करून घेता येईल अशा विचारांकडे व प्रयत्नांकडे तत्त्वज्ञांचे लक्ष वेधले. सामाजिक विषमता, अन्याय, जुलूम व त्याबरोबरच समाजातील एका वर्गाकडून दुसऱ्याची होणारी पिळवणूक कशी थांबवता येईल या संबंधीच्या निरनिराळ्या मार्गांचा विचारही याच वेळी सुरू झाला. त्या दृष्टिकोणातून सामाजिक कायदे होऊ लागले. सामाजिक निरनिराळ्या संस्था व संघटना अस्तित्वात येऊ लागल्या. राजकीय सुधारणा, मतदानाच्या हक्काचा सार्वत्रिक प्रसार, शिक्षणाचा प्रसार, यासंबंधी नाना प्रयत्न सुरू झाले.

वैचारिक क्षेत्रात बुद्धिनिष्ठ उदारमतवाद, आर्थिक क्षेत्रात अनिर्बंध व्यापार, सामाजिक क्षेत्रात अन्याय, जुलूम व सामाजिक विषमता याविरुद्ध झगडा व राजकीय क्षेत्रात राजाच्या परमेश्वरी अंशाविरुद्ध लोकशाहीच्या कल्पना, अशा आचारविचार मंथनाचा तो काळ होता.

अशा वेळी समाजाचे अर्धे अंग जे स्त्रिया ते किती विकल असहाय होऊन पडलेले आहे, याची जाणीव विचारवंतांना न होती तरच नवल होते. खुद्द स्त्रियांना सुद्धा आपल्या परवशतेची, दुबळेपणाची जाणीव होऊन त्या हालचाल करू लागल्या. त्यानंतर एक शतकभर इंग्लंडात व इतर पाश्चात्य देशांत स्त्रीदास्यविमोचनाची जी चळवळ झाली तिचा इतिहास इथे देण्याचे कारण नाही.

अखेर शासनसत्तेला चळवळयास कारणीभूत होणारा मतदानाचा अधिकार मिळविल्याखेरीज फारसा अर्थ नाही असे या चळवळीचे नेतृत्व करणाऱ्या स्त्रियांना कळून चुकले. त्यांनी स्त्रीच्या मतदानाचा हक्क मिळावा असा अट्टाहास सुरू केला. त्याला पहिल्या महायुद्धानंतर मात्र अंशतः यश आले; तोपर्यंत नाही. हे सारे सांगण्याचे कारण एवढेच की आपल्याकडील स्त्रीस्वातंत्र्याच्या चळवळीतही अनुस्यूत कल्पना याच होत्या.

कदाचित पहिल्याने त्याचे रूप इतके स्पष्ट नसेल, पण पुढे ते आपोआप स्पष्ट होत गे

मात्र आपल्याकडील परिस्थितीप्रमाणे तिचे स्वरूप ब्रिटनमधील चळवळीपे वेगळे झाले. कोणत्याही देशाची चळवळ तेथील विशिष्ट परिस्थितीनुसार आकार असते. त्या दृष्टीने पूर्वकालावर विहंगमदृष्ट्या नजर टाकणे आवश्यक आहे. पण वैदि कालची स्त्री, स्मृतिकालातील स्त्री, इतिहासकाळातील स्त्री, याविषयी याच ग्रंथा पहिल्या विभागात बराच ऊहापोह झाला असल्यामुळे येथे एकोणिसाव्या शतकापासू स्वातंत्र्याची वाटचाल पाहाणे योग्य होईल.

युरोपात वैज्ञानिक व यांत्रिक शोधांनी जी औद्योगिक क्रांती घडून आली, नि व वैचारिक क्रांतीने अर्थव्यवस्थेत, अर्थोत्पादनमार्गात अनपेक्षित बदल होऊन सामान्य मनुष्याकडे पाहण्याचा जो नवा सामाजिक दृष्टिकोण आला, तो आपल्याकडे या काळापर्यंत आला नव्हता असे म्हणणे भाग पडते. त्यामुळे व्यक्तिदृष्ट्या अन्याय्य धार्मिक बंधनांनी व सामाजिक बंधनांनी स्त्री शतकानुशतके दबडली जाऊन निकृष्टावस्थेपर्यंत पोहोचली होती. वैदिक कालच्या स्वतंत्र स्त्रीची पुसट आकृतीसुद्धा तिच्या ठिकाणी उरली नव्हती. बौद्ध, महानुभाव, भक्तिमार्गी संतांनी तिला माणूस म्हणून ओळखले, रूढ्याविरुद्ध झालेल्या उठावात तिला सहप्रवासी म्हणून घेतले, पण ते सारे धर्म, मोक्षाच्या मार्गावर, परमेश्वराच्या वाटेवर. त्यामुळे स्त्रीकडे पाहाण्याच्या सामाजिक दृष्टिकोणात फारसा बदल झालेला नव्हता असाच निष्कर्ष काढावा लागतो.

## सामाजिक क्षेत्रातील वाटचाल

दैवगती अशी विचित्र की १९ व्या शतकात ब्रिटिश अंमल प्रस्थापित होऊन भारत पारतंत्र्यात जखडला गेला, आणि बरोबर याच वेळी व्यक्ति-स्वातंत्र्य, समानता, बंधुभाव, बुद्धिवाद, लोकशाही इत्यादी युरोपला हालवून सोडणाऱ्या नवविचारांचे प्रवाह इंग्रजी भाषेच्या साहचर्याने आपल्याकडे वाहू लागले. त्याच सुमारास ब्रिटनमध्ये रिफॉर्म बिलाची व स्त्री-स्वातंत्र्याची चळवळही उदय पावत होती. इंग्रजी भाषेच्या 'वाघिणीचे दूध' प्यालेली आमच्या विचारवंतांची पिढी या सर्व नवविचारांनी अक्षरशः दिपून गेली. समाजाकडे, व्यक्तीकडे पाहण्याची एक प्रकारची नवी दृष्टी तिला प्राप्त झाल्यासारखे झाले. पारतंत्र्याच्या शृंखला तर पायांत रुतत्च होत्या, पण त्यावेळी आपला धर्म, चालीरीती, परंपरा या नावाखाली आपण काय काय अन्याय करतो याचे एक हृदयविदारक दृश्य साक्षे त्यांच्यासमोर उभे राहून विचारवंतांची मने अस्वस्थ होऊ लागली. ती इतकी की काहींना अशा अन्यायांनी जुलुमांनी पिडलेला समाज-पुरुष, पारतंत्र्याच्या शृंखला समजा तुटल्या तरी या नव्या युगात कितपत उभा राहू शकेल किंवा जीवनसंग्रामात तग देऊ शकेल याविषयी संशय उत्पन्न झाला. पारतंत्र्या-बरोबरच किंबहुना जीवनसंग्रामात जगायचे असेल तर त्या आधीच माणुसकीला काळिमा लावणाऱ्या ज्या गोष्टी धर्मरूढीच्या नावाखाली आपल्याकडे चालतात त्या बंद

होऊन समाजात नवचैतन्य आल्याखेरीज तरणोपाय नाही असे ठामपणे त्यांच्या मनाने घेतले. अशा मनःस्थितीत पत्नी, आई, बहीण, मुलगी, भावजय, इत्यादी नात्यांनी भारतीय स्त्रीची वैयक्तिक व सामाजिक निकृष्टावस्था त्यांच्या अगदी डोळ्यासमोर, कित्येक वेळा घरातच त्यांच्या अष्टौप्रहर नजरेसमोर उभी ठाकत असल्याने, स्त्रीजातीला अशा छळातून, गुलामगिरीतून मुक्त करून प्रतिष्ठा प्राप्त करून देण्याकरिता त्यांनी कंबर कसली असल्यास नवल नाही. त्याकाळी रूढीविरुद्ध पाऊल टाकणे म्हणजे किती महाकर्म कठीण होते याची कल्पना त्यांनी पंडिता रमाबाईंचे चरित्र, 'आमच्या आयुष्यातल्या आठवणी', आगरकरांचे चरित्र, भारतरत्न कर्वे यांचे आत्मचरित्र इत्यादी चरित्रे वाचली असतील त्यांना सहज येऊ शकेल. रूढीविरुद्ध बंड करून सुधारणा करू पाहणाऱ्या या सर्व लोकांना त्यावेळी निंदा, अपमान, उपहास, छळ, एवढेच नव्हे, तर सामाजिक बहिष्काराच्या सुद्धा दिव्यातून जावे लागले आहे.

सती गेलेली स्त्री पाहात असता आपल्या बालमनाला जे वाटले ते खऱ्या माणुसकीचे होते अशी विचारांती खात्री होऊन राजा राममोहन रॉयनी सतीच्या चालीविरुद्ध १८२९ च्या आधी जेव्हा पहिली तोफ डागली तेव्हा कट्टर धर्माभिमान्यांकडून त्यांना अगदी कडवा विरोध झाला. विलायतेला जाऊनही अशा अघोरी चालीचे धर्माच्या नावावर त्यांनी समर्थन करण्याचा प्रयत्न केला. पण अखेरीस १८२९ मध्ये बेंटिंकच्या कारकीर्दीत सतीची चाल कायद्याने बंद झाली. या चालीच्या बाबतीत एवढे स्पष्टपणे नमूद केले पाहिजे की ही चाल फक्त ब्राह्मण, क्षत्रिय वर्गापुरतीच मर्यादित होती, असे दिसते. त्यातही सर्वच विधवा स्त्रिया सती जात असत असे नाही. तथापि त्यांनी जाणे चांगले अशी मात्र धर्माची अपेक्षा होती असे दिसून येते.

राजा राममोहन रॉय व तदनंतर पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्यासारख्या गाढे संस्कृत प्रकांड पंडित स्त्रियांचे बाबतीत दुसरे दुसरे शल्य नाहीसे करण्यास पुढे सरसावले, ते स्मृतिवचनांचा आधार घेऊनच. ते शल्य म्हणजे विधवेला पुनर्विवाहाची बंदी. त्याबरोबरच स्त्री-शिक्षणाच्याही प्रसाराचा प्रश्न त्यांनी हाती घेतला. किंबहुना त्यांच्या देशभरच या सुधारणांची लाट उसळली होती. पंजाबात दयानंद सरस्वती व त्यांचे आर्यसमाजिस्ट अनुयायी. गुजराथेत दलपतराय, लक्ष्मीशंकर उमियाशंकर, आपल्याकडे लोकहितवादी, बाळशास्त्री जांभेकर, महादेव गोविंद रानडे, पंडिता रमाबाई, आगरकर, फुले, भारतरत्न कर्वे, गोपाळ कृष्ण देवधर, इत्यादी मंडळींनी अन्यायी सामाजिक चालीरीती मोडून स्त्री-शिक्षणाचा प्रसार करून एकप्रकारे रूढीविरुद्ध बंडाचा झेंडाच उभारला. यात पहिल्यापासून दोन प्रवृत्ती स्पष्ट होत्या. दयानंद सरस्वतींसारखे सुधारक, वैदिक काळी सर्व काही उत्तम होते असे धरून वैदिक समाजरचनेचा आदर्श पुढे ठेवून अन्यायी चाली-रूढीविरुद्ध बंड करीत होते, तर रानडे-आगरकरांसारख्यांना जुने परत आणणे अशक्य आहे, तेव्हा नव्यानेच समाजरचना केली पाहिजे, अशा विचार करून नवसमाजाचे स्वप्न पाहात होते.

हे सारे करण्याकरिता जनमत वळविणे तर भाग होतेच. पण ते काम इतके सोपे मात्र नव्हते. शिवाय या सुधारणा करताना धावयाचा लढा स्वकीयांविरुद्धच होता. म्हणून न्यायमूर्ती रानड्यांनी सुचविल्याप्रमाणे, प्रथम स्मृति, इतिहास, पुराणे इत्यादी धर्मग्रंथांची साक्षीवचने देऊन सामाजिक सुधारणांची आवश्यकता पटविणे, त्यानंतर युक्तिवादाने सदसद्विवेकबुद्धीला आवाहन करणे व शेवटी कायद्याने सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न करणे असा समाजसुधारणांच्या प्रचाराचा कार्यक्रम सुधारकांनी हाती घेतला. राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाच्या वेळी सामाजिक विभागात सामाजिक प्रश्नांचा खल राष्ट्रपातळीवरून व्हावा असेही रानड्यांनी सूचना केली. पण एकदोन वर्षांतच ते शुक्य नाही असे आढळून आल्याने राष्ट्रपातळीवरून सर्व सामाजिक प्रश्नांचा खल करणारी सामाजिक परिषद वेगळी भरविण्यात येऊन सर्व प्रांतांतून तिच्या शाखा उघडल्या गेल्या. हिंदी स्त्रीस्वातंत्र्याच्या इतिहासात सामाजिक परिषदेच्या द्वारे समाज-सुधारकांनी केलेल्या या आरंभकालच्या प्रयत्नांचे स्थान फार मोठे आहे. त्यांनीच पहिल्या प्रथम स्त्रीला व्यक्ती म्हणून ओळखले. विवाहविषयक कायद्यांनी, संपत्तीविषयक कायद्यांनी तिला वैयक्तिक व सामाजिक स्थान मिळवून देण्याचा प्रयत्न केला. शिक्षणाचा—व्यावसायिक शिक्षणाचा प्रसार करून तिला आर्थिक स्वातंत्र्याचे मार्ग खुले होतील, असे प्रयत्न केले. तिच्या नैसर्गिक शक्तींचा नीट विकास व्हावा, एतदर्थ निरनिराळ्या संस्था व यंत्रणा उभ्या केल्या. अर्धेपाऊण शतक समाजसुधारकांनी केलेल्या या प्रयत्नांचा परिणाम म्हणून १९व्या शतकाच्या आरंभीला 'गोठ्यातील दावणीला बांधलेले मुके जनावर' अशी अवस्था असलेली भारतीय स्त्री २०व्या शतकाच्या प्रथम चरणातच स्वतःच्या पायावर उभे राहून बोलण्यास समर्थ अशी झाली. या सर्वांचे मुख्य श्रेय प्रागतिक दृष्टिकोनाच्या समाजसुधारकांच्या चळवळीला द्यावे लागेल यात संशय नाही.

## राजकीय क्षेत्रातील वाटचाल : पूर्वरंग

प्रागतिकांच्या नेतृत्वाखाली स्त्रीस्वातंत्र्याची अशी विधायक वाटचाल होत असता, देशात आणखी एक दुसरी लाट उसळून हळूहळू वर येत होती. काही काळ ती दडल्यासारखी दिसे, पण फिरून दुप्पट जोराने उसळून वर येई. अखेर ती इतकी उसळून देशभर सर्वत्र पसरली की स्त्रीस्वातंत्र्याची चळवळसुद्धा तिच्यात दडून गेली की काय असा काही काळ भास झाला. ती उसळती लाट म्हणजे राजकीय मुक्तीच्या देशस्वातंत्र्याच्या चळवळीची.

ब्रिटिश अमलदारांनी पहिल्याने टोक जरासे दिपून जाऊन त्यांच्या सुधारणांनी भारावून स्थिरावल्यासारखे हालेले दिसले. तरी अखेर राजकीय हक्क—नव्हे स्वदेशच मिळविल्याखेरीज कोणतेही पाऊल पुढे पडणे शक्य नाही असे विचारवंतांना वाटू लागले. त्याला कोणत्याही क्षेत्राचा अपवाद नव्हता.

पहिल्या महायुद्धाच्या वेळी मिसेस ॲनी बेझंट या पाश्चात्य स्त्रीने हिंदी राजकारणात पहिल्याने पाऊल टाकले. त्यांच्या स्वाभाविक तडफेने त्यांनी सान्या हिंदवासीयांना 'जागे व्हा' म्हणून तर आवाहन केलेच पण स्त्रियांनाही साद घातली. त्याचे संवदनशील्य वाढवाण्याजोगे होते. १९१७त त्या काँग्रेसच्या अध्यक्ष झाल्या. लवकरच 'विमेन्स इंडियन असोसिएशन' या नावाची राजकीय, सामाजिक इत्यादी स्त्रियांच्या साऱ्या प्रश्नांचा राष्ट्रपातळीवर खल करणारी एक संघटना त्यांनी तयार केली. (हीच संघटना पुढे अखिल भारतीय महिला परिषदेत विलीन झाली.) प्रांतोप्रांतीच्या शहरी तिच्या शाखा उघडल्या गेल्या व स्त्रीधर्म नावाचे स्त्रियांच्या साऱ्या प्रश्नांविषयी खल करणारे परिषदेचे मुखपत्र सौ. मार्गारेट कझिन्स या कर्तबगार महिलेच्या संपादकत्वाखाली निघू लागले.

स्त्रियांच्या चळवळीला राजकीय क्षेत्राकडे खेचून घेणारी आणखीही एक घटना त्यावेळी घडलेली होती. ब्रिटनमधील स्त्रीस्वातंत्र्याची चळवळ राजकीय म्हणजे मतदानाच्या हक्काखेरीज इतर सर्व व्यर्थ, या भूमिकेवर येऊन, महायुद्धाच्या कितीतरी आधीपासून त्या क्षेत्रातच लढा देत होती. तो हक्क त्यांना युद्धानंतरच मिळाला. त्याचेही पडसाद आपल्याकडे उठले. शिवाय त्याच वेळी मॉंटेग्यू, चेम्सफर्ड सुधारणापूर्वीचे वातावरण तयार झाले होते. सुधारणा कायद्याच्या पूर्वतयारीसाठी त्यावेळचे हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी सर मॉंटेग्यू देशभर अवलोकनासाठी दौरा करीत होते. अशा वेळी सौ. सरोजिनी नायडू यांच्या नेतृत्वाखाली अखिल भारतीय स्त्रियांचे प्रातिनिधिक शिष्टमंडळ सर मॉंटेग्यूंना भेटले. त्यांनी 'सर्व लोक'यांत स्त्रियांचाही समावेश व्हावा, शिवाय आरोग्य, शिक्षण या बाबतीत स्त्रियांकरिता अधिक सोयी व्हाव्यात अशी मागणी केली. भारतीय स्त्रीस्वातंत्र्याच्या चळवळीत ही स्त्रियांची संघटनात्मक मागणी म्हणजे एक मोठेच पताकास्थान झाले. कारण अखिल भारतीय स्त्रीसंस्थांनी संघटित होऊन स्वतः केलेली ही पहिली मागणी.

यानंतर स्त्रीसंस्थांना व संघटनांना चांगलीच चालना मिळाली. देशभर शहरोशहरी जागृत स्त्रिया संघटित होऊन प्रचार करू लागल्या. याच वेळी स्त्रीसंघटनांतून मध्यमवर्गीय स्त्रियांचा प्रवेश झाला. हा नवा वर्ग सामाजिक सुधारणाच्या बाबतीत कर्वे-आगरकरांचा अनुयायी तर राजकीय बाबतीत स्वातंत्र्याचा भोक्ता असा होता.

मॉंटेग्यू चेम्सफर्ड रिपोर्टात स्त्रियांच्या या मागणीची, ती मध्यवर्ती सरकारच्या कक्षेतील नव्हे, असे म्हणून बिलकूल दखल घेण्यात आली नाही. मात्र साउथबरो कमिटीवर तो प्रश्न सोपविण्यात आला. त्या कमिटीने सुधारणा कायद्यान्वये अस्तित्वात येणाऱ्या प्रांतीय कायदेमंडळाला या बाबतीत विचार करून निर्णय घेण्याची मुभा ठेवली. मग अशी की, प्रांतिक कायदेमंडळानी पुरुष मतदार सभाऱ्या अटीवरच स्त्रियांनाही मतदानाचा हक्क द्यावयाचे ठरविले. मद्रासने हा मान प्रथम पटकावला. मग मुंबई. १९२९ पर्यंत इतर प्रांतातील कायदेमंडळानीही स्त्रियाना पुरुष मतदारसभाऱ्या अटीवरच

मतदानाचा हक्क बहाल केला. अर्थात मतदारांकरता ठेवलेल्या अटी अशा होत्या की प्रत्यक्षात अतिशयच थोड्या बायकांना हा हक्क मिळाला होता. १९२३ मध्ये मध्यवर्ती कायदेमंडळाच्या बाबतीतही तशाच अटींवर स्त्रियांना मतदानाचा हक्क देण्यात आला. पण मतदानाच्या हक्काची ही एक बाजू स्त्रियांनी जिंकली असली, तरी प्रत्यक्ष उमेदवार म्हणून उभे राहण्याचा अधिकार त्यांना मिळाला नव्हता, तो १९३१ साली मिळाला.

मध्यंतरी १९२६ साली सरकार-नियुक्त सभासद म्हणून कायदेमंडळातील काही जागा बायकांकरिता राखून ठेवण्यात आल्या. राजकीय क्षेत्रात एकीकडे सुधारणांची ही मनदशीर वाट चालू असताच दुसरीकडे हिंदी स्वातंत्र्याच्या चळवळीत महात्माजींचे आगमन होऊन निराळाच रंग भरू पाहात होता.

## देशस्वातंत्र्याच्या लढ्यात स्त्रियांची अतुलनीय कामगिरी

मॉंटेग्यू चेम्सफर्ड सुधारणांनी लोकांचे समाधान झाले नाही. तेवढ्यात, आगीत तेल ओतावे त्याप्रमाणे, जालियनवाला बागेचे प्रकरण घडले. शेकडो निरपराध स्त्री-पुरुष, बायकामुले यांची कत्तल झाली. या वार्तेने लोकांत आगीचा डोंब उसळून उठला. महात्माजींनी नागपूरच्या कॉंग्रेस अधिवेशनात आपल्या असहकाराच्या लढ्याचा पुकारा केला. बहिष्काराची चळवळ सुरू झाली. जालियनवाला बागेमुळे लोकमत किती प्रक्षुब्ध झाले होते, त्यात बायकाही किती मोठ्या प्रमाणात सहभागी होत्या याची कल्पना, नागपूर अधिवेशनाकरिता देशातून आलेल्या स्त्रीप्रतिनिधींची संख्या लक्षात घेतली तरी सहज येईल. १९२१ च्या असहकाराच्या लढ्यात स्त्री-पुरुष, मुलेमुली, सारीच भराभर तुरुंगात पडली. शाळकरी पोरेपोरीही आल्या. हिंदी स्वातंत्र्याच्या चळवळीच्या क्षितिजावर महात्माजींचा उदय झाल्याबरोबर, राष्ट्रीय चळवळ ही खरोखरी अखिल जनतेची चळवळ होत गेली.

सामाजिक बाबतीत, महात्माजींचा दृष्टिकोण सुधारकांचा होता. दीन, दलित, स्त्रिया यांना ते हीन लेखीत नसत. उलट त्यांना आपल्या बरोबरीची एक व्यक्ती समजून समाजात प्रतिष्ठा प्राप्त व्हावी एतदर्थ ते अहर्निश झटत. स्त्रीला तर त्यांनी कधीच कमी मानले नाही. सत्य-अहिंसेचे तर ते पुजारीच होते. स्वातंत्र्याकरिता त्यांनी लढाच मांडला होता. याशिवाय त्यांच्या चळवळीचा आणखी एक असा विशेष होता की, सामान्यातल्या सामान्य मनुष्यालाही त्यात भाग घेता येऊन त्याने सैनिक व्हावे. खादी (टकळी), परदेशी मालावर बहिष्कार, असहकारिता, सविनय कायदेभंग, ही त्यांची शस्त्रास्त्रे होती. त्यांत शरीरबलापेक्षा मानसिक बळाचीच जास्त आवश्यकता होती. अशा वेळी, स्त्रिया या चळवळीकडे आकृष्ट होऊन स्वातंत्र्य लढ्यात सैनिक म्हणून पुढे आल्या, यात नवल नाही. त्यात १९२८ साली देवी सरोजिनी नायडू राष्ट्रीय सभेच्या अध्यक्ष झाल्या. स्वातंत्र्याची चळवळ स्त्री-पुरुष भेद मानीत नाही, फक्त कर्तबगारीला ओळखते, तिला मानते, हे पुन्हा एकवार सिद्ध झाले. त्यानंतर झालेल्या १९३० च्या मिठाच्या सत्याग्रहात, दांडीमार्चच्या वेळी, १९३२ च्या सविनय कायदेभंगाच्या लढ्यात अक्षरशः

हजारोंच्या संख्येने स्त्रियांनी उडी घेतली. पुरुषांच्या खांद्याला खांदा लावून त्या चळवळीत लढू लागल्या. मनाची भीती गेली, पाय सुटले. भातापावेतो दुबळी म्हणून गणली जाणारी भारतीय स्त्री महात्माजींच्या महामंत्राने एका वेगळ्याच तेजाने झळकू लागली. पण तिचे सारे स्वरूपच बदलले. तिने आपले शील टाकले नाही. विनय टाकला नाही. तिच्या अंगी आलेल्या आत्मिक बळाने तळपून ती इतकी प्रभावित झाली की, लढ्याचा कोणताच भाग तिला वर्ज्य राहिला नाही. मोर्चे, सभा, लाठीमार, तुरुंगवास, हालअपेष्टा साऱ्या काही तिने आनंदाने सहन केल्या. त्या बाबतीत पुरुष सैनिकाच्या ती रेसभरही मागे नव्हती. उलट दारूच्या दुकानावरील, विलायती कापडाच्या दुकानावरील निरोधनात स्त्रीसैनिकच अधिक प्रभावी होत. एवढेच काय, एक पुढारी पकडून तुरुंगात डांबला गेला तर त्याची रिक्त जागा स्वतः नेतृत्व घेऊन त्या भरून काढीत. पण पाऊल मागे पडू देत नसत. स्त्रीचे हे नेतृत्व समाजाच्याही आंगवळणी पडले. ते इतके की, पूर्वी आपण स्त्री-पुरुष हा भेद फार मोठ्या प्रमाणावर करीत होतो हे समाजही विसरला.

१९४२ च्या 'करा नाही तर मरा' या अखेरच्या लढ्यात, लढ्याचे स्वरूप निर्वाणीचे होते. बरेचसे भूमिगत होते. पण त्यातही स्त्रियांनी धमालीच्या उत्साहाने पुरुषांच्या बरोबरीने भाग घेतला. या सर्वांचा परिणाम अखेर एवढा झाला की स्वातंत्र्याचा विचारविनिमय होत असता व स्वातंत्र्य आल्यावरही, स्त्री अगदी सहजपणे पुरुषांच्या बरोबरीने राजकीय क्षेत्रात उभी राहिली. केवळ ती एक स्त्री म्हणून कमी लेखण्याचे कोणाच्याही डोक्यात आले नाही. घटना-समितीच्या बैठकीत, राज्ययंत्रणेत, राष्ट्रीय नियोजनाच्या विचारात आपोआप स्त्रियांना सभासद किंवा प्रतिनिधी म्हणून प्रवेश मिळाला.

## घटनात्मक मार्गांनी चालू असलेले प्रयत्न

स्वातंत्र्याचे हे सारे धुमश्चक्री लढे होत असता घटनात्मक मार्गांकडे तिचे बिल्कुल दुर्लक्ष झाले नव्हते. १९२७ साली कॉमनवेल्थ ऑफ इंडिया बिलाचा विचार होत असता विमेन्स इंडियन असोसिएशनने आपले प्रतिनिधी पाठवले व महत्त्वाच्या दुरुस्त्या सुचविल्या. पहिल्या गोलमेज परिषदेकरिताही आपले प्रतिनिधी कोण असावेत, याची सर्व स्त्रीसंघटनांनी मिळून प्रातिनिधिक नावे सुचविली. ब्रिटिश सरकारने ती मनावर घेतली नाहीत ही गोष्ट वेगळी.

दुसऱ्या गोलमेज परिषदेकरिताही सरोजिनी नायडू यांचे नाव सुचवून त्यांना प्रतिनिधित्व देण्यात आले. सायमन कमिशनच्या शिफारशीप्रमाणे मतदानाचा हक्क जास्त लोकाभिमुख कसा करता येईल याचा विचार करण्याकरिता नेमलेल्या लोथीअन कमिटीपुढे भारतीय पातळीवर काम करणाऱ्या अखिल भारतीय महिला परिषद, नॅशनल कौन्सिल ऑफ विमेन इत्यादी स्त्रियांच्या प्रातिनिधिक संस्थांनी स्त्री-पुरुष भेदाभेद न करता सरसहा प्रौढ मतदानाचा हक्क देण्यात यावा अशी मागणी केली. १९३१ च्या कॉंग्रेसने तर तशा अर्थाचा ठरावच पास करून भारतीय स्त्रीचे स्थान पुरुषाबरोबर आहे, असे शिक्कामोर्तबच केले.

१९३५ च्या सुधारणा कायदा येण्यापूर्वीच, स्त्रियांच्या प्रातिनिधिक संस्थांनी प्रौढमतदानाचा हक्क मागण्यास सुरुवात केली होती. पुढे या कायद्याचा अंमल आल्यावर पूर्वीपेक्षा कितीतरी अधिक संख्येने स्त्रिया मतदानाच्या कक्षेत आल्या. तरी त्या काही अडचणी होत्या. त्या अडचणी जाहीरपणे मांडून, प्रौढमतदानाची मागणी स्त्रियांनी चालूच ठेवली. या कायद्यात स्त्रियांना राखीव जागा दिल्याने, जरी प्रत्यक्षात त्यांचा फायदा होता तरी ती गोष्ट तात्त्विक भूमिकेवरून त्यांनी 'इष्ट नाही' असेच जाहीर केले.

१९२६ पासून श्रीमती मुथुलक्ष्मी रेड्डीसारख्या कर्तबगार स्त्रिया प्रांतिक कायदेमंडळात आपला प्रभाव पाडू लागल्या होत्या. १९३९ साली सहा प्रांतात जेव्हा लोकमतानुवर्ती कॉंग्रेस पक्षीय मंत्रिमंडळे स्थापन झाली, तेव्हा सहा स्त्रियांना मंत्रिमंडळात प्रवेश मिळाला. दोन डेप्युटी स्पीकरच्या जागेवर निवडल्या गेल्या.

राजकीय क्षेत्रात अशी वाटचाल करता करता स्वातंत्र्यानंतर आता तर, घटनेनेच तिला समान संधी मिळालेली आहे. स्त्री म्हणून कोणत्याही अधिकारपदी येण्याच्या तिच्या आड्काठी राहिलेली नाही. हे श्रीमती इंदिरा गांधी पंतप्रधान म्हणून निवडून येऊ शकल्या यावरून सिद्ध झालेलेच आहे. सध्या मंत्रिमंडळात, विधानसभेत, लोकसभेत, स्त्रिया प्रतिनिधी म्हणून निवडून आलेल्या आहेत. स्त्रीच्या वैयक्तिक, सामाजिक स्वातंत्र्याकरिता व समानतेकरिता त्या कायदेकानू करून तिची दुरवस्था नाहीशी करू शकतात हे हिंदू कोड बिलाने सिद्ध केलेले आहे.

एवढ्या ज्या हक्कांकरिता पाश्चात्य स्त्रियांना दोन शतके तीव्र लढा करावा लागला, ते राजकीय क्षेत्रातील हक्क भारतीय स्त्रीने स्वातंत्र्याच्या लढ्यात पुरुषांबरोबर खांद्याला खांदा लावून लढल्याने, लढ्याशिवाय मिळवले. किंबहुना स्त्रीला असे बरोबरीचे स्थान देणे हा एक स्वातंत्र्याच्या लढ्याचाच भाग होता. त्यामुळे जो पक्ष स्त्रीला असे स्थान देणार नाही तो प्रतिगामी ठरला. जगाच्या इतिहासात स्त्रीने जेव्हा जेव्हा असा भाग घेतला तेव्हा तिला पुरुषांच्या बरोबरीचे स्थान चटकन मिळाले. रशियन राज्यक्रांतीच्या वेळी असेच झाले. दोन्ही महायुद्धांत स्त्रियांनी केलेल्या अनमोल मदतीने पाश्चात्य देशांतही जनमत व हट्टी शासनकर्त्यांनी आपले मन बदलले.

स्त्री-स्वातंत्र्याच्या आपल्याकडील वाटचालीत राजकीय लढ्याचे इतके महत्त्वाचे व आगळे स्थान असल्याने त्या लढ्याला अग्रमान देणे प्राप्तच होते. किंबहुना त्याच लढ्यामुळे भारतीय स्त्रीला स्वतंत्र स्थान प्राप्त झाले, असे म्हणावे लागेल.

## शिक्षण क्षेत्रातील वाटचाल

कायद्याने कितीही हक्क दिले तरी शिक्षणाने मन प्रगल्भ होऊन त्या हक्कांचा यथायोग्य उपयोग करून घेण्याची पात्रता अंगी येत नाही तोपर्यंत ते सारे हक्क मिळून न मिळून सारखेच.

१९व्या शतकापर्यंत आपल्याकडे सुसंस्कृत घरातील स्त्रिया घरातील वातावरणाने, मनाने चांगल्याच प्रगल्भ होत; त्यांच्या अंगी बहुश्रुतपणा आलेला असे. पण त्यांना लिहिणे, वाचणे फारसे नव्हते. सामान्यपणे स्त्री निरक्षरच असे. पण १८२३ मध्ये पहिली मिशनरी शाळा निघाल्यापासून १९१५ पर्यंत स्त्रियांच्या शिक्षणाने चांगलीच आघाडी मारली होती व तीही बऱ्याच क्षेत्रांत, हे १९०७ साली स्त्रीडॉक्टरांची व १९१५ साली पदवीधर स्त्रियांची संघटना होऊ शकली यावरून स्पष्ट होते. स्वातंत्र्याच्या वाटचालीत शिक्षणाला फार महत्त्व आहे. त्याने स्त्रीच्या अंगी कर्तबगारी व गुणवत्ता तर येतेच पण अर्थार्जनाचीही पात्रता येते. सारी क्षेत्रे तिच्या आवडीप्रमाणे विकास करण्यास खुली होतात. समाजाची ती खरा उपयोगी व उत्पादक घटक होते. पण एकंदर स्त्रीशिक्षणाच्या प्रगतीचा, त्यातील अडीअडचणींचा, त्याच्या विविध अंगांचा तपशीलवार विचार प्रस्तुत ग्रंथात अन्यत्र केलेला असल्याने त्याची पुनरुक्ती टाळणे बरे. पण आजही म्हणजे १९६१ सालापर्यंत भारतातील स्त्रीच्या साक्षरतेचे प्रमाण १९३० साली शे. २ होते ते फक्त शे. १२ वर सरकले आहे. यावरून अजून किती वाटचाल करावयाची आहे याची कल्पना येते. खेड्यात तर ते टोकडा ८ च आहे. त्यामुळे एकीकडे शहरातील उच्चविद्याविभूषित स्त्रिया व दुसरीकडे खेड्यातील अजूनही अडाणी असलेल्या स्त्रिया अशी एका देशात विभागणी झालेली दिसते. त्यांच्या एकंदर समजुतीत, दृष्टिकोणात महदंतर पडते, इतके की ती दोन राष्ट्रे असेच वाटावे. हे अंतर नाहीसे झाल्याशिवाय शिक्षणाची पुरी प्रगती झाली व स्त्री-समाजाची एक पातळी आली असे म्हणता येणार नाही.

## स्त्रिया व कायदा

स्त्रीला व्यक्तिगत व सामाजिक दृष्ट्याही योग्य स्थान मिळवून द्यायचे असेल तर कायद्याची कास धरल्याखेरीज गत्यंतर नाही, ही गोष्ट सुधारणावादी प्रागतिकांनी ओळखली होती. त्याचकरिता सरकारवर धरून आणावे म्हणून राष्ट्रपातळीवरील 'सामाजिक परिषदे'ची जनमतयंत्रणाही त्यांनी सिद्ध केली. कालांतराने जागृत झालेला स्त्रीवर्ग स्वयंसिद्ध झाल्यावर सामाजिक परिषदेशिवाय स्वत:च्या संघटनांच्याद्वाराही त्याने सुधारणा कायदे संमत करून घेण्यासाठी खूप अट्टाहास केला.

१८२९ मध्ये पास झालेल्या सतीच्या कायद्यापासून स्वातंत्र्यानंतर १९५५–५६ मध्ये पास झालेल्या हिंदुकोड बिलाच्या वेगवेगळ्या विभागांपर्यंत झालेल्या विवाह-विषयक कायद्याकडे नुसती नजर फेकली तरी धर्मबंधनांनी व तदनुषंगिक इतर रूढींनी स्त्रीला व्यक्ती व समाजघटक न गणता किती अन्यायी रीतीने चाबून टाकले होते याची पुरी कल्पना येते. विधवांचे कायदे, संमतिवयाच्या विधेयकावरील चर्चा व कायदे, स्त्रिया तोपर्यंतच्या गुलामगिरीची एक करुणास्पद कहाणीच सांगतात. स्त्री स्वातंत्र्य तर कसलेच नव्हते. 'शुद्ध भोग्यम्' या पलीकडे स्त्रीचे अस्तित्वच नव्हते असे म्हटले

तरी चालेल. मग ती गृहदेवता म्हणून गौरवलेली असो नाही तर चरणदासी म्हणून पायातल्या वाहाणेच्या मोलाने तोलली जावो. स्वातंत्र्यानंतर संमत झालेल्या हिंदूकोड बिलाने ती सारी परिस्थिती कायद्याच्या फटकाऱ्यासरशी बदलून टाकली. ती अर्थात जागृत स्त्रिया, प्रागतिक पुरुषवर्ग व सर्वांत महत्त्वाचे म्हणजे पंडित नेहरूंचे दूरदर्शी, आग्रही नेतृत्व यांच्या सहकार्याने. पण या सर्वांचा कायदातज्ज्ञांकडून याच पुस्तकात इतरत्र ऊहापोह होणार असल्याने येथे द्विरुक्ती न करणे इष्ट.

एक गोष्ट निश्चित की स्त्रीस्वातंत्र्याच्या वाटचालीत हिंदुकोड बिल या स्थूल नावाखाली पास झालेल्या कायद्यांना स्त्रीस्वातंत्र्याचा पायाच असे गणावे लागेल. कारण त्याने वैवाहिक बाबतीत स्त्री-पुरुषांतील विषमता नष्ट केली व ते एकाच नैतिक तराजूने तोलले जाऊ लागले. त्याचप्रमाणे औद्योगिक क्षेत्रात पास झालेल्या स्त्रीकामगारविषयक कायद्यांनी स्त्रीला स्त्री म्हणून समाजातील तिचे स्थान ओळखून तिची पिळवणूक थांबवली. पण तोही विषय कायद्याच्या कक्षेतील असल्याने त्याचा येथे विचार घेतलेला नाही.

## स्त्रियांचे अर्थार्जन

स्त्रीचे सर्व क्षेत्रांतील स्वातंत्र्य, समता, मान्य करीत असणाऱ्या काही लोकांना स्त्रियांनी अर्थार्जनामागे लागू नये असे प्रामाणिकपणे वाटते. एकतर अशा अर्थार्जनात स्त्री, पुरुषाबरोबर जीवनाच्या स्पर्धाक्षेत्रात उतरते व त्याने तिचे स्त्रीत्व नष्ट होते, अशी त्यांची भावना असते. शिवाय स्त्रीवर स्त्री म्हणून मातृत्व वगैरे ज्या काही सामाजिक जबाबदाऱ्या आहेत, त्यांची अर्थार्जनापाठीमागे लागल्यावर हेळसांड होण्याचा संभव आहे. ही पण समजूत त्या पाठीमागे आहे.

पण वस्तुस्थिती पाहता, या समजुतीत तथ्यापेक्षा भावनाच जास्त आहे असे म्हणावेसे वाटते. कारण असे लोक, औद्योगिक क्षेत्रातील श्रमिक महिला काम करणार असे धरून चालतात. त्यांचा खरा आक्षेप असतो, तो पांढरपेशा वर्गाच्या स्त्रियांनी व्यवसायात शिरण्यावर. वरच्या वर्गाच्या पुरुषांना, स्त्रियांनी त्यांच्याच बरोबर स्पर्धा-क्षेत्रात उतरावे हे फारसे रुचत नाही. कारण खालच्या श्रमिकवर्गातील स्त्रियाही ज्या गरजेपोटी कामाला बाहेर पडतात, तशी गरज वरच्या वर्गातील स्त्रियानाही असते असे त्यांना वाटत नाही. किंबहुना स्त्री मिळवते ही कल्पना पांढरपेशा मनाला रुचणारी नाही. पण आपल्याकडील अशाच एका पाहणीत ६७ टक्के स्त्रिया आपखुशीने व्यवसायात पडल्या नसून बिकट परिस्थितीमुळे त्यांना पडावे लागले असे आढळून आले. शेकडा ५ आपले आवडते काम (व्यवसाय) करीत होत्या. शेकडा ५ स्त्रियांना वेळ कसा घालवावा हा प्रश्न पडल्याने त्यांनी नोकरी धरली होती. शेकडा ४ स्त्रियांना ते एक अधिक पात्रतापत्र असे वाटून त्या नोकरी करीत होत्या. शेकडा २ स्त्रियांनी व्यवसायाचे शिक्षण घेतल्याने ते काम करणे चांगले अशी खात्री पटल्याने त्या तो व्यवसाय करीत होत्या. शेकडा फक्त १ स्त्री अधिक स्वातंत्र्याच्या भावनेने काम करीत होती. पाहणीचा

हा निष्कर्ष स्त्रीजीवनावर ग्राच प्रकाश पाडणारा आहे. शेकडा ६७ बायका गरजेपोटी काम करीत होत्या, हे लक्षात घेण्याजोगे आहे, कारण दिवसानुदिवस देशातील मध्यम व वरच्या वर्गांतील ही गरज परिस्थितीने वाढत आहे हे नाकारून चालणार नाही. शिवाय अविवाहित असताना किंवा विधवा झाल्यावर मग तिने स्वावलंबी होण्याचा प्रयत्न करावयाचा, त्यापेक्षा आधीच स्त्रीने अर्थार्जन करून समाजाचा एक उत्पादक व उपयोगी घटक म्हणून तिच्यावर असलेली सामाजिक जबाबदारी का पार पाडू नये, हाही एक विचार करण्याजोगा प्रश्न आहे. विशेषतः समाजाचा एक समान व स्वतंत्र घटक असा दर्जा तिला प्राप्त झाला असता, तिने आपल्या अंगच्या शक्तींचा यथायोग्य विकास करून समाजाच्या उत्पादनकार्यांत भर घालणे हे तिचे कर्तव्यच ठरते. डॉक्टर, एंजिनीयर स्त्रियांनी आपली व्यवसायकुशलता कामी आणली नाही, तर ती कुजून नष्ट तर होईलच पण त्याबरोबरच ते शिक्षण अनुत्पादक तऱ्हेने वाया जाईल. त्यात तिचे एकटीचं नाही तर समाजाचे नुकसान आहे.

एकदा स्त्रीचा अर्थार्जनहक्क कबूल केल्यावर तिला हवे असणारे शिक्षण, प्रशिक्षण, तिला मिळते की नाही हे पाहणे व त्यानंतर अर्थार्जनाची संधीही तिला बरोबर समान पायावर मिळते आहे की नाही याबद्दल जागरूक असणे या दोन्ही गोष्टी आपोआपच आल्या. सुदैवाने भारतीय स्त्रीला घटनेने असे कोणतेही शिक्षण, प्रशिक्षण घेण्याची पूर्ण मुभा दिली आहे, एवढेच नव्हे, अर्थार्जनाच्या संधीबाबतही विचार करताना स्त्री-पुरुष हा भेदाभेद केला जाणार नाही, अशी घटनेने ग्वाही दिलेली आहे.

स्त्रियांच्या स्वातंत्र्याच्या वाटचालीत औद्योगिक क्षेत्रातील श्रमिक महिला नेहमीच कामे करीत आल्या. पण पांढरपेशा मध्यम आणि वरच्या वर्गांतील स्त्रीने नोकरी, व्यवसायाकरता बाहेर पडणे ही गोष्ट मात्र समाजात रूढ नव्हती. तथापि पहिल्याप्रथम आर्थिक गरज म्हणून विधवा स्त्रियांच्या बाबतीत समाजाची ही बंधने शिथिल झाली व पुढे अविवाहित मुलींच्या बाबतीत ती शिथिल होऊ लागली. स्त्रीशिक्षणाचा प्रसार होत असता देशातील आरोग्यगरजा वाढत असता, शिक्षिका, परिचारिका, डॉक्टर यांना संधी मिळण्याचा प्रश्न उद्भवला नाही. उलट त्यांचा तुटवडाच सारखा जाणवे व अजूनही जाणवतो. म्हणूनच त्या काळी स्त्रियांना शिक्षण देणाऱ्या संस्था भराभर वाढू लागल्या. भारतरत्न कर्व्यांनी १८९६ मध्ये अनाथबालिकाश्रम काढला. पुढे १९०८, १९०९ साली मुंबई, पुणे येथील सेवासदनें निघाली. १८७५ मध्ये जे. जे. हॉस्पिटलमध्ये परिचारिका शिक्षणाचे वर्ग सुरू झाले. सेवासदनांनी अल्प शिक्षणानंतर नोकरी किंवा व्यवसाय करता यावा अशा तऱ्हेच्या प्रशिक्षणावर भर दिला. देशात शहरोशहरी अशा संस्था निघाल्या. १९०७ साली स्त्रीडॉक्टरांची संघटना झाली होती. १९१६ साली खास स्त्रियांकरिता दिल्ली येथे एक मेडिकल कॉलेज काढण्यात आले. शिक्षकांची ट्रेनिंग कॉलेजे तर थोडीथोडके होतीच. यावरून स्त्रियांना किती संधी उपलब्ध होती याची कल्पना येईल. तरीपण दुसऱ्या महायुद्धाकाळी—जवळजवळ १९४१ पर्यंत—शिक्षिका, परिचारिका,

तदनुषंगिक जागा, व डॉक्टरी व्यवसाय, यापेक्षा इतर व्यवसायधंद्यांत स्त्रिया दिसत नसत. काही स्त्रिया वकील झाल्या होत्या, पण १९२३ पर्यंत त्यांना तो व्यवसाय करण्यात न्यायकोर्टाची द्वारे खुली नव्हती, ती त्या वर्षी खुली झाली.

१९४१-४२ मध्ये युद्धजन्य परिस्थितीने व शिक्षणप्रसाराने सरकारी कचेऱ्या वाढल्या. सर्व दर्जेच्या श्रेणीतील नोकरांची गरज वाटली आणि याच वेळी शेकडोंनी स्त्रिया कारकून व इतर श्रेणींच्या कामाकरिता सरकारी कचेऱ्यांतून घुसल्या. दुकानांतून कामे करू लागल्या. 'व्याकाय' झाल्या. १९३९ मध्ये सचिवालयात फक्त ३-४ स्त्रिया होत्या. पण १९४२-४३ मध्ये सरकारी कचेऱ्या अविवाहित व विवाहित स्त्रियांनी भरून गेल्या. खाजगी उद्योगधंदेहि स्त्रियांना घेऊ लागले.

सामाजिक दृष्ट्या वरच्या व्यवसायात व सरकारी वरच्या अधिकाराच्या जागावर काही स्त्रिया युद्धापूर्वीच होत्या. पण त्यांची संख्या फारच अल्प होती. कारकून वगैरे पेशातून स्त्रिया शिरल्या त्या आर्थिक गरज म्हणून तर शिरल्याच पण पुरुषांबरोबरच्याच गुण-पात्रतेचे सर्टिफिकेट घेऊन शिरल्या. त्यामुळे त्यांना वेतनही पुरुषांप्रमाणेच मिळू लागले.

आता तर म्हणजे विशेषतः स्वातंत्र्यानंतर सर्व व्यवसायांतून नोकरीधंद्यांतून स्त्रिया शिरल्या आहेत, त्या इतक्या प्रमाणावर की, बेकार पुरुष त्यामुळे कुरकुरू लागावेत अशी काही वेळा स्थिती येते. सरकारी कचेऱ्यांतून खालच्या शिपायाच्या जागेपासून आय. ए. एस. होऊन एखाद्या खात्याची सर्व जबाबदारी असलेल्या सेक्रेटरीच्या जागीही स्त्रिया दिसतात. मंत्री तर त्या केव्हाच झाल्या होत्या. कलेक्टर, कोर्टांच्या न्यायाधीश म्हणूनही सध्या स्वातंत्र्यानंतर स्त्रिया कामे करू लागल्या आहेत. संशोधक, डॉक्टर, एंजिनीयर व नाना विषयात तज्ज्ञ म्हणून असणाऱ्या अधिकाऱ्या जागांही स्त्रिया व्यापतात. कलाक्षेत्रात त्यांचा प्रवेश पूर्वीपासून आहे व तो आता वाढलेला आहे.

उद्योगधंद्यातील खालच्या पातळीवरही स्त्रिया पूर्वीपासून होत्याच पण वरच्या प्रशासकीय जागांवरही आता श्रीमती सुमती मोरारजींसारख्या स्त्रिया दिसतात. वकील, आर्किटेक्ट, यंत्रज्ञ, तंत्रज्ञ म्हणून सध्या स्त्रिया कामे करीत आहेत. १९३५ च्या कायद्याने इंडियन सिव्हिल सर्व्हिस, मेडिकल सर्व्हिस, फॉरेस्ट सर्व्हिस, इंडियन ऑडिट आणि अकाउंट आणि रेल्वे यात स्त्रिया घेतल्या जात नसत. पण स्वातंत्र्यानंतर तो निर्बंध राहिलेला नाही.

स्त्रियांना घटनेने दिलेल्या समान संधीचा फायदा स्त्रियांनी चांगलाच करून घेतलेला असला तरी खाजगी उद्योगधंद्यात अजूनही कित्येक वेळा अविवाहित स्त्रीला जागा मिळते, पण बाळंतपणाच्या हक्काची रजा, वगैरे द्यावे लागू नये म्हणून विवाहित स्त्रियांना नोकरीवर घेतले जात नाही असे दिसते. या बाबतीत परकीय फार्मास्यूटिकल कंपन्यांविषयी थोड्याच दिवसांपूर्वी वर्तमानपत्रात गवगवा होऊन त्या कंपन्यांना धोरण बदलणे भाग पडले. तथापि असे निर्बंध उघडपणे नसले तरी प्रच्छन्न असतात, त्याबद्दल स्त्रीसंघटनांनी जागरूकता ठेवणे जरूर आहे.

सरकारी नोकऱ्यांतून वेतनाबाबत स्त्री-पुरुष असा भेद केला जात नाही. पण औद्योगिक क्षेत्रांत पूर्वी असा भेद असे. स्त्रीला कमी मजुरी मिळे. आता इंडस्ट्रियल ट्रिब्यूनल, स्टॅन्डर्डायझेशन स्कीम, प्रत्येक धंद्याचे कमीत कमी वेतनमान ठरविणारी समिती, इत्यादी उपायांनी खालच्या थरांवरील कामातही स्त्री-पुरुष असा भेद न करता एखाद्या कामाचे वेतन ठरविले जाते, मग तेथे पुरुष, स्त्री कोणीही काम करो, तितकेच वेतन दिले जाते. तरी अशा वेतनश्रेणी सर्वच लहानमोठ्या धंद्यांत अजून स्थापित झालेल्या नाहीत. त्यामुळे लहान धंद्यांतून अजूनही बाईला मजुरी कमी व पुरुषाला जास्त असा प्रकार दृष्टीस पडतो. पण त्या बाबतीत स्त्रीसंघटनांनी जागरूकता बाळगून लक्ष घातले पाहिजे. अजूनही असे निर्नियंत्रित धंदे पुष्कळ आहेत, आणि तेथे घटनेचा राजरोस भंग होतो आहे.

स्त्रियांचे वरच्या खालच्या सर्व स्तरांवरील अर्थार्जन लक्षात घेतले तर वरच्या स्तरापेक्षा खालच्या स्तरावरील स्त्रियांना त्या अज्ञाणी असल्याने संघटनांच्या मदतीची व श्रमिक संघांच्या मदतीची चांगलीच गरज आहे असे लक्षात येते. पण तसे संघ आपल्याकडे फारसे नाहीत.

त्याचप्रमाणे अर्थार्जन करीत असता मुलाबाळांची हेळसांड होऊ नये म्हणून गिरण्याधारख्या नियंत्रित धंद्यांतून पाळणाघरे, शिशुविहार, जसे सक्तीचे केले आहेत तशा सोयी, व्यवसाय किंवा नोकरीपेशाच्या स्त्रियांना अद्याप उपलब्ध नाहीत. अखिल भारतीय महिला परिषद, नॅशनल विमेन्स कौन्सिल किंवा त्यांच्या शाखा यांनी या बाबतीत जसे लक्ष घालावयास पाहिजे तसे अजून घातलेले दिसत नाही. त्यामुळे पुष्कळ वेळा नोकरी करणाऱ्या स्त्रियांच्यावर घरची, बाहेरची, व मुलांची अशी तिहेरी जबाबदारी पडून विशेषतः विवाहित स्त्री अगदी पिचून निघते.

रशियाने सर्व क्षेत्रांत स्त्रीला उत्पादक घटक म्हणून प्रवेश दिला. पण बरोबर सर्व सोयी केल्या. आपल्याकडे ही विधायक कामगिरी कोणी करावयाची याचा खुलासा अजून झालेला नाही. वर उल्लेखलेल्या स्त्रीसंघटना तर ते आपले काम नव्हे म्हणून हात झटकून मोकळ्या होतात. कदाचित आमच्या स्त्रीसंघटनांची चळवळीची आवड अजून गेलेली तरी नसावी किंवा विधायक कामगिरीला लागणारे कौशल्य आणि चिकाटी अजून त्यांना आत्मसात करता आली नसावी असे म्हणणे भाग पडते.

## स्त्रियांच्या संघटना

आतापर्यंत आपण स्त्रीस्वातंत्र्याची राजकीय, शैक्षणिक, कायदा, सामाजिक क्षेत्र व अर्थार्जन इत्यादी क्षेत्रांत कसकशी वाटचाल होत गेली हे पाहिले. ही वाटचाल म्हणजे स्त्रीस्वातंत्र्याच्या मूलभूत हक्कांबाबत एक प्रकारे इतिहास आहे. आता फक्त राहिला तो आरोग्याबाबत हक्क, व विश्रांतीचा हक्क. पहिल्या हक्काबाबत कोणाचेही दुमत होणे संभवनीय नाही. पहिल्या महायुद्धानंतरच्या काळापासून अशा प्रयत्नांना सुरुवात

झालीच होती. स्वातंत्र्यानंतर ते प्रयत्न खूपच वाढले. अजूनही ते पुरेसे आहेत असे म्हणता येत नाही. तथापि स्त्रियांची प्रसूतीकाळी होणारी मृत्युसंख्या किती घटली आहे ते पाहिले की या सुखसोयींची परिणामकारकता पटू लागते. अजूनही त्या दृष्टीने वाटचाल चालू आहे, व जे होईल ते करण्याचे प्रयत्न चालू आहेत. आता अतिरिक्त लोकसंख्येचा प्रश्न उद्भवला असल्याने स्त्रियांच्या आरोग्यविषयक प्रश्नांकडे जास्तच लक्ष खेचले गेले आहे, व त्यांना अग्रस्थान मिळाले आहे.

दुसरा हक्क विश्रांतीचा. त्याबाबत अजून पुष्कळच विचार व्हावयास पाहिजे आहे. स्त्रीकडे पाहण्याचा समाजाचा दृष्टिकोण आमूलाग्र बदलल्याशिवाय सध्या दिसणारी स्त्रियांची ससेहोलपट बंद होणार नाही. एकतर समाजात, घरच्या कामाच्या कंटाळवाण्या ओझ्यातून (ड्रजरी) स्त्रीची मुक्तता होईल अशा सोयी व साधने उपलब्ध होणे अत्यंत जरुर आहे. शिवाय बालसंगोपनाबाबतही तिला काहीसा विसावा मिळेल अशा संस्था म्हणजे पाळणाघरे, शिशुगृहे अस्तित्वात येणे जरूर आहे. पण हे काम एकट्या दुकट्याचे नाही. स्वतः स्त्रियांनी व त्यांच्या संघटनांनी ते करावयाला पाहिजे म्हणूनच स्त्री-संघटनांचा विचार (राइट टू ॲसोसिएट) करून हे प्रकरण पुरे करू.

अगदी आरंभी म्हणजे जेव्हा भारतीय स्त्री चांगलीशी टमी राहू शकत नव्हती तेव्हा तिला प्रागतिकांनी हात देऊन अशा संघटना तयार केल्या. २० व्या शतकाच्या पहिल्या काही वर्षांपासून स्त्रिया स्वतः संघटित होऊ लागल्या. मागे उल्लेखिल्याप्रमाणे १९०७ मध्येच मेडिकल विमेन्स असोसिएशन व १९०८ मध्ये नर्सेस ॲसोसिएशन या संघटना अस्तित्वात आल्या. त्यानंतर पुष्कळच व्यवसायांतून संघटनांचे प्रयत्न झाले. अजूनही चालू आहेत. मात्र ज्या ठिकाणी स्त्रियांचे असे वेगळे प्रश्न नसतील त्या सर्व व्यवसायातून अलीकडे अलीकडे पुरुषांच्या संघटनांतून बायका भाग घेऊ लागल्या व स्वातंत्र्यानंतर तर सर्व व्यवसायधंद्यातील अशा संघटनातून स्त्रिया भाग घेत असलेल्या दिसतात.

कामगार स्त्रियाही त्याला अपवाद नाहीत. पण याशिवाय करमणूक, मनोविनोदन, खेळ व थोडीशी बौद्धिक करमणूक याकरता सुशिक्षित, अल्पशिक्षित स्त्रियाही महिलामंडळे स्थापू लागल्या आहेत. किंबहुना नव्या काळाची ती एक गरजच होऊन बसली आहे. त्यामुळे लहानमोठ्या शहरांतून, विभागाविभागातून अशी महिलामंडळे अस्तित्वात येतात व स्त्रिया अत्यंत मनोभावाने त्यात भाग घेतात. स्त्रियांच्या नाना प्रश्नांवर चर्चा करतात. थोडेसे समाजिक कार्य, थोडीशी बौद्धिक करमणूक, क्रीडा, मनोविनोदन असे या मंडळांचे स्वरूप असते.

यापेक्षा वरच्या पातळीवर काम करणाऱ्या संघटना म्हणजे नॅशनल विमेन्स कौन्सिल (एन. डब्ल्यू. सी) व त्याच्या शहरोशहरी असलेल्या शाखा. ही संघटना १९१६ पासून सुरू झाली व तिची शाखा आंतरराष्ट्रीय विमेन्स कौन्सिलला जोडली गेली. किंबहुना या संघटनेच्या व विश्वविद्यालयीन शिक्षण घेऊन बाहेर पडलेल्या पदवीधर

स्त्रीसंघटनेच्या मागे पाश्चात्त्य स्त्रियांची प्रेरणा होती असे म्हणण्यास हरकत नाही. यद्यपि स्त्रीसंघटना शिक्षणाच्या क्षेत्रात जास्त लक्ष घालते पण स्त्रियांचे इतर प्रश्न तिला वर्ज्य नाहीत. एन्. डब्ल्यू. सी व तिच्या शाखा तर स्त्रिया व मुले यांसंबंधीच्या सान्याच प्रश्नांवर विचार करतात. पण या सर्वांत स्त्रियांच्या सामाजिक, राजकीय, सान्याच प्रश्नांवर खल करणारी व जास्त प्रातिनिधिक असल्याने प्रभावी झालेली, स्त्रियांची संघटना म्हणजे अखिल भारतीय महिला परिषद. पहिल्याने ही परिषद शिक्षणाचा प्रश्न घेऊन १९२६ साली निघाली. पण पुढे स्त्रियांचे सामाजिक प्रश्न, कायदेविषयक प्रश्न, मतदानाच्या हक्काविषयीचे प्रश्न, स्त्रिया व मुले यांचा होत असलेला अनैतिक व्यापार, देवदासींची चाल, वेश्यावरे चालविणारे व्यापारी, इत्यादी सारे प्रश्न परिषदेच्या कक्षेत आले. त्याबाबतीत शिक्षित स्त्रीवर्गात जागृती उत्पन्न करून मध्यमवर्गीय स्त्रियांना आपल्याकडे ओढून ही परिषद प्रभावी व प्रातिनिधिक बनली. जरी परिषदेने कोणत्याही राजकीय पक्षाचे बिरुद लावले नाही, तरी देशकल्याणाच्या प्रश्नावरही तिने विचार करण्याचे टाळले नाही. औद्योगिक क्षेत्रात स्त्रीकामगारांची स्थिती सुधारण्यास या संघटनेचे बरेच प्रयत्न व चळवळ कारणीभूत झाली. वेश्या-व्यवसायासंबंधीचे अनैतिक व्यापारावर निर्बंध घालणारे कायदे, सामाजिक परिषद व तशाच इतर स्त्रीसंघटना यांच्याच प्रयत्नाने झाले. सामाजिक कायद्याचे श्रेय तर याच स्त्रीसंघटनांकडे जाईल.

असे असताही स्त्रियांना याबाबतीत बरीच वाटचाल करावयाची आहे असे मनात आल्याशिवाय राहात नाही. देशस्वातंत्र्याच्या लढ्यामुळे ज्या हक्कांकरिता पावलोपावली स्वतंत्र देशांतील पाश्चात्त्य स्त्रियांना लढा द्यावा लागला ते सारे हक्क, त्या संधी व पुरुषांबरोबरीचे सामाजिक स्थान भारतीय स्त्रीला दीड शतकाच्या आतच मिळाले. पण ते अजून पचनी मात्र पडलेले दिसत नाही. अखिल भारतीय महिला परिषदेसारखी संघटना अजूनही खेडोपाडी पोहोचली नाही, की सामान्य खालच्या वर्गांच्या स्त्रिया व खेड्यांतील स्त्रियांचा त्यात अंतर्भाव झालेला नाही. हा बहुजन स्त्रीवर्ग अजून वेगळाच अलगपणे वावरतो आहे. त्यात जागृती, शिक्षणाचा प्रसार व हक्काविषयी जागरूकता निर्माण झाल्याखेरीज खरे स्वातंत्र्य मिळाले असे म्हणता येणार नाही. पण ते करायचे असेल तर जागृत झालेल्या व चिकाटीने काम करणाऱ्या महिला संघटना पाहिजेत. त्यांनी विधायक कामगिरीची जबाबदारी अंगावर घेतली पाहिजे. कारण आता कायद्याचे, घटनेचे काम संपलेले आहे पण त्यांचा परिणामकारक वापर होतो की नाही याविषयी डोळ्यात तेल घालून जागरूकता ठेवली नाही तर घटनेने, कायद्याने, मिळालेले स्वातंत्र्य अखेर फोल ठरेल.

# ११

# स्त्रिया आणि राजकारण

अनसूया लिमये

सौ. अनसूया श्रीधर लिमये बी. ए. (ऑ), बी. टी. (जन्म ३१–१२–१९१६) पुण्याच्या टिळक कॉलेजात अवर प्राध्यापक. नंतर १९४२ च्या आंदोलनात प्रत्यक्ष भाग. राष्ट्रसेवादलाच्या महाराष्ट्रातील स्त्रीसंघटक. सहकारी महिला संस्थांचे कार्य. सुगीच व इस्पितळांतील महिला, शिक्षक व इतर सामाजिक प्रश्नांचा प्रत्यक्ष अभ्यास. भाववाढ-विरोध, संयुक्त महाराष्ट्र, गोवा स्वातंत्र्य इत्यादी लढ्यांत भाग. पुणे महानगरपालिकेच्या कार्पोरेशन सभासद व शिक्षण मंडळाच्या अध्यक्ष. (१५५७ सदाशिव, पुणे २)

## संधी मिळाली तेथे स्त्रियांनी कर्तृत्व दाखविले

'स्त्रिया आणि राजकारण' या जणू परस्पर विसंगत गोष्टी आहेत; स्त्रियांचा राजकारणाशी काही संबंध नाही; असलाच तर फार दुरान्वयाने आहे, अशा कल्पना युगानुयुगे चालत आलेल्या आहेत. म्हणूनच 'स्त्रिया आणि राजकारण' हा विषय अनेकदा चर्चेला घेतला जातो. अशा कल्पना चालत येणे स्वाभाविकच आहे. राजकीय इतिहास पुरुषांच्या नावांनी भरलेला आहे. या असंख्य नावांत अधून मधूनच स्त्रियांची नावे उठून दिसतात. याचे कारणही स्पष्ट आहे. लोकशाहीचे युग सुरू होईपर्यंतच्या काळात राजकारण म्हणजे राजघराण्यांचा इतिहास होता. आणि गादीचा वारसाहक्क मुलाकडे, भावाकडे प्रथम जात होता. मुलीकडे त्यानंतर. म्हणजे राजकारणात आणि तत्पूर्वी धर्मकारणात स्त्री ही कनिष्ठ मानली गेली होती. असे असतानाही ज्या स्त्रियांना राजकारणात अग्रभागी येण्याची संधी मिळाली त्यांनी विविध प्रकारचे कर्तृत्व दाखवले आणि स्त्रियाही राजकारण करू शकतात हे सिद्ध केले. अहल्याबाई, ताराबाई, या भारतातील स्त्रियांनी किंवा राणी व्हिक्टोरियासारख्या इंग्लंडमधील स्त्रियांनी शासनाची धुरा हाती आल्यावर कुशलतेने राज्यकारभार चालवला. राजकारण हे प्रजेच्या हितासाठी आहे ही कसोटी लावली तर अहल्याबाईंचा क्रमांक फारच वर लागेल. राणी लक्ष्मी, चांदबिबी यासारख्या स्त्रियांनी रणांगणावर शौर्य गाजवले. ज्या धैर्याने आणि जिद्दीने लोकमान्य टिळकांनी 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' असा मंत्र दिला किंवा

ज्या निर्धाराने महात्मा गांधींनी इंग्रज राज्यकर्त्यांना 'चले जाव' असे सांगितले त्याच जिद्दीने, त्याच धैर्याने महाराणी लक्ष्मीबाईने 'मेरी झांशी कभी नही दूंगी' असा निर्धार व्यक्त केला आणि पोटच्या मुलाला पाठीशी घेऊन रणांगणावर लढता लढता मरण पत्करले. आधुनिक काळात स्वातंत्र्यचळवळीत सुभाषबाबूंकडून स्फूर्ती घेतलेल्या कॅप्टन लक्ष्मीने आपली पलटण उभी केली. डॉ. ॲनी बेझंट यांनी होमरूलची चळवळ उभी केली. डॉ. सरोजिनी नायडू, कमलादेवी चट्टोपाध्याय किंवा अरुणा असफअली यांच्यासारख्या सुप्रसिद्ध स्त्रियांनी भारतीय स्वातंत्र्याचा इतिहास घडविण्यात मोठी कामगिरी बजावली. त्याबरोबर महात्माजींच्या हाकेला ओ देऊन अनेक छोट्या मोठ्या स्त्रियांनी सत्याग्रहात भाग घेऊन तुरुंगवास पत्करला, लाठीमार सहन केला किंवा गोळ्याही झेलल्या. गोमंतकाच्या आंदोलनात सुधाबाई जोशींसारखी एक गृहिणी धीरांगना म्हणून पुढे आली आणि बारा वर्षांची सजा तिने हसत खेळत पत्करली. आज भारताच्या पंतप्रधानपदाची अतिशय जबाबदारीची धुरा श्रीमती इंदिरा गांधींनी पत्करली आहे. ही सर्व उदाहरणे थोडी असली तरी अंगावर पडल्यास मनाने कोमल असणाऱ्या स्त्रियाही कठोर बनू शकतात आणि राजकारणातल्या विविध भूमिका यशस्वी करू शकतात हे कुणालाही मान्य करावे लागेल.

## संस्कृतिपूर्व काळ

समाज प्राथमिक अवस्थेत होता, म्हणजेच संस्कृतीची सुरुवातही नव्हती अशा काळात मनुष्य टोळी-जीवन जगत होता. शेतीचा शोध अद्याप लागावयाचा होता. त्याचप्रमाणे लग्नसंस्था आणि कुटुंबसंस्था यादेखील जन्माला आल्या नव्हत्या. रानात हिंस्र पशूंपासून संरक्षण व्हावे म्हणून टोळीने राहावयाचे व एका रानातील श्वापदे संपली म्हणजे दुसऱ्या रानात तळ द्यावयाचा, श्वापदे मारून खावयाची, हेच जीवन होते. टोळीमध्ये स्त्री-पुरुष दोघेही असत. मुले जन्माला येत परंतु ती साऱ्या टोळीची मुले म्हणून असत. शिकार करण्याचे काम पुरुष करीत आणि श्वापदे ओढून आणून मांस भाजण्याचे व वाटण्याचे काम स्त्रिया करीत. टोळीचे नायकत्व नेहमीच पुरुषाकडे असे, असे नाही. पुष्कळदा स्त्रीकडेही हे नेतृत्व येई. त्यावेळच्या स्त्रिया बुद्धिबलाने पुरुषापेक्षा कमी नव्हत्याच पण शरीरबलानेही त्या फारशा कमी नव्हत्या असे वर्णन पं. राहुल सांकृत्यायन यांनी 'व्होल्गा से गंगा' या पुस्तकात केले आहे. 'राजकारण' आजच्या अर्थाने आणि इतके व्यापक त्यावेळी अर्थातच नव्हते. परंतु समाजाचे नेतृत्व त्या प्राथमिक अवस्थेत स्त्रीने देखील केले आहे असे आढळते.

## वेदकाल

५,००० वर्षांपूर्वी वेदकालात भारतीय संस्कृती जगात एक श्रेष्ठ संस्कृती होती असे आपण वाचतो. पुरुषांचा दर्जा श्रेष्ठ आणि स्त्रियांचा कनिष्ठ अशी विषमता

नव्हती. स्त्रियांनाही शिक्षण दिले जाई. स्वयंवर आणि प्रौढ विवाह प्रचलित होते. त्यावेळीही समाजयंत्राची सूत्रे राजकारणाकडे नव्हती. धर्मकारणाकडे ते काम होते. आणि धर्मकारणात स्त्रीला हक्क होते. गार्गी, मैत्रेयीसारख्या स्त्रियांनी वेदाभ्यासात प्रावीण्य मिळविले होते. आणि ऋषिमुनींना देखील प्रश्नोत्तरांत हरवले होते. लोपा किंवा घोषासारख्या ब्रह्मवादिनी स्त्रियांनी आपले जीवित वेदाभ्यासासाठीच वाहिले होते. ही सारी उदाहरणे प्रसिद्ध आहेत.

## अंधकाराचा प्रदीर्घ काळ

पण वेदकालातील ही उच्च संस्कृती स्मृतिकालाच्या उत्तरार्धात पूर्णतया घसरली आणि स्त्रियांना आपले सारे हक्क गमवावे लागले. मनूसारख्या ज्येष्ठ मुनींनी 'पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने' या वचनांनी स्त्रीला पुरुषाची दासी बनवली. 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' असे सांगून तिच्या स्वातंत्र्याला अपात्रच ठरवून टाकली. स्त्रीचा शिक्षणाचा अधिकार गेला. बालविवाह रूढ होऊ लागले. स्त्रीच्या मातृत्वाचाच फक्त गौरव शिल्लक राहिला.

या सर्व अधःपतनाची कारणे अनेक दिली जातात. धर्मकारणात सोमरसाचे सेवन आवश्यक मानले जाई. स्त्रियांना सोमरसे उष्ण पडू लागला व म्हणून त्यांचा धर्मकारणातला अधिकार गेला असे एक कारण सांगितले जाते. कालांतराने भारतावर परकीय स्वाऱ्या आल्या. आर्यांच्या संस्कृतीवर इतर अनेक संस्कृतींची सावली पडू लागली. युद्धामुळे स्त्री ही एक संरक्षणाची वस्तू बनली. तिला घरातच सुरक्षित ठेवणे हितावह वाटू लागले हेही एक कारण समजते.

खऱ्या अर्थाने समाजावर राजकारणाचे वर्चस्व हे याच काळात सुरू झाले आणि त्याच वेळी स्त्री ही अंधकारात लोटली गेलेली होती. हा अंधारयुगाचा काळ फार प्रदीर्घ होता. या अंधारयुगात भारतात स्त्रीचा दर्जा इतका अधोगतीला गेला होता की श्रेष्ठ समजल्या जाणाऱ्या वर्गातील विधवा स्त्रियांचे केशवपन करण्याची प्रथा आणि मुसलमान स्त्रियांचा पडदा ही दोन हिंदू व मुसलमान या प्रमुख समाजांतील स्त्रियांच्या दास्याची ढळढळीत उदाहरणे आहेत. ज्यावेळी स्त्रियांना चार भिंतींच्या बाहेरील जगच नष्ट झाले त्यावेळी स्त्रिया राजकारणात किंवा समाजकारणात भाग त्या काय घेणार? चूल आणि मूल हीच कार्यक्षेत्रे स्त्रीच्या कक्षेत राहिली. बाहेरच्या जगाला ती पूर्णतया पारखी झाली. ब्रिटिश अमलाच्या सुरुवातीपर्यंत हे अंधारयुग असेच चालत राहिले.

## राजघराणी हा अपवाद

या सर्वांना राजघराणीच मात्र काही वेळा अपवाद होती. दुर्दैवाने या होईना पण कोठे गादीचा वारसा येण्याची शक्यता असे, आणि म्हणून की काय पण राजघराण्यातील स्त्रियांना राजपुत्राच्या बरोबरीचे नसले तरी काही प्रमाणात युद्धाचे —

किमान संरक्षणाचे—शिक्षण मिळत असे. जिजाबाई, ताराबाई, राणी लक्ष्मीबाई यांना घोड्यावर बसणे, दांडपट्टा खेळणे, तरवार चालवणे यांचे शिक्षण मिळाले होते. राजघराण्यामध्ये ज्या स्त्रियांना गादी चालविण्याची संधी मिळाली त्यांनी कर्तृत्वाने आपली जबाबदारी पार पाडली हे आपण पाहिलेच.

राजेलोकांच्या हातात समाजाचे शासन होते, तोपर्यंत सामान्य स्त्रियांनाच काय पण सामान्य पुरुषांनाही राजकारणात स्थान नव्हते. सामान्य पुरुषांनी राजकारणात आपले सामर्थ्य दर्शविले असेल तर ते काही वेळा राजांचा छळ असह्य झाल्यामुळे समाजात बंड निर्माण करूनच.

खऱ्या अर्थाने राजकारण जनतेपर्यंत पोचले ते लोकशाहीच्या सुरुवातीपासूनच व त्याच अर्थाने राजकारणाकडे दृष्टिक्षेप करून त्यात स्त्रियांना काय स्थान आहे किंवा असावे हा खरा महत्त्वाचा प्रश्न म्हटला पाहिजे.

## महात्मा गांधींचे ऋण

भारताच्या राजकारणात लोकशाहीची सुरुवात होण्यापूर्वी महत्त्वाचा काळ म्हणजे स्वातंत्र्यप्रयत्नांचा काळ येऊन गेला. दीडशे वर्षे ब्रिटिशांच्या दास्यात असलेला सारा समाज गुलामी वृत्तीच्या शृंखलांनी जखडला गेला होता. या अवस्थेतून त्याला वर काढण्यास दादाभाई नौरोजी, लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, सुभाषचंद्र बोस, पंडित नेहरू यांसारख्या अनेक देशभक्तांनी आपली जीवने वेचली. या सर्वांमध्ये स्त्री-समाजातही जागृती करून त्याला स्वातंत्र्यप्रयत्नांकडे अभिमुख करण्याचे महत्तम कार्य जर कुणी केले असेल तर ते महात्माजींनी. महात्माजींच्या राजकारणाला सामाजिक आणि विधायक दृष्टीची फार मरीव जोड होती. गुलामीत असलेला हा देश निःशस्त्र होता. या निःशस्त्र देशाला गांधीजींनी सत्याग्रहाचा नवा मंत्र दिला. त्याबरोबरच खेड्यापाड्यांतील निरक्षर आणि गरीब जनतेला देखील स्वातंत्र्य आंदोलनात भाग घेता यावा या दृष्टीने त्यांनी खादी, अस्पृश्यता-निवारण, दारूबंदी, राष्ट्रभाषा प्रचार, यांसारख्या विधायक कार्यक्रमाची चौदा कलमी योजना दिली. या विविध कार्यक्रमांतून पुरुषांबरोबर स्त्रियाही भाग घेऊ लागल्या.

सत्याग्रहाचे शस्त्र हे तर स्त्रियांना आकर्षून घेण्याच्या दृष्टीने फार प्रभावी शस्त्र ठरले. सशस्त्र युद्धात सैन्यातील लोकच भाग घेऊ शकतात. सशस्त्र बंडामध्ये समाजातील एखादा विशिष्ट भागच कार्यप्रवण बनतो. परंतु निःशस्त्र प्रतिकाराच्या गांधीजींच्या मोहिमेत समाजाच्या सर्व थरांतून भाग घेण्यास जनता पुढे झाली. पुरुष आले, स्त्रिया आल्या, शहरातून आल्या, खेड्यापाड्यांतून आल्या, श्रीमंतवर्गातून आल्या, मध्यम वर्गातून आल्या, त्याप्रमाणे श्रमिक वर्गातून आल्या. १९२० सालच्या प्रतिकाराच्या चळवळीत प्रथम काही प्रमाणावर स्त्रियांनी कारावास पत्करला आणि १९४२ च्या आंदोलनात फारच मोठ्या प्रमाणावर स्त्रियांनी चळवळीत भाग घेतला. बहुतेक सर्व

मागांतून स्त्रियांसाठी राखून ठेवलेले तुरुंग भरून गेले. काही ठिकाणी ही संख्या इतकी मोठी झाली की दुसरे तुरुंग उघडावे लागले. 'कडेवरी मुले घेऊ क्रांतीमध्ये सामील होऊ' हे त्यावेळचे साने गुरुजींचे गीत म्हणजे वस्तुस्थितीचेच काव्य होते.

सत्याग्रहाच्या तत्वामध्ये शौर्याबरोबर नैतिक मूल्यांवर भर होता. गांधीजींनी भ्याडाची अहिंसा कधीच सांगितली नाही, तर शूराची अहिंसा सांगितली हे लक्षात घेतले पाहिजे. या शस्त्राच्या मागे त्यांनी स्त्रीसमाजाचीही शक्ती उभी केली. इतकेच काय गांधीजींनी स्त्रियांशी केलेले 'हितगुज' वाचले, तर त्यांनी एके ठिकाणी असेही म्हटले आहे की, 'आजच्या समाजात पाशवी शक्ती, यांत्रिक शक्ती, पैसा, यांचेच महत्व आहे म्हणून आजच्या समाजाचे नेतृत्व पुरुष करतो आहे. पण माझ्या डोळ्यासमोर जे समाजाचे चित्र आहे त्याचा पाया प्रेम, सेवा, त्याग या मूल्यांवर आधारलेला असेल आणि त्याचे नेतृत्व स्त्रिया करतील.'

गांधीजींनी या शब्दांत स्त्रियांच्या ठायी असलेल्या सुप्त शक्तीबद्दलचा केवढा विश्वास व्यक्त केलेला आहे!

## मतदानाचा अधिकार

लोकशाहीच्या विचारामुळे एका राजाकडे, एका घराण्याकडे, किंवा एका गटाकडे असलेली सत्ता सामान्य लोकांकडे आली. लोकशाही पद्धतीचे मुख्य गमक म्हणजे मतदानाचा अधिकार. हा मतदानाचा अधिकार देखील स्त्रियांना प्रथमतःच मिळाला नाही. त्याकरिता इंग्लंड, फ्रान्ससारख्या पाश्चिमात्य देशांत स्त्रियांना मोठी चळवळ करावी लागली.

१९१४ साली पहिले महायुद्ध सुरू झाले आणि राष्ट्रावरच संकट आल्यामुळे स्त्रियांनी आपली चळवळ स्थगित केली. युद्धाच्या काळात तरुण पुरुष आघाडीवर गेल्यामुळे कारखाने, इस्पितळे, शाळा यातून काम करणाऱ्यांची अधिक गरज भासू लागली. स्त्रियांनी या क्षेत्रातून भराभर नावे नोंदविली. विशेषतः रेडक्रॉस पथकातून फार मोठ्या प्रमाणात स्त्रियांनी काम केले. तेव्हा त्यांच्या कर्तबगारीने व राष्ट्रभक्तीने प्रभावित होऊन १९१८ साली इंग्लिश पार्लमेंटने स्त्रियांना मतदानाचा अधिकार दिला. युरोपमधील स्त्रियांना मताधिकार मिळविण्यासाठी जी चळवळ करावी लागली किंवा जे सहन करावे लागले ते भारतीय स्त्रियांना करावे लागले नाही. स्वातंत्र्यचळवळीत त्यांनी स्वयंस्फूर्तीने आपला वाटा उचलला. १९५० साली डॉ. आंबेडकर यांच्या नेतृत्वाखाली स्वतंत्र भारताची घटना तयार झाली तीत २१ वर्षांच्या वरील पुरुषाप्रमाणे स्त्रियांनाही मताचा अधिकार मिळाला.

## विधायक प्रवृत्तींकडे स्त्रियांचा अधिक कल

भारतात लोकशाही युगाला आता आता सुरुवात झाली आहे. घटनेने आणि कायद्याने आता स्त्रियांना सर्व नागरिकस्वातंत्र्य लाभले आहे. घटनेने स्त्री आणि पुरुष

असा भेद ठेवलेला नाही. परंतु अद्यापही राजकारणात स्त्रियांचा भाग मोठ्या प्रमाणावर दिसून येत नाही. भारताचे पंतप्रधानपद एका स्त्रीकडे आले. पण सामान्य स्त्रिया, मग त्या सुशिक्षित असोत की अशिक्षित असोत, अजून राजकारणापासून दूर राहिलेल्या आढळतात. याची कारणे अनेक असू शकतील. राजकारणात भाग घेणारांना धकाधकीचे जीवन व्यतीत करावे लागते. एखाद्या पदावर स्थानापन्न होण्याची संधी मिळाली तरी नागरिकांना, मतदारांना हरघडी तोंड द्यावे लागते. चालू घडामोडी-बाबत अत्यंत तत्पर राहावे लागते. आपली त्याबाबतची प्रतिक्रिया तातडतोब व्यक्त करावी लागते. विरोधी पक्षांतील कार्यकर्त्यांना तर जनतेवर होणाऱ्या अन्यायाच्या प्रतिकारार्थ सिद्ध असावे लागते. प्रसंगी प्रतिकार करताना तुरुंगवास भोगावा लागतो. दैनंदिन घराची आणि मुलाबाळांची जबाबदारी अंगावर असणाऱ्या स्त्रियांना या धकाधकीला तोंड देणे कठीण जाते. राष्ट्रावरील आपत्तीच्या प्रसंगी घरादाराचे पाश बाजूला सारून स्त्रिया तुरुंगवास पत्करण्यास देखील तयार होतात, हे अनेकदा सिद्ध झालेले आहे. स्वातंत्र्यचळवळीत तर अनेक स्त्रियांनी कारावास भोगलाच पण स्वातंत्र्योत्तर देखील भाववाढविरोधी आंदोलन, संयुक्त महाराष्ट्राचे आंदोलन, गोव्याचे आंदोलन, अशांसारख्या जनतेच्या चळवळीत स्त्रियांनी हिरीरीने काम केले व कारावासही भोगला.

हे सर्व खरे असले तरीही दैनंदिन राजकीय क्षेत्रात स्त्रियांचे प्रमाण फार कमी दिसते, हे मान्य केले पाहिजे. त्याउलट महिलामंडळ, सहकारी चळवळ, ग्रामोद्योग यांसारख्या विधायक क्षेत्रातून स्त्रिया अधिक संख्येने उतरलेल्या दिसतात. यावरून स्त्रियांचा कल लढाऊ किंवा धकाधकीच्या राजकारणापेक्षा विधायक प्रवृत्तीकडे अधिक असावा असे अनुमान निघते.

आज सार्वत्रिक निवडणुकांतून विविध पक्ष स्त्रियांना उभे करीत नाहीत अशी तक्रार अनेकदा ऐकू येते. ही तक्रार पुष्कळ अंशी खरीही आहे. परंतु उभे करावयाचे म्हटले तरी सत्ताधारी पक्ष सोडला तर विरोधी पक्षातून अशा स्त्रियाही मिळत नाहीत. लायक स्त्रिया असल्या तरी त्या तयार होत नाहीत, अशीही उदाहरणे पुष्कळ आहेत.

आज भारतात मंत्रिपदावर व गव्हर्नरपदावर आरूढ झालेल्या स्त्रिया क्वचित दिसतात. राज्यसभा, लोकसभा, विधानसभा, विधानपरिषदा यांतून निवडून आलेल्या स्त्रियांचे प्रमाण फारच अल्प आहे. ही स्थिती भारतातच आहे असे नाही, तर युरोप, अमेरिका यांसारख्या लोकशाही अनेक शतके रुजलेल्या देशांतही आहे. निवडून आलेल्या व विविध लोकनियुक्त पदांवर असलेल्या स्त्रिया फार कमी प्रमाणात दिसतात. इंग्लंडमध्ये हे प्रमाण १५ टक्के देखील नाही. भारतातही ते साधारण तेवढेच आहे. अमेरिकेत नुकतीच प्रे. जॉन्सन यांच्या प्रेरणेने एक चळवळ झाली. त्यात विविध महत्त्वाच्या पदांवर काम करण्यास लायक असणाऱ्या स्त्रियांची नोंद करावी व त्यांना तसे

उत्तेजन द्यावे असे आवाहन करण्यात आले होते. युगोस्लाव्हिया, स्वीडन, इस्रायल यांसारख्या अधिक पुरोगामी व समाजवादी असणाऱ्या देशांत मात्र हे प्रमाण थोडेसे अधिक आहे. परंतु तरीही म्हणावे तितके नाही.

स्त्रियांनी राजकारणात काम करण्यापासून दूर राहण्याचे कारण आणखीही एक आहे. राजकारण हे केवळ धकाधकीचे नाही तर अतिशय गढूळ बनलेले आहे. इतकेच काय पण खऱ्याखोट्याचा विधिनिषेध नाही, स्वार्थपरायणतेचा बुजबुजाट, कारस्थाने, उलाढाल्या यांनी भरलेली प्रकरणे दिसली म्हणजे 'काय राजकारण शिजतय तुमचं' असे म्हणण्याची प्रथा रूढ झाली आहे. मग ते प्रकरण एखाद्या शिक्षणसंस्थेतील असो वा सामाजिक संस्थेतील असो. या गढूळ वातावरणापासून स्त्रियांना दूर रहावेसे वाटले तर नवल नाही. मग साहजिकच त्यांना राजकारणापेक्षा एखादे सामाजिक क्षेत्र निवडावेसे वाटते. म्हणून एक वेळ आपत्तीच्या वेळी राष्ट्राच्या हाकेला ओ देऊन त्यागासाठी सिद्ध झालेल्या स्त्रिया दिसतात, परंतु दैनंदिन राजकारणातल्या विविध जबाबदाऱ्या घेण्यास मात्र त्या तयार दिसत नाहीत.

आजचे राजकारण अनेक दोषांनी भरलेले आहे. स्वार्थ आणि मोह हे त्याच्या पायाचे दोन खांब आहेत. त्याचप्रमाणे जातिवादानेही ते आज बरबटलेले आहे. आज भारतीय समाजात अनेक जातीजमातींतून स्त्रिया आता कुठे चार भिंतींच्या बाहेर पडू लागलेल्या आहेत. घोषातून बाहेर येत आहेत. शिक्षण घेऊ लागल्या आहेत. अजूनही बहुजनसमाजातल्या या स्त्रिया राजकारणात प्रवेश करू धजत नाहीत.

## राजकारणाचे महत्त्व स्त्रियांना पटवले पाहिजे

पण आज राजकारण गढूळ असले, स्वार्थलंपट असले, जातिवादाने बरबटलेले असले तरी अखेर समाजाचेच प्रतिबिंब राजकारणात उमटते हे लक्षात घेतले पाहिजे. त्याचप्रमाणे राजकारणाच्या हातात समाजाच्या नियंत्रणाची फार मोठी सत्ता आहे हे देखील विसरता कामा नये. स्वार्थी, संकुचित, राष्ट्राची तमा न बाळगणाऱ्या आणि आळसाने शिथिल झालेल्या समाजात बदल करावयाचा म्हटल्या तरी राजकारणाकडे लक्ष देणे आवश्यक आहे. आपल्याला हवे तसे कायदेकानू करणे शासनाच्या हातात आहे. लोकनियुक्त सभासद हे त्या त्या समाजातील अग्रणी असतात. समाजाला आपल्या काबूत ठेवण्याची शक्ती त्यांच्या हातात असते. राजकारणात शहाण्याने जाऊ नये म्हटले तर ही सारी शक्ती स्वार्थी आणि गुंड प्रवृत्तींच्या हातात जाती लगेच. राजकारणाचे महत्त्व स्त्रियांना पटवले पाहिजे. आपले मत डोळसपणाने योग्य त्या उमेदवाराला किंवा योग्य पक्षाला देण्याचा विचार त्यांना स्वतःच्या बुद्धीने करता आला पाहिजे. राजकारणातली काही सूत्रे हातात घेण्याचा विचारही या दृष्टीने स्त्रियांनी जरूर केला पाहिजे व राजकीय पक्षांनी त्याप्रमाणे स्त्रियांचे शिक्षण केले पाहिजे. कामगारसंघटनांतून त्यांना काम करण्यास पुढे आणले पाहिजे.

## स्थानिक स्वराज्यसंस्था हे योग्य क्षेत्र

स्त्रियांची कुवत व उभारी वाढेपर्यंत स्थानिक स्वराज्य हे क्षेत्र स्त्रियांना सर्वांत योग्य आहे असे म्हटले पाहिजे. आज ग्रामपंचायतींतून एखाददुसरी राखीव जागा असते त्या ठिकाणी स्त्रिया दिसतात. बाकी जागांवर त्या उभ्या राहिलेल्या फारशा दिसत नाहीत. मुंबई, पुणे यांसारख्या शहरांतून हाताच्या बोटावर मोजण्याइतक्याच स्त्रिया नगरपालिकांतून निवडून आलेल्या दिसतात. संख्या आधीच थोडी असली म्हणजे स्त्रिया साधारणपणे मोकळेपणाने वावरू शकत नाहीत. संकोचाने व भिऊनच त्या वागत असतात.

स्थानिक स्वराज्यसंस्थेत काम करावयाचे म्हणजे आपल्या राहत्या गावात राहून घर व मुले संभाळून स्त्रीला काम करता येते. त्या ठिकाणी पाणी, रस्ते, आरोग्य, शिक्षण यांसारखे परिचयातले प्रश्न हाताळावयाचे असतात. मात्र एका मोठ्या गावाच्या परिसरात, नियोजनपूर्व विचारांनी, अधिक व्यापक पायावर या प्रश्नांचा विचार करावा लागतो. पण अभ्यासाने आणि सवयीने हे स्त्रीला सहज समजून घेता येईल. त्यासाठी मतदारसंघात सतत संबंध राखणे, नागरिकांच्या अडचणी समजून घेणे व त्या सोडवण्याचे प्रयत्न करणे ही कामे त्यांना करावी लागतील. स्त्रिया निवडून येऊन ही कामे करतील तर सामान्य नागरिक स्त्रियांतही जागृती अधिक प्रमाणात होईल.

स्थानिक स्वराज्यसंस्थांतून प्रथम कामाची सवय केली तर विधिमंडळे, लोकसभा यांसारख्या मोठ्या क्षेत्रात जाण्यास स्त्रिया हळूहळू तयार होतील.

## स्त्रियांना वाव द्यावयाचा तर समाजात काही बदल आवश्यक

स्त्रियांनी घरादाराची व मुलांची जबाबदारी सांभाळून राजकीय क्षेत्रात काम करावयाचे असेल तर समाजाचा दृष्टिकोण बदलला पाहिजे. स्त्रियांच्या मातृत्वाचा योग्य तो आदर करून त्यांना काही सवलती हक्क म्हणून मिळाल्या पाहिजेत. त्यांच्याकडे किंवा त्यांच्या मुलांकडे कुत्सित दृष्टीने पहावयाचे समाजाने – स्त्रियांनी आणि पुरुषांनी – सोडले पाहिजे. त्यांना उत्तेजन मिळाले पाहिजे. आज एकदोन ठिकाणी सर्व ग्रामपंचायत स्त्रियांनी हातात घेतल्याचे ऐकू येते. पण अधिक तपास केल्यावर त्यातही काही ठिकाणी यामागे पुरुषाचा स्वार्थ व राजकारण आहे असे आढळून आले. स्त्रियांच्या हातून पण पुरुषच सत्ते हाखवीत असतात. स्त्रियांना तयार करण्याची दृष्टी ते ठेवीत नाहीत.

स्त्रियांना घराबाहेर विविध क्षेत्रात वाव द्यावयाचा तर कुटुंबातल्या स्त्रीच्या काही जबाबदाऱ्या हलक्या करणेही आवश्यक आहे. कुटुंबनियोजनाने काही भाग साध्य होणारच आहे. पण त्याशिवाय धुलाई, धान्यसफाई, काही काही वेळा रसोई व शिशुसंगोपन या बाबतीत सामुदायिक नव्हे पण सहकारी पायावर काही कामे झाली तर स्त्रियांचे काम हलके होईल व सामाजिक जाणीव अधिक वाढेल, राष्ट्रीय संपत्तीच वापर काटकसरीने होईल.

स्त्रियांना आज राखीव जागा ठेवाव्या काय असाही महत्त्वाचा प्रश्न आहे. तत्त्वतः समतेची भाषा बोलणाऱ्या स्त्रियांनी राखीव जागांची मागणी करणे केव्हाही योग्य नाही. अंतिम दृष्ट्याही ते हितावह नाही. परंतु व्यवहारात मात्र आज राखीव जागा नसतील तर स्त्रिया या क्षेत्रांत अगदी अपवादानेच दिसतील. म्हणून निदान सर्व पक्षांनी स्त्रियांना अधिकाधिक प्रमाणात उमे करणे आवश्यक आहे. या दृष्टीने स्त्रियांनी व नेत्यांनीही लक्ष दिले पाहिजे व चळवळ केली पाहिजे.

आजच्या समाजाचा पाया पाशवी शक्ती व पैसा हा आहे. त्याचे नेतृत्व पुरुष करीत आहे. पण माझ्या डोळ्यासमोर जो समाज आहे त्या समाजाचा पाया प्रेम, सेवा, त्याग हा होईल. त्यावेळी त्याचे नेतृत्व स्त्री करील; कारण प्रेम, सेवा, त्याग हे गुण स्त्रीजवळ अधिक आहेत, असे गांधीजी म्हणत.

स्त्रिया राजकीय क्षेत्रात उतरल्या म्हणजे राजकारणातला चिखल त्या नष्ट करू शकतील असे धाडसाचे विधान मी करू इच्छीत नाही. सर्व तऱ्हेची पात्रता अंगी आल्यावर जेव्हा स्त्रिया स्वार्थ किंवा अप्रामाणिकपणापासून दूर राहतील तेव्हाच हे खरे म्हणावे लागेल. त्याला अजून वेळ आहे.

परंतु गांधीजींच्या उद्गारात काही तथ्य असेल तर ते हेच की, स्त्री ही माता आहे. प्रेम करावे, सेवा करावी, त्याग करावा या गोष्टी मातृत्वाच्या प्रक्रियेतूनच निर्माण होतात. पण आज प्रेम, सेवा त्याग, याचे क्षेत्र फक्त स्वतःच्या कुटुंबापुरतेच आहे. ते जर खरोखर व्यापक होईल व राष्ट्रातील गरीब जनतेवर, निराधार मुलांवर, अगदी दलित समाजावर प्रेम करण्यास, त्यांची सेवा करण्यास, त्यांच्यासाठी त्याग करण्यास स्त्रिया पुढे येतील तर खरोखरच राजकारण स्वच्छ होण्यास मदत होईल. समाज सुदृढ होण्यास मदत होईल आणि प्रेम आणि माणुसकी यांचा विरत चाललेला धागा पुन्हा बळकट होईल.

या साऱ्याची जाणीव सामान्य स्त्रियांना करून देण्याचे आणि त्यांना कार्यप्रवण करण्याचे काम आजच्या तरुण सुशिक्षित ध्येयवादी स्त्रीचे आहे.

0

# १२

# मराठी साहित्यातील स्त्रियांची कामगिरी

कमलाबाई टिळक

सौ. कमलाबाई टिळक, एम्. ए. (जन्म १९०५) बनारस हिंदु युनिव्हर्सिटी व महाराजा सयाजीराव युनिव्हर्सिटी यांमध्ये २५ वर्षे इंग्लिश वाङ्मयाच्या प्राध्यापिका. 'हृदय शारदा', 'आकाश गंगा' व 'अश्विनी' हे कथासंग्रह आणि 'स्त्रीजीवनविषयक काही प्रश्न' (मुंबई विद्यापीठाचे १९४०-४१ चे सर्वोत्कृष्ट पारितोषिक मिळालेले) व 'स्त्री-जीवनाची नवी क्षितिजे' यांच्या लेखिका. (कमलकुंज, ७० के, सेंट्रल ॲव्हेन्यू रोड, चेंबूर, मुंबई ७१)

## 'अपौरुषेय वाङ्मय'—सहजसुंदर ओवी

गंगामैय्याच्या उगमाच्या शोधार्थ जसे गंगोत्रीपर्यंत जावे लागते, त्याप्रमाणे मराठी साहित्यातील स्त्रियांच्या कामगिरीची सुरुवात अभ्यासण्यासाठी लोकसाहित्यातील 'अपौरुषेय वाङ्मया'पर्यंत जावे लागेल. कै. डॉ. कमलाबाई देशपांडे यांनी स्त्रियांच्या ओठावर सहाव्या सातव्या शतकापासून खेळत आलेल्या ओवीबद्ध वाङ्मयाला 'अपौरुषेय वाङ्मय' असे वेदाचे अभिधान कौतुकाने ठेवले. वेदांप्रमाणेच या जात्यावरच्या व झोपाळ्यावरच्या ओव्यांत कर्तेपणाचा अहंकार नाही, वेदांसारखेच प्रसादपूर्ण, सूत्रमय, बिंदूत सिंधू सामावून दाखवणारे, वेदांप्रमाणेच आद्य वाङ्मय म्हणून वर्णन करता येईल असे व पुरुषाचा संबंध नाही म्हणून अपौरुषेय.

स्त्रियांनी निर्माण केलेल्या या वाङ्मयातील कल्पनाचातुर्य, भावनांची उत्कटता, जिव्हाळा, अर्थगर्भ शब्दयोजना व सहजसुंदरता पाहून मन थक्क होते. या ओव्यांतील जीवनाचे चित्र सर्वस्पर्शी व हृदयस्पर्शी असून, चटकन तोंडात बसावी व स्मरणात ठसावी अशी लयबद्धता व शब्दयोजना त्यात आढळते. या वाङ्मयातील कौटुंबिक जिव्हाळा व स्त्रीहृदयाचा मनोज्ञ आविष्कार महाराष्ट्रीय संस्कृतीचे यथातथ्य चित्र नजरेसमोर उभे करतो. शिवाय स्त्रीमन हे इथून तिथून सारखेच असल्यामुळे भारतात प्रांताप्रांतांची भावनात्मक एकता साधण्याला या 'अपौरुषेय वाङ्मया'च्या अभ्यासाचा व प्रसाराचा खात्रीने उपयोग होऊ शकेल.

या साहित्याचा उगम विद्वत्तेत नसून उत्कट भावनेत आहे. या स्त्री-हृ
भावना विवाहादी शुभप्रसंगी, माहेरचे मूळ, सासरची पाठवणी, बाळराजां
मालणे आंदुळणे वगैरे प्रसंगी उचंबळून येतात व वात्सल्यात भिजलेल्या ओवं
वाहू लागतात. स्त्रीजीवनातल्या नाना अनुभूति जात्यावरच्या व झोपाळ्यावर
ओव्यांतून नानाविध रूपाने प्रगट होतात. देवादिकांच्या ओव्यांतून हा
भक्तिरसात डुंबतो. उत्कटता, एकतानता, एकनिष्ठा व समर्पणबुद्धी हा या सा
स्थायीभाव मानला पाहिजे.

या ऋजु, सात्त्विक व उत्कट भावना त्यांना साजेशा साध्या, सरळ व सुंद
अवतरतात. रोजच्या व्यवहारातली, अकृत्रिम व म्हणूनच कुठेही न अडखळण
ओघवती भाषा ऐकणाराच्या हृदयाची पकड घेते. पण रोजची असली तरी ही
रटाळ वाटत नाही. कारण चटकन वीज चमकून तिने आभाळ देदीप्यमान करून
त्याप्रमाणे एखादी साधी पण समर्पक व कलाक उपमा या भाषेला रम्यत्वाचा
चढवते.

'घर माझं निर्मळ, दगावाचून आभाळीळ' असे अभिमानाने म्हणणारी
किंवा—

> बंधुजी विचारितो मैना सासुरवास कसा
> चिताकाचा फासा गळी रुतला सांगू कसा

असे भावापाशी सासरच्या जीवनाचे अत्यंत मार्मिक वर्णन करणारी बहीण; (
हे एका दागिन्याचे नाव. दागिना तर हवा, मग फासा टोचतो म्हणून कसे चाले
किंवा

> सागर पुत्राला वस नको करूंस सासूबाई
> दारीच्या चाफ्यापाशी दुरदेशाची आली जाई

असे सांगणारी सून या भाषाप्रभुत्वाची साक्ष पटवील.

जात्यावरच्या ओव्या हे वाङ्मय तर खरोखर अवर्णनीय आहे. पहाटेच्या
निवांत वेळी स्त्री आपले मन जात्यापाशी मोकळे करते व नानाभाव सहजस्फूर्त
मंजुळ निनादात पाझरू लागतात.

> जात्या ईसवरा तुला घडुनी पाहिलं
> मायलीचं दूध तुज्या कारनी लाविलं
> जात्यावर बसातं संवर जात्याशी बोलातं
> सम्रादीराचं लुगडं आपल्या प्याईनं (देहानं) तोलातं

अशा माहेरचा व स्वकर्तृत्वाचा अभिमान व फुग्यासारखं हलकं उंची वस्त्र देह
त्याचपर्यंत होत स्त्रीच्या या 'जन्माच्या सवगड्याशी' ती प्रगट करते. आपल्या

भावजीवनाचे चित्रच या ओव्यांतून उभे करते. लहानपणी खेळलेले खेळ, भोंडले, भुलाबाई, नागपंचमीचे फेर, माहेरच्या माणसांची ओढ, सासरच्यांचे तिखट अनुभव, 'हयशा' कांत, काळजाचा घड, 'बाळराजा' व चिमणी सईबाई, अशा नाना विषयांवर ओवीमागून ओवी बाहेर पडू लागते.

ओव्यातून गुंफलेले हे वाङ्मय डॉ. सरोजिनी बाबर म्हणतात त्याप्रमाणे मूल्यवान 'स्त्रीधन' आहे; तसेच मराठी साहित्याचा तो जुना, साधा पण बहुमोल अलंकार आहे. त्यात प्रगट झालेले स्त्रीजीवनाचे व समाजाचे चित्र जपून ठेवले पाहिजे. साने गुरुजी, दुर्गाबाई भागवत, सरोजिनी बाबर, मालतीबाई दांडेकर, कमलाबाई देशपांडे यांच्या प्रयत्नांनी त्यांतील अनेक अमोल रत्ने गवसली आहेत. संशोधकांच्या श्रमांनी प्रांतोप्रांतीच्या आणखीही रत्नमंजूषा उजेडात येत आहेत.

## स्त्रियांची गाणी

यानंतरच्या काळातील स्त्रियांची गाणीही उल्लेखनीय आहेत. क्वचित ओव्यांपेक्षा यांना बाळसे जास्त. पौराणिक कथानकांवर ही गाणी स्त्रियांनी वेळोवेळी रचलेली असावीत. शेवटच्या ओळीत क्वचित कवयित्रींच्या नावाचा उल्लेख आढळतो. चिर्धी, द्रौपदीचा बंधु शोभे नारायण, गोकुळचा कान्हा, रासक्रीडा, अक्रुराची व उद्धवाची गाणी, मुद्रिका, धावे, शकुनाची गाणी, ही सर्व अत्यंत रसाळ, सोज्वळ व कोमल जिव्हाळ्यात भिजलेली असतात. त्यात शृंगार (कृष्णसत्यभामेची गाणी, दुरा), हास्यरस (गंगापार्वती, लक्ष्मीसरस्वती कलह), करुण रस (अभिमन्यूची, चिलयाची गाणी), अद्भुत रस (द्रौपदीवस्त्रहरण, दुर्वासभोजन) नेहमीच्या वत्सल व भक्तिरसाबरोबर प्रगट होतात. वृद्ध स्त्रिया आपल्या गोड, कापऱ्या स्वरात ही गाणी म्हणू लागल्या की ऐकणारांचे अष्टभाव जागृत होतात.

अर्थात या प्राचीन स्त्री साहित्यातले विश्व संकुचित होते. स्वतःचे कुटुंब, स्वतःचा गाव या पलीकडे या अडाणी, भाबड्या जीवांची नजर पोचत नव्हती. स्वतःच्या सासर-माहेरच्या कुटुंबाचे भले व्हावे यापलीकडे आदर्श नव्हते. ध्येये नव्हती. लोकसाहित्याचे सर्व गुण पूर्णांशाने या ओव्यांत, गीतांत, कहाण्यांत, लोककथांत होते. पण ज्याला ललित म्हणता येईल असे वाङ्मय अजून मराठीच्या कुशीत जन्मले नव्हते.

## बहिणाबाईंच्या ओव्या

जुन्या स्त्रीगीतांच्या वळणावर लिहिणाऱ्या पण आधुनिक अभिजात वाङ्मयाच्या प्रसादगुणा प्रतिभेवर स्पर्शलेल्या कवयित्री बहिणाबाई चौधरी यांचा उल्लेख आवर्जून केला पाहिजे. त्यांच्या ओव्या ग्रामीण स्त्रीजीवनाच्या दैनंदिनीवर आधारलेल्या आहेत व त्यामध्ये जिव्हाळा, सहजसुंदर शब्दयोजना व समर्पक उपमा, उत्प्रेक्षा वगैरे गुण आढळतात. पण याहीपेक्षा उच्च पातळीवर जाऊन जीवनविषयक तत्त्वज्ञान अत्यंत

प्रगल्भ व उदार स्वरूपात प्रकट करण्याचे सामर्थ्य बहिणाबाईच्या प्रतिभेत आहे. माणुसकीला विसरलेल्या, स्वार्थी, संकुचित जगाकडे पाहून त्यांचे कविहृदय पिळवटते व 'मानसा, मानसा, कर्धी व्हशील मानूस' असे कळवळ्याचे उद्गार बाहेर पडतात. त्यांची कल्पकता व सखोल चिंतनात्मकता 'मन पाखरू पाखरू' सारख्या हृदयंगम गीतात आढळून येते. खानदेशी, वऱ्हाडी माया व विनोदाची झालर यांनी या प्रसादपूर्ण, प्रगल्भ, उदात्त व प्रतिभाशाली गाण्यांची गोडी व रंजकता अधिकच वाढली आहे.

## संत व भक्त कवयित्री

मराठी ललित साहित्याचा आरंभ महानुभावांपासून म्हणजे सुमारे सातशे वर्षांपूर्वी झाला असे मानतात. हे वाङ्मय गेल्या साठ-सत्तर वर्षांतच उजेडात आले व त्याच्या अभ्यासास सुरुवात झाली. स्त्रियांना अभिमान बाळगण्याजोगी गोष्ट आहे की त्या जुन्या काळात सुद्धा नाव घेण्याजोगी एक कवयित्री मराठी साहित्य भूषवून गेली. आद्य मराठी कवयित्री म्हणून महदाइसा (महदंबा किंवा रुपाई या नावांनीही ही ओळखली जाते) प्रसिद्धी पावली आहे. शके १२०८चे सुमारास हिने आपले 'धवळे' रचले. धवळे म्हणजे लग्नसमारंभात गावयाची वरविषयक गीते. महदाइसेने आपल्या धवळ्यात रुक्मिणीस्वयंवराची कथा गाइली आहे. मात्र ज्ञानेश्वरीसारखी असून आपल्या सहजसुंदर शैलीने, हुबेहूब वर्णनांनी, कौटुंबिक भावनांच्या जिव्हाळ्यांनी व स्त्रीस्वभाव-सहज बारीकसारीक तपशीलाच्या चटकदार मांडणीने हे धवळे संस्मरणीय झाले आहेत.

मराठी साहित्याच्या उषःकालात, संतवाङ्मयात, स्त्रियांची भक्तिरसपूर्ण वाणी माधुर्याने निनादली. त्या काळची स्त्री सुशिक्षित नसेल पण सुसंस्कृत खात्रीने होती. ज्ञानेश्वरी, अमृतानुभवासारखे अध्यात्मविद्येच्या गाढ व्यासंगावर आधारलेले ग्रंथ स्त्रियांनी लिहिले नाहीत. पण भक्तिरसाने ओथंबलेले व सर्वांभूती समबुद्धी, निरभिमान, दया, क्षमा इत्यादी उदात्त तत्त्वे जिचे व्यवच्छेदक लक्षण त्या भारतीय मनोभूमिकेचे दर्शन घडवणारे शेकडो प्रासादिक अभंग लिहिणाऱ्या थोर कवयित्री या काळात होऊन गेल्या. समर्पणबुद्धी, सेवा, निष्ठा, हे स्त्रियांचे अंगभूत गुण भक्तिरसाला पोषक ठरले. अवघ्या पंधरा-सोळा वर्षांच्या मुक्ताबाईंचे ज्ञानेश्वरांना उद्देशून लिहिलेले ताटीचे अभंग अमर झाले आहेत. नामदेवांची 'दासी जनी' हिच्या अभंगातील साधा, सरळ, भाव, पांडुरंगाबद्दलची – 'पंढरीची आई, विठाबाई' हिच्या बाबतची – निष्ठा व त्यामुळे कवनात आलेली एकरूपता कौतुकास्पद वाटते. तितकी उल्लेखनीय कवयित्री संत तुकारामाची शिष्या बहिणाबाई. पंढरी व पंढरीनाथ यांच्या प्रेमाने भरलेले हिचे अभंग साधे व मोहक आहेत. अभंगवृत्तात लिहिलेले हिचे आत्मचरित्र रसाळ, प्राञ्जळ व तत्कालीन समाजरचनेवर व जनमनावर उत्तम प्रकाश टाकणारे आहे. समर्थ रामदासांच्या शिष्या वेणूबाई यांचे ओवीबद्ध सीतास्वयंवर, वेदांत व्यक्तिचित्रे व प्रसंग

निवेदन या वाङ्मयगुणांनी युक्त आहे. त्यांची मनुष्यस्वभावाची ओळख व उपहासगर्भ विनोदबुद्धी 'वदे राम लक्ष्मणा हे लिही रे' या मौजेच्या प्रकरणात स्पष्ट दिसते.

## दीडशे वर्षे स्त्री मूक राहिली

संतकवींच्या नंतर मराठेशाहीत पंतकवी व शाहीर उदयास आले. या दोन्ही गटांत स्त्रिया चमकल्या नाहीत. पंतकवींच्या काव्यात व्युत्पन्नता, वृत्तबद्ध रचना, विद्वद्‌मान्य भाषालंकार, व संस्कृतप्रचुरता अपेक्षित असे. पद्धतशीर शिक्षणाला आचवलेल्या स्त्रियांना ही गुणाढ्यता आपल्या काव्यात आणणे शक्यच नव्हते. पेशवाईत पोवाडेलावण्यांनाही बहर आला होता. 'अबला' व 'भीरू' ठरलेली स्त्री वीररसाला अनभ्यस्त असल्या-मुळे तिने पोवाडे रचणे शक्यच नव्हते. लावण्यांतल्या शृंगाररसाची स्त्री ही अधिष्ठात्री देवता असली तरी स्त्रीसहज शालीनतेमुळे 'तशा' लावण्या स्वतः लिहिण्याचा धीर तिला होणे सर्वस्वी असंभवनीय होते. 'सजणा'ला उद्देशून लिहिलेल्या लावण्या, त्यांतील विरहव्यथेची व्याकूळ, निर्भीड वर्णने, प्रणयमीलनाची आवाहने व आव्हाने पुरुषरचितच आहेत.

पेशवाईनंतर आंग्लाई आली. संतपंत कवींचा भाव उतरला, भक्तीचे मळे सुकून गेले. परमेश्वरस्तुतिपर काही वृत्तबद्ध रचना आढळते. पण बदललेली राजवट नवे दृष्टिकोण, नवे आदर्श व भिन्न आचारविचार घेऊन आली. त्याचे प्रतिबिंब साहित्यात साहजिकच पडू लागले. इंग्लिश वाङ्मयाच्या अभ्यासाचा परिणाम मराठी साहित्यात अभिनव विषय व अभिव्यक्तीच्या व रचनेच्या नव्या पद्धती यांत दिसू लागला. नवे पाश्चात्य शिक्षण देणारी विद्यापीठे उघडली. स्त्रीशिक्षणावर त्या काळात बहिष्कार असल्यामुळे या नव्या शिक्षणाचा फायदा स्त्रियांना मिळाला नाही. पूर्वीच्या कवयित्रींना उपयोगी पडलेले पुराणकीर्तनश्रवण, भजन व त्यायोगे येणारी बहुश्रुतता व मिळणारे ज्ञान या आधुनिक साहित्यनिर्मितीला पुरे पडणारे नव्हते. स्त्रियांना सहज जमणारी ओवी, अभंग इत्यादी काव्यवाहनेही मागे पडली. त्यामुळे या मध्यंतराच्या जवळजवळ दीडशे वर्षांच्या काळात स्त्रियांचा आवाज मराठी साहित्यात उमटला नाही.

## जुन्या पिढीतील लेखिका व कवयित्री

आंग्लाईच्या प्रारंभीचा मराठी वाङ्मयाचा हा 'इंग्लिश अवतार' फारसा मौलिक व उच्च दर्जाचा नव्हताच, पण मग एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात चिपळूणकरी युग सुरू झाले व खऱ्या अर्थाने अर्वाचीन मराठी साहित्याचा नारळ फुटला. याचवेळेपावेतो पाश्चात्य संस्कृतीच्या प्रभावामुळे स्त्रीशिक्षणाला सुरवात झाली होती. मराठी साहित्यात, देशाच्या इतर दुरवस्थांप्रमाणे 'स्त्रियांच्या परवशते'लाही वाचा फुटत होती. हरिभाऊ आपटे, आगरकर, वगैरे स्त्रियांच्या कैवाऱ्यांनी स्त्रियांच्या दुर्दशेचे चित्र वाङ्मयात उभे केले. पूर्वी चार भिंतीत कोंडलेली स्त्री हळूहळू मोकळ्या हवेत येऊ

लागली. पडद्यामागची पडद्यावर दिसू लागली. तिचे अस्तित्व जाणवू लागले. तिची दखल घेण्याची जरूरी उत्पन्न झाली. स्त्रियांना शिक्षण घेऊन पुढे येण्याला पुरुषांनी मदत केली. हळूहळू उदारमतवादी पुरुष स्त्रियांना वाङ्मयनिर्मिती करण्यास उत्तेजन देऊ लागले. सुसंस्कृत वर्तुळात वावरणाऱ्या स्त्रियांनी साहित्याच्या दालनात डोकावण्यास सुरुवात केली. काशीबाई कानिटकर, गिरिजाबाई केळकर, आनंदीबाई शिर्के, साधे सोपे गद्य निबंध, कथा, कादंबरी या स्वरूपात लिहू लागल्या. पण वाङ्मयकर्तृत्वातील स्त्रियांची मूळ परंपरा कवितेची. त्यामुळे काव्यप्रांतात स्त्रियांना संचार जास्त सहजपणे होऊ लागला. जुन्या स्त्रीगीतांच्या वळणावर श्री. पार्वतीबाई गोखले, कृष्णाबाई गाडगीळ व केशवसुती संप्रदायात लक्ष्मीबाई टिळक, सरस्वतीबाई मिडे, सारजाबाई बापट, अरुणाबाई देशपांडे वगैरे कवयित्री लिहू लागल्या. पतिप्रेम, अपत्यस्नेह, माहेरचा जिव्हाळा या जुन्या विषयाना नवीन कलाटणी मिळाली व निसर्ग, देश, दलितवर्ग वगैरे नवीन विषय व समता, स्वातंत्र्य, विश्वबंधुत्व वगैरे नवीन तत्त्वज्ञान प्रकट होऊ लागले. स्त्रियांच्या जिव्हाळ्याचे विषय, विधवेची करुण स्थिती, परित्यक्तेचे केविलवाणे जीवन वगैरे विषय अर्थात वरचेवर या काव्यात येतच.

केशवसुतानंतर सुरू झालेल्या रविकिरण-मंडळाच्या संप्रदायात मनोरमाबाई रानडे यांचे नाव प्रामुख्याने घ्यावे लागेल. कमलाबाई देशपांडे, विमलाबाई देशपांडे, इंदिरा संत वगैरे कवयित्री या काळात लिहू लागल्या. विषय व भावना या काळात पूर्वीचीच होती पण अभिव्यक्तीत बंधनापलीकडे जाण्याची ऊर्मी होती.

## नवकाव्याच्या पाईक कवयित्री

१९३० चे सुमारास नवकाव्याचे युग सुरू झाले. मर्ढेकर हे या युगाचे प्रणेते. 'सत्यं शिवं सुंदरम्' चे जुने साहित्यसंकेत नवकवींनी धाब्यावर बसविले. ध्येयवादाची रोमँटिक धुंदी झाडून टाकून कठोर, नागडी वास्तवता लिहिण्याचे नागड्या शब्दात उघडी केली. दुसऱ्या महायुद्धानंतर पश्चिमेत आलेले वैफल्य, उजाड झालेले जीवन, दारुण वर्तमानकाळ व भकास भविष्यकाळ यांनी 'वांझपण' आणल्याकडेही दाखून राहिली. बहुजनसमाजातील नकारघंटा कानात घणघणू लागून वीणेचा मधुर झंकार लोपून गेला. वृत्ताच्या, जातीच्या, ल्यबद्धतेच्या, कुठल्याच काव्ययुगाच्या खोडावेटीत अडकून घेणे नवकवींना पसंत नव्हते. आतला आशय व्यक्त करण्याला ठराविक शब्दविश्व नवकवींना पुरेनासे झाले. जुन्या उपमा उत्प्रेक्षा शिळ्या झाल्या. यंत्रयुगातल्या नव्या प्रतिमा उप-योगात आल्या. अभिव्यक्तीच्या या धडपडीत काव्यात क्लिष्टता, अर्थहीनता, अमूर्तता, शिरली. कवी व वाचक दोघेही गोंधळून गेले. अनोळखी रूप, गद्य मळणाऱ्या प्रतिमांच्या चक्रव्यूहात दोघेही सापडत व आशयाच्या मध्यबिंदूला पोचण्याचा रस्ता हरवून बसत. काही काळाने नवकाव्यातले तत्त्वज्ञान, सद्यीवनमूल्याविरुद्ध बंड — मग ती मूल्ये जीवनातली असोत की साहित्यातील असोत — शब्दशः वाचकांच्या पचनी पडले.

पण नवकाव्यातील वास्तवदर्शनाच्या अट्टाहासाने त्यांत शिरलेली अभद्रता, नव्या प्रतिमांच्या आग्रहामुळे आलेली सौंदर्यहीनता व खडबडीत शब्दांमुळे व बेबंद रचनेमुळे आलेली अर्थहीनता व लोपलेले नादमाधुर्य वाचकांना अजून रुचत नाही.

स्त्रियांच्या अंगोपांगी कोमलता, सुरेलपणा व शालीनता मुरलेली असल्यामुळे अगदी नव्या म्हणविल्या जाणाऱ्या कवयित्रींमध्येही कर्कशपणा, खडबडीतपणा व अभद्र अश्लीलता आढळत नाही. इंदिरा संत, संजीवनी मराठे, शांता शेळके, पद्मा, शिरीष पै, निर्मला देशपांडे, मेघला, अनुराधा पोतदार, वगैरे कवयित्री नव्या युगाच्या पाईक आहेत. यापैकी इंदिरा संत यांच्या नावाने पहिले बोट घालावे लागेल. आरंभी पतीच्या जोडीने केशवसुती संप्रदायात त्यांनी कविता लिहिल्या. पतिप्रेम हा त्यांच्या कवितांचा स्थायीभाव होता. वात्सल्य वगैरे स्त्री-हृदयातील नाजुक भावनांची गुंफणही त्या हळुवार हाताने उकलून दाखवीत. शेला, मेंदी या कवितासंग्रहात ही जुन्या वळणाची कविता आढळते. पण इंदिराबाईंनी फार झपाट्याने नवकाव्याच्या परंपरेत प्रवेश करून घेतला. मुक्तछंदाचा वापर, आशयाच्या अभिव्यक्तीसाठी यंत्रयुगातल्या प्रतिमांचा उपयोग व अंतर्मनात खोल खोल शिरून तेथील भावनांची पिंजण, ही नवकाव्याची लक्षणे त्यांनी आत्मसात केली. इतर नवकवींइतक्या वैफल्याने त्या ग्रासल्या नसल्या तरी नैराश्याची दाट छटा त्यांच्या निसर्ग व मानवविषयक काव्यात स्पष्ट दिसते. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर लाभणाऱ्या अपार समृद्धीची सुखस्वप्ने नियतीच्या व प्रतिकूल परिस्थितीच्या टाचेखाली चिरडून जात असलेली पाहून इंदिराबाईंचे कविहृदय कातर होते. 'मृगजळ' 'रंगबावरी' या अलीकडच्या कवितासंग्रहात ही अगतिकता व तद्‌भव विषण्णता स्पष्ट दिसते.

शांताबाई शेळके या जुन्या रोमँटिक संप्रदायातल्या. त्या काव्य जगतात व काव्य लिहितात. कुसुमकोमल भावना वीणाझंकारासारख्या नादमधुर शब्दात गुंफणे हा त्यांचा कविमनोधर्म. 'वर्षा' मधल्या धुंद प्रणयाच्या मोहिनीची जागा पुढे 'रूपसी'त विषण्णतेने घेतली आहे. जगातील दुःखदैन्याने जीव सुसमरून कवयित्री जणू स्वतःच्याच अंतर्मनात मान खुपसून बसते. शांताबाईंना सौंदर्याची तहान आहे. निसर्गावर त्यांची प्रीति आहे. त्यांच्या प्रसादपूर्ण शैलीत या भावना संथ, शांत लयीत वाहात राहतात.

संजीवनी मराठे याही जुन्या रोमँटिक परंपरेतल्याच. पण त्यांच्या 'छाया' व 'चित्रा' या अलीकडच्या संग्रहात त्या आपली प्रेरणा नवीन आशयाच्या संदर्भात नव्या रचनाप्रकारात वसवू पाहात आहेत असे वाटते. कौटुंबिक जिव्हाळा, अपत्यस्नेह, ईश्वरनिष्ठा, राष्ट्रप्रेम, देशभक्ती हे जुनेच विषय नवीन आशयात नटवण्याचा त्यांचा प्रयत्न चालू असतो. मातृत्वाच्या फाळणीने त्यांचे कविहृदय फाटलेले दिसते. स्त्रीच्या नव्या युगातील नव्या अवताराची त्यांना जाणीव आहे. 'स्त्री माझे नाव'या कवितेत स्त्रीजीवनात प्रकटलेल्या नव्या स्थितींची त्यांनी दखल घेतली आहे. स्त्रीने कुटुंबाच्या पसाऱ्यातच केवळ गुरफटून न राहता आदर्श नागरिक, वैज्ञानिक, समाजसेवक,

राजकारणी व्यक्ती वगैरे बनण्याची महत्त्वाकांक्षा ठेवली पाहिजे, या स्त्रियांत जागृत होणाऱ्या नव्या जाणिवेला या कवितेत वाचा फोडली आहे. सुरेल व भावपूर्ण आवाजाने कवींच्या मैफलीत आपल्या कविता गाऊन दाखवणाऱ्या संजीवनीबाईंची मराठी साहित्यातील कामगिरी उल्लेखनीय आहे. 'पद्मा' यांच्या 'नीहार' मध्ये मातृवात्सल्य, प्रणय, निसर्ग या विषयांवर मनोज्ञ कलात्मकतेने मृदु भावना गुंफल्या आहेत. 'आषाढ' सारख्या कवितांत त्यांनी नवीन प्रतिमा व छंदाचाही उपयोग केलेला आढळतो. त्या समतावादाच्या कैवारी असून 'नवीन स्त्री' त्यांच्या काव्यात वावरताना दिसते.

'नाही मी तुमची मादी, मी माणूस, माणूस मादी.'

निर्मला देशपांडे यांच्या 'गंधखुळी'मध्ये प्रणयभावना, सृष्टिसौंदर्य, निरागस बाल्य, सौंदर्यपूजा यांच्या जोडीला खेळकरवृत्ती व विनोदबुद्धी आहे. शिरीष पै, शेळके यांनी स्त्रीमनाबरोबर पुरुषमनाचेही विश्लेषण केलेले त्यांच्या कवितांवरून दिसून येते. अपर्णा देशपांडे, इंदिरा तेलंग, ललितकुमारी भट इत्यादी कवयित्रींनी स्त्री-जीवनातल्या विविध पैलूंभोवती वेढलेल्या भावनांचा आविष्कार मधुर कवितांतून केला आहे. लक्ष्मीबाई टिळक यांच्या ख्रिस्तायनप्रमाणे महाकाव्य रचण्याचा प्रयत्न मात्र अद्याप कोणा कवयित्रीने केला नाही.

## जुन्या जमान्यातील गद्य लेखिका—तंत्राचा विकास

प्राचीन ओव्या व स्त्रीगीते जितक्या प्रमाणात उत्कृष्ट आहेत व प्रचारातही आहेत, तितक्या प्रमाणात गद्य लोकसाहित्य, नागरी भागात तरी आढळत नाही. वेळोवेळी कहाण्यांची मात्र उजळणी होत असेल तेवढीच. पण आंग्लाईनंतर स्त्रीने साहित्यात प्रवेश केला तो मुख्यत्वे गद्यविभागात. काशीबाई कानिटकर, गिरिजाबाई केळकर, वामनसुता वगैरे पहिल्या लेखिका लहान लेख व गोष्टी 'मनोरंजन'सारख्या मासिकांत लिहू लागल्या. यात प्रपंचातील व्यावहारिक गोष्टींचा ऊहापोह व साध्या नीतितत्त्वाचा बोध असे. या 'चांदण्यातील गप्पा' व 'जिजीच्या गोष्टींत' विशेष कल्पनेचे अवडंबर नसून अगदी रोजच्या जीवनातील सरळ गोष्ट किंवा वागण्याबोलण्याबद्दल उपदेश गोवलेला असे. स्त्रीच्या नजरेतून रेखाटलेले जीवन पहिल्यानेच आधुनिक वाङ्मयात आणणाऱ्या, या लेखिकांचे महत्त्व विशेष आहे. त्यांचे लेखन काहीसे पाल्हाळिक असले व त्यात रचनाकौशल्याचा अभाव भासला तरी स्त्रीसाहित्यात त्यांचे स्थान अढळ आहे. आनंदीबाई शिर्के यांच्या लेखनात कलात्मक मांडणीचे प्रयत्न दर्शन होते. 'वेगम दिलआरा'ही त्यांची गोष्ट खूप गाजली. कथानकातील गुंतागुंत, त्यात गुंफलेले रहस्य व शेवटची आश्चर्यजनक उकल यायोगे त्यांनी अद्भुत रस निर्माण केला. "साहित्य निर्माण करण्याला नुसते वास्तवदर्शन पुरत नाही. त्या दर्शनात एक तंत्र असते. नीतिबोध 'वरे सत्य बोला, यथातथ्य चाला' या रामदासी थाटात करणे लांछन

साहित्यात वसत नाही. कलात्मक सुवक्ता इच्छित हेतू आत्त यशस्वी रीत्या साधून देते." वगैरे दंडक लेखिकांना हळूहळू ज्ञात होत होते व त्यांच्या लिखाणांत उतरत होते.

स्त्रीशिक्षणाच्या प्रसाराबरोबर माध्यमिक व उच्च शिक्षण घेणाऱ्या स्त्रियांची संख्या वाढली. त्यांचे चार भिंतीतले जग हळूहळू रुंदावू लागले. स्त्रियांच्या प्रगतीच्या मार्गावर समाजाकडून व कुटुंबियांकडून कळत वा न कळत निर्माण होणारे अडथळे, निची आर्थिक परवशता व कायदेशीर दुर्दशा स्त्रियांच्या लिखाणात प्रगट होऊ लागली. कथेचे तंत्रही आटोपशीर, एकसूत्री व प्रभावी होऊन ती 'लघुकथा' बनली. १९२० ते १९३२ या वर्षात अनेक स्त्रियांनी लघुकथेच्या प्रांतात हजिरी लावली. शहरातील मध्यमवर्गाचे जीवन व विशेषतः या वर्गातील स्त्रियांचे जीवन हा मध्यवर्ती विषय बहुतेक सर्व लेखिकांचा होता. क्षमाबाई राव या नामवंत लेखिकेने तर कोळी, कोष्टी व कामकरी वर्ग यांच्या जीवनावर व समस्यांवरही कथा लिहिल्या. वास्तवपूर्ण वातावरण निर्माण करण्याचे त्यांचे कौशल्य व कथांतील रेखीव व्यक्तिचित्रण वाखाणण्याजोगे आहे. 'कृष्णाबाई' या नावाने लिहिणाऱ्या मुक्ताबाई दीक्षित याही एक अत्यंत समर्थ कथालेखिका होत्या. केवळ घटनांचे स्थूल चित्रण करण्यापेक्षा त्यांच्या मागली व्यक्तींची मनोभूमिका विश्लेषण्याची त्यांची हातोटी वर्णनीय आहे. वैवाहिक जीवनातील अनेक समस्या त्यांनी आपल्या कथांतून हाताळल्या. कुसुमावती देशपांडे यांनी आपल्या चिंतनशील मनोवृत्तीने व तिच्या काव्यात्मक आविष्काराने लघुकथेला आगळीच शोभा आणली. लघुकथेच्या आता ठरून गेलेल्या पारंपरिक तंत्राकडे त्या विशेष लक्ष देत नसत. त्यांच्या कथांना 'भावचित्रे' हे नाव कदाचित जास्त साजून दिसेल. विदर्भातल्या श्रमजीवी वर्गातल्या व्यक्तींचे त्यांचे चित्रण वास्तवदर्शी व हृदयस्पर्शी आहे. नाना थरांतल्या स्त्रियांच्या भावनांचे त्यांनी अत्यंत नाजूक कलात्मक हाताने विश्लेषण केले आहे.

लघुकथेचे तंत्र आत्मसात करून प्रवाही निवेदनशैलीने स्त्रीजीवनाचे यथातथ्य चित्रण करणाऱ्या कितीतरी लेखिकांची नावे सांगता येतील. कुमुदिनी रांगणेकर, पिरोज आनंदकर, शशिकला आळंदकर, शांताबाई नाशिककर, कमला वैद्य, तारा कुलकर्णी, दया पटवर्धन, हिरा बनसोडे, आनंदीबाई जयवंत वगैरे लेखिकांनी मराठी साहित्यात चांगली कामगिरी बजावली आहे.

## लघुकथेच्या दालनात क्रांतिकारक बदल — विभावरी शिरूरकर

१९३३ च्या सुमारास लघुकथेच्या प्रांतात विशेषतः लेखिकांच्या दालनात एक क्रांतिकारक बदल घडून आला. विभावरी शिरूरकर यांच्या 'कळ्यांच्या निःश्वासाने' खूपच खळबळ उडवून दिली. य. गो. जोशींप्रमाणे लघुकथेच्या तंत्राविरुद्ध बंड या कथांत होतेच. शिवाय समाजाच्या स्त्रियांच्या भावनांबद्दलच्या सोयीस्कर समज वा अपसमजा-विरुद्ध बंडाचे निशाण उभारले होते. या सुमारास महाराष्ट्रात सुशिक्षित स्त्रियांची

## कादंबरी लेखिका—जुन्या व नव्या

लघुकथेच्या क्षेत्रात स्त्रियांनी जितका विपुल संचार केला तितका कादंबरीच्या क्षेत्रात केलेला दिसत नाही. एक तर कादंबरी लिहिण्याला जितका दीर्घ अवसर व चिंतनसातत्य लागते तितके प्रापंचिक व व्यवसायात पडलेल्या स्त्रियांना लाभत नाही. दुसरे लघुकथांना मासिकांतून चटकन प्रसिद्धी मिळते. कादंबरी प्रकाशित करणे कठीण पडते. नवोदित लेखिकांना प्रकाशक भेटत नाहीत व स्वतः पदरमोड करून कादंबरी प्रसिद्ध करणे सर्वच लेखिकांना शक्य नसते. कादंबरीलेखनाचे तंत्र जास्त कठीण असते. लघुकथेपेक्षा कादंबरीला कल्पनेची जास्त व्यापक भरारी व मोठ्या प्रमाणावर सृजनक्षमता आवश्यक असते. जुन्या पिढीतल्या स्त्रिया इथे उण्या पडत. नव्या पिढीला जास्त पुस्तकी शिक्षण लाभत असल्यामुळे व त्यांच्या अनुभूतींच्या कक्षा समाजाच्या बदलत्या घडीमुळे जास्त रुंदावल्यामुळे कादंबरीलेखिकांची संख्या दिवसानुदिवस वाढत आहे.

मराठी कादंबरीला सुरुवात बाबा पदमनजी यांच्या ‘यमुनापर्यटन’ पासून म्हणजे १८५७ पासून झाली. पुढे हरि नारायण आपटे युग, वा. म. जोशी युग व फडके-खांडेकर युग आले. काशीताई कानिटकर, जानकीबाई देसाई, इंदिराबाई सहस्रबुद्धे, शांताबाई नाशिककर वगैरे काही लेखिकांची नावे स्त्रीजीवनावर आधारलेल्या कादंबऱ्यांच्या लेखिका म्हणून आपटे संप्रदायात घालता येतील. कमला फडके, शान्ता शेळके, सुमती धनवटे, शकुंतला गोगटे यांनी फडक्यांचा कलावाद व सौंदर्यवाद उचललेला दिसतो. पण १९२० पासून बहुतेक लेखिकांवर खांडेकरांच्या ‘जीवनासाठी साहित्य’ या तत्त्वज्ञानाचा परिणाम झालेला दिसून येतो. स्त्रियांच्या जीवनात शिक्षणामुळे, समान हक्कांच्या मागणीमुळे व आर्थिक स्वातंत्र्यामुळे जी क्रांती झाली तिच्या परिणामाचे खळबळ उडविणारे चित्र कादंबरीतून रेखाटणाऱ्या पहिल्या कादंबरीकार विभावरी शिरूरकर ऊर्फ मालतीबाई बेडेकर होत. विरलेले स्वप्न, हिंदोळ्यावर, दोघांचे विश्व, शबरी या कादंबऱ्यांतून स्त्रियांच्या भावविश्वाची झालेली उलथापालथ त्यांनी समर्थपणे व कलात्मकतेने रेखाटली आहे. गीता साने यांच्या ‘वठलेला वृक्ष’, ‘हिरवळीखाली’ वगैरे कादंबऱ्यांनही स्त्री जीवनातल्या समस्यांची सडेतोड चर्चा आहे.

## कादंबरीक्षेत्रातील दोन प्रवाह

१९३६चे सुमारास नवेनवे विचारप्रवाह साहित्यावर आपले ठसे उमटवू लागले. जुन्या सामाजिक मूल्यांना ‘नवनीतिवाद’ आव्हान देऊ लागला. या बदलत्या सामाजिक मूल्यांचे चित्रण कादंबऱ्यांतून होऊ लागले. दुसऱ्या महायुद्धानंतर पश्चिमेकडे सर्व जुनी जीवनमूल्ये कोसळून पडली व त्यांचे पडसाद पूर्वेकडे उमटू लागले. देशभक्ती, कौटुंबिक जिव्हाळा, एकनिष्ठा, प्रेम, स्वार्थत्याग, ही सर्व वरवरची पांघरुणे असून त्यांच्या पाठीमागे स्वार्थ, फितुरी, लोभ, क्रौर्य, वासना, द्वेष यांचा नंगा नाच चालू

असतो हे समाजातील 'नाही रें'च्या अनुभवास येऊ लागले. मूल्यमर सत्ताधारी 'आहे रें'चे मुखवटे ओढून काढून पाठीमागील कटू व ओंगळ सत्याचे दर्शन साहित्यातून घडवण्याकडे साहित्यिकांची प्रवृत्ती होऊ लागली. पूर्वीच्या 'सत्य सुंदर शिव'च्या मागले 'खोटे खराब खवट' बाहेर पडू लागले. समाजात व मानवी मनात दाटून राहिलेल्या या घाणीचा निचरा झाल्याखेरीज समाजाचे व देशाचे 'श्रेयस्' साधणार नव्हते. यामुळे 'प्रेयस्'ची आराधना सोडून देऊन 'श्रेयस्'वर अंतिम हित साधणाऱ्या गोष्टींवर साहित्य केंद्रित होऊ लागले. या उपसलेल्या घाणीने उबग येऊन, साहित्य-मूल्यांचा लोप झाल्याचा ओरडा होऊ लागला. पण खरे पाहू जाता, साहित्याचे अवमूल्यन झाले नसून मानवी जीवनाची मूल्ये ढासळत आहेत, व त्यांना सावरण्यासाठी हा साहित्यविभ्रम साजरा करावा लागत आहे; तथाकथित मूल्यांची – चौदा कॅरट मूल्यांची – होळी करून दोन्ही हातांनी फाल्गुनभाऊ गाजवल्याखेरीज पावनकारी साहित्यसुवर्ण गवसणार नाही व भविष्याचा वसंतकाळ जीवनात व तदनंतर साहित्यात अवतरणार नाही असा या नवसाहित्यिकांचा दावा आहे. 'एक शून्य बाजीराव' सारखी नाटके, 'वासुनाका', 'अजगर' वगैरे कादंबऱ्या यामागची ही भूमिका असावी.

या नव्या प्रेरणेनुसार मराठी कादंबरीवाङ्मयात दोन नवीन प्रथा सुरू झाल्या. मनुष्याच्या अंतर्मनातले सुप्तप्रवाह त्यांच्या अतीव सूक्ष्म स्वरूपात निरखून, त्या संदर्भात त्यांच्या समाजातील वागणुकीचा अर्थ उकलणे हा पहिला प्रकार. इंग्लिश वाङ्मयातील डी. एच. लॉरेन्स, व्हर्जीनिआ वुल्फ वगैरेंपासून स्फूर्ती घेऊन मर्ढेकर, कानेटकर, खानोलकर, शेळके, दळवी, भाऊ पाध्ये वगैरे लेखक लिहू लागले, व अभद्र, असुंदर व विसंगत लिहिल्याबद्दल समाजाच्या तिरस्काराचे व काही समीक्षकांच्या दारुण टीकास्त्राचे लक्ष्य बनले. मात्र या संज्ञाप्रवाहाच्या मार्गावर लेखिकांची पावले अजून उमटलेली दिसत नाहीत. लघुकथेच्या क्षेत्रात काही लेखिकांनी या तंत्राचा वापर केलेला आपण पाहिलाच; पण कादंबरीक्षेत्रात तसे प्रयत्न झालेले नाहीत.

मराठी कादंबरीक्षेत्रातला दुसरा प्रवाह म्हणजे प्रादेशिक कादंबऱ्या. स्वतंत्र भारतात भावनात्मक एकता येण्यासाठी प्रांताप्रांतातले, समाजातले निरनिराळे थर उजेडात आणून समजून देणे आवश्यक वाटू लागले आहे. ब्वे, दिघे, डांडेकर, पेंडसे, माडगुळकर या लेखकांनी अशा प्रादेशिक कादंबऱ्या लिहून दलित, रुग्ण, गुन्हेगार मानवाचे व अज्ञात व उपेक्षित भूभागाचे जीवन सहानुभूतीच्या 'क्ष' किरणांनी प्रकाशित केले. लेखिकांनीही या महत्त्वाच्या कामगिरीला हातभार लावला आहे. मांगगारुडी जातीच्या जीवनावर मालतीबाई बेडेकर यांनी 'बळी' ही कादंबरी लिहिली आहे. शांता शेळके यांनी कोळी लोकजीवनावर व सरोजिनी बाबर यांनी ग्रामीण जीवनावर कादंबऱ्या लिहून त्या त्या थरातील समाजाचे व व्यक्तीचे यथातथ्य दर्शन घडवले आहे. मोकळ्या हृदयाची, फटकळ जिभेची, उथळ सभ्यतेला अनभ्यस्त अशी ही माणसे नागरी मनाला निराळेपणामुळे चटका लावतात, व खडबडीत आवरणाखाली

पाळणाऱ्या निर्मळ माणुसकीची व सुसंस्कृत रंग ज्या मानवतेची पूजा बांधते तिची जात एकच आहे ही अंतरीची खूण पटून नागरीग्रामीण एकात्मता होते.

## स्त्रीलेखकांची कामगिरी खांडेकरी परंपरेमध्ये

याप्रमाणे कादंबरीक्षेत्रातल्या या दोन प्रवाहांनी सामाजिक परिस्थिती व अंतर्मनातील दुराकलनीय भावनोद्रेक यांनी मानव कसा घडत गेला आहे याचे दर्शन घडवून महाराष्ट्रातील प्रांतांच्या व समाजाच्या विविध थरांत समीपता आणली व सर्वभूती वास करणाऱ्या माणुसकीच्या एकाच धाग्याची जाणीव उत्पन्न करून सायुज्यता साधली. पण या अत्युच्च भूमिकेवरून कादंबऱ्या लिहिणाऱ्या लेखिकांची संख्या अद्यापि अत्यल्प आहे, व बव्हंशी खांडेकरी परंपरेत सामाजिक आशयाच्या कादंबऱ्या लिहिण्याकडे लेखिकांची प्रवृत्ती विशेष आढळते. एकंदरीत जीवनातील ध्येयशून्यता व तत्त्वभ्रष्टता, वैवाहिक जीवनातील समस्या व बदलत्या स्त्रीजीवनातली बदलती मूल्ये यांचे दर्शन घडवणाऱ्या लेखिकांची संख्या बरीच आहे. कादंबरीलेखनाचे तंत्र, विषयाची कलापूर्ण मांडणी, रेखीव व्यक्तिचित्रण, वास्तवपूर्ण वातावरणनिर्मिती व निवेदनशैली यांमध्ये या लेखिकांनी साधारणण्याजोगे नैपुण्य मिळविले आहे. कृष्णाबाई मोटे, आनंदीबाई जयवंत, कुमुदिनी रांगणेकर, मालतीबाई दांडेकर, प्रेमा कंटक, डॉ. सुमती क्षेत्रमाडे, सिंधु गाडगीळ, लीला देशमुख, शालिनी हळदीपूरकर, सरोजिनी दबडे, तारा दोले, सुधा साठे, लीला श्रीवास्तव, शशिकला आळंदकर, विजया नरवणे, सुधा पडके, सुमती बेल्सरकर, यमुना शेवडे वगैरे अनेक लेखिका रंजक व मनोधक कादंबऱ्या लिहून मराठी साहित्यात चांगली कामगिरी बजावीत आहेत.

## नाट्य लेखनात स्त्रियांची कामगिरी अत्यल्प

लघुकथा कादंबरी क्षेत्रांच्या मानाने नाट्याच्या क्षेत्रात स्त्रियांनी आपला प्रभाव फारच कमी पाडलेला दिसतो. खरे म्हणजे नाटक हे लोकशिक्षणाला जास्त पोषक व म्हणून 'जागृत' व 'मुमुक्षु' स्त्रियांनी या साधनाचा जास्त उपयोग करून घेतला पाहिजे. दीड दोन हजार प्रेक्षकांवर एकाद्या तत्त्वाचा एकदम उत्कट परिणाम करण्यास नाट्यासारखे दुसरे हत्यार नाही. पण अर्थात या मार्गात अडचणी पुष्कळ. नाटक लिहून झाले तरी रंगभूमीवर आणणे महा कठीण; नवोदित लेखिकेचे नाटक व्यावसायिक रंगभूमीवर येणे जवळजवळ अशक्यच. नाटक लिहिण्याचे तंत्रही इतर साहित्य प्रकारापेक्षा जास्त अवघड आहे. एकाच वेळी निरनिराळ्या थरांतील, भिन्न पार्श्वभूमी, भिन्न आचारविचार, भिन्न शिक्षण-संस्कृती अशा लोकांच्या मनाची पकड घेणे, तसेच नुसत्या तत्त्वज्ञानाचे घुटके पाजणे व निव्वळ मनरंजन करणे या दोहोंमधला सुवर्णमध्य साधणे, हे फार मोठे कसब आहे. पण हळूहळू या क्षेत्रातही लेखिका पुढे येत आहेत.

मराठी नाटक १८४३ पासून विष्णुदास भावे यांनी सुरू केले. त्या कीर्तनवजा नाटकात, नंतरच्या 'अल्लड्-दुर्र' नाटकात, पुढच्या 'बुकिश' नाटकात लेखिकांची नावे आढळत नाहीत. इंग्लिश व संस्कृत नाट्यांची भाषांतरे, १८८० पासून सुरू झालेली किर्लोस्करी संगीत नाटक परंपरा, कोल्हटकरी रोमँटिक नाटके, वरेरकरांची सामाजिक नाटके, अल्लादीनच्या गुहेप्रमाणे शब्दरत्नांच्या लखलखाटाने डोळे दिपवून टाकणारी गडकरी नाटके; यांपैकी कुठल्याच संप्रदायात लेखिकांचा स्वैर संचार दिसत नाही. काशीबाई सहस्रबुद्धे, हिराबाई पेडणेकर, राधाबाई करमरकर यांनी काही पौराणिक नाटके लिहिली. पण त्यात कुठेच विशेष कलोत्कर्ष साधलेला नाही. गिरिजाबाई केळकर यांनी मात्र उल्लेखनीय अशी दोन सामाजिक नाटके लिहिली आहेत. एकंदरीने खाडिलकरी ऐतिहासिक व नव्या संदर्भाने लिहिलेल्या पौराणिक नाटकापेक्षा सामाजिक नाटके स्त्रीकर्तृत्वात मानवलेली दिसतात. विशेषतः सामाजिक नाट्यतंत्रात 'नाट्यमन्वंतरा'ने इब्सेनपासून स्फूर्ती घेऊन जो कायापालट घडवून आणला त्याने बऱ्याच लेखिका नाट्यक्षेत्राकडे आकर्षित झाल्या.

## मुक्ताबाई दीक्षित आणि इतर नाटक-लेखिका

या लेखिकांमध्ये मुक्ताबाई दीक्षित यांना अग्रपूजेचा मान द्यावा लागेल. त्यांच्या 'जुगार' या पहिल्याच नाटकात त्यांची नाट्यतंत्रावरची पकड, आणि कला व वैचारिक बैठक यांचा प्रीतिसंगम साधण्याचे कौशल्य स्पष्टपणे निदर्शनास आले. नाट्यातील संघर्ष, व्यक्ति-रेखनातील सखोल मनोविश्लेषण व चटकदार संवाद या कलागुणांच्या जोडीला नाट्यमहर्षि केशवराव दाते यांचे दिग्दर्शन लाभल्यामुळे 'जुगार' खूपच गाजले. मध्यंतरी मृतवत् झालेली मराठी रंगभूमी १९४३ च्या शतसांवत्सरिक सोहोळ्या नंतर नवचैतन्याने रसरसली. ऐतिहासिक, सामाजिक, निव्वळ विनोदी, निव्वळ संगीत-प्रधान, रहस्यात्मक व न-नाट्यात्मक असे अनेक संप्रदाय नाट्यक्षेत्रात आले. बहुतेक लेखिकांनी सामाजिक आशयावर उभारलेल्या नाटकावर भर दिलेला आढळतो. तारा वनारसे, सरिता पदकी, सुमती धनवटे, वसुंधरा पटवर्धन, लीला चिटणीस, विमल घैसास वगैरेंची नाटके उल्लेखनीय आहेत. एकांकिका लिहिण्याकडे स्त्रियांचा कल विशेष दिसतो. सुटसुटीत तंत्र व आकाशवाणीद्वारा किंवा हौशी मंडळाकडून चटकन रंगभूमीवर येण्याची शक्यता यामुळे हा नाट्यप्रकार स्त्रियांना सुलभ वाटतो. कुमुदिनी रांगणेकर, लीला भागवत, दया पटवर्धन वगैरे पुष्कळच नावे या क्षेत्रात आढळतात. महिला मंडळासाठी लिहिलेली पुरुष-पात्रविरहित नाटके हाही एक खास नाट्यप्रकार आहे. मालतीबाई बेडेकर, पद्मा गोळे, कुमुदिनी रांगणेकर, आनंदीबाई किर्लोस्कर यांनी या प्रकाराची बंधने पाळूनही चांगली कलात्मक नाटके लिहिली आहेत. बालरंगभूमीच्या क्षेत्रात सुधा करमरकर व सई जोगळेकर यांनी नाटुकली लिहून व ती कौशल्याने रंगभूमीवर सजवून फार प्रशंसनीय कामगिरी बजावली आहे.

## वाङ्मयाची इतर क्षेत्रे स्त्रिया समृद्ध करीत आहेत

याप्रमाणे काव्य, कादंबरी, नाटक व लघुकथा या चार प्रमुख ललितवाङ्मयाच्या क्षेत्रांतील स्त्रियांची कामगिरी थोडक्यात दर्शविली. याखेरीज वाङ्मयसमीक्षेच्या क्षेत्रात गोदावरी केतकर, मालूबाई खरे (मालतीबाई बेडेकर) व कुसुमावतीबाई देशपांडे यांनी नाट्यशास्त्र, अलंकारशास्त्र व कादंबरीचे तंत्र यांवर ग्रंथ लिहून उत्तम भर घातली आहे. ललित निबंधाच्या क्षेत्रात इरावती कर्वे, कुसुमावती देशपांडे, वसुंधरा पटवर्धन यांनी नाव केले आहे. इरावतीबाईंचे निबंध तत्वचिंतनात्मक पण खेळकर शैलीत लिहिलेले, कुसुमावतींचे काव्यात्मक व वसुंधराबाईंचे मनोविश्लेषणात्मक असतात. लेखिकांत क्वचित आढळणारी विनोदबुद्धी प्राधान्याने प्रकट करणारे शकुंतला परांजपे यांचे लघुनिबंधही उल्लेखनीय आहेत. मुक्ताबाई दीक्षित यांच्या 'प्रचीती'त निखिलपणे वावरणारा विनोद मनोज्ञ आहे.

दुर्गाबाई भागवत याच्या 'ऋतुचक्र' या निबंधसमुच्चयात दिसून येणारी निसर्गप्रीती, सूक्ष्म निरीक्षण, कल्पनाविलास व हृदयंगम वर्णनशैली अत्यंत आल्हाददायक आहे. 'व्यासपर्व' या निबंधसमुच्चयातील व्यक्तिरेखा विचारांना चालना देणाऱ्या आहेत. त्या रेखाटनांना प्रकट झालेली दुर्गाबाईंची मौलिक तर्कपद्धती, चतुर व अंतर्भेदी मनोवगाहन व मनोज्ञ भाषाशैली यांनी या पुस्तकाला मराठी साहित्यात अढळ स्थान प्राप्त करून दिले आहे.

'आत्मचरित्रे' या दालनात लेखिकांनी अविस्मरणीय कामगिरी दाखवली आहे. लक्ष्मीबाई टिळक यांची 'स्मृतिचित्रे' हे मराठी वाङ्मयाचे बहुमोल लेणे आहे. जीवन खडतर असताना सुद्धा त्याकडे पाहाण्याची खेळकर दृष्टि, दुःख जीवनातसुद्धा गंमत हेरण्याची हातोटी, तत्कालीन समाजाचे व व्यक्तींचे हुबेहूब चित्रण व साधी पण हृदयंगम भाषा या गुणांनी या थोर लेखिकेने आपले व आपल्या साधुवृत्तीच्या, कविमनाच्या पण काहीशा लोकविलक्षण पतीचे चरित्र नटवले आहे. 'आमच्या आयुष्यातील काही आठवणी' हे रमाबाईसाहेब रानडे यांचे आत्मचरित्र तत्कालीन समाजाचे चित्र, लेखिकेची उत्कट पतिपरायणता व सहज ओघवती भाषा यांमुळे विस्मरणीय आहे. कमलाबाई देशपांडे, लीलाबाई पटवर्धन, पार्वतीबाई आठवले, आनंदीबाई कर्वे, यशोदाबाई जोशी, सत्यभामाबाई सुखात्मे, यांची आत्मचरित्रेही निवेदनशैली व तत्कालीन स्त्रीजीवनाचे व सामाजिक जीवनाचे यथातथ्य दर्शन यामुळे वाचनीय आहेत. चरित्रलेखनातही स्त्रियांनी हातभार लावला आहे. अवंतिकाबाई गोखले यांचे गांधीचरित्र, पार्वतीबाई चानिटकर यांचे डॉ. आनंदीबाई जोशी यांचे चरित्र, इंदिरा भागवत यांचे 'या सदाशिव', वेणूताई पानसे यांचे 'हरि नारायण आपटे' चरित्र, दुर्गा भागवत यांचे पंडित राजारामशास्त्री भागवत यांचे चरित्र, हे चरित्रवाङ्मयाचे चांगले नमुने आहेत.

ललितवाङ्मयाखेरीज समाजशास्त्रीय, पंडिती व संशोधकीय वाङ्मयातही स्त्रियांनी स्थान मिळवले आहे. इरावती कर्वे यांचे 'मराठी लोकांची संस्कृती' व 'हिंदु समाजरचना व शास्त्र' गीता साने यांचे 'चंबळची दस्युभूमि', नलिनी पंडित यांचे 'जातिवाद व वर्गवाद', डॉ. कमलाबाई देशपांडे यांचे 'स्त्रियांच्या कायद्याची वाटचाल' वगैरे ग्रंथ लेखिकांच्याच काय पण एकंदर मराठी साहित्यातही अग्रेसरत्व पटकावतील असे आहेत.

असा हा मराठीतल्या लेखिकांच्या वाङ्मयनिर्मितीचा आराखडा. हे वाङ्मय विस्ताराने तसेच गुणांनी वाढत आहे हे स्पष्ट आहे. साहित्य हे जीवनाचा 'आदर्श' दोन अर्थांनी आहे. ते जीवनाचे प्रतिबिंब हुबेहूब दाखविते, तसेच पूर्णत्वात काही व्यंगे असल्यास ती सुधारण्यासही कारणीभूत होते. ही द्विदल कामगिरी लेखिकांच्या हातून उत्तरोत्तर वाढत्या गुणाढ्यतेने पार पडेल अशी उमेद बाळगण्यास हरकत नसावी.

# १३

# ललितकला आणि स्त्री

## [१] संगीत

केशव वामन भोळे

श्री. केशव वामन भोळे (जन्म २३–५–१८९६) चित्रपट व्यवसायात १७ वर्षे व आकाशवाणीमध्ये ७ वर्षे संगीतज्ञ व संगीत निर्माते. संगीत, नाट्य, चित्रपट व क्रिकेट यांवर पुष्कळ लिखाण. 'अस्ताई'ला महाराष्ट्र शासनाचे बक्षिस. (स्वरवंदना, आपटे रोड, पुणे ४).

### साधे शिक्षण नाही; गाणे-बजावणे कुठले

पेशवाई बुडाल्यानंतर इंग्रजांच्या संस्कृतीचा एकंदर महाराष्ट्रीय जीवनावर हळूहळू परिणाम होत गेला. आपण जिंकले गेलो असलो तरी आपण या परकीय अंमला-पासून आपली सुटका लवकर करून घेतली पाहिजे हा विचारच प्रथम प्रमुख ठरला. लोकजागृतीचे साधन म्हणून वर्तमानपत्रे निघाली. शाळा निघाल्या. पण यात स्त्रियाविषयी कोणी विचार केला नाही. स्त्रियांच्या शिक्षणाचा प्रश्न कै. ज्योतीबा फुल्यांनी प्रथम हाती घेतला. त्यांनी मुलींना शिक्षण देणारी शाळा काढली. मुली जास्तीत जास्त मराठी चार बुके शिकून लग्न करून संसार करू लागल्या. हुजूरपागेसारख्या संस्था स्थापन होईपर्यंत स्त्रियांना इंग्रजीचा गंधही नव्हता. अशा या अज्ञानावस्थेत परवशतेत काळ कंठणाऱ्या स्त्रीला ललितकला हा शब्दही ठाऊक नव्हता. गाणे, बजावणे व नाच ह्या गोष्टी कलावंतिणीवर (म्हणजे नायकिणी कसबिणीवर) सोपविल्या गेल्या होत्या. बाहेरख्याली लोक अशा कलांचा चोरून परामर्श घेत असत. लग्नमुंजीत कलावंतिणीचे गाणे करणे ऐपतदार लोकानाच परवडे. हे गाणे समारंभाचा एक भाग समजले जाई. त्याला समाजात स्वतंत्र असे स्थान नव्हते. एरवी ते ऐकणे निषिद्धच मानले जाई आणि असा श्रोता बाहेरख्याली म्हणून गणला जाई. समाजात त्याला प्रतिष्ठा नसे.

मुलींना गोड गळ्याची हौस पुरविण्याचे प्रसंग फक्त धार्मिक स्वरूपाचे असत. मंगळागौर हरताळका जागविणे, हदग्याची गाणी फेर धरून म्हणणे, व्रताची गाणी

(एकादशी शिवरात्र) म्हणणे हेच काय ते अपवादात्मक प्रसंग. पण या प्रसंगी मात्र मुली आणि पोक्त बायकासुद्धा अहमहमिकेने उत्साहाने भाग घेत. झोपाळ्यावरील ओव्या, भाऊबीजेवरील, घरातील विविध नात्यांवरील ओव्या, आणि दळणकांडण करताना, गव्हले वळताना, शेवया, पापड्या, कुरड्या करताना गात ती स्त्री-गीते अत्यंत बोलकी, भावदर्शी, सरस आहेत. यांखेरीज दुसरी गाणी म्हणणे गैर ठरले होते. शारदा नाटक निघाल्यानंतर मुली वल्लरी, जान्हवी, शारदेची काही गाणी वरील व्रताच्या प्रसंगी गात असत. त्या नाटकाचा विषय आणि त्या नाटकाची असामान्य लोकप्रियता याच्या मुळाशी होती. आणि ती गाणी सोज्वळहि (म्हणजे शृंगारिक नव्हेत) होती. स्त्रियांची परवशता ('आम्ही दीन गाई') हतबलता व्यक्त करणारी, पुरुषाची कठोर हजेरी घेणारी गाणी (काय पुरुष चळले बाई, जन खुळावले, म्हातारा इतुका) म्हणणाऱ्या काही धिटुकल्या बल्लरीही मी लहानपणी पाहिल्या आहेत.

## विसाव्या शतकाच्या सुरुवातीस किंचित आरंभ

हे सर्व झाले तरी गरती स्त्रीने गायनवादन (नर्तन ? छेः अब्रह्मण्यम्) कला यावी या बुद्धीने शिकायला विसावे शतक उजाडावे लागले. मुंबईसारख्या मोठ्या शहरी ऐपतदार मुली बाजाची पेटी वाजवायला शिकू लागल्या. नाटकातील वापरामुळे हे वाद्य लोकप्रिय होऊ लागले होते. पेटीवर मुली नाटकातील पदे, काही स्त्रीगीते (मुद्रिका, गौळणी, संतांची पदे, अभंग,) वाजवून गाऊ लागल्या. क्वचित् एखाद्या घरी आधी सतार, नंतर दिलरुबा पेटू येऊ लागला. ही घरे सुधारकाची (म्हणजे स्त्रीसुधारणा-वाद्यांची) मानली जात होती. माझी मावीच १९०३ साली बाजाची पेटी वाजवू लागली होती. सर मोरोपंत जोशांच्या मुलींना संगीत शिकवायला गवई ठेवले होते. त्यांच्याच घरी प्रथम मी पियानो हे वाद्य पाहिले. पण ते दिवाणखान्याचे भूषण म्हणून असावे. जोशांच्या स्नेह्यांची मुलगी माई चिटणीस सतार शिकत असे. तिने तीत बरीच प्रगती केली होती. पण लग्न झाले आणि सतारीला गवसणी घातली गेली. तिच्या मुलीने (कुसुमावती देशपांडे) संगीताशी कधीच (अभ्यासाखेरीज) संपर्क राखला नाही. पुण्यात १९१२ साली कै. भास्करबुवा बखल्यानी भारतगायन समाज काढला पण तेथे विद्यार्थिनी असल्याचे ऐकिवात नाही. पुरुषाची संगीताची आवड कीर्तनभजनाने पोसली गेली. पण स्त्री फक्त श्रोताच राहिली. संगीत नाटकामुळे स्त्रीला गाण्याबजावण्याचे द्वार खुले झाले. सौभद्र, शारदेतील गाणी शिकण्यास मज्जाव नव्हता. माझ्या परिचयातील कितीतरी मुलींचे गोड गळे रूढिप्रिय समाजामुळे संगीताला मुकले. श्रीमंतांच्या, सुधारकांच्या मुली अपवाद मानल्या जात. माझ्या माहितीप्रमाणे मुंबईत खास स्त्रियाना बाजाची पेटी शिकविण्याचा क्लास गायवाडीत श्री. शारदाबाई मांटे यानी प्रथम काढला होता. या सर्वांच्या मुळाशी ललितकलेकडे पाहाण्याचा दृष्टिकोन एक नाद म्हणून किंवा करमणुकीचे, वेळ घालविण्याचे साधन म्हणून होता. भरतकाम, विणकाम, चित्रकलाइतके उपयुक्ततेचे

महत्त्व त्यांना नव्हते.

पण पुढे पुढे प्राथमिक व दुय्यम शिक्षणात मर्यादित असा संगीताचा शिरकाव झाला. सभा, संमेलने भरविताना स्वागताचे गाणे म्हणण्याच्या हेतूने, बदशहाच्या वाढदिवसाच्या समारंभाचे वेळी स्तुतिपर गाणे म्हणायला मुली 'तयार' हव्यात हाच त्यातला मुख्य हेतू असावा. जेथे मुली बोर्डिंगात रहात तेथे सायंकाळी प्रार्थना म्हणणे, भजने म्हणणे असा प्रघात सुरू झाला. यात प्रामुख्याने गळा चांगला असणाऱ्या मुलींना थोडे रागदारी संगीत शिकविले जाई. बाकीच्या प्रार्थनागीते म्हणण्यात भाग घेत.

## उच्च शिक्षणात संगीत शिक्षणाचा शिरकाव

स्त्रीशिक्षणात संगीताला असे स्थान मिळायला फार काळ जावा लागला. संगीत हा विषय ऐच्छिक घेण्याची सोय प्रथम महिला विद्यापीठाने केली. मागाहून नागपूर विद्यापीठात प्रवेश परीक्षेपासून पुढे पदवी परीक्षेपर्यंत संगीत विषय घेण्याची सोय झाली. उत्तर प्रदेशात खास संगीत शिक्षणाचे मॅरिस कॉलेज स्थापन झाले. तेथे कै. पं. भातखंडे आणि नंतर त्यांचे शिष्य शिक्षक म्हणून काम करू लागले. त्यांच्या आधी विष्णु दिगंबर पलुस्करांनी लाहोरला गांधर्व महाविद्यालयाची स्थापना करून संगीताला प्रतिष्ठा मिळवून दिली. विद्यालयाच्या शाखा अलाहाबाद, कानपूर, कराची, मुंबई येथे निघाल्या. मुंबईत मुलींही गांधर्व विद्यालयात प्रथम व्हायलिन, दिलरुबा शिकू लागल्या. नंतर गायन. यात पारशी समाजातील स्त्रियाही येऊ लागल्या. पाश्चात्त्य संगीतावरील या समाजाचे लक्ष उडवून भारतीय रागदारी संगीताकडे खेचण्याचे महत्कार्य पंडितजींनी केले. बनारस हिंदु विद्यापीठात, अलिगड विद्यापीठात संगीत दाखल झाले. दक्षिणेतील विद्यापीठाने तर आधीच संगीताचे शिक्षण देणे सुरू केले होते. परंतु ज्या मुंबईत गांधर्व महाविद्यालय आपले कार्य करीत होते, तेथे तत्पूर्वी कै. रामकृष्ण गोपाळ भांडारकर, न्या. तेलंग, कै. म. चि. आपटे यांच्यासारखे प्रतिष्ठित विद्वान, पलुस्करांचे गुरु कै. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांकडे रागदारी संगीत शिक्षण घेत होते. यांचा मुंबई विद्यापीठाशी संबंध होता तरीही त्यात या संगीताचे अध्यापन व्हायला त्यांना सुचले नाही हे एक नवलच मानले पाहिजे. पादरपेशा समाजात गायनाची गोडी लावण्यास पं. पलुस्कर, त्यांचे गुरु इचलकरंजीकर बुवा, काही उत्तम गायक कीर्तनकार (फलटणकरबुवा, राशिनकर, कार्लेकर, घेंडेकरबुवा) काही तंतकार (रावजीबुवा बेलबागकर, कृष्णराव मुळे इत्यादी) हेच जास्त कारणीभूत झाले. मराठी नवई व्यसनात बुडून गेलेले नव्हते. भातखंडयांनी जुने ग्रंथ वाचून, अभ्यास करून प्रचलित संगीताला शास्त्राची जोड दिली, प्रतिष्ठाही मिळवून दिली, विद्यालये स्थापन केली. किती स्त्रिया गायन शिकल्या हे कळायला मार्ग नाही. परंतु संगीताला समाजात प्रतिष्ठा आणि आदराचे स्थान विष्णु दिगंबरांप्रमाणे त्यांनीही मिळवून दिले.

के. दीनानाथ मंगेशकरांच्या मुलींनी (लता, आशा, उषा, मीना यांनी) पार्श्वगायिका म्हणून खूप नाव मिळविले. लतेने आपले अग्रस्थान आजही कायम ठेवले आहे. आकाशवाणी, नाट्यसंस्था यांत नवीनच गायिका चमकू लागल्या आहेत. तसेच स्त्रियांमध्ये रागदारी संगीत, ललित संगीत लोकप्रिय झाले असून आकाशवाणीतील दतरात अशा गायिकांची संख्या शेकडो-हजारोपर्यंत वाढली आहे. हे यश विलोभनीय आहे. गायिका स्त्रियांनी समाजात आपल्या संगीत कलेने यशाबरोबर प्रतिष्ठाही मिळविली आहे.

## सर्वांगीण उन्नतीस ललितकलांचा अभ्यास अवश्य

हे सारे खरेच. पण मनुष्याची सर्वांगीण उन्नती होण्यास शिक्षण अवश्य आहे हे जसे सर्वमान्य झाले आहे, तसेच ललितकलांचा अभ्यास त्यासही त्याच कार्याकरिता उपयोगी पडतो, संगीताने माणसाची सौंदर्यदृष्टी पोसली जाते, नवल्यास ती उत्पन्न करता येते, हे अगदी अलीकडे मान्य होत आले आहे. मुलींना गायनवादन शिकायला काही हरकत नाही, त्यांची लग्ने जमण्यास त्या कला उपयोगी पडतात या व्यवहारी विचारापासून, शिक्षण उन्नतीकरिता अवश्य आहे या विचारापर्यंत मजल गाठायला शंभर वर्षांचा काल जावा लागला. आता विद्यापीठात संगीताचे अध्ययन चालू होऊन पदव्याही ठेवल्या आहेत. संगीत ही कला शिकण्याकरिता मध्यवर्ती सरकार, संगीत-नाटक अकादमी यांजकडून विद्यार्थिनींना भरपूर शिष्यवृत्ती मिळते. नृत्य आणि नाट्य शिक्षणाची व्यवस्था दिल्ली येथे उत्कृष्ट शिक्षकाच्या साहाय्याने चालू आहे. सर्वश्री अल्लाडी, बिरजू महाराजांसारखे अव्वल दर्जाचे शिक्षक तेथे आहेत. आकाशवाणीच्या उत्तेजनामुळे हजारो स्त्रिया आज रागदारी आणि ललित संगीत अनेक केंद्रांवर गात आहेत. परंतु अजूनही संगीत कलेचा उपयोग लग्न होईपर्यंत वेळ काढण्याकरिता किंवा विवाह जमविण्याचे एक साधन म्हणून होत आहे. कारण विवाह झाल्यावर मुली संगीताचा रियाज करीत नाहीत. संसार, मुलांचे संगोपन अशी कारणे त्या पुढे करतात. परंतु काही (अपवादात्मक का होईना) स्त्रिया संसारात रंगूनही संगीताचे जोपासन करतात. अर्थात पुरुषवर्गाचे सक्रिय साहाय्य असल्याशिवाय हे कार्य कठीण आहे. पण संसारातही संगीताचे स्थान तो अधिक रम्य आणि मधुर करण्याकरिता नक्की आहे हे पुरुषवर्गाने ओळखले पाहिजे. पुरुषांना संगीत नको असते असादला प्रकार मुळीच नाही. पण स्वतःच्या पेशी धरितात भाग न होता ते करता आले तर आयतोबासारखे त्यांना हवे असते हेही एक अप्रिय सत्य आहे.

## नृत्याच्या बाबतीत प्रगतीला अधिकच विलंब

नृत्याच्या बाबतीत आम्हाला कळवळा एकोणीस वर्षांचा काल काढावा लागला. अत्यान्त प्रतिष्ठित कुलातील एक मुलगी रुक्मिणी देवी अरुंडेल हिने भरतनाट्यम् या तंजावर येथील नृत्यप्रकाराचा अभ्यास करून त्यात खूप मान्यता मिळविली.

महाराष्ट्रामध्ये श्रीमती मेनकादेवींच्या नृत्यालयात कु. दमयंती जोशीने वयाच्या आठव्या नव्या वर्षीच प्रवेश केला. बरीच वर्षे मेनकादेवींकडे शिक्षण घेतल्यावर तिने कत्थक नृत्यात स्पृहणीय प्रावीण्य मिळविले आहे. पुण्यात श्री. कालिंदी माटे आणि रोहिणी माटे यांनी नृत्य शिकण्यास सुरुवात केली. रोहिणी माटे यांचा मुख्य अभ्यास कत्थक नृत्याचा असला तरीही त्या पार्वतीकुमाराकडे भरतनाट्यमही शिकल्या आहेत. त्या नृत्याच्या तीन शाळा (पुणे, मुंबई, कानपूर) चालवितात. त्यांच्या अनेक शिष्या झाल्या असल्या तरी त्यांत सौ. मंदाकिनी मालवीय, कु. प्रभा मराठे, कु. शरदिनी भिडे, कु. कीर्तने यांनी तयारी विशेष दर्जाची आहे. प्रभा मराठ्यांनी नंतर बिरजू महाराजांकडे तालीम घेतली असून त्याही नृत्याचा वर्ग चालवितात. मुंबईत रोहिणी वागळे याही नृत्य शिकल्या व नृत्यशाळा चालवितात. महाराष्ट्रातील प्रमुख शहरांत संगीताच्या शाळांप्रमाणे नृत्यशाळाही चालू आहेत. परंतु वैयक्तिक जीवनात कलांचे संगोपन आणि विकास चालू राहिला पाहिजे. दक्षिणेकडे रविवारी सणावारी उत्सवात संगीताचे कार्यक्रम घरोघरी चालू असतात. तेथे स्त्रियाही भाग घेतात, इतकेच नव्हे तर त्यांचे कौतुकही होते. दाक्षिणात्यांचे हे उदाहरण आम्ही महाराष्ट्रीयांनी डोळ्यासमोर ठेवून असे कार्यक्रम नित्य घडविले पाहिजेत, तरच आमचे जीवन उन्नत होईल, समृद्धही होईल. कै. डॉ. केतकरांनी आपल्या विचक्षणा कादंबरीत निव्वळ ललितकलांचा व्यवसाय करणाऱ्या (धंदेवाईक) स्त्रियांना समाजाने आदराने वागविले पाहिजे असे प्रतिपादन केले आहे. आम्ही तर पुढे एक पाऊल टाकून म्हणतो की, समाजाने विवाहित कलावंतींनाही आदराने वागविले पाहिजे. कारण ललितकलांचा रियाज जन्मभर चालू ठेवावा लागतो, हे आम्ही पक्के जाणले पाहिजे, तरच आमच्या समाजाची सर्वांगीण उन्नती होईल, अन्यथा होणार नाही. ललितकलांचा रियाज करणाऱ्या कलावंत स्त्रियांमध्ये भेदभाव करू नये. तसे करणे असंस्कृतपणाचे मानले गेले पाहिजे. तरच स्त्रियांना कलोपासनेत उत्साह वाढेल, मनाला मोकळेपणाही निर्माण होईल. आपण कलेचा व्यासंग करतो आहोत ही हलकेपणाची बाब आहे असे त्यांना समाजजीवनात केव्हाही वाटू नये असे पवित्र वातावरण समाजाने या बाबतीत निर्माण केले पाहिजे. कला सुसंस्कृत समाजाचे, प्रगत समाजाचे महत्त्वाचे लक्षण मानण्याची वेळ येऊन ठेपली आहे.

0

## [२] चित्रकला

धुंडिराज भास्कर ओंकार

प्रा. भय्यासाहेब ओंकार, जी. डी. आर्ट, ए. एम्. (जन्म ६-२-१९३१) प्राध्यापक, श्री. ना. दा. ठा. महिलापाठशाला, पुणे. चित्रकार, चित्रकला समीक्षक, अनेक पुस्तकांचे चित्रकार व लेखक. चित्रकलाविषयक संस्थांमध्ये पदाधिकारी. अभ्यासक्रम समित्यांचे सभासद. (४९५ शनिवार, पुणे २)

### स्त्रीजीवनात नाना रूपांनी अवतरणारी चित्रकला

तसे पाहिले तर स्त्रियांच्या आणि चित्रकलेचा बराच निकटचा संबंध मानावा लागेल. केशभूषा करताना, वस्त्रावरणे निवडताना, अंगावर दागदागिने घालताना स्त्रियांना सौंदर्यदृष्टी वापरावी लागते. सुंदर फुलांचे गजरे असोत की हातावरची मेंदी असो, त्यातून स्त्रिया आपली कलाकौशल्याची रुची दाखवीत असतात. अंगणात रांगोळ्या घालणे, सुंदर तोरणांनी प्रवेशद्वारे नटवणे, उशांचे अभ्रे, गालिचे, टेबलटॉप यांच्यावर सुंदर भरतकाम करणे या स्त्रियांच्या आवडीच्या कला-हस्तकौशल्याच्या वर्गांना प्राधान्येकरून महिलांचीच संख्या अधिक असते. या सर्व गोष्टींतून स्त्रियांच्या कलाभिरुचीची साक्ष मिळते.

या त्यांच्या कलोपासनेला परंपरा आहे. काव्यात जसे स्त्रीगीतांचे स्वतंत्र दालन आहे, तद्वतच या हस्तकलांचे मानावे लागेल. रांगोळीची कला केवळी हरी किंवा तरी वर्षांची तिची परंपरा आहे. आणि ती परंपरा प्रामुख्याने गृहिणींनीच जतन करून ठेवली आहे, वाढविली आहे. भारताच्या प्रांतप्रांतातून या रांगोळीकलेच्या विविध स्वरूपांचे दर्शन घडते.

बंगालमध्ये या रांगोळ्यांना 'अल्पना' म्हणतात. तांदुळाची पिठी पाण्यात कालवून त्याने अल्पना रेखाटली जाते. महाराष्ट्रातील रांगोळी भुकटीच्या स्वरूपात असते. हळद, कुंकू, बुक्का, गुलाल वापरून मूळच्या पांढऱ्या रांगोळीला इतर रंगांची जोड देऊन महाराष्ट्रीय महिला सुंदर रेखाकृति शेणाने सारवलेल्या अंगणात रेखाटतात. केरळमध्ये फुलांचे माहात्म्य. तेथील रंगावली फुलांनी तयार होते, त्यांना 'पुक्किळम' म्हणतात. गोंड, संथाळ वगैरे आदिवासी स्त्रिया रांगोळीऐवजी भिंतीवर चित्राकृति रेखाटतात. या चित्राकृतींना 'इत्ताल' म्हणतात. पांढऱ्या चुन्याच्या भिंतीवर कावेने व काळ्या रंगाने हे इत्ताल चितारले जातात.

कोणत्याही गृहिणीला सुलभतेने रेखाटता येतील असेच हे रंगावलीचे प्रकार होत. अगदी स्वस्तात मिळणारे रंग आणि ब्रशऐवजी चिंधीचा बोळा वापरून या रंगावली चितारल्या जातात. आकारांची रचना इतकी सुलभ असते की प्रत्येक आकृति काही ठिपक्यांच्या जोडण्याने निर्माण होते. पण त्या आकारात सुलभतेसोबतच सौंदर्य, प्रतीकात्मता

आणि प्रसन्नता सामावलेली असते. सूर्य, चंद्र, स्वस्तिक, पद्म, शंख, गदा, चक्र, कासव, गोपद्म अशा अनेक आकारांना या रंगावलीत मनोहर स्थान प्राप्त झाले आहे. स्त्रीगीतातल्या भावना-कल्पनांना जसे आगळे सौंदर्य लाभले आहे तसेच या रंगावली प्रकारांना. हा प्रकार आजपर्यंत स्त्रियांनीच जोपासला आहे. आणि स्त्रियांच्या नाजूक हातानी सोप्या पण डौलदार अशा या चित्रप्रकाराला मांगल्य प्राप्त झाले आहे.

भारतीय स्त्रियांचे कशिदाकामही अपूर्वाईचे मानावे लागेल. मण्यांना, आरशांचा, रेशमी धाग्यांचा, कापडाच्या तुकड्यांचा, पिसांचा, शिंपल्यांचा वापर करून भरतकाम करण्याची रीत फार जुनी आहे. अगदी जंगलात राहणाऱ्या आदिवासी स्त्रियामुद्धा सुंदर भरतकामाचे नमुने तयार करतात. हिमालयात राहणाऱ्या 'मिश्मी'सारख्या जमातीतही सुंदर रंगसंगतींनी नटलेल्या शालींचे विणकाम पाहिले म्हणजे त्या जमातीतल्या स्त्रियांच्या सौंदर्यदृष्टीचे कौतुक वाटते.

गृहसजावटीचे असे अनेक कलाप्रकार स्त्रियांनी आपल्या प्रतिभेने आजपर्यंत नटवले आहेत. या कलांची जाणीवपूर्वक दखल घेऊन त्यांची कलासंग्रहालये निर्माण होण्याची गरज आहे. या कलांच्या इतिहासाचा मागोवा घेतला गेला पाहिजे म्हणजे वेगवेगळ्या प्रांतातल्या स्त्रियांनी या कलाप्रकारांना कसे समृद्ध केले आहे हे कळून येईल व स्त्रियांच्या कलाक्षेत्रातील कर्तृत्वाचे मूल्यमापन होईल.

### प्रत्यक्ष चित्रकलेत स्त्रियांचा भाग अल्प

स्त्रियांच्या या गृहोपयोगी कलेचा भाग सोडून आणि प्रत्यक्ष चित्रकलेसंबंधी विचार करू लागलो तर थोडी निराशाच पदरी येते. संगीत, नृत्य, वाङ्मय या ललितकलांच्या क्षेत्रात स्त्रियांची नावे जशी विपुलतेने सांगता येतात तशी ती चित्रकलेच्या क्षेत्रात नाहीत. संगीत आणि नृत्य या कलांना लागणारी शरीरसंपदा स्त्रियांना निसर्गानेच बहाल केली आहे. संगीताला लागणारा सुरेल आवाज आणि नृत्याला लागणारे शरीरसौष्ठव हे स्त्रियांना उपजतच लाभते, अर्थात यामुळे या क्षेत्रात स्त्रियांच्या कर्तृत्वाला स्वतंत्र स्थान आहे. साहित्यक्षेत्रातही स्त्रियांची कामगिरी उल्लेखनीय ठरेल. हळुवार भावनांची जपणूक स्त्रीसाहित्यात पाहायला मिळेल. वात्सल्य, कारुण्य, भक्ति, प्रेम, दया अशा विविध भावनांना स्त्रियांच्या लेखणीतून झालेला आविष्कार मनोज्ञ ठरला आहे.

चित्रकलेच्या क्षेत्रात मात्र थोडी निराळी स्थिती आहे. चित्रकर्त्या स्त्रियांची संख्या कमी आहे. मात्र एवढे खरे की चित्रकला क्षेत्राकडे वळलेल्या स्त्रियांची संख्या फार कमी असली तरी ज्या स्त्रियांनी हे क्षेत्र निवडले त्यांनी या क्षेत्रात मोठी कामगिरी केली.

### काही नामवंत चित्रकार स्त्रिया

प्राचीन काळात विविध राजांची स्मरणाने चित्रे रेखाटणाऱ्या चित्रलेखेच्या कलाकर्तृत्वावरून त्या काळीही चित्रकलाक्षेत्रात स्त्रिया हिरीरीने पुढे होत्या हे लक्षात येते.

भारतीय कलेच्या इतिहासात दुसरी एक अद्वितीय स्त्री म्हणजे अमृता शेरगील. विसाव्या शतकाच्या आरंभी, इ. स. १९१३ मध्ये जन्माला आलेली ही स्त्री. केवळ अठ्ठावीस वर्षांच्या हयातीत तिने भारतीय कलेच्या इतिहासात फार मोठी कामगिरी करून दाखविली. तिची आई हंगेरियन होती आणि वडील शीख यामुळे पाश्चात्त्य आणि पौर्वात्य संस्कृतींचा तिच्या कलागुणांवर ठसा उमटलेला होता. तिने स्वतःचे एक व्यक्तिचित्र रेखाटले आहे त्यात तिने भारतीय वेष परिधान केला आहे आणि जवळच्या आरशात स्वतःचे प्रतिबिंब दाखवले आहे ते मात्र युरोपीय विदुषीच्या पेहरावातील. हे चित्र म्हणजे अमृताच्या सर्व जीवनाचेच प्रतीक होय. तिचे कलाशिक्षण युरोपात झाले पण तिने चित्रित केले ते सारे भारतीय जीवन. इथल्या जीवनातली करुणा तिने चित्रित केली. इथले ऋतू, इथले उत्सव, इथली नाती आणि इथली माणसे यांचे मनोज्ञ दर्शन अमृताने आपल्या नाजुक कुंचल्याने घडवले. तिच्या कलेत पारंपरिकता होतीच, पण त्याबरोबरच नवकलेचा प्रभाव होता. नवकलेतले अनेक गुण तिने आत्मसात केले होते. रंग, आकार आणि छायाप्रकाश यांचे विविध प्रयोग तिने भारतीय चित्रकलेच्या इतिहासात चिरस्थायी केले. म्हणूनच भारतीय कलेला नवकलेचा साज चढवणाऱ्या कलावंतांत अमृता शेरगील हे नांव प्रामुख्याने घेतले जाते. ती अल्पायुषी ठरली; नाहीतर कलाक्षेत्रात तिने याहूनही अधिक कामगिरी करून दाखविली असती. अमृता शेरगीलची चित्रे आज दिल्लीच्या म्युझियममध्ये एअरकंडिशन केलेल्या खोल्यांत ठेवून देण्यात आली आहेत. तिच्या कलाकृती हा भारतीय कलेचा मोठा ठेवा आहे.

अंबिका धुरंधर, अंजला त्रिनिदाद, प्रफुल्ला जोशी ही आणखी काही भारतीय चित्रकर्त्या स्त्रियांची नांवे. या स्त्रियांनी आपापल्यापरीने कलाक्षेत्रात कामगिरी केली आहे. अंबिका धुरंधर आणि अंजला त्रिनिदाद या दोघींचेही वडील कलामहर्षी होते. आपल्या थोर पित्याचा वारसा त्यांनी कलाक्षेत्रात समर्थपणे चालविला. प्रफुल्ला जोशी ही आधुनिक कालातील चित्रकर्ती. नवकलेच्या क्षेत्रातील तिची कामगिरी. विविध रागिण्यांची तिने नव्या पद्धतीने काढलेली चित्रे कलारसिकांना आवडली आहेत.

## स्त्रियांच्या कर्तृत्वाला अवसर आहे

या स्त्रियांच्या कामगिरीकडे पाहिले म्हणजे चित्रकलेच्या क्षेत्रात स्त्रियांच्या कर्तृत्वाला अवसर मिळणे सहज शक्य आहे हे दिसून येईल. मात्र त्यासाठी स्त्रियांनी पुढे व्हायला पाहिजे आणि त्यांच्यापासून उपेक्षित राहिलेले हे क्षेत्र त्यांनी आपल्या कलागुणांनी भूषित केले पाहिजे. विज्ञानाधिष्ठित जीवन अधिक समृद्ध होत आहे, स्त्रियांवरील बंधने जाऊन स्वतंत्र वृत्तीने त्या विविध क्षेत्रात वावरत आहेत. अशा या काळात चित्रकला क्षेत्रातही स्त्रियांच्या कामगिरीला भरपूर वाव आहे.

चित्रकला क्षेत्राच्या मर्यादाही आता वाढल्या आहेत. चित्रकला ही आता केवळ कॅनव्हासवर राहिलेली नाही. जाहिराती, मासिके, पुस्तके, गृहसजावट, विविध

कारखान्यातील आलेख, युद्ध आघाड्या, चित्रपटसृष्टी अशा विविध बाबतींत चित्रकलेचा वापर मोठ्या प्रमाणावर केला जातो. या दृष्टीने चित्रकला ही एक शोभेचीच कला राहिली नसून मानवी जीवनाला गरज वाटावी इतकी तिची उपयुक्तता सिद्ध झाली आहे. अशा या वेळी या कलाक्षेत्रात काही कामगिरी करून दाखविण्याची आकांक्षा स्त्रियांनी धरली तर ती स्वागतार्ह ठरेल.

## [३] नृत्यकला

प्रभा मराठे

श्रीमती प्रभा मराठे (जन्म ८-१०-१९३६) रोहिणी भाटे यांचेकडे गुरुवानीचे नृत्यशिक्षण. संगीत नाटक अकादमीची राष्ट्रीय शिष्यवृत्ती. पं. बिरजू महाराज यांच्याकडे लखनौ घराण्याच्या कथकचा तपशीलवार अभ्यास. नृत्यावर स्फुट लेखन व नृत्यप्रयोगाचे परीक्षण. 'कलाछाया' नृत्यसंस्थेच्या संचालिका. (७५९।१४ ब, प्रभात रस्ता, पुणे ४)

### माणूस आणि नृत्य, परस्परांचा अतूट संबंध

खरे म्हणजे स्त्री आणि नृत्यकला यांच्यातील संबंधाच्याही आधी मनुष्य आणि नृत्यकला यांच्यातील संबंधाबद्दल अनेक विचार मनात येतात. वेगवेगळ्या कालखंडातील समाजजीवनात नृत्यादी कलाविषयीची जाणीव भिन्न भिन्न दिसते. वर्तमानकालीन समाजात या कलेला आलेले स्वरूप व या समाजजीवनाशी त्याचे असलेले नाते, यांतून तर रोजची वाटच काढायची असते : आणि मग मनात एकावर एक प्रश्नचिन्हे उभी राहतात.

नटराज हे श्रीशंकराचे नृत्यस्वरूप. नटराजाच्या हातातील डमरूच्या निनादाने जग जागे झाले आणि त्याच्या तालावर नाचू डोलू लागले. म्हणजे नृत्य प्राणिमात्राच्या जीवनाशी असे जन्मापासून निगडित. बरे, ही कथा म्हणजे कुणाला कल्पनेचा खेळ वाटेल, पण आमच्या आदिवासींच्या जीवनात नृत्याचे केवढे महत्त्व! नेगायला कसेबसे पटकुर आणि पाठीला चोळभर तुकडा असे हे जगतात, आणि दरदिवशी नाचतात, गातात. भरल्या पोटी खरे म्हणजे सुचाव्यात अशा या 'सांस्कृतिक' गोष्टी त्यांना अर्धपोटी सुचतात तरी कशा! प्रपंचाचा गुंता सोडून शान्त ईश्वरचरणी लीन होण्यासाठी झटणारी, भौतिकतेपासून दूर जाऊ इच्छिणारी अनेक संतमंडळी

नृत्यासारख्या भौतिक गोष्टींच्या साहाय्याने आमची वाटचाल करतात, मग सर्वसाधारण लोकांची काय कथा? विविध वृत्तींच्या, विविध देशांतल्या आणि विविध आर्थिक स्तरांतल्या माणसांना नृत्य सारखेच आकर्षित करते. असे असूनही नृत्यकलेत रमणाऱ्या स्त्रीला पुरातन काळापासून आजपर्यंत कमीअधिक प्रमाणात संघर्षाचे जीवन जगावे लागले आहे, हे पाहिले म्हणजे आश्चर्य वाटते. भगवान कृष्णाबरोबर रास रंगविणाऱ्या गोपी आणि राधा, त्या काळच्या समाजात टीकानिंदेचेच पात्र ठरल्या. कुठल्या ना कुठल्या देवमूर्तीच्या सेवेला वाहून घेणाऱ्या नृत्यकार स्त्रियांची अनेक रूपे — देवदासी, महारी, मुरळी, मंदिरनर्तकी इत्यादी, अशा स्त्रियांची जणू एक वेगळी जातच. कलावंत म्हणून समाजाने चार कौतुकाचे शब्द त्यांच्यावर फेकावे, पण आपल्या कुलीन जीवनापासून मात्र त्यांना चार हात दूर ठेवावे. आजचे आधुनिक युग संस्कृतिसंवर्धनाचे! दर चार दिवसांनी कुणातरी नृत्यकार स्त्रीचे नाव, फोटो चमकतो. एखादवेळी कुणाला तरी सुवर्णपदके, पदव्या, मानसन्मान मिळतात. आणि तरीसुद्धा या 'सन्माननीय' नृत्यकार स्त्रीच्या जीवनातील संघर्षात फार मोठा फरक पडलेला नाही. ही परिस्थिती विचार करायला लावणारी निश्चित आहे.

## नृत्याचा संबंध ईश्वराराधनेशी जोडून ठेवला

आमचे पूर्वज मोठे चतुर होते. जीवनातल्या प्रत्येक लहानसहान गोष्टीचा संबंध त्यांनी ईश्वराशी जोडून ठेवला. ८४ लक्ष योनी फिरून मनुष्यजन्म मिळावयाचा. तेव्हा या मनुष्यजन्माचे सार्थक मोक्षप्राप्तीमध्ये व्हावे ही कल्पना. आत्म्याचे परमात्म्याशी मीलन म्हणजे मोक्षप्राप्ती. एकपेशी प्राण्यापासून मनुष्यप्राण्यापर्यंत प्राण्याची शारीरिक उत्क्रांती होत गेली. मनुष्य हा शारीरिक दृष्ट्या परिपूर्ण प्राणी. आता यापुढे उत्क्रांती व्हायची, ती बुद्धितत्त्वाची. शरीर आणि बुद्धी दोन्ही जेव्हा पूर्णावस्थेला पोहोचतील तेव्हा दोन्ही गळून पडून उरते फक्त सूक्ष्मस्वरूप आत्मज्योत; जी त्याच क्षणी परमात्मज्योतीमध्ये विलीन होऊन जाते. मोक्ष मोक्ष म्हणतात तो हाच. या मोक्षाच्या अनेक मार्गांपैकीच एक मार्ग कलासाधनेचा. मोक्षप्राप्तीसाठी नृत्यासारख्या भौतिक गोष्टीचाच सोपान करणारे मन केवढे प्रगल्भ असेल! आमच्या पूर्वजांनी नृत्याचे मनुष्यजीवनातील महत्त्व ओळखले. आणि त्यांना हेही जाणवले की, ही कला अत्यंत सामर्थ्यवान आणि प्रसंगी मनुष्याला रसातळाला नेऊ शकणारी आहे. विशेषतः स्त्रीमध्ये या कलागत गुणांची खोली अधिक; आणि म्हणूनच तिच्यासाठी स्त्रीला या कलेपासून धोका अधिक. तेव्हा या धोकादायक वाटेचे वळण बदलले तर? बहुधा याच विचाराने नृत्याला भक्तीचे अधिष्ठान दिले गेले. नृत्यांगना मीरेची कथा या संदर्भात आठवते. मीरेच्या पतीला मीरा कृष्णापुढे काय नाचते ते पाहण्याची फार इच्छा होती. मीरा नेहमी नकार देत असे. अखेर एक दिवस त्याने फारच हट्ट धरला तेव्हा ती म्हणाली, 'मी तुमच्यासमोर नाचेन पण एका अटीवर. इथून पुढे आपले संबंध बहिणभावाप्रमाणे

राहतील.' राण्याने कबूल केले. मीरा त्याच्यासमोर मुक्तपणे नाचली, आणि...... राणा अंतर्बाह्य थरारून गेला; परंतु तो वचनबद्ध होता. अखेर याच संघर्षात त्याचा बळी गेला. मला या कथेत फार मोठा अर्थ वाटतो. आपल्या नृत्याचे पेटते सामर्थ्य आणि राण्याच्या नश्वर कुडीचे दौर्बल्य मीरा पूर्णपणे जाणून होती. ती त्याला वचनबद्ध ना करती तर तिच्या नृत्याच्या मोहपाशात राणा आणि राण्याच्या मायापाशात ती अडकून पडती. कौशल्याने तिने हा अधःपात टाळला.

## देवदासी : देवाला वाहिलेल्या नर्तकांची निराळी जमात

दक्षिणेतल्या देवदासी किंवा उत्तरेतल्या मंदिरनर्तकींच्या जन्माचे रहस्य हेच आहे. यांना लौकिक जीवन निषिद्ध असे. दक्षिणेतल्या देवदासींच्या परंपरेने 'भरतनाट्य' आणि 'कथाकलि' या दोन शास्त्रोक्त नृत्यपद्धती अगदी अलिकडच्या काळापर्यंत टिकविल्या. उत्तरेत 'कथिकां'च्या घरात कुणीतरी एक मुलगी देवाला दिली जाई. बाकीच्या लौकिक जीवन जगत. मणिपूरचा एक राजा भाग्यचंद्र याने आपल्या मुलीला रासलीला शिकवून तिला कृष्णार्पण केली होती. अगदी आत्ताआत्तापर्यंत मणिपुरी मुली फक्त देवळात नाचत. अशा रीतीने नृत्यकलेची उपासना करणाऱ्या स्त्रियांचा एक समूह समाजापासून तुटून निघाला. कलासाधना आणि तिचे ईश्वराच्या मूर्तीसमोर प्रदर्शन एवढेच यांचे जीवन असे. अर्थात या नृत्यकार्यक्रमाच्या वेळी मंदिराचा मुख्य पुजारी आणि अनेक विद्वज्जन प्रेक्षक म्हणून हजर असावयाचेच. अशा तऱ्हेचे अलौकिक जीवन या स्त्रियांच्या वाट्याला देण्यात आले, आणि आदर्श आणि वास्तव यांचा संघर्ष सुरू झाला.

या स्त्रिया ईश्वरचरणी वाहिल्या गेल्या खऱ्या; परंतु हा ईश्वर होता अचेतन पत्थराची मूर्ती, आणि या स्त्रिया होत्या सचेतन रक्तमांसाच्या मूर्ती. या जड शरीराच्या निसर्गदत्त मागण्यांची व्यवस्था लावण्याचे राहूनच गेले. मेहनतीने तेजाळलेला त्यांचा बांधा, बुद्धीच्या विलासाने लखलखणारे डोळे आणि अंगप्रत्यंगातून ओसंडणारे दिलदार मोहक तारुण्य. कार्यक्रम पाहणारे विद्वज्जन आणि पुजारी हे सगळेच काही मीरेच्या वचनबद्ध राण्याइतके संयमी नव्हते, किंवा सर्वच देवदासी काही मीरेइतक्या समर्थ नव्हत्या. हळूहळू देवाच्या दारीच पापाचा शिरकाव झाला. काही देवळांचे महन्त देवापुढे पडणाऱ्या तांबूलपैशाप्रमाणेच देवदासींनाही आपली मालमत्ता समजू लागले. पुढे देवाच्या मंडपातून राजदरबारी त्यांना प्रवेश झाला. देवदासी नाचू शकते तोवर तिचा मान, तोवर तिची बडदास्त. पुढे काय? हा प्रश्न होताच. अर्थात एखाद्या धनिकाला धरून राहणे व्यवहार्य ठरू लागले. उत्तरेत मुसलमान शहेनशहा आले. मंदिरे उद्ध्वस्त झाली. देवापुढे पुष्पांजली वाहणाऱ्या नर्तिका नवाबापुढे सलामी करू लागल्या. 'कलावती' म्हणून समाजाकडून ज्या स्त्रीचा मानसन्मान होई, तिची 'कलावंतीण' म्हणून अवहेलना होऊ लागली. कथिकांच्या मुली तर नाचायच्याच बंद झाल्या.

करतात. चार बोटांच्या बारा पेरांवर सारे गणित-शास्त्र ते मांडून ठेवतात. तीच त्यांची व्हीयेन्डिल. जॉमेट्री वगैरेशी सातत माहीत नसणाऱ्या नर्तिका सुंदर, रेखीव डिझाइन्स तयार करतात. चित्रकलेला सजीव करून सोडतात. नृत्यकार निर्माण करीत असलेले वेगवेगळे आकृतिबंध म्हणजे चित्रकलेचे सुंदर सजीव नमुनेच. नृत्यातील भावाभिव्यक्ती साधता साधता नृत्यकार उत्तम मानसशास्त्रज्ञ बनून जातो. केवळ डोळे, भुवया, हस्तक, मान इत्यादी अंगांच्या हालचालींवर ताबा मिळविल्याने भावाभिव्यक्ती साधत नाही. त्यासाठी ती ती विशिष्ट घटना, विशिष्ट भूमिका समजू शकणारे प्रगल्भ मन प्रथम लागते. स्त्रियांनी मनावर घेतले तर या कलेचा अभ्यास करता करता त्या विदुषी बनू शकतात. नृत्यकलेच्या अवनतीच्या काळात ज्यांनी कष्टाने नृत्यकला जतन केली, अशा २-३ स्त्रियांची नावे आठवली तरी याचा पुरावा मिळेल. श्रीमती रुक्मिणी अरुंडेल, श्रीमती मृणालिनी साराभाई आणि कै. मॅडम मेनका सोखी. एकाहून एक उच्च व्यक्तिमत्त्वाच्या नायिका. रुक्मिणीदेवींचे पति, श्री. अरुंडेल हे प्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ तर ॲटोमिक एनर्जीचे श्री. विक्रम साराभाई आणि हार्डविक् इन्स्टिट्यूटचे कर्नल सोखी हे पतीचे शास्त्रज्ञ. अशा समर्थ व्यक्तिमत्त्वाच्या पतींना साथ देणाऱ्या, तितक्याच समर्थ व्यक्तिमत्त्वाच्या तीन नृत्यकार स्त्रिया. यांनी कितीतरी मोठा मानसिक झगडा पदरी घेऊन, देवदासी आणि राजनर्तकींच्या सरत्या काळात, निडर होऊन मरणाऱ्या नृत्यकलेला आसरा दिला. आपल्या कामगिरीने समाजाचे परिवर्तन केले. आपला पैसा, श्रम आणि प्रतिष्ठा यासाठी राबविली आणि फार मोठे आंतरिक समाधान मिळविले. मॅडम मेनका आता हयात नाहीत परंतु श्री. रुक्मिणीदेवी आणि श्री. मृणालिनीदेवी यांचेबरोबर बोलू लागले, म्हणजे आपण एका नर्तकीशी बोलत आहोत की प्रगल्भ तत्त्वज्ञाशी बोलत आहोत, असाच कुणालाही प्रश्न पडेल. नृत्यकलेने ही किमया त्यांच्या आयुष्यात केली, परंतु हेही खरेच की आजच्या काळात नृत्यकला अशी किमया करताना क्वचितच दिसते. कारण आता आम्ही नृत्यकलेचा अभ्यास करीत नाही. आम्ही फक्त 'नाचतो'. आम्हा स्त्रियांच्या आयुष्यात घातक ठरते आहे ती नृत्यकला नव्हे, तर नृत्यकलेबाबतची ही आमची चुकीची वृत्ती.

### नृत्यकला ही हौस की व्यवसाय

आमचा सर्वांत पहिला गैरसमज म्हणजे, नृत्य शिकणाऱ्या प्रत्येक मुलीने स्टेजवर 'आर्टिस्ट' म्हणून चमकले पाहिजे. ही कल्पना आमच्या मनात इतकी पक्की होत चालली आहे, की नृत्य शिकायला लागल्या दिवसापासून आम्हाला 'स्टेज-आर्टिस्ट' बनण्याचे वेध लागलेले असतात. आधुनिक युगात प्रत्येक गोष्टीला एक तंत्र लागते. हेही ते यापाठीही आहे. पण मानून विसरतो की, या तंत्राने हस्तगत होणाऱ्या कोणत्याही गोष्टीला अल्पायुष्याचा शाप असतो. शिवाय, ते तंत्र पुन्हा पुन्हा कामदायी येत नाही. आज स्त्रिया अशाच तंत्र अनुकरण करून 'स्टेज-आर्टिस्ट' हा बनतात, आणि आपसुकतः

कला आहे. ही ताकद टिकविण्यासाठी गृहकृत्यातल्या अनेक गोष्टींत तिची ताकद खर्च न होणे इष्ट असते. स्वतःच्या शरीराची सामान्य स्त्रीपेक्षा वेगळ्या तऱ्हेने तिला जोपासना करावी लागते. कारण शरीर हेच या कलाविष्काराचे साधन आहे. चित्राला जसा उत्तम कागद हवा, शिल्पाला जसा उत्तम दगड हवा तसे नृत्याला उत्तम शरीर हवे. आणि यासाठी ती घरात काळजी घेऊ लागली की, 'चोचले करते', 'नखरेल' इत्यादी संज्ञा आल्याच. वाटेल तसले आणि वाटेल तेवढे न खाणे. घासणे, वाटणे इत्यादी गोष्टी शक्यतो टाळणे, चेहेरा, हात नियमाने क्रीम लावून मऊ ठेवणे, तसेच दोन दोन मेरांच्या पोळ्या लाटणे, वर्षभराच्या लोणच्याच्या कैऱ्या चिरणे, लग्नाच्या पंक्ती वाढणे, अशा हात-पाय, पाठ दमविणाऱ्या गोष्टी नेमक्या कार्यक्रमाच्या दिवशी न करणे इत्यादी पथ्ये तिने पाळायलाच हवीत. अशा वेळी कुटुंबियांनी तिला हिणवू नये. रोजचा रियाज ही महत्त्वाची गोष्ट. तो ठराविक वेळी करावयाचा म्हणजे त्या वेळातली कामे नोकराकडून करून घेणे आणि त्यासाठी त्याला तसेच साथीदारांना पैसे देणे हे आलेच. तसेच नेमक्या त्यावेळी आलेल्या पाहुण्यांच्या आदरातिथ्यात थोडे उणेअधिक हे होणारच. मुलांचे संगोपन ही महत्त्वाची गोष्ट. ती स्त्री नृत्याची नादी आहे तेव्हा तिच्या हातून मुलांकडे दुर्लक्ष होणारच, असे गृहीत धरूनच तिच्या प्रत्येक कृतीकडे बघितले जाते. खरे म्हणजे बहुधा सुशिक्षित कलावंत स्त्री मुलांची वाढ फार सुंदर रीतीने करीत असते. परंतु मुलांचे संगोपन म्हणजे मुलासाठी खस्ता काढणे व त्याग करणे या परंपरागत कल्पनेत तिचे वागणे बसत नसल्यामुळे तिच्यावर आक्षेप येतात.

वरील गोष्टी क्षुल्लक दिसल्या तरी प्रत्यक्ष जगताना डोंगराएवढ्या मोठ्या होऊन वठनात आणि नृत्याचा व्यवसाय कुटुंबात राहून पत्करणाऱ्या स्त्रीला पदोपदी संघर्षाला तोंड द्यावे लागते. नृत्याच्या बाबतीत हौस आणि व्यवसाय यातली सीमारेषा पुसट असते त्यामुळे हौसेचे रूपांतर नकळत व्यवसायात होते आणि मग हौसेचा आनंदही हातून निसटतो आणि व्यवसायही साधत नाही. हे कसे होते पाहा. नृत्यामध्ये थोडे प्राविण्य मिळू लागले की चार लोकांनी आपले नृत्य पाहून कौतुक करावे ही नैसर्गिक अपेक्षा निर्माण होते. येथपर्यंत हौसच राहते, पण कुठे १-२ ठिकाणी कार्यक्रमासाठी म्हणून मुलगी बाहेर पडली की, आपल्या वाढत्या आकांक्षांना न्याय घालणे बहुतेकांना साधत नाही. घरगुती कार्यक्रम, छोट्या मैफिली, कुठे मदतीसाठी कार्यक्रम यातून वाढणारी रंगभूमीची आवड मग सुटत नाही आणि नकळतच व्यावसायिक सत्रात भाग घेणे, कॉन्फरन्सेसमध्ये कार्यक्रम देणे हे चक्र वाढत जाते. त्यात अधिकाधिक वेळ गुंतू लागतो. रियाज, पोशाख यासाठी अधिक पैसा लागतो. मोठ्या मोठ्या गुरुजनांकडे शिकावेसे वाटू लागते आणि यासाठी लागणाऱ्या पैशासाठी कार्यक्रमाला पैसे घेणे सोयीस्कर वाटू लागते. पुढे मग 'पब्लिसिटी', अनेक लोकांशी ओळखी वाढणे, इतर नृत्यकारांशी चुरस आणि सतत प्रकाशात राहण्याची गरज, हे सर्व ओघाने आलेच.

या सर्व उलाढालीत त्या कलावतीला आपल्या मूळच्या सरळसाध्या कौटुंबिक जीवनात रस वाटेनासा होऊन त्यापासून ती हळूहळू दुरावते आणि दुसरीकडे व्यवसायाच्या तंत्रात अडकून, हौसेच्या काळात मिळणाऱ्या कलासाधनेतल्या खऱ्याखुऱ्या आनंदालाही मुकते. सुरुवातीस आपल्या कलाविष्कारात हरखून गेलेले, मग्न झालेले आणि या सच्च्या मग्नतेमुळेच रसिकांच्या श्रद्धाआदराला पात्र ठरून प्रचंड व्यावसायिक यश मिळविलेले कित्येक कलावंत नंतर स्वतःच्या कलेशीच उद्दाम झालेले मी पाहिले आहेत. कला माणसाइतकी सहनशील नाही. तिच्याशी तुम्ही प्रामाणिक आहात तोवर ठीक. एरवी ती तुमच्यावर सरळ उलटून प्रहार करते. कलावंत लहान मुलासारखा असतो. कलेच्या कुशीत तो आईच्या कुशीतल्यासारखा निर्धास्त असतो. पण स्वतःच्या उद्दामपणामुळे एकदा का याने आईची कुशी गमावली, की तो सैरभैर होतो आणि पोरक्या मुलासारखे वणवण भटकण्याची पाळी त्याच्यावर येते. जी कला त्याच्या व्यक्तिमत्त्वाच्या उन्नतीस कारणीभूत झाली, तीच त्याच्या व्यक्तित्वाचा ऱ्हास करते. व्यवसायात राहून आलला असा ऱ्हास न होऊ देणे फार थोड्या कलावंतांना साधते.

## कौटुंबिक जीवन आणि कलासाधन

म्हणून हौसेची मर्यादा ओलांडताना स्त्रीने काळजीपूर्वक पाऊल टाकावे. आपल्या पतीचा स्वभाव, कुटुंबाची व्याप्ती व जबाबदारी, आपली आर्थिक परिस्थिती आणि शारीरिक ताकद या बाह्य परंतु महत्त्वाच्या गोष्टी आणि आपल्याला नक्की काय हवे आहे, आपल्या मनाचा पिंड काय व आपले मनोधैर्य किती यांचा नीट अंदाज घेऊन पुढे पाऊल टाकावे. मनाचा पिंड धरसोडीचा असेल तर कोसळणे नि विराट होणे भागच पडेल. मर्यादा पार पडल्येत तरी शक्य होणार नाही. तसे नसेल तर मात्र, स्त्रीने या क्षेत्रात आपण कुठवर जायचे व काय करायचे याच्या मर्यादा ठरवून त्याप्रमाणे आणि त्या मार्गावरून चालत असता मग स्वतःची कुणाशीही तुलना करू नये. रंगभूमीवरच्या झगझगाटातली नृत्यकार स्त्री जे करू शकणार नाही ते कदाचित इतर नृत्यकार स्त्रिया करू शकतील. घरगुती समारंभात नृत्य करून समाजाच्या शिक्षणाचे एक मोठे काम साधेल. मध्यमवर्गातला हा समाज ५-१० रु. खर्चून न कळणाऱ्या अभिजात नृत्याच्या कार्यक्रमाला वर्षातून फार तर एखादा जाणार. या उलट सर्वांत स्वस्त दरातली करमणूक म्हणून सिनेमाला मात्र ही माणसे पुष्कळदा जातात. नृत्याविषयींचे फार मोठे गैरसमज सिनेमातल्या नृत्यावरून त्यांच्या मनात पक्के झालेले असतात. अशा कार्यक्रमातून या समाजाला अभिजात नृत्यात काय पहायचे हे हसत खेळत सांगता येते. 'तुम्हाला नृत्यातले काय कळते?' असे म्हणून त्यांना उडवाउडव करण्यापेक्षा 'तुम्हाला कळलेच पाहिजे' अशा निर्धाराने आम्ही त्यांच्याजवळ गेलो तर अभिजात नृत्यकारांना आणखी काही वर्षांनंतर उत्स्फूर्त प्रेक्षकवर्ग मिळेल. आणि हे काम कौटुंबिक क्षेत्रातून स्त्री फार समर्थपणे करू शकेल. 'अगो,

तिची मुलगी नाचणार आहे. तिची भाची नाचणार आहे; अन शिवाय तिकिट वगैरे नाही.' मोठ्या उत्साहाने नि कौतुकाने आमची कुटुंबवत्सल मंडळी या कार्यक्रमाला जमतात. ही संधी घेऊन, जमलेल्या नातलगांच्या कुवतीनुसार मोजमापाने, नृत्यकार स्त्रीने आपले ज्ञान त्यांच्या डोक्यावर अक्षरशः ओतावे. पन्नास चेहेऱ्यांतून चार सहा डोळे तरी चमकू लागलेले असतात. हे यश कमी नव्हे. आविष्कारामधला आनंद अशा रीतीने व्यावसायिक रंगभूमीवर न कदाचित मिळविता येईल. जाणकारांच्या छोट्या मेहेफिलींमध्ये असा आनंद फार मिळतो. तिथे कुठल्याही नाचता येते. समोर तिकिट काढून आलेला जमाव नसतो, त्यामुळे त्याला अमुक दिलेच पाहिजे असे बंधन नसते. स्वतःला जे हवे ते नाचता येते आणि एक गुपित म्हणून सांगते की व्यावसायिक रंगभूमीवरचे प्रसिद्ध गायक नर्तकसुद्धा अशा मेहेफलींसाठी फार उत्सुक असतात. मोठमोठ्या दहाबारा घटकेच्या कार्यक्रमासाठी आवश्यक ती स्फूर्ती ते अशा एखाद्या मेहेफिलीतूनच मिळवितात. आमच्याबरोबरचे दहाबारा गायकवादकनर्तक कलावंत आणि दहाबारा शिष्यमंडळी यांच्याबरोबर जन्माष्टमीच्या रात्री दीड दोन वाजता की. बिरजूमहाराजांचा अभिनय जसा खुलताना मी पाहिला आहे तसा कार्यक्रमात क्वचित खुलतो. मोठ्या कार्यक्रमात कलावंताच्या कष्टाला तेज चढत असते, तर अशा छोट्या मेहेफिलीत त्याचा आत्मा उमलून येतो.

## फसव्या यशाच्या मागे लागू नये

नृत्यव्यवसायातल्या फसव्या, तकलादू यशावर स्त्रियांनी आपली महत्त्वाकांक्षा केंद्रित न करता, अभ्यासू वृत्तीने जर या कलेकडे पाहिले, आणि अधिक सखोल महत्त्वाकांक्षा ठेवली तर शरीरमनाला आनंद देणारी व शरीरमनाचा विकास करणारी नृत्यकलेसारखी दुसरी प्रभावी गोष्ट नाही. स्त्रीच्या आयुष्यात उल्हास, ताजेपणा चैतन्य आणि बौद्धिक तरतरी शेवटपर्यंत कायम ठेवण्यासाठी नृत्य फार उपयोगी पडणारे आहे, फक्त 'जरा जपुन टाक पाऊल साजणी' म्हणजे झाले!

१४

# गेल्या दीडशे वर्षांतील स्त्रीशिक्षणाचे प्रयोग

गंगूताई पटवर्धन

श्री. गंगूताई पटवर्धन, बी. ए., टी. सी. व मॉंटेसोरी डिप्लोमा (लंडन). (जन्म १६-५-१९००) निवृत्त मुख्याध्यापिका, सरकारी ट्रेनिंग कॉलेज फॉर विमेन, बडोदे. सेंट्रल श्री. ना. दा. ठा. विद्यापीठास जोडलेल्या महिला पाठशाळेच्या दहा वर्षे ऑनररी प्रिन्सिपल व गानसमाजाच्या अध्यापिका. शिक्षण व समाज क्षेत्रात सेवाकार्य. पुणे विभागाच्या भारत स्काउट-गाइड्‌स ॲसिस्टंट स्टेट कमिशनर. (विसावा, १२९१ शुक्रवार, सुभाषनगर, पुणे २)

शिक्षण संपादन करणे (Right to educate) हा मानवी मूलभूत हक्कांपैकी महत्त्वाचा हक्क आहे. आंतरराष्ट्रीय संघटनेने त्या बाबतीत स्त्रीपुरुष समानता मान्य केली आहे व १९५० साली भारतीय राज्यघटनेतही तिला मान्यता मिळाली आहे. आज घटनेप्रमाणे भारतीय स्त्रीस ज्ञानमंदिराची सर्व दालने खुली झाली आहेत. हा हक्क प्राप्त होण्यापूर्वीच्या दीडशे वर्षांच्या काळाचे सिंहावलोकन केल्याशिवाय तो प्राप्त होण्यासाठी कोणी किती कष्ट केले व किती आणि कोणत्या प्रकारचे उपाय योजले हे ध्यानी येणार नाही. ज्यांना हा हक्क आज आपोआप जन्माबरोबर प्राप्त झाला आहे त्यांना तो किती मेहनतीने संपादन करण्यात आला हे नीट समजले तर त्याचे खरे मोल लक्षात येईल. त्या दृष्टीने गेल्या दीडशे वर्षांतील स्त्रीशिक्षणाची सामान्य वाटचाल व ती होत असता वेळोवेळी झालेले तद्विषयक प्रयोग थोडक्यात वर्णन करण्याचे ठरविले आहे.

तिची एक नाचणार आहे. तिची मावशी नाचणार आहे; अन शिवाय मित्रिणी वगैरे नाही.' मोठ्या उत्साहाने नि कौतुकाने आमची कुटुंबवत्सल मंडळी या कार्यक्रमाला जमतात. ही संधी घेऊन, जमलेल्या माणसांच्या कुवतीनुसार संक्षेपाने, नृत्यकार स्त्रीने आपले ज्ञान त्यांच्या टाळ्यावर अक्षरशः लादावे. पाठीच्या चेहऱ्यांनून चार सहा टाळे तरी चमकू लागतात लागतात. हे यश कमी नव्हे. आविष्कारामधला आनंद अशा रीतीने व्यावसायिक रंगभूमीवर न जाताही मिळविता येईल. जाणकारांच्या छोट्या मेहेफिलीमध्ये अशा आनंद फार मिळतो. तिथे मुक्तपणे नाचता येते. समोर तिकिटे काढून आलेला ग्राहक नसतो, त्यामुळे त्याला अमूक दिलेच पाहिजे असे बंधन नसते. स्वतःला जे हवे ते नाचता येते आणि एक गुपित म्हणून सांगते की व्यावसायिक रंगभूमीवरचे प्रसिद्ध गायक नर्तकसुद्धा अशा मेहेफलीसाठी फार उत्सुक असतात. मोठ्यातल्या बहुधारा धडाकेबाज कार्यक्रमासाठी आवश्यक ती स्फूर्ती ते अशा एखाद्या मेहेफिलीतूनच मिळवितात. आमच्याघरोघरांचे बहुधारा गायकवादकनर्तक कलावंत आणि बहुधारा शिष्यमंडळी यांच्याबरोबर जन्माष्टमीच्या रात्री बारा दोन वाजता श्री. बिरजूमहाराजांचा अभिनय जसा खुलताना मी पहिला आहे तसा कार्यक्रमात क्वचितच खुलतो. मोठ्या कार्यक्रमात कलावंताच्या कसबाला तेज चढत असते, तर अशा छोट्या मेहेफिलीत त्याचा आत्मा उमलून येतो.

## फसव्या यशाच्या मागे लागू नये

नृत्यव्यवसायातल्या फसव्या, तकलादू यशावर स्त्रियांनी आपली महत्त्वाकांक्षा केंद्रित न करता, अभ्यासू वृत्तीने जर या कलेकडे पाहिले, आणि अधिक सखोल महत्त्वाकांक्षा ठेवली तर शरीरमनाला आनंद देणारी व शरीरमनाचा विकास करणारी नृत्यकलेसारखी दुसरी प्रभावी गोष्ट नाही. स्त्रीच्या आयुष्यात उल्हास, ताजेपणा चैतन्य आणि बौद्धिक तरतरी शेवटपर्यंत कायम ठेवण्यासाठी नृत्य फार उपयोगी पडणारे आहे, फक्त 'जरा जपुन टाक पाऊल साजणी' म्हणजे झाले!

❧

मध्ये ब्रिटिश फॉरिन स्कूल सोसायटीतर्फे स्त्रीशिक्षणप्रसार करण्याच्या हेतूने मिस कुक हिंदुस्थानात आल्या व त्यांनी कलकत्त्यालाच दुसरी शाळा उघडली. १८२४ साली लेडी ॲमर्स्ट ह्यांनी कलकत्ता व त्याचा परिसर ह्यात मुलींच्या शाळा काढण्याच्या हेतूने 'सोसायटी फॉर नेटिव्ह फीमेल एज्युकेशन' नावाची संस्था काढली. बंगालमध्ये असे प्रयत्न चालू असता 'अमेरिकन मिशनरी सोसायटीने' मुंबई शहरात १८२४मध्ये ह्या इलाख्यातील मुलींची पहिली शाळा उघडली. ती इतकी लोकप्रिय झाली की १८२९ पर्यंत निरनिराळ्या भागांत अशा ९ शाळा निघून त्यांत ४०० मुली शिकू लागल्या. भायखळ्याला शाळेला जोडून वसतिगृहही सुरू केले. त्याच सोसायटीने १८३१मध्ये नगरला दोन शाळा व एक वसतिगृह काढले. चर्च मिशनरी सोसायटीने १८२४मध्ये आपली पहिली शाळा मुंबईस काढून १० वर्षांत ठाणे, नाशिक, इत्यादी जिल्ह्यातही अनेक शाळा काढल्या. अमेरिकन मिशनचे काम पाहून स्कॉटिश मिशनला स्फूर्ति झाली. त्यांनी डॉ. विल्सन व मिसेस विल्सन (पूर्वीच्या मिस कुक) यांचे नेतृत्वाखाली मुंबई व मुंबईजवळील जिल्ह्यांतून आपल्या शाळांचे जाळे पसरविले. कलकत्ता मुंबईत झाले तेच मद्रास वगैरे ठिकाणी झाले. मद्रास इलाख्यात तर स्त्रियांत पडदा नसल्याने शिक्षणाचा फैलाव होण्यास चांगलीच अनुकूल भूमी मिळाली.

येथे एक गोष्ट नमूद केली पाहिजे की, मिशनरी संस्थांचा अंतस्थ हेतू ख्रिस्ती धर्मप्रसाराचा होता. त्यांच्या तऱ्हेच्या प्रार्थना, धर्मविषयक पाठ ह्यांना विद्यार्थीनींना उपस्थित राहाणे भाग पडे. त्यामुळे हिंदू लोकांच्या मुलींना ह्या शाळांचा लाभ फारच कमी मिळे. खालच्या समाजाला जवळ करून मिशनऱ्यांनी त्यांना मोठ्या प्रमाणावर शिक्षित केले. थोड्याशा शिक्षणानेही, कंपनी सरकारच्या नोकरीत त्यांना प्रवेश मिळू लागला, त्यामुळे पुरुषसमाज आकर्षित झालाच, पण स्त्रियानाही शिक्षित केले पाहिजे ह्याची त्याला जाणीव होऊ लागली. त्यामुळे पुढारलेल्या समाजाने व पारशी समाजाने ह्या शाळांचा फायदा घेतला. बंगालमध्ये राजा राममोहन रॉय ह्यानी १८ व्या शतकाचे शेवटी सामाजिक सुधारणा व स्त्रीशिक्षण ह्याबद्दल लोकांत जागृती उत्पन्न केली. ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांनीही त्याला जोड दिली. सतीची चाल बंद करण्याच्या खटपटीसाठी राजा राममोहन रॉय विलायतेत गेले असता, हिंदी माणसांना शिक्षण देऊन व तेही इंग्रजी मार्फेद्वारा देऊन त्यांना कंपनी सरकारच्या अधिकाऱ्यांमध्ये स्थान द्या, अशी मागणी त्यानी केली होती. इंग्रजी शिक्षणाने दृष्टी बदलून स्त्रियांची दुर्दशा नष्ट होण्यास मदत होईल अशी त्यांची खात्री होती.

ईस्ट इंडिया कंपनीस १८३३मध्ये सनद वाढवून देताना त्यापूर्वी राजा राममोहन रॉय ह्यांनी आपल्या विलायतेतील वास्तव्यात हिंदुस्थानातील परिस्थितीविषयी जे वर्णन केले त्याचा परिणाम होऊन मेकॉले साहेबास शिक्षणविषयक धोरण ठरविण्यास सांगण्यात आले. त्याप्रमाणे इंग्लंडमधील शिक्षण-पद्धतीच्या धर्तीवर येथील अभ्यासक्रमाची रचना करण्यात आली व इंग्रजी हे शिक्षणाचे माध्यम ठरविण्यात आले.

त्यामुळे येथील संस्कृत पाठशाळा, मदरसा ह्यांना मिळणारी आर्थिक मदत बंद झाली व इंग्रजी शाळांसाठी तो पैसा खर्च होऊ लागला. अर्थात त्या शाळा हळूहळू बंद पडल्या. त्यापुढे दुय्यम व उच्च शिक्षणाच्या संस्था स्थापन करण्याकडे सरकारने लक्ष पुरविले. अशा शाळांतून शिक्षण घेऊन बाहेर पडणाऱ्या पुरुषांना मोठमोठ्या नोकऱ्या, मानाच्या जागा मिळू लागल्या. इंग्रजांच्या इतिहासाचे व संस्कृतीचे ज्ञान मिळाल्याने त्यांच्या राहाणीसारणीप्रमाणे वागण्याची इच्छा उत्पन्न होऊ लागली. त्यामुळे आपल्या देशातील स्त्रीवर्ग मागासलेला आहे, त्याला शिक्षण नाही, तो आपल्या विचारांशी सहमत होऊ शकत नाही, ह्याची त्यांना खंत वाटू लागली; पण मिशनरी शाळांत पाठवण्याची तयारी संस्कारामुळे होईना. त्यामुळे खाजगी शिक्षण-प्रयोग करण्याची स्फूर्ती होऊन काही देशी शाळा निघाल्या.

## स्वकीयांनी केलेले पहिले वहिले प्रयोग

अशा शाळांपैकी पहिला प्रयोग महात्मा ज्योतिराव फुले यांनी १८४८ मध्ये केला. स्त्रियांना शिक्षण दिल्याशिवाय देश वर येणार नाही; हिंदु धर्मातील जातिभेद, अस्पृश्यता, कुरकुट धर्मकल्पना ह्या नाहीशा करावयाच्या असतील तर स्त्रियांचे विचार सुधारले पाहिजेत; त्यासाठी त्यांना शिक्षण दिले पाहिजे, अशी त्यांची दृढ श्रद्धा होती. ह्या उद्देशाने त्यांनी मुलींची पहिली शाळा पुण्यास काढली. लोकमताची पर्वा न करता, लोकांच्या छळाला न जुमानता त्यांनी मुलींना शाळेत घेतले. शिक्षिका मिळत नव्हत्या म्हणून स्वतःच्या पत्नीस स्वतः शिकवून तयार केले व शिक्षिकेचे काम करविले. पुढे सरकारने मुलींच्या शाळा काढण्याचे ठरविल्यावर त्यांनी आपली शाळा सरकारकडे सोपविली. ह्या त्यांच्या कामाबद्दल समाजाने त्यांचा छळ केला पण कंपनी अधिकाऱ्यांनी त्यांचा गौरव करून त्यांना रु. २०० चे इनाम दिले. राजा राममोहन रॉय व ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांनी ब्राह्मोसमाजाच्या मार्फत स्त्रीशिक्षणाचे कार्यास बंगाल मध्ये सुरुवात केली. अशा रीतीने महाराष्ट्र व बंगालमध्ये हिंदी स्त्रियांच्या आधुनिक शिक्षणास खाजगी प्रयत्नांनी उठाव मिळाला. ह्याच सुमारास मुंबईस एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्ये शिक्षण घेऊन बाहेर पडलेल्या श्री. दादाभाई नौरोजी, डॉ. भाऊ दाजी, रावसाहेब मंडलीक, न्यायमूर्ति रानडे इत्यादी पुढाऱ्यांनी विद्यार्थीदशेत असतानाच स्त्रीशिक्षणास मदत केली. प्रो. पॅटन ह्यांच्या प्रोत्साहनाने १८४७ मध्ये स्टूडन्ट्स लिटररी व सायंटिफिक सोसायटी नावाची संस्था त्यांनी काढली व १८४९ मध्ये सोसायटीच्या वतीने स्त्रियांसाठी शाळा काढल्या. दुपारी दोन तास शिक्षकाचे काम विनावेतन करून त्यांनी त्या चालविल्या. समाजाकडून आर्थिक मदत मिळाल्यावर पगारी शिक्षक नेमले व पूर्णवेळच्या शाळा केल्या. जगन्नाथ शंकरशेट यांनी स्त्रीशिक्षणास आर्थिक मदत दिली. अहमदाबादमध्ये श्री. मगनभाई करमचंद ह्यांनी मुलींच्या शाळा काढण्यासाठी रु. २०,००० देणगी दिली, त्यामुळे तेथे दोन शाळा निघाल्या.

अशा रीतीने आपल्या संस्कृतीचे संरक्षण करण्याच्या दृष्टीने मुलींच्या खाजगी शाळा खाजगी प्रयत्नाने निघत होत्या. पण कंपनी सरकारने मात्र हिंदी स्त्रीशिक्षणाच्या क्षेत्रात कोणतीही जबाबदारी स्वीकारली नाही. कंपनीच्या अधिकाऱ्यांचे असे मत पडे की, स्त्रीशिक्षण हे लोकांस मान्य नसून त्याबद्दल सामान्य जनतेच्या मनात तर एक प्रकारची अढी आहे. त्यामुळे बायका बिघडतील अशी तिला भीती व धास्ती वाटते. तेव्हा सरकारने त्यात हात घातल्यास हिंदुमुसलमान ह्यांच्या धर्मकल्पनांवर आघात होऊन धार्मिक भावना दुखावतील. माउन्ट स्टुअर्ट याने मुलांच्या शिक्षणासाठी अतोनात खटपट केली; पण मुलींच्या शिक्षणाबद्दल एक अवाक्षरही आपल्या निवेदनात काढलेले नाही. ह्याला काही इंग्रज अपवाद होते हेही येथेच सांगितले पाहिजे. १८४८ ते १८५१ पर्यंत गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलचे लॉ मेंबर व शिक्षण मंडळाचे अध्यक्ष असणारे बेथ्यून ह्यांनी स्वतःच्या खर्चाने हिंदी मुलींसाठी एक शाळा चालविली. ती 'सेक्युलर' म्हणजे कोणत्याही धर्माचा पुरस्कार करावयाचा नाही अशा तत्त्वावर चालविली. बंगाली भाषा, शिवणकाम व ज्यांना इंग्रजी हवे असेल त्यांना इंग्रजी भाषा असे शिक्षणाचे स्वरूप ठेवण्यात आले. पुढे ती पूर्ण वेळची शाळा बनून कॉलेजवर्गही तिला जोडले गेले. (१८४९)

१८५३ मध्ये ले. कर्नल जेकब ह्यांनी पार्लमेंटच्या सिलेक्ट कमिटीपुढे निवेदन करताना असे स्पष्ट सांगितले की, पश्चिम हिंदुस्थानामध्ये सरकारी शिक्षणपद्धतीचा लाभ घेणारी एकही स्त्री नाही. हे विधान इंग्रजी शाळेसंबंधी असावे.

## सरकारचे अलिप्ततेचे धोरण बदलले

स्त्रीशिक्षणासंबंधीचे अलिप्ततेचे सरकारी धोरण बदलून टाकण्याचे श्रेय लॉर्ड डलहौसीला दिले पाहिजे. त्यांनी गव्हर्नर जनरल या नात्याने शिक्षण मंडळाचे मार्गदर्शन करताना असे स्पष्ट फर्मावले की, 'स्त्री शिक्षणाची देखरेख हादेखील शिक्षण मंडळाच्या कक्षेतील विषय आहे व त्याला सरकारने आस्थेने आगत्यपूर्वक व मोकळेपणाने पाठिंबा दिला पाहिजे.' १८५४च्या वुडच्या खलित्यात डलहौसीच्या या हुकुमाला मान्यता मिळून स्त्रियांच्या शिक्षणाची जबाबदारी सरकारने उघड रीतीने स्वीकारली. पुरुषांच्या शिक्षणाची जबाबदारी घेण्यास सरकारने १८१३मध्ये सुरुवात केली. स्त्रियांच्या बाबतीत ती स्वीकारण्यास आणखी चाळीस वर्षे लागली. ही जबाबदारी स्वीकारल्यावर १८५७ साली मुलींचे गाव वर्ग चालविणाऱ्या शिक्षकांना इनामे मिळू लागली. तरीही १८६४–६५पर्यंत या दिशेने फारशी प्रगती झाली नाही. १८६४ला लोकल फंड सेस सरकारने बसविला व मुलींच्या शिक्षणावर अधिक खर्च करता येऊ लागला व अधिक शाळा उघडणे शक्य झाले. १८६५ मध्ये मुलींच्या एकूण शाळा २३ होत्या त्या १८७१ मध्ये २१८ झाल्या व शाळांतील मुलींची संख्या ६३९ होती ती ५११० झाली.

मान मुमाराय मिस मेरी कार्पेंटर ह्या इंग्रज समाजकार्यकर्त्या हिंदुस्थानात भेट देण्यास आल्या. राजा राममोहन रॉय यांच्या भेटीमुळे त्यांना ह्या देशाबद्दल आत्मीयता व कुतूहल निर्माण झाले होते. त्यांनी स्त्रीशिक्षणाच्या कार्याबद्दल सरकारी अधिकाऱ्यांशी चर्चा केली. स्त्रीशिक्षणास स्त्री शिक्षकांची आवश्यकता असल्यामुळे स्त्रियांसाठी ट्रेनिंग कॉलेजे काढून स्त्रीशिक्षक तयार केले पाहिजेत; स्त्रीशिक्षक असल्या शिवाय शाळा व मुली वाढणार नाहीत, हे त्यांनी अधिकाऱ्यांना पटवून दिले. सरकारने त्या सल्ल्यानुसार ट्रेनिंग कॉलेजे काढण्याचे ठरविले व १८७० साली पुण्यास व १८७१ मध्ये अहमदाबादेस अशा दोन संस्था मुंबई इलाख्यात सुरू केल्या. इतर इलाख्यांतही तशा काढण्यात आल्या. ट्रेनिंग कॉलेजे निघाली, पण त्यात पुरेशा विद्यार्थिनीच मिळेनात. पुण्याच्या ट्रेनिंग कॉलेजात केवळ ८ विद्यार्थिनी दाखल झाल्या, कारण विद्यार्थिनी प्रौढ हव्या व अशा स्त्रियांना मुळाक्षरापासून आरंभ करणे भाग होते. अशा पाठशाळेत दाखल होण्यास किमान वय व किमान शैक्षणिक लायकी असणाऱ्या उमेदवार हव्यात, त्या मिळणे कसे शक्य होते? प्राथमिक शाळांत दाखल होणाऱ्या मुली चौथीपर्यंत गेल्या तरी वय १८ पर्यंत असणे शक्य नव्हते. १७–१८ वर्षांच्या त्या शिकलेले विसरलेल्या असायच्या. शिवाय, प्रौढ स्त्रिया घ्याव्या तर त्या निरक्षर असायच्या. त्यामुळे दाखल होण्यास कबूल असलेल्या अशा स्त्रियांना प्रवेश देऊन त्यांना प्रथम प्राथमिक शाळेचे शिक्षण द्यावयाचे व मग प्रशिक्षण द्यावयाचे; असेच प्रत्येक इलाख्यात करावे लागले. १८७८ पर्यंत ट्रेनिंग कॉलेजच्या प्रवेशासाठी निश्चित शैक्षणिक लायकीची अट ठेवता आली नाही. प्राथमिक चौथी पास असल्याचा दाखला त्यासाठी पुरत असे. तरीही पुण्याच्या संस्थेमधून १८७० ते १८८२ ह्या काळात ३४ स्त्रिया शिक्षिका म्हणून बाहेर पडल्या; म्हणजे वर्षाला सरासरी तीन असे त्याचे प्रमाण पडले. ह्याच काळात अहमदाबादेच्या संस्थेतून ३८ स्त्रिया पास झाल्या म्हणजे सरासरी प्रमाण तेच. १८८२ साली सर्व हिंदुस्थानात ट्रेनिंग कॉलेजमध्ये शिकणाऱ्या स्त्रियांची संख्या केवळ ५१५ होती. शिक्षिका कमी म्हणून शाळा कमी. सहशिक्षण देण्यास लोक तयार नव्हते. तरीही १८८२ साली १,२७,०६६ मुली शिकत होत्या, त्यांपैकी ४२,०५१ मुली मुलांच्या शाळेत जात होत्या.

## स्त्रियांसाठी निराळा अभ्यासक्रम; स्त्रियांना व्यवसायशिक्षण

ह्या कालातील लक्षात घ्यावयाची दुसरी एक बाब म्हणजे मुलींच्या स्वतंत्र शाळा स्थापन होऊ लागल्यावर मुलींसाठी विशेष अभ्यासक्रम असावा अशी मागणी होऊ लागली. १९ व्या शतकापर्यंत सामान्य प्रचलित मत असे होते की मुलींना पुढील आयुष्यात नोकरी करावयाची नसून संसार करावयाचा आहे, तेव्हा दिलेले शिक्षण संसारोपयोगी असले पाहिजे. तेव्हा त्यासाठी स्वतंत्र अभ्यासक्रम व स्वतंत्र पाठ्यपुस्तके असावी. मुलांच्या व मुलींच्या अभ्यासक्रमात फरक करण्याचे मान्य होऊन १८७७–७८

मध्ये मुलींसाठी निराळा अभ्यासक्रम रचण्याचे ठरले व शिवण-टिपण, चित्र वगैरे विषयांचा समावेश करण्यात आला. तसेच मुलींची लग्ने लवकर होत असल्याने चार वर्षांचाच प्राथमिक शाळेचा अभ्यासक्रम असावा हेही मान्य करण्यात आले. स्वतंत्र पाठ्यपुस्तके तयार करणे मात्र १९०६ पर्यंत अमलात आले नाही.

स्त्रियांच्या प्राथमिक शिक्षणाचे सरकारी तारू अशा रीतीने धिमेपणाने मार्ग क्रमीत असता, मिशनरी संस्थांनी मुलींच्या माध्यमिक शाळा काढण्याच्याही मार्गावर पुढचे पाऊल टाकले. त्याचा फायदा युरोपियन, ॲंग्लो इंडियन, हिंदी ख्रिश्चन व पारशी ह्या समाजांनी घेतला, तितका पुढारलेल्या हिंदू समाजाने घेतला नाही. हिंदू स्त्रिया बोटावर मोजण्याइतक्याच दाखल झाल्या. माध्यमिक शिक्षणाप्रमाणे धंदेवाईक शिक्षणाचीही थोडीफार सोय झाली. प्राथमिक ट्रेनिंग कालेजे स्थापन झाली, त्यानंतर १८७५–७६ मध्ये ग्रँट मेडिकल कॉलेजमध्ये मिडवायफरी (सूतिकाविद्या) वर्ग निघून नर्सिंग (रुग्णशुश्रूषा) ह्या धंद्याचेही शिक्षण स्त्रियांस मिळू लागले. काही मिशनरी संस्थांत शिवणविणकामासारखे साधे धंदे शिकविण्याची सोय करण्यात आली. ह्याचाही फायदा वर सांगितलेल्या समाजांनीच घेतला. पण धंदेशिक्षणात स्त्रियांस प्रवेश मिळू लागला ही घटना महत्त्वाची होय. स्त्रियांच्या उच्च शिक्षणाची सुरुवात मात्र अजून व्हावयाची होती; १८८१–८२ साली एकही स्त्री कॉलेजमध्ये शिकत नव्हती.

याच सुमारास मिस मेरी कार्पेंटर या इंग्लिश समाजकार्यकर्त्या हिंदुस्थानात भेट देण्यास आल्या. राजा राममोहन रॉय यांच्या भेटीमुळे त्यांना या देशाबद्दल आत्मीयता व कुतूहल निर्माण झाले होते. त्यांनी स्त्रीशिक्षणाच्या कार्याबद्दल सरकारी अधिकाऱ्यांशी चर्चा केली. स्त्रीशिक्षणास गती द्यावयाची असल्यास स्त्रियांसाठी ट्रेनिंग कॉलेजे काढून स्त्रीशिक्षक तयार केले पाहिजेत; स्त्रीशिक्षक असल्या शिवाय शाळा व मुली वाढणार नाहीत, हे त्यांनी अधिकाऱ्यांना पटवून दिले. सरकारने त्या सल्ल्यानुसार ट्रेनिंग कॉलेजे काढण्याचे ठरविले व १८७० साली पुण्यास व १८७१ मध्ये अहमदाबादेस अशा दोन संस्था मुंबई इलाख्यात सुरू केल्या. इतर इलाख्यांतही तशा काढण्यात आल्या. ट्रेनिंग कॉलेजे निघाली, पण त्यात पुरेशा विद्यार्थिनीच मिळेनात. पुण्याच्या ट्रेनिंग कॉलेजात केवळ ८ विद्यार्थिनी दाखल झाल्या, कारण विद्यार्थिनी प्रौढ हव्या व अशा स्त्रियांना मुळाक्षरापासून आरंभ करणे भाग होते. अशा पाठशाळेत दाखल होण्यास किमान वय व किमान शैक्षणिक लायकी असणाऱ्या उमेदवार हव्यात, त्या मिळणे कसे शक्य होते ? प्राथमिक शाळांत दाखल होणाऱ्या मुली तिसरी चौथीपर्यंत गेल्या तरी वय १८ पर्यंत असणे शक्य नव्हते. १७-१८ वर्षांला त्या शिकलेले विसरलेल्या असायच्या. खरे, प्रौढ स्त्रिया घ्याव्या तर त्या निरक्षर असायच्या. त्यामुळे दाखल होण्यास कबूल असणाऱ्या स्त्रियांना प्रवेश देऊन त्यांना प्रथम प्राथमिक शाळेचे शिक्षण द्यावयाचे व मग प्रशिक्षण द्यावयाचे; असेच प्रत्येक इलाख्यात करावे लागले. १८७८ पर्यंत ट्रेनिंग कॉलेजच्या प्रवेशासाठी निश्चित शैक्षणिक लायकीची अट ठेवता आली नाही. प्राथमिक तिसरी पास असल्याचा दाखला त्यासाठी पुरत असे. तरीही पुण्याच्या संस्थेमधून १८७० ते १८८२ ह्या काळात ३४ स्त्रिया शिक्षिका म्हणून बाहेर पडल्या; म्हणजे वर्षाला सरासरी तीन असे त्यांचे प्रमाण पडले. ह्याच काळात अहमदाबादेच्या संस्थेतून ३८ स्त्रिया पास झाल्या म्हणजे सरासरी प्रमाण तेच. १८८२ साली सर्व हिंदुस्थानात ट्रेनिंग कॉलेजमध्ये शिकणाऱ्या स्त्रियांची संख्या केवळ ५१५ होती. शिक्षिका कमी म्हणून शाळा कमी. सहशिक्षण देण्यास लोक तयार नव्हते. तरीही १८८२ साली १,२७,०६६ मुली शिकत होत्या, त्यांपैकी ४२,०७१ मुली मुलांच्या शाळेत जात होत्या.

## स्त्रियांसाठी निराळा अभ्यासक्रम; स्त्रियांना व्यवसायशिक्षण

ह्या काळातील लक्षात घ्यावयाची दुसरी एक बाब म्हणजे मुलींच्या स्वतंत्र शाळा स्थापन होऊ लागल्यावर मुलींसाठी विशेष अभ्यासक्रम असावा अशी मागणी होऊ लागली. १९ व्या शतकापर्यंत सामान्य प्रचलित मत असे होते की मुलींना पुढील आयुष्यात नोकरी करावयाची नसून संसार करावयाचा आहे, तेव्हा दिलेले शिक्षण संसारोपयोगी असले पाहिजे. तेव्हा त्यासाठी स्वतंत्र अभ्यासक्रम व स्वतंत्र पाठ्यपुस्तके असावी. मुलांच्या व मुलींच्या अभ्यासक्रमात फरक करण्याचे मान्य होऊन १८७७-७८

मध्ये मुलींसाठी निराळा अभ्यासक्रम रचण्याचे ठरले व शिवण-टिपण, चित्र वगैरे विषयांचा समावेश करण्यात आला. तसेच मुलींची लग्ने लवकर होत असल्याने चार वर्षांचाच प्राथमिक शाळेचा अभ्यासक्रम असावा हेही मान्य करण्यात आले. स्वतंत्र पाठ्यपुस्तके तयार करणे मात्र १९०६ पर्यंत अमलात आले नाही.

स्त्रियांच्या प्राथमिक शिक्षणाचे सरकारी तारू अशा रीतीने धिमेपणाने मार्ग क्रमीत असता, मिशनरी संस्थांनी मुलींच्या माध्यमिक शाळा काढण्याच्याही मार्गावर पुढचे पाऊल टाकले. त्याचा फायदा युरोपियन, अँग्लो इंडियन, हिंदी ख्रिश्चन व पारसी ह्या समाजांनी घेतला, तितका पुढारलेल्या हिंदू समाजाने घेतला नाही. हिंदू स्त्रिया बोटावर मोजण्याइतक्याच दाखल झाल्या. माध्यमिक शिक्षणाप्रमाणे धंदेवाईक शिक्षणाचीही थोडीफार सोय झाली. प्राथमिक ट्रेनिंग कालेज स्थापन झाली, त्यानंतर १८७५-७६ मध्ये ग्रँट मेडिकल कॉलेजमध्ये मिडविफरी (सूतिकाविद्या) वर्ग निघून नर्सिंग (रुग्णशुश्रूषा) ह्या धंद्याचेही शिक्षण स्त्रियांस मिळू लागले. काही मिशनरी संस्थांत शिवणविणकामासारखे घावे धंदे शिकविण्याची सोय करण्यात आली. ह्याचाही फायदा वर सांगितलेल्या समाजांनीच घेतला. पण धंदेशिक्षणात स्त्रियांस प्रवेश मिळू लागला ही घटना महत्त्वाची होय. स्त्रियांच्या उच्च शिक्षणाची सुरुवात मात्र अजून व्हावयाची होती; १८८१-८२ साली एकही स्त्री कॉलेजमध्ये शिकत नव्हती.

## पुराणमतवादामुळे प्रतिकूल परिणाम

स्त्रीशिक्षणाच्या ह्या काळच्या परिस्थितीचा विचार करताना दुसऱ्या एक विचारप्रवाहाचाही परामर्ष घेतला पाहिजे. वुडच्या खलित्यानंतर पुरुषांच्या उच्च शिक्षणाला वेग मिळाला. तिन्ही इलाख्यात विश्वविद्यालये स्थापन झाली. कॉलेजातून इंग्रज प्राध्यापकांच्या नेमणुका झाल्या. विश्वविद्यालयीन शिक्षणात पाश्चात्य वाङ्मय, पाश्चात्य समाजरचना, पाश्चात्य संस्कृती, ह्यांची ओळख झाल्याने आपल्याकडील काही आत्मभाषा कोविदांनी इंग्रज लोकांची भाषा, इंग्रज लोकांचे रीतरिवाज, इंग्रजांचा पेहेरवेश यांचा स्वीकार केला. इतकेच नव्हे तर काहींनी ख्रिस्तीधर्म स्वीकारला. ह्याचा परिणाम असा झाला की सामान्य जनतेला हे शिक्षण म्हणजे आपल्या धर्मावर व संस्कृतीवर आघात आहे असे वाटू लागले. लोक मिशनरी व सरकारी शाळांतून मुलेमुली पाठविण्यास तयार होईनात. तसेच काही विचारवंतांनी आपल्या धर्मात वाटणारी वैगुण्ये दूर करण्यासाठी ब्राह्मोसमाज, प्रार्थनासमाज किंवा आर्यसमाज स्थापून धर्माला कालानुरूप नवे वळण देण्याचे प्रयत्न केले व अशा रीतीने समाजात नव चैतन्य आणले. काही विचारवंतांना हे प्रयत्न आपल्या संस्कृतीस पोषक वाटले नाहीत. अशा रीतीने सुधारणेच्छू व पुराणमताभिमानी असे हिंदू समाजाचे दोन विभाग पडत चालले. ह्या विचारांच्या विविध लाटांनी मुलींच्या शिक्षणावर अनिष्ट परिणाम झाला. प्राथमिक शिक्षणाच्या एकदोन इयत्ता पुऱ्या होताच मुलींची लग्ने करून देण्याची प्रवृत्ती बहुजन हिंदू समाजात

पुनः वळावली. शाळांत नेमल्या जाणाऱ्या शिक्षिका बहुतांशाने ख्रिश्चन, ॲंग्लो इंडियन, ज्यू किंवा पार्शी असावयाच्या व माध्यमिक शाळेच्या मुख्य शिक्षिका इंग्रज असायच्या. त्या कारणांनी स्त्रीशिक्षणाचे पाऊल ह्या काळात थोडे मागेच आले.

ह्या कोंडीतून मार्ग काढण्याचा सुधारणावादी विचारवंतानी खूप प्रयत्न केला. स्वतःच्या बायकांना व मुलींना स्वतः किंवा खाजगी शिक्षकाकडून शिक्षण देण्याची काहींनी व्यवस्था केली. काहींनी दुसरे उपाय योजले. बंगालमध्ये झनाना स्कूल स्थापन करण्यात आले. १८८०–८१ मध्ये पंडिता रमाबाईंच्या खटपटीने व न्या. रानडे, डॉ. भांडारकर ह्यांच्या मदतीने आर्य महिला समाज स्थापन होऊन प्रौढ स्त्रियांना बहुश्रुत करण्याचा प्रयत्न झाला. त्यांच्या सभासदांस पुराणे, व्याख्याने, चर्चा ह्यांच्या द्वारा आपल्या संस्कृतीचें तसेच सद्य:स्थितीचे सम्यक ज्ञान मिळू लागले. सभा दर शनिवारी भरत. सामान्य कार्यक्रमाबरोबर भाषा, खगोलशास्त्र, इतिहास, शरीरशास्त्र, भूगोल, इतिहास इत्यादी विषयांचेही ज्ञान पुरुष वर्गाच्या मदतीने देण्यात येई. केरोपंत छत्रे पुण्यास व सदाशिवराव केळकर हे मुंबईस ह्या समाजकार्याकडे विशेष लक्ष देत. श्री. रमाबाईसाहेब रानडे, काशीबाई कानिटकर वगैरे स्त्रिया अशाच मार्गाने शिकल्या.

बडोद्याला श्रीज्ञानशाला ह्याच हेतूने अमलात आल्या. शाळेत न जाणाऱ्या स्त्रियांसाठी शिक्षिका पाठवून घरोघर ज्ञान देण्याची प्रथा सुरू झाली. वेळ दुपारी २ ते ५. विद्यार्थिनींचे वय ११ वर्षांवरील. विषय : स्वच्छता, आरोग्य, शिशुसंगोपन रुग्णपरिचर्या, ह्याशिवाय भाषा. ज्ञान कायम ठेवण्यासाठी फिरते वाचनालय, व्याख्याने, मॅजिक लॅंटर्न ही साधने. शिवण, भरतकामाची प्रदर्शने भरविणे, परीक्षा सहामाही घेणे, उत्तम यशासाठी बक्षिसे व शिष्यवृत्त्या देणे, अशा रीतीने ह्या ज्ञानशाळांचे काम चाले. स्त्रियांनी शाळेत येण्याऐवजी शाळा त्यांचे घरी जाई. बंगालची झनानाशाळा व बडोद्याची श्रीज्ञानशाळा ह्यांची जात एकच. पण श्रीज्ञानशाळा अधिक व्यवस्थित व योजनाबद्ध असावी असे दिसते.

### पुढचे पाऊल : 'हायस्कूल फॉर इंडियन गर्ल्स'

१८८२ साली हंटर कमिशन नेमून सरकारने शिक्षणाचा आढावा घेतला. कमिशनच्या शिफारसीत सेक्युलर शाळांना अनुदान देण्याबद्दल, मुलींचा अभ्यासक्रम स्वतंत्र व त्यांच्या अभिरुचीस अनुसरून करण्याबद्दल, त्यासाठी योग्य पाठ्यपुस्तके प्रसिद्ध करण्याबद्दल, फी व शिष्यवृत्त्या देण्याबद्दल, माध्यमिक शिक्षणास उत्तेजन देण्याबद्दल, स्त्रीविषयक सर्व खाजगी प्रयत्नांस उत्तेजन देण्याबद्दल, अशा अनेक स्त्रीशिक्षणास उपकारक शिफारसी होत्या. ह्या कमिशनपुढे इतर विद्वान पुढाऱ्यांबरोबर पंडिता रमाबाईंनी साक्ष दिली होती. त्यांच्या विद्वत्तेचा व बहुश्रुततेचा फार प्रभाव पडला. त्यामुळे कमिशनच्या शिफारशी स्त्रीशिक्षणास सर्व प्रकारे अनुकूल होऊन त्याला फार वेग मिळाला.

ह्याचा प्रत्यक्ष पुरावा म्हणजे पुण्यात १८८४ मध्ये स्थापन झालेली मुंबई इलाख्यातील पहिली मुलींची माध्यमिक शाळा. सर वेडरबर्न या उदारधी इंग्रज अधिकाऱ्याने मुलींच्या माध्यमिक शाळेसाठी स्वतःच्या मावाच्या स्मरणार्थ रु. १०,००० ची देणगी देऊ केली व न्यायमूर्ति रानडे प्रभृतींनी ती कल्पना उचलून धरून आपल्या स्त्रीवर्गाच्या मदतीने सरकारची त्यासाठी मान्यता मिळविली. सरकारकडे मागणी करतांना आर्य महिला समाजाच्या सदस्य श्री. रमाबाईसाहेब रानडे व काशीताई कानिटकर ह्यांनी पुढाकार घेतला होता. 'हायस्कूल फॉर इंडियन गर्ल्स' ह्या नावाने ती स्थापन झाली. पुढे 'हुजूरपागा' या ल्हान नावानेच ती ओळखली जाऊ लागली. खिश्चन शाळांतून मुली पाठविण्यास तयार नसलेल्या पालकांना ते एक वरदानच झाले. थोड्याच दिवसात शाळेची भरभराट झाली. पुराणमतवादी समाजाने ह्या संस्थेच्या स्थापनेस कडवा विरोध केला. इंग्रज बाई मुख्य अध्यापिका, पारसी व खिश्चन मास्तरणी व अभ्यासक्रम मुलांचाच ह्या कारणासाठी लोकमान्य टिळक प्रभृती मंडळींनी ह्या शाळेचा पुरस्कार केला नाही. सुधारणावादी समाजाने (ज्यात पारशी, मुसलमान, खिश्चन ह्यांचाही समावेश होता) ह्या संस्थेला संपूर्ण पाठिंबा दिला.

ह्या शाळेनंतर मुंबईस 'चंदारामजी हायस्कूल फॉर गर्ल्स,' 'आर्यन गर्ल्स हायस्कूल' इत्यादी शाळा निघाल्या. इतर इलाख्यातूनही मुलींच्या माध्यमिक शाळा स्थापन होऊ लागल्या. जेथे मुलींच्या शाळा नसतील तेथे मुलांच्या शाळेतही मुली पाठविण्याची काही लोकांची तयारी झाली. माध्यमिक शाळांतील अभ्यास पुरा झाल्यानंतर माध्यमिक शालान्त परीक्षेला त्या बसू लागल्या. ती परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्यांना कॉलेज प्रवेशास अडचण पडली नाही. मुंबई इलाख्यात मुली विश्वविद्यालयाच्या परीक्षांसाठी अर्ज करू लागल्या. तेव्हा मुंबई विश्वविद्यालयाच्या सीनेटने कोणताही विपमतावाद उत्पन्न केला नाही. 'नियमात ज्या ठिकाणी पुरुष शब्द असेल तेथे स्त्री ह्या शब्दाचाही त्यात अंतर्भाव होतो असे समजावे' असा एक सामान्य स्वरूपाचा ठराव करून ह्या प्रश्नाचा निकाल लावला. इंग्रज अमेरिकन स्त्रियांना हा हक्क मिळविण्यास कसे व किती झगडावे लागले ते आपण जाणतोच. कदाचित त्यांच्या लढ्याचाच हिंदी स्त्रीला फायदा मिळाला असावा.

१८८८ मध्ये बी. ए. परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्या मिस कार्नेलिया सोराबजी ह्या मुंबई विश्वविद्यालयातील पहिली पदवीधर स्त्री. ह्याच्या आधी अमेरिकेत जाऊन १८८६ मध्ये एम्. डी. पदवी मिळविण्याचे दिव्य पुण्याच्या एका महाराष्ट्रीय स्त्रीने केले होते. ती पहिली हिंदी स्त्री डॉक्टर आनंदीबाई जोशी होय. महाविद्यालयीन स्त्रियांची संख्या जास्त जास्त वाढू लागली, पण मुंबई इलाख्यात स्त्रियांसाठी स्वतंत्र महाविद्यालय काढण्याचे त्यावेळी कोणाच्या मनात आले नाही. कारण संख्या फार कमी व पडदा वगैरेची अडचण नव्हती. स्वतंत्र बाके टेवून भागे. १९०१ मध्ये मुंबई इलाख्यात ७९ स्त्रिया महाविद्यालयीन शिक्षण घेत होत्या व ३४९ धंदेशिक्षणाच्या संस्थांतून शिकत होत्या. स्त्रियांच्या माध्यमिक व उच्च शिक्षणात इतर इलाख्यांपेक्षा मद्रास इलाखा फार

पुढे होता. तेथे महाविद्यालयात जाणाऱ्या स्त्रियांची संख्या अधिक प्रमाणात असल्याने पढ्याची चाल नसणाऱ्या, स्वतंत्र महाविद्यालये स्थापन करण्याची गरज भासली. बंगाल्यात व उत्तर हिंदुस्थानात इतर ठिकाणी पडद्याच्या चालीमुळे स्वतंत्र महाविद्यालये स्थापन करणे भाग पडले.

## शतकाच्या अखेरीस स्त्रीशिक्षणाची मंद प्रगती

१८८२ ते १९०१ पर्यंतच्या कालखंडात माध्यमिक व उच्च शिक्षणाचे द्वार स्त्रियांस खुले झाले असले, तरी एकंदर स्त्रीशिक्षणाची वाटचाल विशेष गतिमान नव्हती असेच म्हणणे प्राप्त आहे. कारण १९०१ च्या खानेसुमारीप्रमाणे मुंबई इलाख्यात स्त्रियांची संख्या ८९,६२,७०८ होती पण शाळेत जाणाऱ्या मुलींची संख्या केवळ ९३,०६३ होती आणि त्यांपैकी ११,९८६ मुली सरकारमान्य नसलेल्या शाळांतून शिकत होत्या. यावरून साक्षरतेचे प्रमाण फक्त १% पडते. हे समाधानकारक कसे म्हणावयाचे ? ही गती कुंठण्याची थोडीशी कारणमीमांसा करणे इष्ट होईल.

१८८५ मध्ये राष्ट्रीय महासभा स्थापन झाली. तिच्या अधिवेशनाबरोबर सामाजिक परिषदही भरविण्यात येऊ लागली. राजकीय हक्कांच्या मागणीबरोबर सामाजिक सुधारणांबद्दल जागृती करण्याचे काम त्यामुळे सुरू झाले. हिंदुस्तानात निरनिराळ्या ठिकाणी ती अधिवेशने भरत असल्याने सामाजिक सुधारणांना वेग मिळाला. स्त्रियाही त्या अधिवेशनांत भाग घेऊ लागल्या, पण हातूनच राजकीय सुधारणा आधी, की सामाजिक सुधारणा आधी या मुद्यावर लोकाग्रणींत मतभेद होऊन त्यातून 'पुराणमतवादी' व 'सुधारक' ह्या नावाऐवजी 'जहाल' व 'मवाळ' या नावांचे हिंदी पुढाऱ्यांचे दोन पक्ष निर्माण झाले. ह्या वादामुळे स्त्रियांची सामाजिक स्थिती सुधारण्याच्या कामी व्यत्यय येऊन स्त्रीशिक्षणाच्या प्रगतीवरही त्याचा परिणाम झाला. त्यामुळे प्रयत्न करूनही मुलींचे लग्नाचे वय फारसे वाढेना. १८५६ मध्ये विधवाविवाहाचा कायदा होऊनही पुनर्विवाहाचे प्रमाण वाढत नव्हते व बालविधवांची संख्या घटत नव्हती. व संमतिवयाचे दोन कायदे पास होऊनही १२ वर्षांचे वर ती वयोमर्यादा जाऊ शकली नाही. प्रागतिक विचारांना अज्ञानामुळे सामान्य जनतेचा पाठिंबा नव्हताच, त्यात सुशिक्षित पुढाऱ्यांत दोन तट पडून जहालांकडून विरोध होऊ लागला त्यामुळे सामाजिक व शैक्षणिक प्रगतीचा वेग थोडा काळ थंडावला.

## पंडिता रमाबाईंचे प्रयत्न

ह्या काळात सरकारी, निमसरकारी प्रयत्न चालू असता स्त्रीशिक्षणास हातभार लावण्याचे काही वैयक्तिक प्रयत्न झाले. त्यांचाही उल्लेख केला पाहिजे. पंडिता रमाबाईंनी अमेरिकेत असताना **'Hindu High Caste Woman'** नावाचे पुस्तक लिहून व तुफानी व्याख्यान-दौरे काढून हिंदी स्त्रीसमाजाची त्या वेळची स्थिती तेथे

समजावून सांगितली व हिंदी विधवा स्त्रीच्या उद्धारासाठी कार्य करण्यास असोसिएशन स्थापून लाखो रुपये मिळविले. इंग्लंडमध्ये त्यांनी खिस्ती धर्म स्वीकारला होता. १८८९ मध्ये हिंदुस्थानात आल्यावर 'रमाबाई असोसिएशन'तर्फे मुंबई व पुणे येथे खास विधवांसाठी 'शारदासदन' नावाची संस्था कशी काढली व काही हिंदू स्त्रिया खिश्चन झाल्याने प्रागतिक लोकांचा मिळणारा पाठिंबा बंद होऊन, त्यांना केडगाव येथे 'खिस्ती मिशन' कसे स्थापावे लागले हा इतिहास त्यांच्या चरित्रावरून सर्वांस माहीत आहे. ज्यांना ठाऊक नाही त्यांनी अवश्य वाचला पाहिजे. एक बाणेदार हिंदी स्त्री स्वतःच्या विद्वत्तेने व कर्तृत्वाने जगाला वशी कशी करून सोडते, त्याचे हे ज्वलंत उदाहरण आहे. अजूनही हजारो गरीब व असहाय, विधवा, सधवा, व मुले त्यांच्या संस्थेचा फायदा घेऊन स्वतःचे जीवन सुखाने कंठीत आहेत. हिंदू समाजाला त्यांच्या कार्यापासून विन्मुख रहावे लागले ही दुर्घटना होय. त्या खिस्ती बनल्याने हिंदू समाज त्यांना मुकला. तरीही त्यांनी केलेल्या प्रयत्नाबद्दल त्यांचे ऋण स्वीकारणे आपले कर्तव्य आहे. विधवा,स्त्रियांच्या शिक्षणाचे द्वार त्यांनीच खुले केले.

## अण्णासाहेब कर्वे यांचे कार्य

'शारदासदन' अशा रीतीने बंद झाल्यावर हिंदू विधवांच्या शिक्षणाचा प्रश्न पूज्य अण्णासाहेब कर्वे यांनी सोडविला. विधवा पुनर्विवाहाने विधवांच्या जीवनाचा प्रश्न सुटणार नाही याबद्दल खात्री झाल्यावर त्यांनी त्यांना शिक्षण देऊन स्वतःच्या पायावर उभे करण्यासाठी अनाथ बालिकाश्रम नावाची संस्था काढली व पंडिता रमाबाईने सुरू केलेले काम पुढे चालविले. १८९६ मध्ये पुण्यास सुरू केलेली ही संस्था १९०० साली हिंगणे खेड्यात नेण्यात आली व तिचा पुढे कसा विकास झाला ह्याची साद्यंत हकिकत त्यांच्या चरित्रात आलेली आहेच. अनेक विधवांना आश्रमाचा आसरा मिळून शिक्षणाने त्या स्वावलंबी झाल्या व मानाचे जीवन जगल्या. 'शारदासदनाची' पहिली विधवा विद्यार्थिनी गोदूबाई. अण्णांशी तिने पुनर्विवाह केल्यावर, शारदासदनातून नंतर बाहेर पडलेल्या श्री. काशीताई देवधर, श्री. वेणूताई नामजोशी, वगैरे स्त्रियांनीच अण्णांच्या ह्या कार्याला उठाव दिला हेही नमूद करण्यासारखे आहे.

शारदासदन, अनाथबालिकाश्रम स्थापन झाल्याने बाल व प्रौढ विधवांच्या प्राथमिक व माध्यमिक शिक्षणाचा मार्ग मोकळा झाला. प्रौढ स्त्रीशिक्षणाच्या दृष्टीने सुरू झालेल्या उपक्रमातही भर पडली. बंगालमध्ये ब्राह्मो समाजाने या दिशेने प्रयत्न केले. ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांचे कार्य ह्या संदर्भात अवश्य ध्यानात घेतले पाहिजे.

खिश्चन धर्माच्या प्रसाराला आळा घालण्याचे जे प्रयत्न ह्या काळी चालू होते, त्यात केशवचंद्र सेन व स्वामी विवेकानंद ह्यांची कामगिरी विशेष मोलाची होती. इंग्लंड अमेरिकेत दौरे काढून हिंदू वेदांत तत्त्वज्ञानाला त्यांनी जगात मान्यता मिळवून दिली. हिंदू धर्मीयांचा स्वधर्मावरचा विश्वास पुनरुज्जीवित करून आर्यधर्माच्या श्रेष्ठतेची

छाप विचारांवर पडून दिली. हिंदू स्त्रीचे पूर्ववैभव व सामर्थ्य तिला प्राप्त व्हावे ह्या दृष्टीने तिला ज्ञान देण्यासाठी स्वामी विवेकानंदांनी सिस्टर निवेदितेच्या मदतीने 'बालिकासदन' नावाची संस्था काढली. १८९८ मध्ये ती स्थापन होऊन १९०५ पर्यंत ती चालू होती. इतर शिक्षणाबरोबर हिंदू धर्मतत्त्वांच्या अभ्यासास विशेष महत्त्व दिले होते. वेदकालीन स्त्रियांप्रमाणे ब्रह्मवादिनी स्त्रिया निर्माण व्हाव्या ही मनीषा होती. सिस्टर निवेदितांच्या मृत्यूनंतर तिचे कार्य पुढे चालले की नाही ह्याचा पत्ता लागत नाही वंगभंगानंतरच्या राजकीय धुमश्चक्रीत ती विस्मरणात गेली असावी. अल्पकाळ टिकली तरी एक नवीन दिशा या दृष्टीने तिचे फार महत्त्व आहे. आर्य समाजाने ह्याच दिशेचे पुढे अनुसरण केले हे दिसेलच.

आतापर्यंतच्या विवेचनात १९ व्या शतकातील स्त्रीशिक्षणाची वाटचाल व प्रयोग ह्यासंबंधीचा आढावा घेतला आहे. त्यावरून त्या शतकारंभीची शैक्षणिक परिस्थिती व शतक पुरे झाले तेव्हाची परिस्थिती ह्यात महदंतर पडले होते असे कबूल करावे लागेल. त्यातील प्रगती एकंदरीने मंद असली तरी अडचणीही दुर्गम होत्या. जेथे एकही प्राथमिक शाळा व एकही मुलगी शिकत नव्हती, तेथे लाखांनी मुली शिकू लागल्या होत्या. स्त्रियांच्या प्राथमिक शिक्षणाला संपूर्ण समाजाची मान्यता मिळून माध्यमिक व उच्च शिक्षणासही विशेष विरोध होईनासा झाला होता.

## विसावे शतक : १९०१–१९३७

### राजकीय विचारमंथनामुळे स्त्रीशिक्षणास चालना

विसाव्या शतकाची सुरुवात झाली, तेव्हा नुकत्याच पडून गेलेल्या भयंकर दुष्काळा-मुळे व प्लेगसारख्या रोगराईमुळे प्रजा संत्रस्त झाली होती. इंग्रज राज्यकर्त्यांनी त्या वेळेस केलेल्या बेजबाबदार वर्तनाने सुशिक्षित समाजाला त्याच्याबद्दल चीड आली होती. सरकारने जुलुमाने केलेल्या वंगभंगामुळे सुधारणावादी समाजही असंतुष्ट झालेला होता. चहुबाजूंनी परिस्थितीवर मात करण्याचे प्रयत्न सुरू होते. मवाळ पुढाऱ्यांची राष्ट्रीय महासभेद्वारा राजकीय हक्कांसाठी चळवळ व समाजसुधारकांची सामाजिक परिषदेद्वारा समाजसुधारणेबद्दल जागृती आणि जहाल पुढाऱ्यांची अराजक कारस्थानांचे द्वारा सरकारच उखडून पाडण्याची धडपड असा तिहेरी सामना हिंदुस्थानभर चालू झाला. अशा वेळी राज्य टिकविण्यासाठी इंग्रज सरकारने प्रजेला विश्वासात घेऊन शक्य तितके मिळते घेऊन वेळ निभाऊन नेण्याचे धोरण स्वीकारले. ही सर्व परिस्थिती स्त्रीशिक्षणाचे विकासास उपकारक ठरली. कशी ते पाहाणे मनोरंजक होईल.

स्त्रीशिक्षणास फारसे महत्त्व न देणाऱ्या जहाल पक्षास हिंदुस्थानची अर्धी प्रजा अशिक्षित अज्ञानी ठेवणे धोक्याचे आहे हे उमगले. देवी सरोजिनी नायडू, डॉ. ॲनी बेझंट ह्या स्त्रियांनी राष्ट्रीय परिषदेत व होमरूल चळवळीत प्रत्यक्ष भाग घेतला. महात्मा

गांधींनी तर असहकार चळवळीत स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीने सामील करून घेतले.

सरकारने प्रजेस खूष करण्यास १९०९ व १९१९ साली दोन राजकीय सुधारणा-कायदे पास करून सरकार लोकानुवर्ती करण्याचे प्रयत्न केले. त्यात स्त्रियांनाही मर्यादित मतदानहक्क मिळाला. त्याचा फायदा घेऊन सुधारणावादी पक्षाने स्त्रियांच्या प्रगतीस अनुकूल असे कायदे पास करून घेतले. संमतिवयाची मर्यादा १४ झाली. बालविवाहास बंदी झाली. अधिक कालपर्यंत शालेय शिक्षण घेण्यास व देण्यास संधी प्राप्त झाली. १९१८ च्या युद्धामुळे आर्थिक परिस्थिती खालावल्याने नोकरी मिळेपर्यंत मुलाचे लग्न करणे लांबणीवर पडू लागले व वधू शिक्षित असावी अशी मागणी वाढली, इत्यादी कारणांनीही मुलींना शिक्षणास पुरेसा अवसर मिळू लागला.

लॉर्ड कर्झनच्या १९०४ च्या शैक्षणिक निवेदनात 'मुलामुलींचे शाळेतील प्रमाण नवास एक आहे. शेकडा २·४९ मुलीच शाळेत जातात' असे म्हटले होते. १९१३ च्या ठरावाने ही परिस्थिती सुधारण्यास पडदास्त्रियांसाठी गव्हर्नेस नेमण्याची व प्रत्येक प्रांतातील रीतिरिवाज निरनिराळे असल्याने त्यांस अनुसरून शैक्षणिक उपाय योजण्याची शिफारस केली. व्यवहारी शिक्षण, मुलांपेक्षा वेगळे अनुरूप विषय व आरोग्यास योग्य वातावरण यावरहि भर दिला. अधिक शिक्षिका व स्त्रीतपासनीस नेमण्याची सूचना दिली.

## माध्यमिक आणि उच्च शिक्षण वाढीला लागले

त्या सूचनांनी माध्यमिक शिक्षण वाढीला लागले. उच्च शिक्षणाचे क्षेत्रही विस्तृत झाले. गेल्या शतकात स्त्रिया बुद्धीने कमी असल्याने त्यांना मुलांच्याबरोबर तेच शिक्षण देणे बरोबर नाही. त्यांच्या नाजुक प्रकृतीस ते मानवत नाही असा बहुजनसमाजाचा समज होता. मॅट्रिक व नंतरच्या उच्च परीक्षात पहिले दुसरे नंबर मिळवून मुलींनी ह्या जनमताला सुरुंग लावला. १९०५ मध्ये कुमारी रुबेन मॅट्रिकला पहिल्या आल्या. १९१६ मध्ये श्री. तापीबाई हर्डीकर ह्यांनी (उशीरा शिक्षणास सुरुवात करूनही) एम्. ए. व बी. एस्सी. ह्या दोन्ही परीक्षा एकाच वर्षी देऊन वरचा वर्ग पटकावला. त्यानंतर हा विक्रम अनेकांनी केला व आनुषंगिक मान व पदव्या मिळविल्या. 'प्रगतिपथावर' ह्या हुजुरपागेच्या सुवर्ण-महोत्सव ग्रंथात अशी नावे नमूद आहेत. मुलींच्या अशा पराक्रमाने स्त्री वर्गात आत्म-विश्वास उत्पन्न झाला आणि मुंबई विश्वविद्यालयाच्या विविध परीक्षांसाठी महाविद्यालयातून प्रवेश मिळवून शिक्षणक्षेत्रातील अनेक शाखांत त्या चमकू लागल्या. १९०१ मध्ये कॉलेजमध्ये शिकणाऱ्या मुलींची संख्या ७५ होती ती १९३७ मध्ये १२४५ वर गेली. मुंबई इलाख्याप्रमाणे इतर प्रांतांतही घडले. महाराष्ट्रात मुंबई विश्वविद्यालयास जोडलेली मुलींची स्वतंत्र महाविद्यालये निघाली नाहीत, पण माध्यमिक शाळा व ट्रेनिंग कॉलेजे निघाली. ह्या बाबतीत सरकारी प्रयत्नाबरोबर काही खाजगी प्रयोगही सुरू झाले.

पदवीधर स्त्रियांनी महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेरही माध्यमिक शाळा काढण्यास पुष्कळ मदत केली. अण्णासाहेब कर्व्यांनी कुमारिका मुलींकरिता 'महिला विद्यालय'

नावाची संस्था १९०७ मध्ये काढली, तीत त्याची वयोमर्यादा वाढविण्याच्या हेतूने होतकरू गरीब मुलींना २० वर्षांपर्यंत विवाह न करण्याच्या अटीवर शिष्यवृत्ती देऊन शिकविले. त्यासाठी त्यांनी फंड उभा केला. लवकरच ही संस्था नावारूपाला आली, व पुढे अनाथबालिकाश्रमातच विलीन झाली.

## रमाबाई रानडे : सेवासदन

श्री. रमाबाई रानड्यांनी १९०९ मध्ये श्री. मलबारी ह्या पारशी दानशूर गृहस्थांच्या विनंतीवरून मुंबईस सेवासदन नावाची संस्था काढली. सेवासदनाने प्राथमिक शिक्षणात प्रौढ स्त्रियांचा भार उचलला. पूर्वी आर्यमहिलासमाज जे काम करी ते, पंडिता रमाबाई केडगावी गेल्यावर, हिंदु लेडीज क्लब स्थापून श्री. रमाबाई रानडे करू लागल्या होत्या. न्या. रानडे यांच्या निधनानंतर त्यांनी 'सेवासदन' संस्था प्रागतिक नेत्यांच्या मदतीने स्थापन केली. विवाहित स्त्रियांसाठी साक्षरतावर्ग, शिवणवर्ग, गायनवादन व चित्रवर्ग, असे करता करता, त्यांनी ट्रेनिंग कॉलेज, नर्सिंग व मिडविफरी वर्ग काढून, धंदेशिक्षणाचीही सोय केली. मुंबईस ही संस्था स्थापून झाल्यावर १९१४ साली त्यांनी नामदार गोखले व गो. कृ. देवधर यांच्या मदतीने पुण्यास तिची शाखा काढली. ती काढल्यावर मुंबईची जबाबदारी एका समितीवर सोपवून पुण्याच्या संस्थेची संपूर्ण जबाबदारी त्यांनी स्वीकारली. हळूहळू निरनिराळ्या शहरी शाखा काढून इतर प्रांतांतही तसे काम करण्यास त्यांनी उत्तेजन दिले.

१९०९ मध्ये इंग्लंडमधील विमेन्स कौन्सिलच्या शिक्षण समितीने स्त्रीशिक्षणात शास्त्रीय विषयात गृहविज्ञान विषयास स्थान मिळावे अशी मागणी केली. १९१३ च्या शिक्षणविषयक निवेदनातही स्त्रियांचा अभ्यासक्रम मुलांपेक्षा वेगळा असावा असे सरकारी सूचन आहे. हिंदुस्थानात ह्या काळापूर्वीपासून पुराणमतवादी समाजाचा मुलामुलींच्या एकत्र अभ्यासाबद्दल असंतोष व विरोध होता. १९०५ च्या बंगभंग चळवळीपासून इंग्रजी शिक्षणपद्धतीचा तिरस्कारही उत्पन्न होऊन स्वभाषेचा व तिच्यामार्फत लोक शिक्षणाचा प्रचार करण्याचे प्रयत्न चालू झाले होते. इंग्रजी भाषेचे माध्यम शिक्षणप्रसाराच्या आड येते हे अनेक हिंदी व इंग्रज विचारवंतांनी मान्य केले होते. १९१५–१६ ला ह्या विषयावर निबंध लिहून बॅरिस्टर पी. जे. मेहतांनी इंग्रजी माध्यमापासून होणारे तोटे विशद केले होते. बहुजनशिक्षणप्रसारास मातृभाषेसारखे दुसरे माध्यम नाही हे सर्व शिक्षणतज्ज्ञांनी कबूल केले होते. पण मेकॉलेसाहेबांच्या 'मिनिट'ला डावलून सरकारचे हित होणार नव्हते. तेव्हा आपल्यास अनुकूल असणाऱ्या प्रागतिकांचा आसरा घेऊन सरकारने आपले धोरण बदलले नाही.

## कर्वे यांचे भारतवर्षीय महिला विद्यापीठ

ह्या परिस्थितीची कोंडी फोडण्याचे विचार येथील काही समाजनेत्यांच्या मनात

घेऊ लागले. त्यांपैकी आण्णासाहेब कर्वे हे प्रमुख होत. इतर बाबतीत त्यांनी जसे प्रयोग केले तसेच ह्याही बाबतीत करण्याचे त्यांनी निश्चित केले. स्त्रियांपुरता विचार करून त्यांनी तो अंमलात आणण्याचे ठरविले. असे विचार मनात येण्याला व जपानच्या स्त्रियांच्या विश्वविद्यालयाचे माहितीपत्रक हाती येण्याला कशी एक गाठ पडली व हिंदुस्थानातील स्त्रियांचे पहिले विद्यापीठ स्थापण्याचा विडा त्यांनी कसा उचलला हा अद्भुत वृत्तांत त्यांच्या भाषेत त्यांच्या आत्मवृत्तातूनच वाचावा. १९१६ मध्ये 'भारतवर्षीय महिला विद्यापीठ' अस्तित्वात आले. (१) मातृभाषेला बोधभाषेचे स्थान (२) इंग्रजी दुय्यम पण आवश्यक विषय (३) स्त्रीजीवनास उपयोगी शास्त्रांचा आवश्यक विषयात समावेश (४) बाकीची शास्त्रे, भाषा ह्यांचे बरोबर ललितकला विषयांना ऐच्छिक विषयात स्थान व (५) मातृभाषेचा आवश्यक अभ्यास ह्या पंचसूत्रीवर त्यांनी युनिव्हर्सिटीचा अभ्यासक्रम रचला. महाविद्यालयीन अभ्यासक्रमाची मुदत तीन वर्षे, खाजगी अभ्यास करून परीक्षा देण्याची सवलत, ज्या विषयात ५० टक्के गुण मिळतील त्या विषयात सूट देण्याची व परीक्षा हप्त्याहप्त्याने उत्तीर्ण होण्याची व्यवस्था इत्यादी तिची दुसरी आकर्षणे होती.

ह्या अभिनव विश्वविद्यालयाचा अभ्यासक्रम लोकसंमत व लोकप्रिय करण्यास कै. बापूसाहेब चिपळूणकर ह्यांच्यासारखे खंदे प्रचारक त्यांस लाभले. लवकरच प्रयत्नास यश येऊन अनेक शहरी विद्यापीठाला जोडलेल्या शाळा निघाल्या. ह्या विद्यापीठातून बाहेर पडणाऱ्या पदवीधर स्त्रियांनीही ह्या कामी पुष्कळ हातभार लावला. पुढे १९२० मध्ये दानशूर शेठ विठ्ठलदास ठाकरसी ह्यांच्या देणगीने विद्यापीठ भक्कम पायावर स्थिर झाले. आज सामान्य पदवीपरीक्षेशिवाय, माध्यमिक प्रशिक्षण पदवी, गृहविज्ञान पदवी, परिचारिका पदवी वगैरे खास अभ्यासक्रम ह्या विद्यापीठाने सुरू केले आहेत. जोडलेल्या महाविद्यालयांची संख्या वाढून हजारो स्त्रिया त्याचा लाभ घेत आहेत. आजही स्त्रियांसाठी असे हे एकमेवाद्वितीय असे विद्यापीठ आहे. स्त्रियांच्या माध्यमिक व उच्चशिक्षणाची प्रगती करण्यात ह्या शतकात ह्या विद्यापीठाने निश्चितपणे उल्लेखनीय कामगिरी केली आहे.

## इतर प्रांतांतील स्त्रीशिक्षणाचे प्रयोग

मुंबई प्रांतात झाले तशा तऱ्हेचे पण जरा वेगळे असे स्त्रीशिक्षणाचे प्रयोग उत्तर हिंदुस्थानातही झाले. पंजाबमध्ये जालंदर येथे स्वामी श्रद्धानंद ह्या आर्यसमाजनेत्याच्या प्रेरणेने लाला देवराज सोंधी ह्यांनी १८९८ च्या सुमारास स्त्रियांच्या शिक्षणासाठी एक संस्था सुरू केली. धर्मसुधारणा हा मूळ उद्देश असल्याने कुमारिका मुलींसाठी 'गुरुकुल कांगडी' च्या धर्तीवर एक गुरुकुल त्यांनी सुरू केले. त्यास 'जलंदर कन्या गुरुकुल' नाव दिले. तेथील शिस्त फार कडक असे. हातात बांगड्या किंवा अंगावर अलंकार धारण करण्यास बंदी होती. शाळेचा पोशाख पिवळी साडी व पिवळे पोलके असे. अभ्यास पुरा होईपर्यंत पालकांचे घरी जाणे वर्ज्य असे. ८ व्या वर्षी मुलींची मुंज झाल्यावर त्यांना होमहवनादी क्रिया सायंकाळ कराव्या लागत. अभ्यास-विषयात संस्कृत, हिंदी,

संगीत (गायनवादन), इतिहास, भूगोल व धार्मिक ग्रंथांचे पठण ह्यांचा समावेश असे. अभ्यास पुरा झाल्यावर दीक्षांतविधि होऊन 'स्नातिका' ही पदवी मिळे. १९२७ पर्यंत हीच व्यवस्था होती. त्यानंतर मनू पालटला. उन्हाळ्याच्या सुट्टीत मुली घरीं जाऊ लागल्या. १९३० पर्यंत इंग्रजीचा शिरकाव नव्हता. त्या साली तिला स्थान मिळाले. १९३३ मध्ये पालकांचे मागणीवरून मॅट्रिक व इतर परीक्षांचा अभ्यासही सुरू झाला. आता एम्. ए.पर्यंत ही अभ्यासकक्षा गेली आहे.

कुमारिकांच्या शिक्षणाबरोबर विधवा व परित्यक्ता, अशक्त यांच्यासाठीही निराळ्या संस्था काढण्यात आल्या. मात्र विधवाश्रम, अनाथाश्रम, इत्यादी विभाग राहाण्याच्या दृष्टीने अगदी निराळे ठेवण्यात आले. लाला देवराज ह्यांची ही कामगिरी पंजाबी हिंदू स्त्रियांच्या शिक्षणात संस्मरणीय आहे.

ह्याच धर्तीची संस्था पंजाबचे स्वर्गस्थ आत्माराम पंडित ह्यांनी बडोदे संस्थानात १९२५ साली सुरू केली. तिचे नाव 'आर्यकन्यामहाविद्यालय.' ही संस्थाही पंजाबच्या कन्यागुरुकुलाप्रमाणे स्वतंत्र अभ्यासक्रमाचे शिक्षण देते. शिस्तपालनाचे सर्व नियम त्याचप्रमाणे असून बौद्धिक अभ्यासक्रमाबरोबर शारीरिक शिक्षणाचाही भरपूर अभ्यास येथील कन्यांना करावा लागतो. लाठी, लेजिम, धनुर्विद्या, जबिया, नेमबाजी, ह्या सर्व प्रकारांबरोबर खो खो, आट्यापाट्या, लंगडी, हे देशी व थ्रो बॉल, नेटबॉल हे विदेशी खेळही त्या शिक्षणात व त्यात तरबेज होतात. एकंदर अभ्यासक्रम १३ वर्षांचा असून १० वर्षे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण व तीन वर्षे महाविद्यालयीन शिक्षण अशी विभागणी आहे. बौद्धिक विषयांत चार भाषांना आवश्यक स्थान आहे. संस्कृत, हिंदी, इंग्रजी व गुजराती. हिंदी व गुजराती बोधभाषा असून संस्कृत पहिल्यापासून शेवटपर्यंत आवश्यक असते. इंग्लिश फक्त प्रवेशपरीक्षेपर्यंत (एस्. एस्. सी.) आवश्यक, नंतर ऐच्छिक. इंग्लिशमध्ये पास न होणाऱ्यांनाही कॉलेजमध्ये प्रवेश मिळतो. ह्या शिवाय गृहविज्ञान आवश्यक असून मानसशास्त्र, स्वयपाकशास्त्र, धुलाईविज्ञान, शिवणकर्तन, विणकाम, टोपलीकाम ह्यांचा त्यात समावेश आहे. ललितकलांच्या (नृत्य, संगीत, चित्र) अभ्यासक्रमाकडेही विशेष लक्ष पुरविण्यात येते. एस्. एस्. सी. व बी. ए.च्या तोडीच्या स्वतंत्र परीक्षा असून त्यांची अनुक्रमे 'विशारद' व 'भारती समलंकृता' अशी नावे आहेत. गुजरातेतील ही एक नमुनेदार संस्था असून पोरबंदर, जामनगर, सोनगड ह्या ठिकाणीही ह्या संस्थेच्या स्नातिकांनी (पदवीधरांनी) तशाच माध्यमिक शाळा सुरू केल्या आहेत. आर्यधर्म व संस्कृती यांचे संरक्षण करण्याच्या उद्देशाने महर्षी स्वामी दयानंदजी सरस्वती ह्यांनी स्त्रीशिक्षणाला असे वळण लावले. पंजाबमध्ये कन्याशिक्षणाचे ते आद्यप्रणेते होत.

संयुक्त प्रांतामध्ये १९२२ मध्ये 'प्रयाग महिला विद्यापीठ' नावाची संस्था निघाली. मुलींच्या माध्यमिक व उच्च शिक्षणाला योग्य वळण लावण्याच्या दृष्टीने ती अस्तित्वात आली. मातृभाषेतून सर्व शिक्षण, देशी भाषांचा अभ्यासक्रमात समावेश, विविध शास्त्रे

व कला ह्यांना स्थान, विद्यार्थिनींना विषयसंतीय भरपूर अवकाश, अशा रीतीने अभ्यासक्रमाची रचना होती. परीक्षांची नावे पुढीलप्रमाणे होती — प्रवेशिका, विद्याविनोदिनी, सुगृहिणी, विदुषी (पास व ऑनर्स) सरस्वती व भारती. एस्. एम्. सी. व नंतरच्या महाविद्यालयीन क्रमवार परीक्षा ह्यांची ती प्रतिनामे असावीत. आज ही संस्था आहे की नाही, असल्यास कोणत्या स्वरूपात आहे याची माहिती मिळत नाही.

## डॉ. ॲनी बेझंट यांचे सर्वव्यापी प्रयत्न

डॉ. ॲनी बेझंट ह्यांनी १९०४मध्ये काशी येथे मुलींची एक शाळा काढली. मिस फ्रान्सिस्का अरुंडेल ती चालवीत असत. पडद्यांनी झाकलेल्या गाडीतून मुली शाळेत येत. शिक्षण इंग्रजीत व इतर माध्यमिक शाळांप्रमाणेच असे. सर्वधर्मसमभावाचे (थिऑसफी धर्माचे) शिक्षण देणे व त्याचा प्रसार करणे हाही त्यात विशेष हेतू होता. ह्याच शाळेचे पुढे कॉलेजमध्ये रूपांतर झाले. थिऑसफिस्ट लोकांच्या मुलींनी त्याचा लाभ घेतला.

डॉ. ॲनी बेझंटनी मुलींची एक शाळा काढली येवढे सांगण्याने त्यांच्या शैक्षणिक कार्याची काहीच कल्पना येणार नाही. १९१३ मध्ये समाजसुधारणासंघ स्थापून त्याचे सभासद होणाऱ्या पुरुष व्यक्तीने '१७ वर्षेपर्यंत आपल्या मुलीचे लग्न करणार नाही आणि स्वतःच्या पत्नीस व मुलींना शिक्षित करीन' असे वचन देण्याची अट घातली. मुख्यत्वेकरून त्यांच्या प्रयत्नांनी १९२७ मध्ये अखिल भारतीय महिला परिषदेचा जन्म झाला. तिथे पहिले अधिवेशन पुण्यास होऊन स्त्रीशिक्षणाच्या स्वरूपासंबंधी चर्चा झाली व एक शिक्षणयोजना तयार केली गेली. १९२८ मध्ये सरकारने हर्टांग कमिशन नेमून हिंदुस्थानातील शिक्षणाची पहाणी करून शिफारसी करण्यास त्यास सांगितले. परिषदेने देवी सरोजिनी नायडू ह्यांच्या नेतृत्वाने एक शिष्टमंडळ पाठवून आपली 'शिक्षण योजना' कमिशनला सादर केली. डॉ. ॲनी बेझंट, डॉ. मुथुलक्ष्मी रेड्डी, मिसेस पी. के. सेन, बेगम हमीद अली, लेडी रुस्तुमजी फर्दुनजी, श्री. अमृतकुंवर यासारख्या स्त्रीपुढाऱ्याच्या कमिशनपुढे साक्षी झाल्या. त्याचा परिणाम किती झाला हे कमिशनच्या स्त्रीशिक्षणविषयक शिफारसींवरून कळेलच. त्यांपैकी प्रमुख अशा : (१) सर्व वेळ काम करणाऱ्या स्त्री शिक्षणाधिकारी नेमाव्या (२) स्थानिक सस्थांवर व शैक्षणिक समित्यावर स्त्री प्रतिनिधी असाव्या. (३) स्त्रीशाळा तपासनीस वाढवावे. (४) माध्यमिक शिक्षण लहान गावात व खेड्यात सुरू करावे. (५) प्राथमिक शिक्षण कार्यक्षम करावे व वाढवावे (६) त्यांतील अपव्यय थांबवावा. (७) प्राथमिक शाळांत सख्या कमी असेल तेथे सहशिक्षण देणे फायद्याचे. (८) शिक्षण सक्तीचे करणे कठीण पण शक्य तितकी संख्या वाढविण्याचा प्रयत्न करावा. (९) माध्यमिक शाळात मुलींसाठी पर्यायी अभ्यासक्रम तयार करावे. डिग्रीकोर्सबरोबर डिप्लोमा परीक्षाही ठेवाव्या. (१०) गृहजीवनशास्त्र, गायनवादन इत्यादी विषयास विद्यापीठांनी मान्यता द्यावी. (११) स्त्री शिक्षकांची सख्या वाढवावी व प्राथमिक शाळांसाठी प्रशिक्षण घेण्यास खेड्यांतील स्त्रियास उत्तेजन द्यावे.

अ. भा. परिषदेने स्वतःच्या काही कल्पनांना मूर्तस्वरूप देण्याचे ठरविले. त्यासाठी शिक्षण फंड उभा करून १९३२ साली दिल्ली शहरात 'लेडी अर्विन कॉलेज' स्थापन केले. गृहविज्ञान व त्याच्या अंगोपांगांचा सर्वांगीण अभ्यास व्हावा ह्या दृष्टीने सर्व साधनसामग्री जमविली व ४ वर्षांचा पदवी अभ्यासक्रम तयार करून काम सुरू केले. हे ह्या विषयाला वाहिलेले हिंदुस्थानातील पहिले महाविद्यालय होय. महर्षी कर्वे ह्यांनी गृहशास्त्राला माध्यमिक व उच्च शिक्षणात स्थान देण्यास सुरुवात केली पण पैसा व साधने ह्यांच्या अभावी तात्त्विक चर्चेवरच (थिअरी) भर दिला गेला. प्रायोगिक ज्ञानाची बाजू लंगडी पडली होती. हे कॉलेज निघाल्यावर इतर विश्वविद्यालयांनीही ह्या विषयांच्या अभ्यासाचा आपल्या अभ्यासक्रमात अंतर्भाव केला. त्यांना जोडलेल्या स्त्रियांच्या महाविद्यालयांतून त्यांचे शिक्षण सुरू झाले. श्री. ना. दा. ठा. विद्यापीठाला सरकारी मान्यता मिळवून देण्यासाठी महिला परिषदेने पुन्हा पुन्हा खास ठराव करून मदत केली. त्या विद्यापीठाची बोधभाषा मातृभाषा असल्याने इंग्रज सरकारच्या राज्यात त्याला मान्यता मिळाली नाही. हिंदुस्थानातील सुधारणावादी प्रागतिक पुढाऱ्यांनाही स्त्रीशिक्षणातील ह्या प्रयोगाला सक्रिय पाठिंबा नव्हता. त्याचाही विद्यापीठाच्या विकासावर प्रतिकूल परिणाम झाला.

हर्टाग कमिशनच्या अनुकूल शिफारशींमुळे व विमेन्स कौन्सिल, अ. भा. म. परिषद ह्या अखिल भारतीय संघटनांच्या प्रचारामुळे व धडपडीमुळे ह्या कालखंडाच्या शेवटल्या भागात हिंदुस्थानातील सर्व मोठ्या व लहान शहरांतून स्त्रियांच्या शैक्षणिक प्रगतीला चांगला वेग मिळाला. विस्तारभयास्तव सर्व प्रांतांतील शिक्षण प्रगतीचा आढावा न घेणे बरे. इतके निश्चित विधान करण्यास हरकत नाही की १९०१ च्या सुमारास मुलींचे प्राथमिक शिक्षण बरेच लोकमान्य झाले तसेच १९३७ च्या सुमारास माध्यमिक शिक्षणही लोकमान्य झाले आणि उच्च शिक्षणास होणारा विरोध नष्टप्राय झाला. स्त्रियांना कोणता शिक्षणक्रम द्यावा व त्याच्या अभ्यासक्रमाचे स्वरूप काय असावे याबद्दलचे तज्ज्ञांचे जे काही मतभेद असतील तेवढेच.

## सन १९३७ ते १९६६ पर्यंतचा कालखंड

ह्या नंतरच्या कालखंडात सर्व दर्जाच्या शिक्षणक्षेत्रात स्त्रियांचा शिरकाव झाला. १९३७ मधील प्रांतिक स्वायत्तता, १९४७ मधील स्वातंत्र्यप्राप्ती, व १९५० मधील सार्वभौम प्रजासत्ताकाची स्थापना ह्या राजकीय क्षेत्रातील तीन अलौकिक घटनांनी स्त्रियांच्या सर्वांगीण विकासास योग्य चालना दिली. महात्मा गांधींच्या प्रोत्साहनाने सामान्य स्त्रियांनीही असहकार चळवळीत हिरिरीने भाग घेतला. स्वातंत्र्यप्राप्तीसाठी झालेल्या 'चले जाव' आंदोलनात, पुरुषांबरोबर खांद्यास खांदा लावून त्यांनी सर्व प्रकारचे कष्ट व हाल सहन केले, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर राज्यघटना तयार करण्यात योग्यतेने भाग घेतला. त्यामुळे स्वातंत्र्यप्राप्तीनंतर निर्माण झालेल्या भारतीय सार्वभौम गणराज्याच्या राज्यघटनेने

समानतेचे सर्व हक्क त्यांना विनायासे बहाल झाले. १९४७ नंतरचा काल हा मिळालेले हक्क कृतीत कसे उतरतील ते पहाण्याचा व त्यासाठी प्रयत्न करण्याचा आहे.

## मूलोद्योग शिक्षणाचे प्रयोग

१९३७ ते १९४७ पर्यंतचा स्त्रीशिक्षणविषयक आढावा घेताना त्यावेळी चाललेले सामान्य शिक्षणातील प्रयोग पाहाणे जरूरीचे आहे. महात्मा गांधींनी राजकीय चळवळीला जोडूनच धार्मिक, सामाजिक व शैक्षणिक पुनर्रचनेचे व पुनरुत्थानाचे प्रयत्न केले. ह्या विषयीच्या आपल्या कल्पनांना व विचारांना, त्यांनी वर्धा आश्रमात असता, मूर्त स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. गांधीप्रार्थना हा धर्मकारणाचा भाग होता. अस्पृश्योद्धार, आंतर जातीय रोटीबेटीव्यवहार इत्यादी समाजकारणाचा भाग व ह्यांना उपकारक होईल अशी ज्ञान-योजना (शिक्षणपद्धती) हा शैक्षणिक भाग होता. आपणास शैक्षणिक पद्धतिविषयीचा विचार करावयाचा आहे. १९३७ मध्ये त्यांनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी इंग्रजी शिक्षणपद्धतीतील गुणदोषांचा विचार करून शिक्षणाची एक योजना तयार केली. व तिला 'वर्धायोजना' असे नाव दिले. 'मूलोद्योगपद्धती' हे तिचे दुसरे नाव. खेडोपाडी शिक्षणप्रसार करण्यास उपयोगी पडेल, ग्रामीण जनतेला जिचे महत्त्व पटेल व ती आकर्षित होईल, आणि ग्रामीण व नागरी जीवनातील अंतर जिच्यामुळे कमी करता येईल अशी शिक्षणपद्धती शोधण्याच्या प्रयत्नात ह्या पद्धतीने जन्म घेतला. सर्व भारतात प्राथमिक शिक्षणात ह्या पद्धतीचा अवलंब करावा अशी त्यांनी शिफारस केली. १९३७ ची कॉंग्रेस मंत्रिमंडळे १९४० लाच विलीन झाल्याने ही योजना लागू करून मोठ्या प्रमाणावर ह्या पद्धतीचा प्रयोग होऊ शकला नाही.

ह्या पद्धतीचा स्त्रीशिक्षणातील पहिला प्रयोग वर्ध्याच्या महिलाश्रमात झाला. सर्वधर्मप्रार्थना, अस्पृश्यता निवारण्यासाठी सडास सफाई, श्रमगौरव शिकविण्यासाठी सूतकताई-विणकाम, कृषिउद्योग, साफसफाई. उद्योग करीत असता त्याच्या अनुषंगाने व अनुरोधाने भाषा, इतिहास, भूगोल, शास्त्र ह्यांचा अभ्यास ह्या सर्व गोष्टी समाविष्ट करून वर्धा महिलाश्रमातील बालिकांना शिक्षण देण्यात येई. येथील आश्रमवासियात सर्वधर्मसमभाव, वस्त्रस्वावलंबन, अन्नस्वावलंबन, श्रमगौरव व सहजीवन इत्यादी सुखी समाज जीवनास अवश्य अशा गुणांचे पोषण होईल अशी त्यांची दिनचर्या ठरविलेली होती. 'वर्धा शिक्षण योजना' तयार होण्यापूर्वीही येथे हा प्रयोग चालू होता.

'वर्धा योजनेची' अभ्यासपद्धती निश्चित झाल्यानंतर जो प्रयोग झाला तो नडियाद येथे 'श्री विठ्ठल कन्या विद्यालय' ह्या संस्थेने केला. ही संस्था कै. वल्लभभाई पटेल यांच्या प्रोत्साहनाने अस्तित्वात आली. १९३७ नंतर ती स्थापन झाली असावी. शाळेला छात्रालय जोडलेले असून ते शाळेच्या आवारात होते. सर्व विद्यार्थिनींना छात्रालयात राहाणे आवश्यक होते. अभ्यासक्रम सहा वर्षांचा असून प्रवेशासाठी प्राथमिक चौथी पास ही शैक्षणिक लायकी ठरविलेली होती. अभ्यासविषयाचे चार भाग

असून गृहविद्या, मूलोद्योग, समाजविद्या व वर्गशिक्षण अशी नावे त्यांस दिली होती. (१) गृहविद्या विषयात गृहकार्य व गृहविज्ञान असे प्रात्यक्षिक व तात्त्विक ज्ञान देण्याची व्यवस्था असून छात्रालयातील स्वच्छता, संडासमफाई, स्वयंपाकपाणी, धुणेभांडी, ह्या सर्व रोजच्या कामाला महत्त्व दिले होते. त्याला इतर विषयांप्रमाणे गुण ठेवलेले असत त्यात उत्तीर्ण होणे आवश्यक होते. (२) मूलोद्योगात वस्त्रविद्या व कृषिविद्या ह्यांचा समावेश असे. पहिल्या तीन वर्षांत कृषिविद्येचे ज्ञान गृहविद्येत समाविष्ट केलेले होते. पुढील तीन वर्षांत तो निराळा गणला जाई. (३) समाजविद्या म्हणजे इतिहास, भूगोल व नागरिकशास्त्र. (४) वर्गशिक्षणात बाकीचे सर्व विषय येत. गुजराती व हिंदी भाषा सर्व वर्षांत आवश्यक, यांशिवाय गणित, सामान्यविज्ञान, संगीत, चित्रकला हे विषय असत, पण प्रत्येक विषय जीवनातील उपयुक्ततेकडे दृष्टी ठेवून प्रात्यक्षिक पद्धतीने शिकविला जाई.

वर्गाला श्रेणी म्हणत. पहिल्या तीन श्रेणींत अभ्यासाचे सर्व विषय असत. पण पुढच्या तीन श्रेणींत दोन शाखा पडत. एक विनीत परीक्षेची व दुसरी लोकशालान्त परीक्षेची. विनीत परीक्षेला संस्कृत व इंग्रजी आवश्यक असत. लोकशालान्त परीक्षेला इंग्रजीऐवजी विशेष गणित व अर्वाचीन भाषा हे विषय अधिक असत. विनीत परीक्षा पास होऊन गुजरात विद्यापीठाच्या समाजसेवा महाविद्यालयात व लोकशालान्त परीक्षा पास होऊन अध्यापनमंदिरात विद्यार्थिनींना प्रवेश मिळावा अशी योजना होती. आज ही शाळा कोणत्या स्वरूपात काम करते याची माहिती नाही. १९४८ पर्यंत तिचे स्वरूप वर वर्णन केल्याप्रमाणे होते.

याच प्रकारचा अभ्यासक्रम व शिक्षणपद्धती असणारी दुसरी संस्था होती. तिचे नाव श्री. कडवीबाई वीराणी कन्याशाळा. ती राजकोटला काठेवाडमध्ये स्थापन झाली. तिचे निराळे वर्णन देण्याची आवश्यकता नाही. श्री जुगतराम दवे यांनी सुरतेजवळ वेडछीच्या खेड्यातही हा प्रयोग केलेला आहे.

आणखी एका निराळ्या दृष्टीच्या शैक्षणिक प्रयोगाचा उल्लेख आवर्जून केला पाहिजे. श्री. पूर्णिमाबेन पक्वासा ह्यांनी १९५६ मध्ये 'शक्तिदल' नावाची संस्था स्थापन केली आहे. ग्रामीण व शहरी स्त्रियांना इतर सामान्य ज्ञानाबरोबर लष्करी शिक्षण देण्याची योजना आहे. घोड्यावर बसणे, बंदूक मारणे, जंबिया, जुजुत्सु, पर्वतारोहण, परेड इत्यादी बाबतीत स्त्रियांना तरबेज करण्याचा प्रयत्न असून स्त्रिया स्वतंत्र भारताच्या उत्तम नागरिक बनून आत्मरक्षण करण्याचे सामर्थ्य त्यांना प्राप्त व्हावे ही संस्थेची प्रमुख उद्दिष्टे आहेत.

सन १९४७ ते ६६ ह्या काळातील नमूद करण्याजोगे दुसरे शिक्षणप्रयोग पूर्वप्राथमिक क्षेत्रात, ग्रामीण शिक्षणक्षेत्रात व प्रौढ शिक्षणक्षेत्रात झाले. श्री. ताराबाई

# १९

# शिक्षणात स्त्रीचे स्थान

## चंद्राबाई कर्नाटकी

कु. चंद्राबाई श्रीनिवास कर्नाटकी, एम्. ए., बी. टी., टी. डी. (लंडन) एम्. डी. ईडी. (डब्लिन). (जन्म २६-४-१९०६) सेवानिवृत्त डेप्युटि डायरेक्टर ऑफ एज्युकेशन महाराष्ट्र राज्य. १८ वर्षे प्रिन्सिपल, ४ वर्षे इन्स्पेक्ट्रेस, ११ वर्षे डायरेक्टोरेट ऑफ एज्युकेशनमध्ये काम. शैक्षणिक, सामाजिक व धार्मिक विषयांवर सुमारे ५० लेख. सर्व सरकारच्या शिक्षण कमिटीवर. ('तारा', २४१ रास्ता पेठ, पुणे ११)

### सामाजिक क्रांतीचे प्रधान लक्षण : स्त्रीवर्गाची जागृती

भारताच्या सामाजिक इतिहासात इंग्रजी अमदानीत सुरू झालेल्या शिक्षणापासून आधुनिक युग सुरू झाले. त्या कालखंडात बुद्धिमान राष्ट्रांनी भारतीयांच्या वैचारिक प्रवाहांना जोर मिळाला आणि तेव्हापासून सुरू झालेल्या क्रांतीने भारतीय जीवनाची सर्व क्षेत्रे आज व्यापली आहेत.

या क्रांतीला प्रामुख्याने शिक्षणातील प्रगती आणि स्त्रीवर्गांचा उद्धार याबद्दलच्या विचारांनी सुरुवात झाली. स्त्रीला जागृत करण्याचे प्रश्न वेढू लागले, तसतसा शिक्षणातील प्रगतीनेही वेग घेतला. हळूहळू स्त्रीची व शिक्षणाची प्रगती परस्परावलंबी बनली. कारण जागी झालेली स्त्रीही इतरांना जागे करण्यात हातभार लावू लागली. तिचा स्वत्वाची जागृत होऊ लागली तसतशी ती अधिकाधिक कार्यप्रवण झाली व समाजाला तिच्या कर्तृत्वाचा फायदा मिळू लागला.

स्त्रीला जागृत केल्याखेरीज राष्ट्राचे पाऊल पुढे पडणार नाही हे ओळखणारे अनेक द्रष्टे भारताला लाभले. त्यांनी निरनिराळ्या बाजूंनी स्त्रीला पुढे यायला मदत केली. तिच्यावर होणारा अन्याय आणि छळ नष्ट करणारे कायदे झाले, तर एकीकडे सत्याग्रहासारख्या राष्ट्रीय स्वरूपाच्या व्यापक चळवळीतही महत्त्वाचा भाग घेण्याइतकी मानसिक ताकद तिच्यात निर्माण केली गेली. परंतु सर्वांत जास्त जोरदार प्रयत्न तिला शिक्षण देण्याच्या बाबतीत झाले आणि त्यामुळेच तिच्या कर्तृत्वाला सर्वच क्षेत्रांत वाव आला.

समाजविकासाच्या अनेक बाजू आहेत. पण शिक्षण ही सर्वांत व्यापक व प्रगतीचे सातत्य अखंड राखणारी बाजू आहे. राजकारण, समाजसेवा, उद्योग, कला किंवा इतर कोणत्याही क्षेत्रात कोणत्याही पातळीवरचे कार्य करणाऱ्या व्यक्तीला शिक्षणाचा पाया लागतो. स्त्रीच्या जीवनाची घडण या पायावर होऊ लागताच ती शिक्षणाचे महत्त्व ओळखू लागली व शिक्षणाच्या कार्यात कार्यकर्त्री बनली.

क्रान्तीच्या सुरुवातीला स्त्रीचे परावलंबित्व नष्ट व्हावे, हे पहिले उद्दिष्ट होते. कारण परावलंबित्वामुळेच तिला समाजात निकृष्टावस्था आली होती. हे परावलंबित्व जितके शारीरिक व आर्थिक होते, त्याहून जास्त वैचारिक होते. स्त्रीचे सगळे जीवनच मर्यादित संकुचित, चारी बाजूंनी बंद होते. शिक्षण घेऊ लागताच तिच्यामध्ये आत्मविश्वास व कर्तृत्वशक्तीची जाणीव उत्पन्न झाली. तिची दृष्टी विशाल झाली. तिला विकासाचा मार्ग दिसू लागला, तो मार्ग धरण्याचे धैर्यही आले व आपल्याला दिसू लागलेला विकासाचा मार्ग आपल्या भगिनीवर्गाला दाखवून देण्याच्या आकांक्षेने स्त्रीनें प्रगतिपथावर पुढे पावले टाकली. परावलंबित्व नष्ट करण्याच्या व्यावहारिक हेतूने शिक्षण घेणाऱ्या स्त्रीचे साहजिकच नोकरी हे पहिले उद्दिष्ट बनले. पण या उद्दिष्टाच्या जोडीला आपण शिक्षण घेतल्याने आलेल्या अनुभूतीचा आनंद इतरांना मिळावा ही सदिच्छा मिळाली.

स्त्रीचा नोकरीपेशा हा आज मोठ्या मतभेदाचा व चर्चेचा प्रश्न झाला आहे. पण पांढरपेशा वर्गातील स्त्रीला कठोर रूढींच्या गळचेपीतून आणि मूर्ख धर्मसमजुतींच्या कैदेतून बाहेर काढण्याचा काळ होता, तेव्हा तिला स्वतःच्या पायावर उभे राहणे, स्वतः काम करून पोट भरणे, याचा अर्थही समजावून सांगावा लागत होता. सरळमार्गाने व स्वाभिमानाने जगण्यासाठी प्रसंग पडल्यास घराबाहेर पडण्याचे 'धाडस' करायला ती त्यावेळी विचकत होती. त्या काळात स्त्रीला शिक्षण देऊन नोकरी करायला उत्तेजन देणे अपरिहार्य होते.

## शिकलेली स्त्री शिक्षण क्षेत्रातच शिरली

आणि त्यावेळी नोकरीसाठी एक शिक्षणाचेच क्षेत्र स्त्रीला सहजसाध्य होते. शिवाय स्त्रीनें शिकवण्याचेच काम पत्करणे त्यावेळी बरेच आवश्यकही होते. कारण सरळमार्गी भीरू समाजाला स्त्रीशिक्षकांचे अस्तित्वच मुलींना शाळांत पाठवण्यास उद्युक्त करू शकत असे.

मुली क्रमाक्रमाने माध्यमिक व उच्च शिक्षणापर्यंत पोचल्या. शिक्षणाचा प्रसार होऊ लागला तसतशी शिक्षिकांच्या संख्येत व कक्षेत वाढ होऊ लागली. या वेळेपर्यंत वैद्यकशास्त्राकडेही स्त्रीचे लक्ष वेधले होते. कित्येकींना निव्वळ हौस, तर कित्येकींना समाजाच्या उपयोगी पडण्याची आकांक्षा वैद्यकी शिक्षण घेण्यास प्रवृत्त करी. त्या शिक्षण-क्रमाच्या खर्चाचे प्रमाण पुष्कळांना आड येई, पण तरीही मुली डॉक्टर होऊ लागल्या. आज संघटित शिक्षणात उपलब्ध असलेल्या प्रत्येक क्षेत्रात स्त्री प्रवेश करते, प्रगती

करते, पुरुषवर्गाचे बरोबरीने, किंबहुना जास्तच चमकतेही. पण आजही स्त्रीच्या कर्तृत्वाचा सर्वांत अधिक व्याप शिक्षणक्षेत्रात व त्याच्या खालोखाल वैद्यकीय क्षेत्रात आहे.

आपल्या कर्तृत्वासाठी प्रथम शिक्षणक्षेत्र व दुसरे वैद्यकीय क्षेत्र स्त्रीने पसंत करणे व्यावहारिक परिस्थितीला अनुसरून घडले. स्त्रियांना स्वावलंबनाचे महत्त्व पटले, त्यांची कर्तृत्वशक्ती जागृत झाली. वैद्यक शिक्षण घेतल्यावर अर्थात त्याच क्षेत्रात काम करणे सर्वच दृष्टींनी हितावह होते व आहे. पण सामान्य शिक्षणक्रम एकंदर असा ठोकळेबाज होता की शिकणे व शिकवणे यापलीकडे त्याच्या उपयोगिक ताब्यात कल्पनेला वाव नव्हता. त्या शिक्षणक्रमाने दुसऱ्या कोणत्याही क्षेत्रात कार्य करण्यासाठी लागणारी पूर्वतयारी होऊ शकत नसे. शिक्षण घेतले पाहिजे म्हणून शिकायचे आणि मग घेतलेल्या शिक्षणाचा उपयोग व्हावा म्हणून शिकवायचे, अशीच विचारसरणी कित्येक वर्षे चालू राहिली. आज अवतीभोवती दिसणाऱ्या इतर नोकऱ्या, किंवा कला, कारागिरी, हस्तोद्योग, इत्यादींचा अर्थार्जनासाठी आधार घ्यावयाचा स्त्रीचे मन घेत नसे. शिक्षणाच्या कार्यात एक प्रतिष्ठितपणा होता, आणि वातावरण सुरक्षिततेचे, स्त्रीत्व मानवणारे होते. शिवाय शिक्षणप्रसाराबरोबर शिक्षिकांना मागणीही मोठी होती. त्यामुळे स्त्रीवर्गाचा शिक्षणक्षेत्रात खोल पाय रुतला.

स्वातंत्र्योत्तर काळात इतर पुष्कळ दारे मोकळी झाली असून आज समाजात वेतनी काम करणाऱ्या स्त्रियांपैकी बहुसंख्य गट शिक्षणक्षेत्रात गुंतलेला आहे. आज पुणे जिल्ह्यातील प्राथमिक व माध्यमिक शाळांतील शिक्षकांपैकी ३२ टक्के स्त्रिया आहेत. फक्त प्राथमिक विभागात ३२·९२ टक्के शिक्षिका आहेत. या विभागात १९५६–५७ मध्ये संबंध मुंबईप्रांतात २०·३४ टक्के शिक्षिका होत्या. अलीकडच्या पाचसहा वर्षांत माध्यमिक शिक्षणातही शिक्षिकांचे महत्त्व वाढत आहे. दहा वर्षांपूर्वी मुंबई प्रांतात २०·२८ टक्के स्त्रीशिक्षक होत्या. आता पुणे जिल्ह्यात त्या २७·१ टक्के आहेत. येथील शहरी विभागात तर एकंदर शिक्षकांपैकी ३४·३९ टक्के शिक्षिका आहेत. गेल्या दोन दशकांपासून विश्वविद्यालयात स्त्रिया अध्यापन करू लागल्या असून त्याचेही प्रमाण झपाट्याने वाढत आहे. १९५६–५७ मध्ये एकंदर प्रांतात १०·४९ टक्के प्राध्यापिका होत्या. आता एका विद्यापीठात गेल्या वर्षी ७·३७ टक्के व चालू वर्षी ९·०९ टक्के प्राध्यापिका आहेत. गेल्या पंधरा वर्षांत शिक्षणक्षेत्राने आणखी एक दालन उघडले आहे — पूर्वप्राथमिक शिक्षणाचे. हे दालन तर स्त्रीने जवळजवळ सगळे व्यापले आहे. महाराष्ट्रातील बालकमंदिरांचा आकडा चार वर्षांपूर्वी ९२७ होता.

शिक्षणक्षेत्रात स्त्रीने प्रथम प्रवेश केला तो त्यावेळी तत्पुरत्या पोटाच्या उद्देशाने. पण तिने ते क्षेत्र आता आपलेसे केले आहे. स्वातंत्र्योत्तर काळात स्त्रीपुरुषांना घटनेने समानहक्क घोषित केल्यापासून, विशेषतः महायुद्ध चालू असल्यापासून पुष्कळ स्त्रिया कचेऱ्या, दुकाने, कारखाने, इत्यादी ठिकाणी कामे करू लागल्या. पण अजूनही स्त्रीकार्यकर्त्यांची सर्वांत जास्त भरती शिक्षणक्षेत्रात आहे.

समाज हे एक कुटुंब आहे अशी कल्पना केली तर मुलांच्या शिक्षणाच्या जबाबदारीत स्त्री पुरुषाच्या खांद्याला खांदा लावण्याइतकी समर्थ झाली आहे हे कुणालाही मान्य करावे लागेल. स्त्रीला हे स्थान फक्त शिकवण्याचे काम करणाऱ्या स्त्रियांनी मिळवून दिले नाही. रमाबाई रानडे, आनंदीबाई कर्वे अशा शिक्षिका नसलेल्या स्त्रियांनी स्त्रीशिक्षणाच्या संस्थामार्फत हजारो स्त्रियांना प्रेरणा व प्रोत्साहन देऊन जी अजोड जागृती केली, तिचे मोल शब्दांनी सांगता येणार नाही.

जीवनाला सुरुवात करणारा एखादा माणूस बरा स्थिरस्थावर झाल्यावर जमा-खर्चाची तपासणी करू लागतो व मिळकतीच्या विनियोगाच्या तपशिलाचा अभ्यास करू लागतो. स्त्रीच्या जीवनाचा व कार्याचा तसा अभ्यास करण्याची गरज आता निर्माण झाली आहे. स्त्रीचे आधुनिक युगातले जीवन सुमारे ७०–७५ वर्षांचे आहे. त्यात अलिकडे दोन दशके शिक्षण घेण्यासाठी सवलती देण्याचे धोरण मुख्यत: सरकारने व आपापल्या परी व्यक्तींनी व संस्थांनी पूर्वीपेक्षा जास्त उदार केले आहे, त्यामुळे शिक्षणक्षेत्रात वाढलेल्या कार्याचा व्याप पुष्कळांच्या अभ्यासाचा विषय झाला आहे. शिक्षणक्रमाचीही छाननी वेळोवेळी होत आहे, व विषयांची विविधता व व्याप्ती यांवर संबंधितांमध्ये सतत विचारविनिमय होत आहे. शिक्षणविषयक घडामोडींशी नागरिक व माता या नात्याने स्त्रीचा संबंध निकटचा आहेच, पण वेतनी काम करणाऱ्या स्त्रीवर्गाचा सर्वांत मोठा गट शिक्षणक्षेत्रात गुंतलेला असल्यामुळे शिक्षणविषयक प्रत्येक मुद्द्याशी स्त्रियांचा जिव्हाळ्याचा संबंध आहे. आपले कार्यक्षेत्र म्हणून उत्पन्न झालेल्या महत्त्वाबरोबरच कार्यकर्त्री या नात्याने लागून आलेल्या जबाबदारीच्या जाणिवेने शिक्षणक्षेत्रातील सुशिक्षित स्त्रीने शिक्षणविषयक परिस्थितीचा विचार करण्याची वेळ आता येऊन ठेपली आहे.

## शिक्षणात व्यावहारिक उद्देशाला प्राधान्य

शिक्षणाबद्दल आज विचार करता पहिली गोष्ट ही लक्षात येते की मानवी जीवनात आवश्यक असलेल्या व 'शिक्षण' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या संस्काराची व्याप्ती अलीकडेच कुठे आपल्याला भासू लागली आहे. भारतातील आधुनिक शैक्षणिक युगाला १५२ वर्षे लोटली आहेत. इ. स. १८१५ साली हिंदमधील युरोपियन लोकांनी मुंबईला आपल्या मुलांच्या शिक्षणासाठी एक संस्था स्थापली व त्या संस्थेने सुरू केलेल्या शाळांत, या देशात प्रथमच, एतद्देशीय मुलांना प्रवेश देण्यात आल्या अशी नोंद आहे. पण या शिक्षणाला जन्मच अशा काही वातावरणात झाला की सुरुवातीपासून आजपर्यंत व्यक्तीला मिळू शकणारे बालपणापासून उच्चतम मर्यादेपर्यंतचे सर्व शिक्षण व्यावहारिक मापाने मोजण्याची आपल्याला सवय लागली. आता स्वातंत्र्योत्तर काळात राष्ट्रावर स्वयंशासनाची जबाबदारी आली. दीर्घ दर्शनी अचानक — स्वयंशासनासाठी राष्ट्रीय पातळीवर आवश्यक असणारी पूर्वतयारी होण्यापूर्वी. त्यामुळे लगेच अकस्मात राष्ट्रजीवनाचा नेता नाहीसा झाला. कुटुंबातला कर्ता गेला. साहजिकच या अवाढव्य कुटुंबात दारुण

परिस्थिती, अस्वस्थता, अव्यवस्था उत्पन्न झाली. या परिस्थितीतून मार्ग काढताना ज्या गोष्टींना महत्त्व द्यावे लागले, त्यात जगणे हे सर्वप्रथम होते. सर्व क्षेत्रांत आर्थिक बाजूवर भर आवश्यक होता. अर्थात शिक्षणातही व्यावहारिक उपयुक्ततेचे वर्चस्व झाले. शिक्षणाने मानसिक संस्कार झाले पाहिजेत, ही गरज भासत असली, तरी अगोदर शिक्षण व्यावहारिक जीवनाला पोषक झाले पाहिजे, या विचारसरणीचा जोर झाला व आजतागायत तो कायम आहे. मानसिक विकास, दृष्टीची विशालता, दैनंदिन सामाजिक जीवनातील आचारामधील सुव्यवस्थितपणा या गोष्टी शिक्षणातून अपेक्षित आहेत, पण शिक्षणाचे उद्दिष्ट द्रव्यार्जनाची लायकी हेच. पुरुषांनी आधुनिक शिक्षण घ्यायला सुरवात केली ती मुळी उपजीविकेचे साधन म्हणूनच. स्त्रियांच्या बाबतीत आर्थिक स्वावलंबन हे आरंभी काही प्रमाणात, काही स्त्रियांना आवश्यक म्हणूनच, तात्पुरते उद्दिष्ट मानण्यात आले होते, आणि स्त्रीची कर्तृत्वशक्ती जागृत व्हावी, तिला स्वत्वाची जाणीव होऊन तिच्यामध्ये धैर्य, आत्मविश्वास यावा हा स्त्रीशिक्षणाचा हेतू प्रबल होता. परंतु मुली प्रथमपासून शिक्षणक्रम मात्र मुलांचाच करीत आल्या. स्त्रियांच्या विचारांना व आकांक्षांना पुरुषांप्रमाणेच वळण लागत आले. इकडे देशात आर्थिक परिस्थिती झपाट्याने घसरू लागली आणि स्त्रीपुरुषांच्या शिक्षणाच्या आरंभी बाळग-लेल्या उद्दिष्टांतील तफावत आणखीच कमी झाली. त्यात पुढारलेल्या देशांतील भौतिक प्रगतीचा आदर्श आपल्या शिक्षणाला अधिक व्यावहारिक बनवू लागला. अशा रीतीने एकंदर शिक्षणातच आज व्यावहारिक उपयुक्ततेला प्राधान्य आले आहे.

## मानवाच्या अंतरंगाची शिक्षणक्रमात उपेक्षा

परंतु हे प्राधान्य आता शिक्षणाचा तोल बिघडवण्याइतके भारी झाले आहे. अलिकडच्या काही महिन्यात तर ठिकठिकाणी विद्यार्थ्यांच्या अविचारी व बेताल वर्तनाने शिक्षणातील तोल बिघडल्याचे सुस्पष्ट झाले आहे. पण हे आविष्कार केवळ तात्कालिक नव्हेत. नकळत शिरकाव करून त्रिलेक वर्षे अनिष्टता हातपाय पसरीत आहे. इतके दिवस ती उपेक्षणीय स्वरूपात राहिली. हल्ली दहापाच वर्षांत घरोघर दैनंदिन जीवनात जनतेला असे अनुभव येऊ लागले आहेत की शिक्षण संस्कार करीत नाही, मुलांची मने मोठी होत नाहीत, त्यांना नोकरीसाठी चालणाऱ्या स्पर्धेत टिकाव लागण्याकरिता आवश्यक असणारी लायकी वाढवण्याच्या इच्छेपलिकडे ज्ञानलालसा उत्पन्न होत नाही, नेकी आणि चारित्र्य जोपासण्याची व जीवनात आस्थेने ते सांभाळ-ण्याची मानसिकता वाटत नाही, किंबहुना सारासारविवेक करताच येत नाही. उलट शिक्षण घेतलेल्या मुलांमध्ये, अहंमन्यता, उर्मटपणा, संकुचितपणा, व आत्मकेंद्रित वृत्ती येते. शाळा-कॉलेजांमधून शिक्षण घेणाऱ्यांमध्ये हे सर्व दोष शिक्षण न घेणाऱ्यांपेक्षा जास्त प्रमाणात दिसून येतात. यावरून शिक्षणाची बाजू चांगलीच लंगडी पडत आहे, किंबहुना विनाशक ठरली आहे, हा स्वाभाविक निष्कर्ष आहे.

आता शिक्षण सामान्य जीवनाची गरजेच्या दृष्टीने जवळजवळ एकरूप झाले आहे. जगात चालू असलेल्या बुद्धिविलासापासून शिक्षण अलग ठेवून तर चालणार नाही आणि मानव तर प्रत्यक्ष सृष्टिकर्ता पाहून तोंडात बोट घालील असे नवे नवे वैज्ञानिक चमत्कार रोज करीत आहे. पण विज्ञानाच्या या आश्चर्यकारक करामतीच्या संपर्काने आणि प्रभावाने आपण आपल्या शिक्षणाचे बहिरंग कितीही सजवू पाहात असलो तरी त्याच वेळी चाललेली अंतरंगाची उपेक्षा तीव्रतेने जाणवल्याशिवाय राहात नाही. दैनंदिन जीवनाचे सर्व व्यवहार मानवाच्या अंतरंगावर अवलंबून आहेत. मोठमोठ्या कालखंडांचा आढावा घेताना मानवाच्या अंतरंगाचा विकास हाच प्रगती अजमावण्याचा निकष मानला जातो. अंतरंगाचा विकास म्हणजे मानवता. बाह्य भौतिक विकास कितीही नेत्रदीपक असला तरी मानवतेत त्याला खालचे स्थान असते. जीवनाच्या सुखसोयींत भर घालण्यासाठी, किंवा विश्वातील कोनाकोपऱ्याला पोचून अज्ञात अशा असलेल्या वस्तुजाताचा शोध घेण्याची हौस भागवण्यासाठी किंवा केवळ वरचढपणासाठी मनुष्य आज वैज्ञानिक प्रगतीमागे धुंदपणे लागला आहे. पण मनुष्य मनुष्याला ओळखतो की नाही, यावर त्याच्या मनुष्यत्वाची किंमत ठरते. मनुष्यामनुष्यामधील जीवन विना-संघर्ष, सुकर, व्यवस्थित चालावे म्हणून संघटित शासनसंस्था, व नियमाचे व कायद्याचे काटेकोर पालन अपेक्षित व आवश्यक आहे. तरी तेथेही कायद्याच्या रुक्षतेवर मानवी अंतरंगाने फेकलेला शिडकावाच माणसाला जगवतो, असा प्रत्येकाच्या दैनंदिन जीवनाशी अंतरंगाचा निकट संबंध आहे. तेव्हा समाजातील नवीन पिढी घडवताना तिच्या अंतरंगाची अत्यंत काळजी घेतली पाहिजे. दुर्दैवाने या गरजेच्या गंभीरतेबद्दल मोठे पुढारी म्हणवून घेणारे राजकारणी बसल्यापासून अनेक लोक अजिबात बेपर्वा झाले असल्याने शिक्षणाचे गांभीर्य व पवित्रता नाहीशी झाली आहे, आणि शिक्षणसंस्थांनाही एकीकडून आर्थिक टंचाई, व दुसरीकडून स्वार्थ व सत्तालोलुपता यांनी गोंधळ माजवला आहे. या सर्व गोष्टींचा संकलित परिणाम हा की नुसत्या अंतरंगाच्या जोपासनेतील उणीवेच्या झळा प्रतिक्षणी सोसाव्या लागल्यामुळे उफाळलेल्या नागरिक शिक्षणावर टापर फोडीत आहे.

माणसाच्या वागणुकीतही इतका वेगळा असतो की काही एक इयत्तेचे शिक्षण घेतलेल्या माणसात एका दृष्टीने सुसंस्कार तर दुसऱ्या एखाद्या दृष्टीने निकृष्टता असे विलक्षण आविष्कार झाल्याचे आढळते. एकाच गुरुकडून एकाच ठिकाणी, एकाच प्रकारच्या मिळालेल्या शिक्षणाची विचित्रता थोडीफार पुरातन काळीही अनुभवास आली. कौरव-पांडवांमध्ये तर जमीनअस्मानाचा फरक होताच, पण युधिष्ठिर, दुर्योधन, अर्जुन, कर्ण, इत्यादी एकेकट्या व्यक्तींमध्येही विविध व परस्परविरोधी वृत्ती विकास पावल्या. मग आजच्या शिक्षणाच्या विराट विविधतेत तसे झाल्यास नवल काय ? मोठमोठ्या पदव्या धारण करून वावरणारे, निरनिराळ्या बुद्धिप्रधान जीवनव्यवसायात, किंवा खुद्द शिक्षण क्षेत्रातही उच्च स्थानी विराजमान होणाऱ्या व्यक्ती सामाजिक परस्परसंबंधाच्या क्षेत्रात मात्र सरासरीच्या आसपास घोटाळत असतात. काही तर व्यस्त प्रमाणाने सरासरीच्या खाली उतरलेल्या आढळतात. हा अनुभव अलिकडे विशेष तीव्रतेने येत असल्यामुळे साहजिक शिक्षणावर ठपका ठेवण्यात येतो.

शिक्षणावर येणाऱ्या आरोपाचा सर्वांत मोठा वाटा शिक्षकाकडे जावा हे अपरिहार्य आहे. कारण अभ्यासक्रम कोणताही, कसाही असो, त्याची प्रत्यक्ष अंमल-बजावणी व ती करीत असताना शिक्षणाच्या उद्दिष्टांचा पाठपुरावा, याबद्दलची जबाबदारी सर्वस्वी शिक्षकाची असते. शिवाय मुलांच्या व्यक्तिमत्त्वाच्या अप्रत्यक्षपणे विकास पावणाऱ्या पैलूवर शिक्षकाच्या आचारविचारांची छाप सतत पडत असते. ती स्वतः शिक्षकालाही टाळता येत नाही.

## शिक्षकांची जबाबदारी आणि त्यात शिक्षिकांचा वाटा

परीक्षेच्या निकालावर शिक्षकाच्या व्यावहारिक यशाचे मोजमाप होते. पण समाज आणि स्वतः शिक्षकही मनोमन जाणतो की विद्यार्थ्यांची जीवनात उतरण्याची अंतर्बाह्य तयारी नुसत्या परीक्षांनी होत नाही. समाजाची शिक्षणापासून अपेक्षा अशी – विद्यार्थ्याला विद्येची गोडी लागली पाहिजे. त्याच्या विचार-उच्चार-आचारावर संस्कार घडल्याचा अनुभव त्याला व इतरांना आला पाहिजे. प्रचलित वातावरणाशी उत्साहपूर्वक समरस होण्याचे सामर्थ्य, तसेच कोणत्याही आगामी परिस्थितीशी न चिडता मिळून जाण्यासाठी लागणारे धैर्य व आत्मविश्वास त्याच्यात आला पाहिजे. त्याच्या वर्तनाला नैतिक जोड पाहिजे. त्याला जीवनातील भारतीय परंपरा उज्ज्वल राखणाऱ्या चारित्र्याचे महत्त्व सर्वश्रेष्ठ वाटले पाहिजे. विद्यार्थ्यांची अशी घडण होण्यासाठी समाज शिक्षकावर विसंबून आहे.

वस्तुतः शिक्षण हे कार्य आहे, धंदा नव्हे. कार्य करण्याकरिता लागणारी सेवाबुद्धी व निःस्वार्थीपणा शिक्षणात आवश्यक आहे. पण एकंदर देशाची आर्थिक दैन्यावस्था, व निदा तोंड देण्याच्या हेतूने चालणेली शिक्षणाची कुतरओढ, यांच्या धमाळीत शिक्षणाला धंद्याचे स्वरूप आले आहे. त्यामुळे केवळ पोटासाठी कामाच्या स्वरूपाविषयी

अज्ञ व बेफिकीर असे कितीतरी लोक शिक्षक म्हणून 'भरती' झालेले आहेत व होत आहेत. त्यांत पुरुषाला उदरनिर्वाह व कुटुंबपोषणाची जितकी जबाबदारी घ्यावी लागते, तितकी स्त्रीला सामान्यतः घ्यावी लागत नाही. त्यामुळे 'वाट चुकलेल्या' शिक्षकांमध्ये पुरुष शिक्षक स्त्रियांपेक्षा मोठ्या प्रमाणात आहेत. अर्थात शिक्षकाच्या अपात्रतेमुळे शिक्षणक्षेत्रात जी हानी होते तीत स्त्रीपासून झालेल्या हानीचा हिस्सा कमी आहे.

हे खरे की केवळ द्रव्यार्जनाखातर काम पत्करणाऱ्या स्त्रिया आहेतच. त्यांच्यातही दोन प्रकार आहेत. काहींना द्रव्यार्जन आवश्यक असते, त्या ओढूनताणून का होईना, कार्याचे स्वरूप समजून घ्यावे, कामात कसूर राहू नये, अशी धडपड करतात. काहींना द्रव्यार्जनाची खरी गरज नसते. या स्त्रियांची वृत्ती उपदउपद पास्या वाहण्याची असते. त्यांतून काही बुद्धिमान असल्या तर क्वचित् त्यांच्या बुद्धीची प्रेरणा त्यांच्या कृतीत उतरलेली दिसते. पण बहुधा त्यांच्यामध्ये आपल्या देशात आजकाल सर्वत्र विषारी वायूप्रमाणे व्यापून राहिलेली हिणेबीपणाची प्रवृत्ती प्रबळ असते. त्यामुळे त्यांच्या बुद्धिमत्तेचा विद्यार्थ्यांवर बौद्धिक सुसंस्कार घडवण्याच्या दृष्टीने उपयोग होतोच असे नाही. अशा शिक्षिका समाजाचे दुहेरी नुकसान करतात. एकतर विद्यार्थ्यांवर त्यांच्याकडून व्हावयाला पाहिजेत ते संस्कार होत नाहीत आणि अधिक गरजू, अधिक पात्र, अधिक कार्यक्षम अशा कार्यकर्त्यांना मिळू शकणाऱ्या जागा त्यांनी अडवलेल्या असतात. या गटात शिक्षण घेतल्यानंतर मुख्यतः रिकामा वेळ घालवण्याकरता व जाता जाता होईल तो अधिक फायदा मिळविण्याकरिता काम करू इच्छिणाऱ्या तरुणींचा समावेश आहे. अशा तरुणींना आता मोठ्या शहरांतून तरी कचेऱ्यासारख्या ठिकाणीही काम मिळू शकते व पुष्कळ मुलींना शाळांतील कामापेक्षा त्या तऱ्हेचे 'टेबलवर्क' पसंत पडते, असे दिसते. शिक्षणाच्या दृष्टीने ही चांगली गोष्ट आहे.

काही स्त्रिया मात्र काहीतरी सार्वजनिक काम करण्याची हौस म्हणून शिक्षिका बनलेल्या असतात. शिक्षिकेला जरूर असलेले विशेष गुण त्यांच्यामध्ये स्वभावतः पुष्कळ प्रमाणात नसले तरी आपल्या हातून चीज होण्याजोगे काम व्हावे अशी त्यांना ओढ असते.

याहून उच्च गट शिकवण्याच्याच आवडीने शिक्षिका बनणाऱ्या स्त्रियांचा. या शिक्षिकाकडून 'अंगचे सर्वोत्कृष्ट' विद्यार्थीवर्गाला मिळते.

आजही शिक्षिकामध्ये या दोन प्रकारच्या स्त्रियांची संख्या बरीच आहे. याचे कारण हे असावे की स्त्रीशिक्षणाला सुरुवात झाली तेव्हापासूनच समाजकार्याच्या हेतूने शिक्षिका बनणाऱ्यांची परंपरा पडली आहे.

## 'ट्रेनिंग' पाहिजे, पण कळकळ आणि आत्मीयता अधिक आवश्यक

इतर कोणत्याही क्षेत्रातील कामात व शिक्षणाच्या कामात फार मोठा फरक आहे. इतर क्षेत्रांत यंत्रे, कागदपत्रे, अशा अचेतन वस्तू हाताळल्या जातात. शिक्षणक्षेत्रात

प्रत्यक्ष चैतन्य हाताळायचे असते. म्हणून शिक्षकांवर मुलांच्या व पर्यायाने समाजाच्या सांस्कृतिक घडणुकीची जबाबदारी पडते. दुसरे असे की जीवनातल्या प्रत्येक क्षेत्राचे शिक्षण मूलभूत असल्यामुळे व समाजातील प्रत्येक स्तरातील मुलामुलींचा शिक्षकांशी निकट संबंध येत असल्यामुळे त्यांच्या कार्याची व्याप्ती व खोली अपार असते. शिवाय, इतर क्षेत्रांत काम करणाऱ्याला त्या त्या कामाचे तांत्रिक शिक्षण (ट्रेनिंग) पुरेसे असते. शिक्षकाला तांत्रिक शिक्षण सामान्यतः लागतेच—अशी निदान मोठमोठ्या शिक्षणशास्त्रांची श्रद्धा आहे. अनुभवाची साक्ष अशी आहे की तांत्रिक शिक्षणाशिवायही विद्यार्थ्यांची सर्वांगीण घडण भारतातल्या कित्येक शिक्षकांनी उत्कृष्ट केलेली आहे. तथापि विद्यार्थी व विषय दोन्ही संख्येने वाढू लागल्यापासून जुन्या परंपरेत न भागलेल्या तंत्राची गरज निर्माण झाली आहे खरी. नियंत्रण ठेवणे कठीण होत आहे इतक्या मुलांची जबाबदारी आज प्रत्येक शिक्षकावर पडत असल्यामुळे त्याचे काम सुकर होण्याच्या दृष्टीने ट्रेनिंग आवश्यक आहे. पण ट्रेनिंग घेतल्यानंतरही शिक्षकाला त्याचा उपयोग डोळे मिटून जगाचा तमा करून भागत नाही. कुठे केव्हा काय केले पाहिजे हे त्याला सदैव जागरूक राहून शोधत राहावे लागते. व पावलोपावली डोके वापरावे लागते. हे सर्वसामान्यतः शिक्षकामध्ये विद्यार्थ्यांविषयी कळकळ आणि विषयाशी समरसता असली म्हणजे चांगल्या प्रकारे साध्य होते. आणि या बाबतीत नैसर्गिक वत्सलतेमुळे स्त्री पुरुषापेक्षा बहुधा सरस ठरते.

दुसरा एक अनुभव स्त्रीपुरुष दोघेही जेथे काम करतात त्या प्रत्येक क्षेत्रातून सांगण्यात येतो की स्त्री पुरुषापेक्षा कामाबद्दल अधिक इमान राखते व अधिक मनापासून काम करते. मिश्र शाळांत किंवा वेगवेगळ्या वेळी मुलांच्या व मुलींच्या शाळांत शिकवण्याचा अनुभव घेतलेल्या शिक्षकांचा मुलींबद्दल हाच अभिप्राय आहे. उच्च शिक्षणक्षेत्रातही तरुणी अलीकडे तरुणांना पुष्कळच वेळा मागे टाकतात असे दिसून येते, याची कारणमीमांसा संबंधित प्राध्यापक अभ्यासावर मन लावण्याच्या मुलींच्या गुणाकडे लावतात. जीवनातही दिसून येते की संसार दोघांचा, पण संसाराबद्दल स्त्रीची आत्मीयता पुरुषापेक्षा जास्त असते. आपल्या कामात सर्वस्व ओतण्याचा हा स्त्रीचा गुण भारतात प्रकर्षाने दिसून येतो. पण जगात सर्वत्रच स्त्रीच्या आकांक्षा आत्मनिष्ठ, मर्यादित, घराभोवती घुमणाऱ्या व म्हणून तीव्र व केंद्रित झालेल्या असतात असे आढळते. आजकाल भौतिक प्रगतीच्या झंझावातात सापडलेल्या स्त्रीची मनोवृत्ती बरीच उथळ सुखलोलुप झाली आहे अशी सर्वत्र तक्रार आहे. पण तरीही स्त्रीमधील प्रेमळपणा व त्याच्या पोटी वसणारी एकनिष्ठा, त्याग व कनवाळूपणा यांचा साक्षात्कार ठिकठिकाणी वारंवार होतो आणि भौतिक उत्कर्ष साधण्याच्या स्पर्धेत सापडून विव्हळ झालेल्या मानवाला त्या साक्षात्कारातूनच दिलासा मिळत आहे. तात्पर्य, पुरुषवर्गापेक्षा अल्पसंख्याकता आणि कार्यतत्परतेतील वरचढपणा या दोन्हीमुळे शिक्षणात आढळून येणाऱ्या कमतरतेची जबाबदारी आज तरी स्त्रीवर कमी आहे.

## बालकाला प्रेमाने चळविणे स्त्रीस्वभावातच आहे

शिक्षणक्षेत्रात कार्यकर्ती म्हणून प्रवेश करण्याचे श्रेय सर्वस्वी स्त्रीचे स्वतःचे नव्हे हे खरे. तिच्या परिस्थितीची जाणीव झालेल्यांनी तिला हात दिला, पुरुषवर्गापुढे उभ्या राहिलेल्या आर्थिक व शैक्षणिक समस्यांमुळे विवाहाची वयोमर्यादा पुढे सरकत जाऊ लागली, ही गोष्ट मुलींच्या माध्यमिक व उच्च शिक्षणप्रसाराला अनुकूल झाली, आणि अलिकडील घसरत्या आर्थिक परिस्थितीमुळे स्त्रीला द्रव्यार्जन बरेचसे आवश्यक झाले, या घटनांचे श्रेय स्त्रीला अर्थातच नाही. पण स्त्री काम करावे लागलेच तर शिक्षणक्षेत्राला अग्रहक्क प्रथमपासून आजवर देत आली आहे, यांत खूप अर्थ आहे. या पसंतीचे, शिक्षणप्रसाराच्या प्रचंड योजना आहेत, आणि त्यामुळे या क्षेत्रात नोकऱ्या सुलभ आहेत, हे कारण नव्हे. पुरुष जीवनाचा विचार बहिर्मुख होऊन करतो. त्याच्या आकांक्षा चारी बाजूंना बाहेर झेप घेतात. स्त्रीने बाह्य जीवनात रस घ्यावा अशा विचारांची जोरदार लाट उसळली आहे. स्त्रीला उत्तेजित करणाऱ्या लहानमोठ्या चळवळीही झाल्या आहेत, आणि अजून होतील. पण घराबाहेर काम करण्याच्या मोहात पडल्याने मनःशांती गमावून बसावे लागते, हा अनुभवही स्त्रीला वाढत्या प्रमाणात येत आहे, आणि साहजिकच काम करावेच लागले तर निदान मन रमण्याजोगे क्षेत्र पत्करून हरपलेल्या समाधानाची भरपाई करून घ्यावी अशी स्त्रीची प्रवृत्ती आहे. तिने ही प्रवृत्ती अजून जपली आहे. यात तिचे कौतुक आहे.

खरेखुरे शिक्षक व्हायचे असेल तर बालकावर प्रेम केले पाहिजे. स्त्रीला हे 'सहज' आहे. तिच्या स्त्रीत्वाचाच तो एक पैलू आहे. पुरुषही बालकावर प्रेम करतो पण स्त्रीइतक्या सहजपणे तो त्याला जिंकू शकत नाही. बालकाला (पुरुषालाही) प्रेमाने आपलेसे करणे स्त्रीच्या स्वभावातच आहे. मुलांना जन्म दिला नसला तरी स्त्री माता असते. मुलांवर रागावतानाही तिच्या हृदयात निरपेक्ष प्रेम असते. ते तिला उदार बनवते. चुकांकडे ती क्षमाशीलपणे पाहाते. चुकलेल्यांना संधी देण्यासाठी लागणारा धिमेपणा (patience) तिच्यामध्ये निसर्गानेच ठेवलेला आहे. स्त्रिया उतावळ्या असतात, पण स्त्री उतावळी नाही. ती सोशीक आहे, जरूर तितका वेळ द्यायला तयार आहे. दुसरे असे की स्त्रीला दुसऱ्याच्या भावनांची संवेदना पुरुषापेक्षा जलद व बिनचूक होते. म्हणून मुलांचे मनोव्यापार ओळखून त्यांना योग्य तो प्रतिसाद देणे व इष्ट वळण लावणे तिला सोपे असते. तात्पर्य शिक्षकाला अत्यावश्यक असणारे सर्वप्रथम गुण खुद्द स्त्रीत्वातच आहेत. पुरुष ते कमावू शकतो, पण त्याला ते कमवावे लागतात.

मात्र संघटित शिक्षणव्यवस्थेत आवश्यक असलेल्या एका गुणाचे प्रमाण स्त्रीच्या मातृसदृश प्रेमळपणामुळेच तिच्यात कमी असते. शिस्तीच्या बाबतीत ती शिथिल असते. स्वतः सोसण्याचा कणखरपणा तिच्यामध्ये पुरेपूर असतो पण शासन करून दुसऱ्याला सोसायला लावणे तिला जमत नाही. शासन करावेच लागले तर पुरुष निर्विकारपणे करू शकतो. स्त्रीहृदय कचरते. शिक्षा देण्याचा प्रसंग टळेल तर बरे म्हणते.

## शिक्षणाच्या उच्च स्तरात स्त्रिया कमी

हे सत्य लक्षात घेतले तर पूर्वप्राथमिक अवस्थेपासून महाविद्यालयीन अवस्थेपर्यंतच्या शिक्षणकार्यात पायरीपायरीने स्त्रीच्या कर्तृत्वाचा प्रभाव कमी कमी होत चालल्याचे दिसते, या घटनेचा अर्थ लागतो. खालच्यापेक्षा वरच्या क्षेत्रात स्त्री कार्यकर्त्यांची संख्या आपल्या सामाजिक जीवनपद्धती-अनुसार कमी होत जाते, इतकेच या घटनेचे कारण या स्वरूप नाही. इतर व्यवसायांशी तुलना करता शिक्षणव्यवसाय आर्थिक दृष्ट्या निकृष्ट आहे हेही या घटनेच्या मुळाशी नाही. कारण इतर क्षेत्रे खुली असताना अर्थार्जनाकरता काम करणाऱ्या स्त्रिया माध्यमिक शिक्षणातही क्वचितच टिकतात. उच्च शिक्षणविभागापर्यंत त्या येतच नाहीत. शिक्षणक्रमात वरवर जावे तसे स्त्रीकर्तृत्व उतरणीला लागलेले दिसते, त्याचे कारण मुख्यतः हे की शिक्षणक्षेत्रातील खालच्या स्तरात स्त्री जशी रमते, वातावरणाशी एकरूप होते तशी वरच्या स्तरात होत नाही. तारुण्योन्मुखावस्थेपर्यंतच्या मुलांमुलींना आपलेसे करून त्यांच्यावर ती वचक ठेवू शकते. त्यांची श्रद्धा मिळवू शकते. वरच्या स्तरात शैक्षणिक पात्रता जास्त लागते हा एक अडथळा असतो ही गोष्ट खरी. पण त्यापेक्षा विद्यार्थ्यांशी शिक्षकाच्या भूमिकेवरून समरस होण्याच्या तिच्या प्रवृत्तीला वरच्या स्तरात, अनुकूल व संघटित शिक्षणव्यवस्थेला सुसंगत असा प्रतिसाद मिळेल, असा आत्मविश्वास विषयावर प्रभुत्व असले तरी तिला वाटत नाही. म्हणून स्त्री उच्च-शिक्षण-क्षेत्र पसंत करीत नाही असे दिसते.

स्त्रीचा बौद्धिक विकास पुरुषाच्या बरोबरीने आजवर झाला असला व पुढेही निश्चित असला तरी तो विकास साधण्याच्या प्रयत्नात स्त्रीसहज मानसिक प्रवृत्ती अजून पूर्णतया दडपल्या गेलेल्या नाहीत ही आनंदाची गोष्ट आहे. पण असा धोका आहे खरा. नवीन दालन खुले होऊन त्यात मनशोक विहार करण्याची मोकळीक मिळाल्याने स्त्रीचे कर्तृत्व त्यात गुंग झाले आहे, तोपर्यंत गुणावगुणांकरता आत्मपरीक्षण करण्याकडे तिचे लक्ष जाणार नाही. ते गेले की तिला स्पष्ट होईल की पुरुषाचे पौरुष जितके इष्ट आहे तितके स्त्रीचे मार्दव इष्ट आहे. पौरुषाबरोबर वसणारा मनोविकारांचा उच्छृंखलपणा जितका क्षम्य आहे, तितकी मार्दवाबरोबर वसणारी शिथिलता क्षम्य आहे. या उणीवा खऱ्या, पण त्या नष्ट करताना मूळ गाभ्याला धक्का बसत असेल तर त्यांचा नायनाट करण्याचा अट्टाहास कशाला धरायचा? परस्परांच्या अपूर्णतेची सहानुभूतिपूर्वक जाणीव ठेवल्याने सहकार्य साधून जो लाभ होईल त्याला असाध्य पूर्णत्वाच्या मागे लागल्याने उलट मुकावे लागेल. कारण त्यात श्रम व वेळ अस्थानी खर्च होतील व प्रगतीत खंड पडेल.

## स्त्रीचे वैशिष्ट्य तिथे प्रकट होत नाही

उच्च शिक्षणाच्या पातळीवर उत्कृष्ट ठरलेल्या स्त्रीशिक्षिका आज आहेत, पुढेही निघतील. पण सामान्यपणे विद्यार्थ्यांच्या मानसिक विकासाच्या दृष्टीने व विद्यार्थ्यांच्या

द्वारा समाजाला वळण लावण्याच्या दृष्टीने स्त्रीचे यशःसंपादन पुरुषशिक्षकापासून भिन्न —स्त्रीविशिष्ट असे असल्याचे आढळत नाही. मुलांमुलींची बौद्धिक, व्यावसायिक, तयारी स्त्री पुरेपूर करून घेऊ शकते. पण विद्यार्थ्यांच्या मनाची घडवणूक एकांगी होत राहते. जीवनाबद्दलच्या स्त्रीच्या दृष्टिकोनाची ओळख त्यांना होत नाही. जीवनाचे सर्वांगी स्वरूप त्याना दिसू शकत नाही. त्यांच्यामध्ये मानसिक कणखरपणा, धैर्य, कष्टाळूपणा, धिमेपणा, त्याग, सहिष्णुता, सहानुभूती, सामुदायिक एकत्व राखण्याची प्रवृत्ती व त्याकरता इतरांशी जमवून घेण्याची तयारी इत्यादी स्त्रीविशिष्ट गुण संक्रमित होत नाहीत. कारण शिक्षणाच्या या टप्प्यात अध्यापन करणाऱ्या स्त्रियांनी स्वतः पुरुषांबरोबर पुरुषांचा अभ्यासक्रम दीर्घकालपर्यंत केलेला आहे. त्या अभ्यासक्रमात स्त्री-जीवनाचे वैशिष्ट्य विचारात घेतले गेलेले नाही व त्यामुळे त्या स्त्रियांच्या विचारांना व प्रवृत्तींना पुरुषी वळण लागले आहे. स्त्रीत्वाचे पैलू शाबूत राखणाऱ्या शिक्षिकांपासून उत्कृष्ट समाजधारणेला आवश्यक असलेली सेवा मिळेल. तोपर्यंत त्या क्षेत्रात काम करणाऱ्या स्त्रिया पुरुष जे कार्य करीत आहेत तेच त्यांच्याच पद्धतीने व ध्येयाने करीत राहतील. यात पुरुषांच्या बरोबरीने स्त्री कार्य करू शकते या भावनेने समाजाला व स्वतः स्त्रीला मिळणाऱ्या समाधानापलीकडे वस्तुतः काही लाभ नाही. या क्षेत्राची प्रतिष्ठा स्त्रियांना अधिकाधिक आकर्षित करील यात शंका नाही. परंतु सुशिक्षित स्त्रीने निव्वळ आकर्षणाला बळी न पडता महत्त्वाकांक्षेपेक्षा बौद्धिक ताकद व टेवण आणि वैयक्तिक उत्कर्षापेक्षा समाजहित साधण्याचे महत्त्व हे मुद्दे उच्च शिक्षणक्षेत्रात येताना आवर्जून विचारात घेतले पाहिजेत.

नोकरी करावीच लागली तर स्त्रीला कामात आनंद व समाधान मिळवून देणारे व तिच्या नैसर्गिक शक्ती कारणी लावणारे शिक्षणासारखे दुसरे क्षेत्र नाही. पण उच्च शिक्षणक्षेत्रापेक्षा प्राथमिक व माध्यमिक क्षेत्राचे महत्त्व बिलकुल कमी नाही. शिवाय शिक्षणक्रमात वर जाता जाता विद्यार्थिसंख्या अनेक कारणांनी निमुळती होत जाते. म्हणून समाजात अधिक भरीव शैक्षणिक कार्य खालच्या थरातच अगोदर व्हावे लागते. परदेशात प्राथमिक शिक्षण जवळजवळ स्त्रीच्याच कर्तृत्वावर चालू आहे. माध्यमिक अवस्थेपर्यंत स्त्रीच्या मानसिक व बौद्धिक शक्तींचा उपयोग समाजाला लाभदायक होऊ शकतो व तसा तो करून घ्यावा असे सामान्यतः मत आहे. कारण त्यात स्त्रीसहज गुणांचे चीज होते व स्त्रीला जरी थोडाफार कामाचा ताण पडत असला तरी तो तिच्या प्रवृत्तींना सह्य असतो. समाजातील स्त्रीशक्तीचा ऱ्हास करण्याइतका ताण असह्य होऊ नये याासाठी कामाचे तास कमी करण्यासारख्या योजना असाव्या.

अर्थार्जनाचा काच तीव्रतर झाल्यामुळे अलीकडे १५–२० वर्षांत स्त्रिया दुसऱ्या अनेक क्षेत्रांत नोकऱ्या पत्करीत आहेत. पण या स्त्रियांची मने व जीवने रुक्ष बनल्याचे काही वर्गांत मोठ्या प्रमाणात आढळून येईल अशी भीती वाटते. तसे झाल्यास समाजजीवन रसहीन, शुष्क बनून जाण्याचा धोका आहे.

स्त्रीवर्गाचे अर्थार्जन ही एक वादग्रस्त समस्या झाली आहे. कोणत्याही पातळी-वरील संसारात स्त्रीपुरुष दोघेही मिळवती असल्याचे पुष्कळ पांढरपेशा कुटुंबात आज आढळते. पैसा मिळवण्याच्या नादाने समाजधारणेतील आपल्या आद्य कर्तव्याकडे स्त्रीचे दुर्लक्ष होते की काय याची आकडेवारी काढल्याशिवाय काही विधान करणे योग्य होणार नाही. शिवाय या विषयावर मतभेद आहेत. परंतु आज जी परिस्थिती दिसते त्यात स्त्रीला द्रव्यार्जन करायला पुरुष फारसा खुशीने लावीत नाही असे दिसते. थकूनभागून आल्यावर घरात कुटुंबात मिळणारी शांती व विश्रांती गमवायला त्याची तयारी नाही. अंशतः या कारणाने व अंशतः स्त्रीचे स्वतःचेच हृदयबंध घर, संसार, कुटुंब, यांभोवतीच गुंतलेले असल्यामुळे पैसा मिळविण्यासाठी बाहेर पडणे टाळता येईल तर टाळणाऱ्या स्त्रियांची संख्या मोठी आहे.

## पुरुषी शिक्षणक्रम स्त्रीला वर की शाप ?

आपल्या देशात झालेल्या स्त्रीशिक्षणाच्या प्रसाराचे तारीफ कोणीही कौतुक करील. इंग्लंड अमेरिकेसारख्या देशापेक्षा स्त्रीशिक्षणाचा प्रसार येथे अधिक वेगाने झाला. त्याला भारतातील गेल्या दोन पिढ्यांतील विचारवंतांची तळमळ, चिकाटी व त्याग कारण झाला. याचे भारतीय स्त्रीने कृतज्ञतापूर्वक चिरकाल स्मरण ठेवले पाहिजे. पण अंशतः त्या विचारवंताचे ध्येय व तत्त्वप्रणाली पुरती आत्मसात होण्यापूर्वीच शैक्षणिक प्रसाराला चहूकडे वेग व उठाव आला म्हणून व अंशतः आपले राजकीय धोरण व आर्थिक स्वावलंबन यांची सुसंबद्ध सांगड होऊ शकली नाही म्हणून आपल्या शिक्षणाची समृद्धी योग्य प्रकारे झाली नाही. शिक्षणाचा प्रत्यक्ष जीवनाशी संबंध राहिला नाही हे प्रत्यक्ष जीवन जगताना लक्षात येऊ लागले आहे. आता मोठमोठ्या मान्यवरांचे विचार वाचण्यात व ऐकण्यात येतात की, मानवी जीवनात स्त्रीचे पुरुषाच्या जोडीचे, पूरक, पण निश्चितपणे भिन्न, असे विशिष्ट कार्य आहे, हे सत्य लक्षात घेतल्याशिवाय समाज सर्व बाजूंनी भक्कम बनणार नाही. स्त्रीला आपले शिक्षण सफल करायचे असेल तर या विचारांचा अभ्यास तिने स्वतः स्वतंत्रपणे कोणताही अभिमान व अभिनिवेश न बाळगता केला पाहिजे.

मौज अशी आहे की शिक्षणक्रम आखताना स्त्रीला विशिष्ट स्थान आजवर कोणी दिले नाही आणि तिने मागितले नाही. मुलांसाठी शिक्षणक्रम बनवायचे व ते गुणदोषांसह मुलींना लागू व्हायचे, ही आरंभापासूनची प्रथा. स्त्रीने याबद्दल कधी तक्रार केली नाही, कारण तिने स्वतःच्या जीवनाचा स्वतंत्र भूमिकेवरून विचारच केला नाही. स्त्रीजीवनाचे *सुगृहिणी व सुमाता हे ध्येय भारतात एकुलत्या एका द्रष्ट्याने—महर्षि* कर्व्यांनी मांडले. स्त्रीला व जनतेला ते एकदम पटले, पसंत पडले. पण मग अधिक मोहक ध्येये समोर येऊ लागली. कर्तृत्व व आत्मविश्वास वाढला तशी ईर्ष्या वाढली. स्त्रीपुरुषांमधील नैसर्गिक असलेल्या सर्व प्रकारच्या फरकाचा नायनाट करायचा चंग बांधून प्रयत्नाला लागलेल्या बुद्धिवादी पाश्चात्यांच्या विचाराचे वारे जोरात इकडे वाहू

लागले. त्यांनी उठवलेले वादळ अजून शांत झालेले नाही. आता 'पुरुषांना मिळतं ते, तसेच, तितकेच, आम्हाला पाहिजे' ही स्त्रीची मागणी आहे. स्वतःचे श्रेष्ठत्व आणि या मागणीतील वेडी लाचारी तिला दिसत नाही. सर्व तऱ्हेचे उत्तेजन, सर्व तऱ्हेच्या सवलती, प्रयत्न, इत्यादींनी 'अनंत हस्ते' उपलब्ध करून दिलेल्या शिक्षणाने स्वत्व जागृत झाल्याचा अभिमान मिरवणाऱ्या स्त्रीचे वैचारिक परावलंबित्व होते तसेच आहे.

## स्त्री ही कुटुंबाच्या द्वारा समाज घडविणारी आहे

स्वतंत्रपणे विचार केला तर स्त्रीला आढळून येईल की समाजाला घडवण्याच्या आपल्या कार्याची कक्षा अपार आहे. शिकलेल्या स्त्रियांची संख्या शहरी विभागात तरी चांगलीच मोठी आहे. पण यांपैकी बहुसंख्य स्त्रिया नोकऱ्या वा अर्थार्जन करीत नाहीत. सामान्यतः स्त्री घर संभाळीत आहे. आणि ही परिस्थिती निसर्गाला व जीवनपरंपरेला धरून आहे. इतकेच नव्हे, तर ती सर्वथैव इष्ट आहे. जगात कुठेही कुटुंबजीवनाचे सौख्य गमवायला माणूस तयार नाही. भारतात तर धर्मानेच आश्रम-व्यवस्था बनवून कुटुंबजीवनाची श्रेष्ठता प्रस्थापित केली आहे. कुटुंबापासून अलग असा जीवनाचा अर्थच लावता येत नाही. शिक्षण जीवनापासून दूर पडत गेल्याने घर व कुटुंब यातील वाङ्‍वी बंधनाबद्दल विकृत कल्पना उद्भवल्या आहेत. पुरुषाला मनःशान्ती व मुलांना आस्थापूर्ण संगोपन मिळवून देणाऱ्या स्त्रीचा दर्जा बाहेरील जीवन पत्करून नव्या नव्या कृत्रिम बंधनात अडकून घेणाऱ्या स्त्रीपेक्षा समाजधारणेच्या दृष्टीने कितीतरी अधिकच श्रेष्ठ ठरतो. '**When you educate a boy, you educate an individual, and when you educate a girl, you educate a family,**' हे नुसते प्रचाराचे घोषवाक्य नव्हे. ते एक सत्य आहे. स्त्रीचे प्रत्यक्ष कर्तव्यक्षेत्र अत्यंत लहान कुटुंबाने मर्यादित दिसले तरी ते अत्यंत व्यापक व अत्यंत महत्त्वाचे आहे. कारण बहुसंख्य स्त्रीवर्गाचे जीवन या क्षेत्रात व्यतीत होत आहे व दुसरे असे की कुटुंबाकुटुंबातून वाढलेल्या घटकाचा समाज बनत असल्याने प्रत्येक घटकाचा विकास समाजविकासाला अनुकूल, पुरेसा व सर्वांगीण झाला पाहिजे ही कुटुंबप्रमुखाची जबाबदारी असते. या दृष्टिकोनातून पाहिले तर घर संभाळणारी स्त्री जे शिक्षण अहर्निश देत असते त्याचे महत्त्व लक्षात येईल.

हे शिक्षण शाळा-कॉलेजांच्या बाहेरचे सर्व वातावरण व्यापून राहिलेले आहे. त्याने फक्त बुद्धी विकसित होत नाही, मनही विकसित होते. माणसाची माणुसकी जागृत राहील, सहिष्णुता वाढीला लागेल, कोतेपणा नाहीसा होईल, समाजाबद्दलच्या व राष्ट्राबद्दलच्या कर्तव्याची भावना बोचायला लागेल, कष्ट करण्याची तयारी राहील, जीवनातले गांभीर्य ओळखण्याची सवय लागेल, थोडक्यात म्हणजे आज 'शिक्षण' मिळत असूनही जे दुरावस्त झाले आहे असे दिसते, पण जे प्रगती हवी असेल तर आवश्यक आहे ते सर्व शिक्षण घर संभाळणारी स्त्रीच देऊ शकेल. जीवनात

आपल्याला स्थान आहे, आपल्याला विचार करता येतो, कार्य करता येते, जबाबदारी उचलता येते, हे तिला शिक्षणाने पटवले आहे. आता समाजाशी आपला अविभाज्य घटक म्हणून असलेला संबंध व त्यामुळे आपल्यावर समाजाच्या उत्कर्षाकरिता असलेली जबाबदारी तिने ओळखली पाहिजे.

## मातेच्या जबाबदारीची व्याप्ति

प्रथम स्त्री माता-पालक असते. शिक्षक पालकांना परस्परांच्या कार्याबद्दल वाद नेहमी कानावर येतो. दोघांचे सहकार्य किती आवश्यक आहे हे सांगायला नको. काही बाबतीत मुलाच्या विकासाची सर्व जबाबदारी शिक्षकाची व काही बाबतीत सर्व जबाबदारी पालकाची असते. ही आपआपली जबाबदारी दोघांनी मनापासून पूर्णतया उचलली पाहिजे. मुलांच्या विकासाच्या दृष्टीने काही उणीवा किंवा अनपेक्षित वा अनिष्ट परिणाम परस्परांच्या कार्यक्षेत्रात घडत असल्याचे लक्षात आले की लगेच परस्परांचे तिकडे लक्ष वेधून तेवढ्या बाबतीत स्वतः अलिप्त राहिले पाहिजे. वैयक्तिक व सामाजिक जीवनात आवश्यक असलेल्या शारीरिक व मानसिक योग्य त्या सवयी मुलांना लावणे हे पालकाचे काम आहे. अर्थात् माता याबद्दल जबाबदार आहे. या जबाबदारीची व्याप्ती फार मोठी आहे. ती यशस्वी रीतीने पेलण्यासाठी मातेला पूर्वतयारीही जबर केली पाहिजे. अखंड बदलत्या जीवनाचा व समाजाला सतत उन्नतिपथावर राखण्याकरिता कशा प्रकारचे वळण आवश्यक आहे याचा विशाल दृष्टी ठेवून तिने अभ्यास करीत राहिले पाहिजे, व त्या कार्यात आपला अल्प वाटा आहे हे ओळखून त्या कार्याला अनुकूल अशा आचारविचारांच्या सवयी प्रथम कटाक्षाने स्वतःला लावून घेतल्या पाहिजेत. उदाहरणार्थ, आर्थिक हलाखी आ वासून आली असताना द्रव्योत्पादनाच्या अगोदर काटकसरीचा अवलंब आवश्यक आहे हे ओळखणारी स्त्री आपल्या मुलांना साधेपणाच्या सवयी लावण्याबद्दल जागरूक राहील आणि त्याकरिता स्वतः साधी राहू लागेल. आपल्या मुलांना मागतील त्या वस्तू, उंची तऱ्हेतऱ्हेचे कपडे वगैरे पुरवीत राहण्याने तशी शक्यता नसलेल्या कुटुंबातील मुलांच्या मनात आपण असंतोष, मत्सर, विरोधवृत्ती, पालकाबद्दल अढी, अपहाराची इच्छा इत्यादी अनेक विकृती निर्माण करतो व पर्यायाने समाजघातक कृती करतो, ही गोष्ट लक्षात घेऊन आपल्या मुलांच्या व त्याच्या निमित्ताने आपल्या स्वतःच्या हौशी भागवण्याच्या मोहावर विचारी माता संयम घालायला शिकेल. तात्पर्य, घर संभाळणारी स्त्री सतत स्वतः शिकत असते, स्वतःच्या मुलांना शिकवीत असते आणि समाज घडवीत असते.

## स्त्रियांचें समाजकार्य आणि लेखनकार्य

कुटुंबाबाहेरच्या अमर्याद जीवनाच्या क्षेत्रातही निरनिराळ्या विभागात स्त्री शिक्षण देत असते. वेतनी काम न करणाऱ्या कितीतरी स्त्रिया समाजसेवा म्हणून काही करीत

असतात. बहुधा स्त्रियांचे सांसारिक प्रश्न सोडवण्यास हातभार लावणे व त्यांच्यामध्ये जागृती उत्पन्न करणे असे या समाजसेवेचे स्वरूप असते. या कार्याचे मोजमाप करणे फार कठीण आहे. आपल्या स्त्रीवर्गामध्ये प्रगतीबद्दल आस्था उत्पन्न झाली आहे यात शंका नाही. पण याला सर्व बाजूंनी वातावरणात वाहात असलेले प्रोत्साहक विचारप्रवाह किती कारण आहेत, सरकारने कोणत्याही हेतूने का होईना पुरस्कारलेल्या योजना किती कारण आहेत, रेडिओ सिनेमासारखी सर्वत्र पसरलेली करमणूकद्वारा ज्ञान पुरविणारी साधने किती कारण आहेत, अज्ञात रीतीने जीवनसर्वस्व वाहून फक्त दोन वस्त्रे व दोन वेळचा घास यावर राहून रात्रंदिवस झिजणारे तुरळक पुण्यात्मे किती कारण आहेत व समारंभाने समाजसेवेचा झेंडा फडकवीत जयगीत गात फिरणारे स्त्रीपुरुष किती कारण आहेत हा एक स्वतंत्र संशोधनाचा विषय होईल. सध्या दिसते ते इतके की स्त्री धडपडीत जागी होऊन इतरांना जागे करीत आहे. जागे होऊन आपण करीत आहो काय याबद्दल मात्र तिला संभ्रमच आहे. कारण तिच्या उन्नतीबद्दल, तिला पुढे आणण्याबद्दल, ते कसे पुढे आणावे याबद्दल, योजना झाल्या तर त्यांच्या अंमलबजावणीबद्दल, अजून ती स्वतंत्रपणे काही निर्णय किंवा कृती करू शकत नाही. स्वतंत्रपणे विचार करून स्वतःच्या जबाबदारीचा तिने अभ्यास केला तर खरोखर तिच्या हातून खरी समाजसेवा घडेल.

दुसऱ्या एका विभागातही स्त्री मोठ्या आवडीने पडली आहे. कदाचित या क्षेत्रात तिला अलिकडे मोबदल्याचे आमिष काही प्रमाणात आकर्षीत असेल. पण केवळ मोबदल्यावर नजर ठेवून ती येथे विहार करीत नसावी. मुख्यतः मनातील ऊर्मीचा आविष्कार करण्याची तळमळ, क्वचित स्वतःला मिळालेली माहिती इतरांना देण्याची सदिच्छा, क्वचित आवश्यक वाटलेल्या ठिकाणी अधिकारवाणीने मार्गदर्शन करण्याची तळमळ, इत्यादी प्रेरणा स्त्रीच्या या क्षेत्रातील संचाराच्या मागे आहेत. हे क्षेत्र लेखनाचे. हे क्षेत्र शिक्षणाच्या बाबतीत किती प्रभावी आहे हे अजून दुर्दैवाने पुष्कळ लेखक-लेखिकांनी ओळखलेले नाही, किंवा निदान त्यासंबंधीच्या स्वतःच्या जबाबदारीबद्दल ते बेदरकार आहेत. म्हणूनच समाज सक्षम करण्याऐवजी छिळछिळा करायला आपण कारणीभूत होत आहोत हे त्यांना सुचत नाही. स्त्रीने या क्षेत्राचे सामर्थ्य लक्षात घ्यावे. कुटुंबातील पुरुषाच्या इष्टानिष्ट कृतींच्या परिणामावर सतत नजर ठेवून अनिष्ट गोष्टींना शह देण्यासाठी ती प्राणपणाने कंबर कसून उभी असते. समाजकुटुंबातील अनिष्टता निकामी करण्याचे काम स्त्रीशिवाय कोण करणार! स्वतःचे स्थान व जबाबदारी ओळखून तिने वाङ्मयक्षेत्रातील क्षुद्र विचारविकारांवर प्रतिहल्ले चढवीत राहिले पाहिजे. लेखनाच्या वापराने मनरंजन व उदात्त विचारांना प्रसार असा उपयोग व्हावा आणि अशा लेखनातून स्त्री ही एक शक्ती आहे असा साक्षात्कार व्हावा. वृत्तपत्रातील व नियतकालिकातील पोरकट विनोदाचा किंवा हीनरस 'कळे'चा स्त्री विषय होणार नाही, असा सबळ स्त्रीने स्वतःच पवित्रा पाहिजे. याकरिता अर्थात तिला आत्मपरीक्षण करून

स्वतःला फक्त शिरून घ्यावी लागेल. पण ही स्त्रीची जबाबदारीच आहे.

## स्त्रीने आपले प्रचंड सामर्थ्य योग्य रीतीने वापरले पाहिजे

जीवनात स्त्रीचे स्थान ‘ शिक्षिका ’ म्हणून कसे व किती विशिष्ट आहे, याची कल्पना थोडासा आजूबाजूच्या वातावरणाचा विचार केला असता सहज येईल. आज हेतुपुरःसर वापरण्यात येणाऱ्या शिक्षणाच्या साधनामध्ये चित्रपट हे एक साधन आहे. या साधनाला फक्त काही मर्यादित कार्यक्रमापुरता शिक्षणाच्या प्रत्यक्ष आवारात प्रवेश व वापर आहे. पण त्या आवाराबाहेर हे साधन उपयोगात असते तेव्हाही ‘ शिक्षण देण्याचे ’ काम त्याच्याकडून होतच राहते. या शिक्षणक्रमावर कोणी नियंत्रण घालू शकत नाही. त्यात भाग बजावणाऱ्या पुरुषांचे समाजावर वजन व स्त्रियांचे वजन यांची तुलना केली तर खुद्द मानवी जीवनालाच स्त्री कसे वळण लावू शकते हे लक्षात येईल.

आपल्या या प्रचंड दुर्दम्य सामर्थ्याची व त्या सामर्थ्यामुळे अनिवार्यपणे आपल्यावर पडणाऱ्या समाजविषयक जबाबदारीची जाणीव स्त्रीने ठेवली पाहिजे. स्वतःच्या स्थानाचा मान व पावित्र्य राखण्याची पात्रता अंगी आणण्याबद्दल ती सदैव जागरूक राहिली पाहिजे. स्त्रीने जगात पुरुषाला कर्तबगार बनवले असल्याचे कितीतरी दाखले आहेत. प्रेम, साहाय्य, प्रेरणा, आणि संरक्षणसुद्धा स्त्रीपासून सतत पुरुषाला मिळत आले आहे. पण स्वतःबद्दलची ही जाणीव सुप्त झालेली आणि नैसर्गिक शक्ती मात्र जागृत, क्रियाशील, शिक्षणाने अधिक तीक्ष्ण बनवलेली. यामुळे आपल्या हातून गोंधळ माजत आहे व अहितकारक, समाजविघातक वर्तन घडत आहे ही परिस्थिती ओळखण्याचे ज्ञान आता स्त्रीजातीला हवे.

१६. भारतीय कायद्याने स्त्रीला दिलेले संरक्षण
विरूपाक्ष अप्पाजी नाईक

१७. समाजधारणेत स्त्रीचे स्थान
मालतीबाई बेडेकर

१८. स्त्रीजीवनातील समस्या
गीता साने

१९. स्त्रीजीवनाची चित्रे
श्रीपाद शंकर नवरे

२० आंतरभारतीय स्त्रीजीवन
श्रीपाद जोशी

१६

# भारतीय कायद्याने स्त्रीला दिलेले संरक्षण

विरूपाक्ष अव्वाजी नाईक

श्री. विरूपाक्ष अव्वाजी नाईक, बी. ए. एल्एल्. बी. (जन्म १९–४–१९०५) औद्योगिक न्यायालय प्रमुख, मुंबई. १९३० पासून १८ वर्षे बेळगावात वकिली, शैक्षणिक व सामाजिक कार्यांत भाग. नंतर अकरा वर्षे जिल्हा न्यायाधीश. १९६६ पर्यंत मुंबई हायकोर्टात न्यायमूर्ती. विविध विषयांवर स्फुट लेखन. 'मानवी स्वातंत्र्य—प्रेरणा व साधना' नुकतेच प्रसिद्ध झाले. अनेक संस्थांमध्ये महत्त्वाचे स्थान. ('प्रबोधन', प्रभात रस्ता, पुणे ४)

## कायद्याने सामाजिक सुधारणा

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात समाज-परिवर्तन अथवा सामाजिक सुधारणा कायद्याने घडवून आणाव्या की नाही याबद्दल या देशात व विशेषतः महाराष्ट्रात एक मोठा वाद निर्माण झाला होता. १८९१ साली तत्कालीन कौन्सिलमध्ये संमतिवयाचे बिल (एज ऑफ कन्सेंट बिल) जेव्हा दाखल करण्यात आले त्या वेळेला या वादाला मोठेच भरते आले होते. कायद्याने सामाजिक सुधारणा घडवून आणणे इष्ट नव्हे असे म्हणणाऱ्या पक्षाचे नेतृत्व लोकमान्य टिळक यांच्याकडे होते. न्यायमूर्ती तेलंग यांसारखे काही नेमस्त सुधारक कायद्याने विवाहविषयक अगर अन्य कोणतीही सुधारणा घडवून आणू नये अशा तऱ्हेच्या मताचे प्रतिपादन पूर्वीपासून करीत आले होते. रानडे आगरकर प्रभृतींनी मात्र कायद्याने सामाजिक सुधारणा घडवून आणणे नुसते इष्टच नव्हे तर अपरिहार्य आहे अशा मताचा पाठपुरावा जोराने केला. परंतु हळूहळू पण निश्चयेकरून कायद्याच्या हस्तक्षेप सामाजिक चालीरीती बदलण्याच्या दिशेने व समाजात इष्ट ते फेरफार करण्याच्या दिशेने वाढत्या प्रमाणात होत गेला. कायद्याने सामाजिक सुधारणा घडवून आणावी की नाही हा वाद आता कालबाह्य ठरलेला आहे. व्यक्तीच्या व समाजाच्या दैनंदिन जीवनामध्ये कायद्याचा हस्तक्षेप दिवसेदिवस वाढत चाललेला आहे. लोककल्याणकारी राज्य स्थापन करण्याकरिता बद्धपरिकर झालेल्या राज्यसंस्थेला सामाजिक न्याय प्रस्थापित करण्याकरिता कायद्याचा आश्रय घेतल्याशिवाय गत्यंतर नाही

हे उघड आहे. एक गोष्ट मात्र खरी की नुसत्या कायद्याने सामाजिक सुधारणा अगर परिवर्तन पूर्णांशाने यशस्वी करणे कठीण आहे. कार्य पूर्ण करण्याकरिता लोकमतामध्येही बदल घडवून आणण्याचा प्रयत्न समाजधुरिणांनी सतत केला पाहिजे. कायदा व लोकमत यामध्ये तफावतीचे मोठे खिंडार राहिले तर ते भरून काढणे कठीण होऊन जाते.

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर घटनेने व भारतीय संसदेने वेळोवेळी कायदे करून स्त्रियांना अनेक बाबतीत संरक्षण दिलेले आहे. घटनेने व इतर स्त्रीविषयक कायद्यांनी भारतीय स्त्रीला जे संरक्षण मिळालेले आहे त्याचे स्वरूप व व्याप्ती नीटपणे समजावून घेण्याकरिता भारतीय समाजात स्वातंत्र्यपूर्व काळी स्त्रीचे स्थान काय होते याचे संपूर्ण चित्र समोर उभे करणे आवश्यक आहे. 'स्वातंत्र्यपूर्व काळ' हा शब्दप्रयोग सुद्धा वरील दृष्टीने मोघम स्वरूपाचा आहे. स्वातंत्र्यपूर्व काळाची विभागणीसुद्धा दोन कालखंडात करणे आवश्यक आहे. पहिला कालखंड म्हणजे ब्रिटिशांचे राज्य हिंदुस्थानात येण्यापूर्वीचा व दुसरा कालखंड म्हणजे ब्रिटिश अमदानी सुरू झाल्यानंतरचा.

## ब्रिटिश अमदानीपूर्वीची स्थिती

भारतीय समाजातील स्त्रीचे स्थान सुमारे १५०० वर्षांपूर्वी मनूच्या वेळेस निश्चित झाले. स्त्रीला भारतीय समाजात अत्यंत दुय्यम किंबहुना हीन प्रतीचे स्थान मिळालेले होते. स्त्री ही स्वातंत्र्याला पात्र नाही अशी निःसंदिग्ध घोषणा मनूने केलेली आहे. 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः' अशा अर्थाची जी वचने मनुस्मृतीत व अन्य ठिकाणी सापडतात ती अर्थवादात्मक समजली पाहिजेत. गार्गी व मैत्रेयी यांसारख्या विदुषी प्राचीन काळी होऊन गेल्या यावरून सामान्य स्त्रीसंबंधी अंदाज बांधणे चुकीचे होय. कारण स्त्री व शूद्र वेदांच्या म्हणजे विद्येच्या व ज्ञानाच्या क्षेत्रात एकाच पंगतीवर बसविण्यात आलेले आहेत. दोघांनाही ज्ञानापासून वंचित केले आहे. विवाह हा एक संस्कार आहे व विवाहसंबंध अविच्छेद्य आहे असे मानण्यात आलेले होते. बायको मेली असता किंवा ती हयात असतानासुद्धा दुसरे किंवा तिसरे लग्न करण्याचा अधिकार पुरुषाला बहाल करण्यात आला असला तरी स्त्रीने पतिनिधनानंतर एक तर सती जावे किंवा केशवपन करून वैधव्यात जन्मभर पिचत राहावे अशी व्यवस्था करण्यात आलेली होती. बालविवाह मान्य होते इतकेच नव्हे तर बालपणीच विवाह झाले पाहिजेत असा आग्रह होता. 'अष्टवर्षा भवेत् कन्या' हे मनुवचन सुप्रसिद्ध आहे. बालविवाहाच्या चालीमुळे बालविधवांची संख्या समाजात फार मोठी असे. त्यांची स्थिती अत्यंत अनुकंपनीय असे. आंतरजातीय विवाह वर्ज्य होते. एका जातीमधील पोटजातींतील विवाहांनासुद्धा बंदी घालण्यात आली होती. विवाहाच्या बाबतीत अनुलोम व प्रतिलोम गोत्रप्रवरविषयक बंधने (प्रोहिबिटेड डिग्रीज) यांसारखी अनेक कृत्रिम बंधने घालण्यात आली होती.

### स्त्रीला मिळकतीवर मालकी हक्क नव्हता

हिंदू कुटुंब प्रायः अविभक्त कुटुंब असायचे. अविभक्त कुटुंबात स्त्रीला फक्त अन्नवस्त्राचा अधिकार असायचा. अविभक्त कुटुंबातील विधवेची स्थिती अत्यंत दयनीय अशी असे. तिला दत्तक घेण्याचाही अधिकार नसे. विभक्त कुटुंबात मिळकतीवर स्त्रीला मर्यादित स्वरूपाचे हक्क देण्यात आले होते. आपल्या हयातीपर्यंत नवऱ्याच्या मिळकतीचा उपभोग तिला घेता येत असे. तिच्या हक्काची मर्यादा हयात उपभोगापुरतीच असे. स्त्रीधन म्हणजे ज्या मिळकतीवर स्त्रीला संपूर्ण अधिकार आहे ती. अशी मिळकत अति अल्प व वेगवेगळ्या प्रदेशात वेगवेगळ्या स्वरूपात व प्रमाणात असे. मुलीचे कन्यादान करण्याच्या वेळेस काही ठिकाणी व काही जातीत बाप पैसे घेत असे त्याला शुल्क हे नाव प्राप्त झाले. बापाने या शुल्कापैकी काही भाग मुलीला अर्पण केला तर ते मुलीचे स्त्रीधन होत असे. त्याचप्रमाणे लाजाहोम होण्यापूर्वी किंवा मिरवणुकीच्या वेळेस आई, मामा वगैरे जवळच्या नातेवाईकांकडून प्रेमाखातर जी देणगी वधूला मिळे ती तिचे स्त्रीधन मानले जात असे. याज्ञवल्क्याच्या मताप्रमाणे नातेवाईकांकडून लग्नानंतर सुद्धा मिळालेल्या देणग्या स्त्रीधन ठरत असत. कात्यायनाच्या मताप्रमाणे कलाकृतेच्या जोरावर व कलाकुसरीने संपादन केलेल्या द्रव्यावरसुद्धा नवऱ्याचे स्वामित्व असायचे. नवऱ्याकडून शुद्ध प्रेमाने मिळालेली देणगी ही बायकोची स्त्रीधन मिळकत आहे, असे नारदाचे मत आहे. सारांश, स्त्रीधनासंबंधी स्मृतिकाराची कल्पना अत्यंत कोत्या स्वरूपाची होती.

भाष्यकारांनी स्मृतिकारांच्या कल्पनेचा विस्तार करण्याचा प्रयत्न केला. विज्ञानेश्वराने स्त्रीला कन्यावारसाने मिळालेली मिळकत हे स्त्रीधन मानले आहे. त्याचप्रमाणे स्त्रीने आपण कमविलेल्या पैशाने विकत घेतलेली मिळकत किंवा विरुद्ध कब्जाने प्राप्त करून घेतलेली मिळकत हेसुद्धा स्त्रीधन होते असे विज्ञानेश्वराचे म्हणणे आहे. जीमूतवाहन याने ज्या मिळकतीवर नवऱ्याचा अधिकार नसेल ती मिळकत स्त्रीधन या सदराखाली टाकावी अशी ऐसपैस व मोघम व्याख्या केली आहे.

स्त्रीचा वारसा हक्क अत्यंत मर्यादित स्वरूपाचा असे. अविभक्त कुटुंबात स्त्रीला कोणत्याही स्वरूपाचा वारसा हक्क मिळत नसे. तिचा हक्क अन्नवस्त्रापुरता मर्यादित असे. स्थूलमानाने विधवा, मुलगी, आई, बापाची आई व बापाची आजी यांना वारसा हक्क प्राप्त होत असे. मुंबई वेटांत ज्या ठिकाणी नीलकंठभट्टाचे मयूख प्रचलित आहे त्या ठिकाणी बहिणीलाही वारसा हक्क मिळत असे. नदपंडित व बाळंभट यांचेही मत वरीलप्रमाणेच आहे. गोत्रज सपिंडाची विधवा व मुलगी यांचाही वारसदारामध्ये समावेश वरील टीकाकाराने केला आहे. मात्र बगाल, बनारस, मद्रास व मिथिला या प्रदेशात स्त्रीला मिळालेला वारसा हक्क मर्यादित स्वरूपाचा म्हणजे हयात मालकीचा आहे. महाराष्ट्रात व मुंबईमध्ये मात्र कन्यावारसाने आलेली मिळकत स्त्रीची स्वतंत्र मालकीची मिळकत म्हणजे स्त्रीधन मानलेली आहे.

स्त्रियांच्या हक्कांनी स्थूलमानाने वर निर्दिष्ट केलेल्या स्वरूपात ब्रिटिशांचा अंमल यानात चालू होईपर्यंत अस्तित्वात होती.

## ...श अंमल सुरू झाल्यानंतर

ब्रिटिश अंमल आल्यानंतर पाश्चात्य शिक्षणाच्या प्रसाराबरोबर समतेचे व ...याचे व बंधविमोचन करणारे विचार या देशात प्रसृत होऊ लागले. न्याय व ...च्या पायावर नव समाजाची उभारणी केली पाहिजे, असे विचार तत्कालीन ...जसुधारकांनी जोराने पुढे मांडण्यास सुरुवात केली. समाजात स्त्रीला मानाचे ...द मिळाले पाहिजे हा त्यांच्या सामाजिक पुनर्रचनेच्या विचाराचाच एक भाग ... स्त्रीला समाजामध्ये योग्य स्थान मिळवून देण्याकरिता स्त्रीशिक्षणाला चालना ...ाली पाहिजे असा या समाजधुरिणांचा योग्य आग्रह होता. कायद्याने पहिला ...र सतीच्या अमानुष चालीवर केला व सती जाण्यास कायद्याने मज्जाव करण्यात ...ा. १८५६ साली विधवांच्या पुनर्विवाहाला अनुमती देणारा कायदा मंजूर करण्यात ...ा. शास्त्रांचा अर्थ चुकीचा लावल्यामुळे व रूढीच्या दबावाखाली विधवांच्या ...र्विवाहाला बंदी करण्यात आली आहे व ही बंदी शास्त्रसंमत नाही अशा तऱ्हेचे ...कायद्याचे समर्थन करण्यात आले. १८७२ साली 'स्पेशल मॅरेज ॲक्ट' या ...ाचा कायदा पसार होऊन जे कोणी आपण हिंदू नाही अशी घोषणा करण्यास ...र असतील त्यांना जातिबंधने बाजूस सारून विवाह करण्यास या कायद्याने मोकळीक ...न देण्यात आली. १९२३ साली या कायद्यात फेरबदल होऊन हिंदू धर्माचा ...ग न करताही कोणालाही स्पेशल मॅरेज ॲक्टप्रमाणे आंतरजातीय विवाह करण्यास ...ळीक मिळाली. १९२९ साली बालविवाह प्रतिबंधक कायदा मध्यवर्ती विधिमंडळाने ...विलास शारदा या सभासदाच्या नेतृत्वाने मंजूर केला. यालाच रूढ भाषेत 'शारदा ...यदा' असे नाव मिळाले. या कायद्याने मुलीच्या विवाहाची मर्यादा १४ वर्षांपर्यंत ...ढविण्यात आली. कन्यावारसाने मिळालेली मिळकत हे स्त्रीचे संपूर्ण मालकीचे ...न असते हा महाराष्ट्र व मुंबई येथे प्रचलित असलेला नियम ज्या ज्या ठिकाणी ...ताक्षरेचा अंमल (विज्ञानेश्वराचे भाष्य) चालू आहे तेथे तेथे लागू करावा अशा ...र्थाचा कायदा १९२९ साली 'हिंदू लॉ ऑफ इन्हेरिटन्स ॲक्ट' नावाने मंजूर ...ण्यात आला.

१९३७ साली स्त्रियांच्या मिळकतीच्या हक्कात वाढ करणारा कायदा 'हिंदू ...मेन्स राइट टु प्रॉपर्टी ॲक्ट' या नावाने पसार करण्यात आला. या कायद्यान्वये ...विभक्त कुटुंबातसुद्धा विधवेला आपल्या नवऱ्याच्या इस्टेटीवरील अंश हयात ...पभोगाकरता मिळू लागला. १९४६ साली 'हिंदू मॅरेज डिसेबिलिटीज ॲक्ट' या ...ावाचा कायदा संमत होऊन एका जातीतील निरनिराळ्या पोटजातींमध्ये, सगोत्र व ...पिंड वधूवरांमध्ये विवाह होणेस मज्जाव असू नये अशी तरतूद करण्यात आली.

## स्वातंत्र्योत्तर काळ

१९४९ साली 'हिंदु मॅरेज व्हॅलिडिटी ॲक्ट' या नावाचा कायदा करून अनुलोम व प्रतिलोम अशा तऱ्हेच्या सर्व विवाहांना मान्यता देण्यात आली. दरम्यान मुंबई प्रांतात द्विभार्याप्रतिबंधक कायदा व विवाहविच्छेदास परवानगी देणारा कायदा अशा तऱ्हेचे कायदे १९४६ व १९४७ साली करण्यात आले. पार्लमेंटमध्ये वारसा, विवाह, दत्तक वगैरे हिंदु कायद्याच्या सर्व क्षेत्रात सर्वंकष बदल घडवून आणणारा कायदा 'हिंदु कोड' या नावाने मांडण्यात आला. अत्यंत परिश्रम घेऊन या बिलाची कलमे डॉ. आंबेडकर यांनी तयार केली. मात्र विधिमंडळात त्या बिलाला सनातनी मंडळाकडून कडवा विरोध झाला. त्यामुळे शेवटी हे बिल मागे घ्यावे लागले. ही माघार मात्र तात्पुरती ठरली.

## १९५० ची भारतीय राज्यघटना

१९५० साली भारतीय जनतेने घटना समितीच्या द्वारा एक नवीन घटना घोषित केली. या घटनेच्या उपोद्घातात आर्थिक, सामाजिक व राजकीय न्याय मिळवून देण्याची ग्वाही देण्यात आली आहे. त्याचप्रमाणे त्याच उपोद्घातात व्यक्तिस्वातंत्र्य व संधीची समता या तत्त्वांची घोषणा करण्यात आली आहे. मार्गदर्शक तत्त्वे या चौथ्या परिच्छेदात सारख्या कामाला सारखे वेतन, कामाकरिता सहृदयतेने आखलेल्या सोयी व बाळंतपणाकरिता लागणाऱ्या सुखसोयी यांचीही तरतूद करण्याचे आवाहन करण्यात आले आहे. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे वयात आलेल्या प्रत्येक व्यक्तीस स्त्री व पुरुष यांना मताचा अधिकार बहाल करण्यात आला ही होय. सारांश, घटनेने स्त्री आणि पुरुष यांचा समान दर्जा मान्य करण्यात आला. आणि अशा तऱ्हेने स्त्रीला भारतीय समाजात मानाचे व बरोबरीचे स्थान देण्यात आले.

## विवाहविषयक कायद्यात क्रांतिकारक बदल

आंबेडकरांनी संसदेत मांडलेल्या हिंदु कोड बिलाच्या बाबतीत जो अनुभव आला तो जमेस घेऊन पाटसकर या नव्या कायदेमंत्र्याने नवे डावपेच लढविण्यास सुरवात केली. हिंदु कोड बिलाची बृहत् संहिता संसदेपुढे मांडण्याचे टाळून निरनिराळ्या विषयांत हिंदु कोडाच्या आशयाची विभागणी केली, आणि टप्प्याटप्प्याने हिंदु कायद्यात आमूलाग्र बदल घडवून आणण्याचे ठरविले. पहिला हप्ता १९५५ साली हिंदु विवाहाचा कायदा या रूपाने संसदेपुढे मांडला व तो पसार झाला. या कायद्यामध्ये हिंदु विवाहात फार मोठे व क्रांतिकारक बदल घडून आले. पाचव्या कलमात लग्नाच्या ६ शर्ती सांगण्यात आलेल्या आहेत. लग्नाच्या बाबतीमध्ये जातिविषयक, गोत्रप्रवरविषयक जी अनेक बंधने होती ती काढून टाकण्यात आली. विवाह, धर्मशास्त्रातील विधीप्रमाणे अगर रूढीप्रमाणे करता येतो. विवाहाच्या बाबतीत लेखी पुरावा असावा या उद्देशाने लग्नाची

नोंद करता येते. ९ व्या कलमामध्ये पती अगर पत्नी यांपैकी कोणालाही विवाहपूर्ती (रेस्टिट्यूशन ऑफ कॉंजुगल राइट्स) करण्याचे आवाहन करण्यात येते. १० व्या कलमामध्ये विवाहविच्छेदन करून मिळण्याची तरतूद करण्यात आलेली आहे. दोन वर्षे किंवा अधिक काल दोघांपैकी एकाने दुसऱ्यास योग्य कारणाच्या अभावी टाकून दिले असेल किंवा निर्दयतेने वागविले असेल तर विच्छेदन मागता येते. लग्नाच्या वेळेस नवरा अगर बायको नपुंसक असतील किंवा वेडे असतील किंवा त्यापैकी कोणाचीही संमती फसवून मिळवलेली असेल तर विवाह अवैध ठरविण्याची तरतूद १२ व्या कलमात करण्यात आलेली आहे. १३ व्या कलमात घटस्फोट कोणत्या परिस्थितीत मागता येईल याची तरतूद करण्यात आलेली आहे. सर्वच कलमांचा तपशील सांगत बसण्याचे कारण नाही. विवाह हा एक संस्कार असून विवाहबंधन अविच्छेद्य असते ही कल्पना मागे पडून विवाह ही एक सामाजिक बाब असून विवाहाचे नियम व्यक्तीच्या व समाजाच्या हितसंवर्धनाच्या दृष्टिकोणातूनच तयार केलेले असले पाहिजेत ही कल्पना हिंदू विवाहाच्या मुळाशी आहे.

## स्त्रीला पुरुषाच्या बरोबरीने वारसाहक्क

लगेच पुढच्या वर्षी संसदेने दोन महत्त्वाचे कायदे मंजूर केले. एक म्हणजे हिंदू वारसा कायदा व दुसरा हिंदू दत्तक व पोटगीचा कायदा. हिंदू वारसा कायद्याने घडवून आणलेले बदल अत्यंत मूलगामी व अत्यंत क्रांतिकारक स्वरूपाचे आहेत. मिताक्षरा अविभक्त कुटुंबातील पुरुषांच्या मृत्यूनंतर त्यांच्या मिळकतीचा हिस्सा मुलग्याबरोबरच मुलगी, विधवा पत्नी व आई तसेच मयत मुलाचा मुलगा, मयत मुलाची मुलगी, मयत मुलीचा मुलगा, मयत मुलीची मुलगी, मयत मुलाची विधवा, मयत मुलाच्या मुलाचा मुलगा, मयत मुलाच्या मुलाची मुलगी व मयत मुलाच्या मयत मुलाची विधवा स्त्री यांनाही मिळतो. मात्र मयताने मृत्युपत्राने काही व्यवस्था करून ठेवली असेल तर इस्टेटीची वाटणी त्या व्यवस्थेप्रमाणे होते. कायद्याला एक परिशिष्ट जोडण्यात आले असून त्या परिशिष्टाचे दोन भाग पाडण्यात आलेले आहेत. पहिल्या भागातील वारसदारांचा उल्लेख कलम ६ चे विवरण करताना आलेला आहे. पहिल्या भागात वर्णिलेले वारसदार हयात नसतील तर दुसऱ्या भागात वर्णिलेल्या वारसदारांना वारसा हक्क मिळतो. त्यातसुद्धा मुलाच्या मुलीची मुलगी, बहिण, मुलीच्या मुलाची मुलगी, मुलीच्या मुलीचा मुलगा, मुलीच्या मुलीची मुलगी, बहिणीचा मुलगा, बहिणीची मुलगी, वडिलांची आई (आजी), आई, भावाची विधवा, भावाची बहिण, आईची आई, आईची बहिण अशा कन्या वारसांचा उल्लेख करण्यात आलेला आहे. १४ व्या कलमात हिंदू स्त्रीकडे जी जी मिळकत असेल—मग तिची मालकी मर्यादित स्वरूपात असली तरी—ती मिळकत तिच्या संपूर्ण मालकीची होते अशा तऱ्हेची महत्त्वाची तरतूद करण्यात आलेली आहे. १५ व्या कलमात हिंदू स्त्री व्यवस्थापत्र न करता वारली असेल तर

तिच्या इस्टेटीचा वारसा कसा, कोणाकडे व किती जातो याची तरतूद करण्यात आलेली आहे. एकंदरीत वरील विधेयकाने स्त्रियांना नवऱ्याच्या व वडिलांच्या इस्टेटीमध्ये वारसा हक्काची तरतूद करून देऊन स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्याचा पाया घातला असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही.

दत्तकाच्या कायद्यामध्येसुद्धा स्त्रियांची होणारी कुचंबणा व छळणूक याना फाट देणाऱ्या तरतुदी करण्यात आलेल्या आहेत. मुलीलासुद्धा दत्तक जाण्याचा अधिकार आहे, अशी या कायद्यात केलेली तरतूद क्रांतिकारक मानावी लागेल. त्याचप्रमाणे दत्तकाच्या बाबतीत प्राचीन हिंदू कायद्याने स्त्रीवर जी अनेक कृत्रिम बंधने घातली होती ती सर्व काढून टाकण्यात आलेली आहेत.

## वेश्याव्यवसायाचे निर्बंधन

त्याच साली (१९५६) संसदेने केलेल्या दुसऱ्या एका समाजहितपोषक कायद्याचा निर्देश करावा लागेल. स्त्रिया व मुले यांना अनैतिक मार्गाला लावण्याच्या ज्या निरनिराळ्या क्लृप्त्या आहेत त्यांवर निर्बंध घालणे हा या कायद्याचा उद्देश आहे. या कायद्याचे नाव 'सप्रेशन ऑफ इम्मॉरल ट्रॅफिक इन विमेन ॲन्ड गर्ल्स ॲक्ट' या कायद्याने वेश्याव्यवसायावर बंदी घातली नाही ही गोष्ट खरी आहे. परंतु कायद्याने वेश्याव्यवसायावर बंदी घातली म्हणजे हा व्यवसाय बंद होईल असे मानणे भाबडेपणाचे लक्षण आहे. दारूबंदीच्या बाबतीत आलेले अनुभव या बाबतीत अत्यंत मार्गदर्शक आहेत. ज्या कायद्याची अंमलबजावणी शासनसंस्थेला करता येत नाही किंवा जे कायदे मूलतः माणसाच्या सहज प्रवृत्तीच्या विरुद्ध आहेत, असे कायदे करण्याने लोकांना कायदा मोडायला एक प्रकारचे आवाहन केल्याप्रमाणेच होते. म्हणून सप्रेशन ऑफ इम्मॉरल ट्रॅफिक ॲक्टने आपले उद्दिष्ट मर्यादित ठेवले हे एका परीने बरे झाले. वेश्याव्यवसायावर नियंत्रण घालणे व त्याचे दुष्परिणाम कमी करणे हेच या कायद्याचे उद्दिष्ट आहे. या कायद्याचा कटाक्ष मुख्यतः वेश्यागृहावर आहे. देवळे, शाळा व इतर सार्वजनिक व्यवहार चालण्याच्या ठिकाणापासून अशा तऱ्हेची वेश्यागृहे दूर असली पाहिजेत असा कटाक्ष आहे. त्याचप्रमाणे गिऱ्हाइकांना निरनिराळ्या मार्गाने वटविण्याच्या ज्या क्लृप्त्या लढविल्या जातात त्यांना आळा घालण्याची तरतूद या कायद्याने करण्यात आलेली आहे. वेश्यागृहे कोणती हे शाबीत करणे अवघड काम असते. 'ज्या ठिकाणी वेश्याव्यवसाय चालतो ते वेश्यागृह,' अशी व्याख्या करणे सोपे आहे. परंतु वेश्याव्यवसाय चालतो हे शाबीत करणे सोपे नाही. म्हणून कित्येक वेळा बनावट गिऱ्हाईक खुणा केलेल्या नोटा देऊन वेश्यागृहात पाठविण्याची प्रथा पडलेली आहे. हा प्रकार अत्यंत किळसवाणा आहे हे उघड आहे. पैशाकरिता असे कृत्य करायला प्रवृत्त होणाऱ्या माणसाच्या साक्षीवर कोर्टाने कितपत भरवसा ठेवायचा या प्रश्नालाही समर्पक उत्तर सापडत नाही.

१९६१ साली संसदेने हुंडा प्रतिबंधक कायदा मंजूर केला. लग्नाचा मोबदला म्हणून हुंडा देणे बेकायदेशीर आहे. असे या कायद्याने ठरविले. याही कायद्याचा उद्देश स्तुत्य आहे. पण कायद्याची अंमलबजावणी कशी करायची हा मोठा अडचणीचा प्रश्न आहे. त्यात आली स्त्रियांना बाळंतपणाकरिता काही सोयी उपलब्ध करून देण्याचा कायदा पसार करण्यात आलेला आहे.

## कायद्यामुळे समस्यांचा परिहार होत नाही

कायद्याने स्त्रीला दिलेले हक्क व संरक्षण यांची रूपरेषा वरीलप्रमाणे आहे. स्वातंत्र्याच्या, मातृत्वाच्या व समतेच्या संबंधी पारख्या झालेल्या स्त्रीला आज कायद्याने पुरेसे श्रेष्ठ व मानाचे स्थान समाजात मिळवून दिलेले आहे. कायद्यापुरतेच बोलावयाचे असेल तर स्त्री व पुरुष यांना बरोबरीचे हक्क मिळालेले आहेत असे मानावे लागते. पण निव्वळ कायद्याने स्त्रियांच्या समस्यांचा परिहार होऊन त्यांना समता प्राप्त होईल असे मानणे भोळेपणाचे आहे. समाजाच्या मनात बदल घडल्याशिवाय म्हणजे त्याचे हृदयपरिवर्तन झाल्याशिवाय व स्त्रियांना सामाजिक व आर्थिक स्वातंत्र्य पूर्णांशाने उपलब्ध झाल्याशिवाय स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचा दर्जा प्राप्त होणे सुतराम् शक्य नाही. कायद्याने घडून आलेल्या बदलाचे परिणाम कसे होतात व त्या परिणामांची तीव्रता कमी करण्याकरिता काय केले पाहिजे याचा ऊहापोह केल्याशिवाय हा लेख पूर्ण होणार नाही. म्हणून त्याचा थोडक्यात विचार खालील परिच्छेदात केलेला आहे.

लग्न व घटस्फोट — एक सामान्य नियम असा सांगता येईल की माणसाला ज्या ज्या प्रमाणात स्वातंत्र्य मिळते त्या त्या प्रमाणात त्याची असुरक्षितता वाढते. लहान मूल जेव्हा गर्भाशयात असते तेव्हा ते सर्वस्वी परतंत्र असते. आईच्या श्वासाने श्वास घ्यावा, आईच्या अन्नावर पोसावे अशा तऱ्हेची क्रिया चालू असते. परंतु ते मूल सर्वस्वी सुरक्षित असते. मूल जन्माला आले म्हणजे ते स्वतंत्र होते. पण ते असुरक्षित असते. बरीच वर्षेपर्यंत मुलाला आईवर सर्व बाबतीत अवलंबून रहावे लागते. दुसरे उदाहरण सरंजामी समाजव्यवस्थेचे देता येईल. अशा तऱ्हेच्या समाजव्यवस्थेमध्ये प्रत्येक माणसाचे स्थान निश्चित असते. सुताराचा मुलगा सुतार, लोहाराचा मुलगा लोहार, दुकानदाराचा मुलगा दुकानदार, असा क्रम वंशपरंपरा चालत असे. कोणालाही व्यवसाय बदलण्याचे स्वातंत्र्य नसे. पण प्रत्येकाला स्वत:च्या पोटापुरते काही ना काही मिळत असे. औद्योगिक क्रांती झाल्यानंतर माणसाला व्यवसाय-स्वातंत्र्य मिळाले. परंतु व्यवसाय मिळण्याची शाश्वती राहिली नाही. याचाच अर्थ स्वातंत्र्याबरोबर असुरक्षितता आली असा होतो. घटस्फोटामुळे लग्नविच्छेदनाचे स्वातंत्र्य मिळाले. पण पुनर्विवाहाचा प्रश्न अधिक बिकट झाला. घटस्फोटिता या नात्याने त्या दुर्दैवी स्त्रीवर एक प्रकारचा मानसिक कलंक आलेला असतो. अविवाहित स्त्रीचेच लग्न होण्याची जेथे अडचण तेथे घटस्फोटितेचे काय होईल हे विस्ताराने सांगण्याचे कारण नाही. त्यातल्या त्यात

त्या स्त्रीला मुले असतील तर पुनर्विवाह जवळजवळ अशक्य आहे. स्त्री आणि पुरुष यांच्या घटस्फोटाच्या प्रक्रियेमध्ये सर्वांत अधिक हाल जर कोणाचे होत असतील तर ते मुलांचेच होय. याचा अर्थ घटस्फोट त्याज्य आहेत असा नव्हे. याचा अर्थ शक्य तर घटस्फोट टाळावे हा आहे. सुप्रतिष्ठित विवाह हा समाजाचा पाया आहे. कुटुंब संस्थेच्या अभावी समाजाची कल्पनाच करवत नाही. कुटुंबसंस्था स्थिर व सुप्रतिष्ठित होण्याकरिता झालेले विवाह टिकाऊ स्वरूपाचे असले पाहिजेत. स्त्री कितीही स्वतंत्र झाली, कितीही शिकली तरी तिचा ओढा कुटुंब व मुले यांच्याकडेच अधिक असतो. म्हणून समाजाची व्यवस्था अशा तऱ्हेने झाली पाहिजे की, ज्यामुळे घटस्फोटांची संख्या अत्यल्प होईल. विवाहपूर्व शिक्षण देणाऱ्या संस्था निघाल्या पाहिजेत. नवरा आणि बायको यांमध्ये कलहाला सुरुवात होते तेव्हापासूनच त्यांना योग्य सल्ला देणारी मंडळी (मॅरेज कौन्सेलर्स) समाजाने व शासनाने उभी केली पाहिजेत. त्याचप्रमाणे सल्लामसलतीची सोय कोर्टाने करून दिली पाहिजे.

## घटस्फोट ही एक शोकांतिका

सारांश, लग्नाकरिता व मुलांच्या पालनाकरिता योग्य तयारी झाल्यानंतरच विवाह-बंधनात स्त्रीपुरुषांनी आपणास गुंतवून घ्यावे. गडबडीने ठरविलेली लग्ने ही जशी त्याज्य तसेच भावनेच्या भरात झालेले घटस्फोटही त्याज्य होत. घटस्फोट ही एक शोकांतिका आहे. हे आपण ध्यानात ठेवले पाहिजे. घटस्फोट म्हणजे अपेशी जीवनाचा कबुलीजबाब होय. त्याचप्रमाणे घटस्फोटाचे कायदे हे प्रामुख्येकरून माणुसकीच्या तत्त्वावर आधारलेले असले पाहिजेत. आजच्या कायद्याच्या तरतुदीप्रमाणे करण्यात आलेला घटस्फोटाचा दावा हा एक प्रकारचा फार्स असतो. घटस्फोटाच्या दाव्याच्या चौकशीच्या पूर्वीच काही गोष्टी एक प्रकारच्या संगनमताने ठरविल्या जातात. केव्हा पत्नीचा तोतया प्रियकर म्हणून कोणाला तरी पुढे केले जाते, केव्हा अंगावर शहारे आणणाऱ्या, नवऱ्याच्या अथवा बायकोच्या निर्दय वागणुकीच्या दंतकथा कोर्टापुढे रंगवल्या जातात. या गोष्टी टाळण्याकरिता उभयतांच्या मीलनाचे सर्व प्रयत्न थकल्यानंतर उभयतांना काही मर्यादेपर्यंत परस्पर संमतीने घटस्फोट मिळण्याची तरतूद कायद्यामध्ये करून देणे आवश्यक आहे. शाळा-कॉलेजातूनच लग्नाविषयी व कुटुंबपालनाविषयी स्वतंत्र अभ्यासमंडळे ठेवली पाहिजेत. नवराबायकोच्या भांडणाच्या प्रारंभकाळी मनोविश्लेषणात्मक उपचार दोघांवर केले गेले पाहिजेत. घटस्फोट अपरिहार्यच झाला तर तो अधिक मानवतावादी दयार्द्र बुद्धीच्या दृष्टिकोणातून घडवून आणला पाहिजे. उभयतांना परस्परांपासून निरोप देते वेळी मनामध्ये कोणताही कडवटपणा राहू नये. विवाहमार्गदर्शकांच्या संस्था स्थापन करताना या संस्थेवर शक्यतो स्त्रियांच्या नेमणुका करणे इष्ट होईल. किंबहुना घटस्फोटाच्या दाव्यामध्ये निर्णय देण्याकरिता शक्य तो स्त्रियांचीच न्यायाधीश म्हणून नेमणूक व्हावी. असे केल्याने समजूतदारपणा, दया व

सहानुभूती या स्त्रीमध्ये अंगभूत असलेल्या गुणांचा उपयोग होईल. व परिणामतः नवराबायकोची भांडणे विकोपाला जाणार नाहीत.

## वारसा हक्क व आर्थिक स्वातंत्र्याची समस्या

स्त्रीस्वातंत्र्याचा व समतेचा प्रश्न समाधानकारकपणे सुटवावयाचा असेल तर स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य उपलब्ध करून देणे आवश्यक आहे. प्रथमतः लग्नसंस्थेत आमूलाग्र परिवर्तन घडवून आणले पाहिजे. याकरिता वधूवरांना समान पातळीवर आणले पाहिजे. वरपक्षाने वधूपक्षाकडून हुंडा घ्यायचा ही चाल प्राचीन काळापासून अस्तित्वात आहे व हुंडा-प्रतिबंधक कायद्याने या पद्धतीला आळा बसलेला नाही. फक्त हुंडा घेण्याच्या स्वरूपात फरक पडलेला आहे. स्त्री आणि पुरुष यांच्या असमानतेला येथूनच सुरुवात होते. विवाहानंतर स्त्रियांना काही ना काही उत्पन्नाच्या प्राप्तीची साधने उपलब्ध करून देणे आवश्यक आहे. स्त्रियांनी काही ना काही व्यवसाय करून द्रव्यार्जन केले तरच स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य मिळेल आणि स्त्री व पुरुष यांच्या समान दर्जाचा पाया घातला जाईल. अर्थातच स्त्रियांनी कोणते व्यवसाय करावेत व कोणते करू नयेत या बाबतीत समाजधुरिणांनी शास्त्रशुद्ध पद्धतीने विचार करायला हवा. स्त्री आणि पुरुष यामध्ये नैसर्गिक भेद असल्याने एकच तऱ्हेचा व्यवसाय दोघांनी करावा या म्हणण्यात काही हशील नाही. स्त्रियांचे पुरुषीकरण करणे हे शक्यही नाही व इष्टही नाही. कारखान्यातील अवजड कामे स्त्रियांनी शक्यतो करू नयेत. जेथे शारीरिक शक्तीचा वापर अधिक प्रमाणात करावा लागतो ती कामे स्त्रियांना वर्ज्य असली पाहिजेत. वैद्यक, रासायनिक प्रक्रिया, आहारविषयक व्यवसाय, शिक्षण, ललितकला, साहित्य व कायदा या क्षेत्रातील व्यवसायात स्त्रियांनी अवश्य भाग घ्यावा. संसाराला हातभार लावण्याच्या दृष्टीने व्यवसाय करायचा हा दृष्टिकोण स्त्रियांनी सतत बाळगणे अवश्य आहे. स्वयंपाक व मुलांचे संगोपन कोणी करायचे हा प्रश्न दिवसेंदिवस कठीण होत चाललेला आहे. नोकरांची वाढत जाणारी अडचण हा एक स्त्रियांच्या व्यवसाया-मधील अडसर आहे. व्यवसाय चालू असताना मुले ठेवण्याकरिता बेबीसारख्या सोयी उपलब्ध झाल्या पाहिजेत. कुटुंबनियोजनावर स्त्रियांनी अधिक कटाक्ष बाळगला पाहिजे. कुटुंब मर्यादित ठेवणे जितके आवश्यक तितकेच दोन मुलांमधील अंतर ४ ते ५ वर्षांचे राखणे आवश्यक आहे. कुटुंबनियोजन करण्याकरिता गर्भपाताला कायद्याने परवानगी द्यावी किंवा काय हा एक वादग्रस्त प्रश्न आहे. गर्भपाताचा कायदा शुष्कळसा सैल करून गर्भपाताच्या बाबतीत काही विशिष्ट परिस्थितीत वैद्यकीय व अन्य सोयी करून देणे आवश्यक आहे. गृहिणीला वाढत्या महागाईशी तोंड देणे दिवसेंदिवस कठीण होत चालले आहे. जमा आणि खर्च यांची तोंडे कशी मिळवावयाची ही एक दिवसेंदिवस कठीण होत जाणारी समस्या होऊन बसली आहे. गृहकृत्यांच्या बाबतीत नोकरांवर अवलंबून न राहता यंत्रांच्या (गॅजेट्स) साहाय्याने सर्व कार्ये

उरकण्याची सवय लावून घेतली पाहिजे. घराचा गाडा चालविण्याच्या बाबतीत पुरुषांनीही स्त्रियांना हातभार लावणे आवश्यक आहे. कुटुंब चालविणे ही एक भागीदारी आहे. ही भावना स्त्री आणि पुरुष या दोघांच्याही मनात रुजली पाहिजे. इतकेही करून महागाईशी टक्कर देता येईलच असे नाही. वाढत्या महागाईला तोंड देता यावे म्हणून काही सामाजिक सुरक्षिततेची योजना सरकारने अंमलात आणणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे मानसिक उपचाराची केंद्रे व बाळंतपणाकरिता विनाखर्च सोयी शासनाने उपलब्ध करून दिल्या पाहिजेत. वरील प्रपंच विस्ताराने करण्याचे कारण म्हणजे निव्वळ कायद्याचे संरक्षण कसे अपुरे पडते हे मनावर बिंबवावे हे आहे.

## बंधमुक्त स्त्री म्हणजे बंडखोर स्त्री नव्हे

स्त्रीचे दास्यातून विमोचन करणे व तिला समानतेचा दर्जा प्राप्त करून देणे याचा अर्थ तिला अनिर्बंध स्वातंत्र्य देणे असा नाही. कुटुंब व समाज या बाबतींतील जबाबदारींची जाणीव स्त्रीला करून दिल्याने स्त्री निश्चितपणे संयमाने वागेल यात संदेह नाही. सर्व नैतिक व सामाजिक बंधने ही अंतिमतः स्वयंनिर्मित बंधने आहेत. निसर्गाविरुद्ध बंड करण्याचा सल्ला जॉर्ज बर्नार्ड शॉ याने आपल्या सुप्रसिद्ध बॅक टू मेथ्यूसेला या नाटकात स्त्रियांना दिलेला आहे. अशा तऱ्हेचा सल्ला निराशावादातून व पराभूत मनोवृत्तीतून जन्म पावलेला आहे. वंशसातत्याची जबाबदारी निसर्गाने स्त्रीजातीवर टाकली हा स्त्रियांवर घोर अन्याय आहे, हे शॉचे म्हणणे तत्त्वतः मान्य केले तरी निसर्गनियम मानवाला मान्य असलेल्या समतावादाच्या तत्त्वाला अनुसरून बनलेले आहेत, असे मानणे म्हणजे निसर्गनियमांचे मानवीकरण करण्यासारखे आहे. वंशसातत्याच्या जबाबदारीमुळे स्त्री शारीरिक दृष्ट्या दुबळी व परावलंबी झाली ही गोष्ट खरी आहे. संस्कृतीच्या प्रारंभकाळात मातृत्वाचा गौरव होऊन मातृप्रधान कुटुंबसंस्था प्रचलित झाली अशी इतिहासाची साक्ष आहे. परंतु जीवनार्थ कलह जसजसा तीव्र होत गेला, निरनिराळ्या हिंस्र श्वापदांशी व रानटी टोळ्यांशी टक्कर देण्याची आवश्यकता अधिकाधिक भासू लागली त्यावेळेस माणसाला शक्तीची आराधना करणे भाग पडले. या आराधनेतूनच पितृप्रधान कुटुंबसंस्था, जी आजतागायत प्रचलित आहे, ती जन्माला आली. स्त्री आणि पुरुष हे परस्परांना पूरक आहेत. पुरुष हा शक्तीचा व दीर्घोद्योगाचा प्रतीक असला तर स्त्री ही सहृदयतेचे, सौंदर्याचे, विवेकशीलतेचे व समजूतदारपणाचे प्रतीक आहे. स्त्री-पुरुषसंबंध या मूलभूत जाणिवेतूनच नियंत्रित केले पाहिजेत.

## पात्रतेप्रमाणे कायदा

ग्रीक तत्त्ववेत्ता प्लेटो याने लोकांच्या योग्यतेप्रमाणे त्याना कायदे मिळतात असा सिद्धांत २००० वर्षांपूर्वी सांगून ठेवला आहे. त्यात बरेच तथ्य आहे. कायदा कसाही असला तरी अंतिमतः स्त्रियांच्या विकसनक्षमतेवर व त्यांनी प्राप्त करून घेतलेल्या

समाजातील स्थानावर त्या कायद्यांची अंमलबजावणी अवलंबून राहाते. स्त्रीशिक्षण व स्त्रियांची सर्वांगीण सुधारणा या मूलभूत प्रश्नाकडे सदोदित लक्ष केंद्रित केले पाहिजे. त्याचप्रमाणे न्याय्य तत्त्वावर समाजाची पुनर्रचना झाली पाहिजे. समाजाचे हृदय-परिवर्तन व मनःक्रांती झाल्याशिवाय निव्वळ कायद्याने स्त्रीला तिचा योग्य दर्जा प्राप्त होणे अशक्य आहे. अस्पृश्यता निवारणाचा कायदा होऊनही व्यवहारात अद्याप अस्पृश्यतेचे उच्चाटन झालेले नाही. शारदा कायदा व हुंडा-प्रतिबंधक कायदा लोकांनी धाब्यावर बसवले म्हणून कायद्याप्रमाणेच सामाजिक आघाडीवर सुद्धा जागरूकपणे दक्षता ठेवली पाहिजे. कायदा समाजापुढे एक प्रकारचा आदर्श ठेवतो. त्या आदर्शाप्रत पोचण्याकरिता शैक्षणिक व सामाजिक क्षेत्रामध्ये स्त्रियांची उन्नती घडवून आणून त्यांची कार्यक्षमता वाढवली पाहिजे. स्त्रियांच्या उन्नतीचा प्रश्न समाजाच्या इतर पददलित वर्गांच्या उन्नतीच्या प्रश्नाप्रमाणेच कठीण व दीर्घ काळ टिकणारा आहे. आपण हळूहळू पुढे सरकत जाऊ तसतसे आपले ईप्सित ध्येय क्षितिजाप्रमाणे सतत अप्राप्य होत जाईल हे ध्यानात ठेवून आपण धीमेपणाने व निश्चयाने पावले टाकली पाहिजेत.

# १७

# समाजधारणेत स्त्रीचे स्थान

मालतीबाई बेडेकर

सौ. मालती बेडेकर (कु. बाळूताई खरे) बी. ए. (जन्म १–१०–१९०५) हिंगणे येथे भारतीय महिला विद्यापीठात शिक्षण. तेरा वर्षे शिक्षिका व मुख्याध्यापिका, पुण्याच्या श्री ना. दा. ठा. कन्याशाळेत व हिंगणे महिलाश्रम हायस्कूलमध्ये. नंतर सोलापूर गुन्हेगार वस्तीत लेडी सुपरिंटेंडेंट. विवाहोत्तर विनावेतन समाजकार्य. प्रथितयश लेखिका व वक्त्या, समाजाला हालवून सोडणारे विविध प्रकारचे (कादंबऱ्या, नाटके, प्रहसने, लघुकथा, प्रबंध, भाषांतर, वगैरे) विपुल लेखन. अनेक पारितोषिकांच्या मानकरी. ('मनुस्मृति', डेक्कन जिमखाना, पुणे ४)

## आताच हा प्रश्न निकडीचा झाला आहे?

समाजधारणेत स्त्रीचे स्थान कोणते? दर्शनी हा प्रश्न निरर्थक वाटतो. स्त्री-दाक्षिण्याने गोडस उत्तर देण्याचा प्रयत्न केला तरी प्रत्यक्षात स्त्रीचे स्थान कोणते याचे उत्तर हजारो हजार वर्षे आणि साऱ्या पृथ्वीतलावरील देशात एकच एक आहे. (आता काही देश अपवाद झाले आहेत.) ते उत्तर हे: प्रजोत्पादन व अपत्यसंगोपन हे निसर्गाने लावलेले काम व पुरुषप्रणीत आचारधर्माने लादून दिलेली गृहकर्तव्ये या दोहोंमुळे प्रत्यक्षात जे असेल ते स्त्रीचे सामाजिक धारणेतील स्थान.

आजवर या विषयावरील चर्चा स्त्रियांचा उद्धार करणारांनी तळमळीने केली असली, किंवा इतरांनी फावल्या वेळची करमणूक म्हणून केली असली तरी आता एका तऱ्हेच्या अशा काही क्रांतीची चाहूल येते आहे की यापुढे वरील प्रश्नाचे उत्तर अविचाराने देऊन चालणार नाही. सवंग उत्तर देऊन चालणार नाही. वाळवंटपणानेही उत्तर देऊन चालणार नाही. इतकी निकड या प्रश्नाची आहे.

भारतीय घटनेने स्त्रीपुरुषांना समान संधी, समान हक्क इत्यादी दिल्याने स्त्रीला आता कोणत्याही क्षेत्रात काम करण्याला प्रतिबंध नाही. तिचे समाजधारणेतील स्थानही पुरुषाच्या बरोबरीचे राहील असे वाटण्याचा संभव आहे. एवढेच नव्हे तर कित्येकजण आता विचारतातही की आता सारे मिळाल्यावर स्त्रियांची रड कशासाठी? आता बायकांचे प्रश्न नि बायकांची दुःखे राहिली तरी कोठे?

हा प्रश्न विचारणाऱ्यांच्या एक गोष्ट ध्यानात येत नसावी. कायद्यांनी मिळालेली समानता ही खरोखर पदरी पडण्यासारखी परिस्थिती नाही. मृगजळाप्रमाणे माणसे सुखाच्या मागे लागतात आणि सुखी तर समान कुणीच नसते हे जरी खरे, तरी साऱ्या जगातील बायकांची एकच रडकथा का? त्यांचे सनातनधारणेतील आसन हे आळवावरच्या पाण्यासारखे आहे काय? ते तसे असण्याचे कारण काय?

हजारो वर्षे समाजातील निम्न्या श्रेणीतील स्त्रियांचा फार प्रचंड वर्ग प्रजोत्पादन, अपत्यसंगोपन, गृहकर्तव्ये आणि घराबाहेरही पोटासाठी काबाडकष्ट करीत आला आहे. मध्यमवर्गीय कित्येक स्त्रिया घराबाहेर काबाडकष्ट पूर्वी करीत नव्हत्या. त्याही आर्थिक परिस्थितीमुळे, शिक्षणाने बुद्धी जागी झाल्याने, घराबाहेरची कामे करण्याच्या हौसेने किंवा सामर्थ्याने प्रजोत्पादन, अपत्यसंगोपन, गृहकर्तव्ये व नोकऱ्या करू लागल्या आहेत. श्रीमंत वर्गातील स्त्रिया प्रजोत्पादन करतात आणि कित्येक अपत्यसंगोपन व गृहकर्तव्ये ही नोकराने करवून घेतात. त्यांच्यापैकी अर्थार्जनासाठी फार थोड्या बाहेर पडतात. पण 'समाजकार्य' या नावाची कार्ये करण्यासाठी किंवा दिवस घालण्यासाठी किंवा शोभेसाठी बाहेर पडतात. त्या फार थोड्या असतात. पण या त्रिविध वर्गांत अर्थार्जनाची मुभा गेल्या पंचवीस चाळीस वर्षांत मिळाली असली तरी स्त्रीला अन्नयुगानंतर थोड्याच काळात चिकटलेली कामे तशीच्या तशीच राहून मध्यमवर्गीय स्त्रियांवर तिहेरी जबाबदारी पडत आहे. त्याबद्दल समाजातील फार थोड्यांना सहानुभूती असते. निम्न्या श्रेणीतील लाखो स्त्रिया हजारो वर्षे घरात व घराबाहेर काबाडकष्ट करीत आल्या तरी त्याबद्दल समाजाने कधी चर्चा केली नाही. पण मध्यमवर्गातील स्त्रिया तेच करू लागल्याबरोबर सर्वत्र चर्चा सुरू झाल्या. विवाहित स्त्रियांनी नोकऱ्या कराव्या की नाही, नोकरी करणाऱ्या विवाहित स्त्रियांचे संसाराकडे दुर्लक्ष होते, विवाहित स्त्रिया घराकडे लक्ष असल्याने नोकरी नीट करीत नाहीत, अर्थार्जनाची स्त्रियांना चटक लागून त्या चैनबाज होतात, सुशिक्षित स्त्रिया संसाराला लायक नसतात, सुशिक्षित स्त्रियांना मुलांवर संस्कार करता येत नाहीत, सुशिक्षित स्त्री सुखी आहे का? हे नि असले विषय सतत चर्चेला येतात. हजारोंनी स्त्रीपुरुष त्या ऐकायला येतात. जणू काय साऱ्या स्त्रिया बुद्धिजड होऊन घरात राबत होत्या तेव्हा सुखी होत्या, उत्कृष्ट संसार करीत होत्या, चैनी नव्हत्या.

## स्त्रीचे स्थान सतत दुय्यम राहिले

या साऱ्या प्रश्नाची चर्चा वारंवार होत असते याचे कारण पुरुषप्रधान समाजात स्त्रीच्या प्रतिबंधाला जे तडे जात आहेत ते समाजाला मानवत नाहीत. स्त्री आणि पुरुष हे घटक पूर्वी अविरोधाने नांदत असल्यासारखे दिसत, कारण स्त्रीची मुस्कटदाबी आचार-धर्मांने करून ठेवली होती. ती नाहीशी होत चालल्यावर स्त्री व पुरुष अविरोधाने प्रत्यक्षात नांदत नाहीत, हे सत्य बाहेर पडू लागले.

घटनेने दिलेले हक्क, रूढीने बनवलेली मनोवृत्ती आणि प्रत्यक्ष भोवती असणारी

परिस्थिती या सर्वांचा आपसांत विरोध असल्याने स्त्रीपुरुषांतील वेदिली बोलकी होऊ लागली आहे.

प्रत्येक पुरुष — मग तो मजुरी करणारा मजूर असो की मंत्री असो — आपल्या घरात तो 'राव' असतो. स्त्रीला शब्दांनी घरात राणीपद दिले असले, तिला आपल्या-बरोबर मिरवली, तरी हे पुरुषाचा अहंकार दुखवला जात नाही तोपर्यंतच. कोणत्याही सामाजिक थरात पुरुषाचे 'रावा'चे स्थान दुखवले गेले, त्याचा अहंकार दुखवला गेला तर स्त्रीला मिळालेले राणीपद परयांतील राणीच्या किंमतीचे होते. समाजातील बहुसंख्य कनिष्ठ वर्गात सर्व तऱ्हांनी काबाडकष्ट करणाऱ्या, पुरुषाच्या बरोबरीने मोलमजुरीने पैसा घरात आणणाऱ्या स्त्रीला पुरुषाच्या अहंकारामुळे मारपीट होत असते. मध्यमवर्गातील स्त्रीला कदाचित मारपीट होत नसेल. पण तिहेरी जबाबदारी घेऊनही पुरुषाचा अहंकार फुलवावा लागतो. न फुलवल्यास तो घर मोडायलाही तयार असतो. हजारो हजार वर्षे पुरुषाचे स्थान पुरुषप्रधान समाजात श्रेष्ठ ठरले आहे. स्त्रीचे नेहमीचे दुय्यम ठरले आहे. ते का ?

## परिणाम : स्त्री कावली जाते

स्त्रिया शिकल्यानंतर त्यांच्याकडून अपेक्षा मात्र वाढल्या. पण त्यांचे स्थान दुय्यमच राहिले. अर्थार्जन करणाऱ्या पुरुषाला घरातून कित्येकदा नोकरीनिमित्त, धंदा-निमित्त घरापासून दूर जावे लागते, घरात असला तरी नोकरीधंद्यात त्याचा फार वेळ जातो, किंवा तो आळशी असतो; किंवा जबाबदारी घेऊ इच्छीत नाही, म्हणून मुलांवर संस्कार करण्याची जबाबदारी स्त्रीवरच पडते. शिक्षणाने तिने हे करावेच अशी समाजाची अपेक्षा असते, परंतु मुलांवर संस्कार हे फक्त आईनेच करून भागत नाही. तिला पित्याची, शिक्षकाची, अवतीभवतीच्या सुसंस्कृत वातावरणाची साथही मिळावी लागते हे फारसे कोणी लक्षात घेत नाही. लहान घरे, अपुरा पैसा, वाढत्या गरजा, तळमळीशिवाय दिलेले शिक्षण, समाजातील सर्व थरातील अनाचार यांमुळे आई असमर्थ ठरते. पुरुष नोकरी करतो आणि ही स्त्री नोकरी करून शिवाय घरातील जबाबदारी उचलते. तरी पुरुषी अहंकारालाच तिला जपावे लागते. समाजालाच नव्हे तर तिलाही पुरुषी अहंकाराला फुलवीत राहणे हे अगत्याचे वाटत असते. याचे फार गूढ कारण आहे. पण यामुळे ती कावरी जाते. समाजाची धारणा या सतत असलेल्या असमाधानाने होऊ शकत नाही. *कारण हा कनिष्ठ व मध्यमवर्गीय स्त्रियांना काच निराळे रूप घेतो.* त्यांना स्वतःच्या गौरवाची कोणतीच भावना पोसता येत नसल्याने उत्तेजनरहित निर-पेक्षपणे राबणे ही पुरातन काळातील परिस्थिती तशीच चालू असल्याने स्त्रियांची मने कळाहीन होत जातात. रटाळ आयुष्यात रावत राहून सचीने मुक्या होऊन बसलेल्या स्त्रिया आता गप्प बसत नाहीत. त्या किरकिरतात, कजाग बनतात, रडतात, जाजा-वतात, चिनतुडाचे वाद घालतात, क्षणभर स्त्रियांचाच वरचष्मा पुरुषांवर आहे असा

मास होऊ लागतो. नव्हे अनेक घरांतून गरीब स्वभावाच्या पुरुषांवर या आत्मगौरव नष्ट झालेल्या स्त्रिया, असमाधानी, तोल गेलेल्या स्त्रिया, चांगला सूड घेतानाही दिसतात.

केवळ हजारो वर्षे डांबून पडल्याने स्त्रिया पुरुषाच्या मानाने संकुचित मनाच्या, कमी ज्ञानी, कमी अनुभवी, थोडक्या बुद्धीच्या नि अदूरदृष्टीच्या होऊन बसलेल्या आहेत. त्यामुळे त्यांचा चाललेला थयथयाट पुरुषाला अविवेकाचा वाटतो. घरातल्या घरातही सल्लामसलतीला त्या पुरेशा लायकीच्या नाहीत असे पुरुषाला वाटू लागते. उलट, गौरवास्पद म्हणून स्त्रियांच्या माथी मारलेली कामे टवाळ, जिगजिगीची, वकशीरपणा नसलेली, ती करूनही कुणाला त्यांची काडीइतकी किंमत नसलेली अशी वाटून लग्नानं आपण शय्यासोबतीण आणि मोलकरीण झाल्याची भावना स्त्रियांना येते. याचे कारण एकच, ते म्हणजे, 'सेक्स'. समाजधारणेच्या संदर्भात 'सेक्स'चा विचार अत्यंत महत्त्वाचा आहे.

## येडिलीच्या इतिहासाचे पहिले पर्व

घटनेने कितीही समानता दिली असली तरी माणसांच्या श्रद्धा, विश्वास, अपेक्षा या परंपरेत, वर्षांत रुजून पडलेल्या असतात. त्यामुळे समानता ही कागदोपत्री असते आणि प्रात्यक्षिक हे वरीलप्रमाणे सुरू असते. त्यामुळे निसर्गनिर्मित अशा या दोन जातींत निर्माण झालेली येडिली आता झाकापाक करून लपवण्यासारखी राहिलेली नाही. हे सारे असे का याचा विचार फार निराळ्या रीतीने करायला हवा आहे. वाटते तसे केवळ बरोबर हक्काचे हे भांडण नाही. हे सेक्समुळे निर्माण झालेले भांडण आहे. अश्मयुगापासून अणुयुगापर्यंत या येदिलीच्या इतिहासाची प्रमुख दोन पर्वे आहेत. त्यांची स्थूलपणे थोडक्यात रूपरेखा सांगून मग पृष्ठाच्या मर्यादेत त्याबद्दल विचार करण्याचे योजले आहे. (१) प्रजोत्पादन हे केवळ निसर्गाच्या हाती असण्याचे एक पर्व आणि (२) प्रजोत्पादन हे माणसाच्या हाती आल्यानंतरचे दुसरे पर्व. या दोन पर्वांचा विचार अत्यंत महत्त्वाचा आहे.

समाजधारणेतील स्त्रीचे स्थान हे शिक्षण, अर्थार्जन यामुळे केवळ ठरणारे नाही. त्यामुळेच स्त्रीपुरुषातील येदिली असूनही तिचा अर्थ लागत नाही. स्त्रीचे स्थान हे प्रजोत्पादनामुळेच ठरणारे आहे.

१. प्रत्यक्ष प्रजोत्पादनाची क्रिया ही निसर्गाने स्त्रीच्या माथी लावली.

२. मानवप्रणीत संस्कृतीने समाजधारणेसाठी विवाहसंस्था काढली. विवाहबाह्य प्रजोत्पादन झाल्यास ते गर्ह्य ठरवले आणि असे प्रजोत्पादन करणारी स्त्री नीच ठरवली. पुरुषालाही विवाहबाह्य प्रजोत्पादन करण्यास प्रतिबंध केला असला तरी त्याने प्रजोत्पादनात लावलेला हातभार कळण्याची शक्यता नसल्याने तो उजळ माथ्याने राहण्यास त्याला निसर्गाने हात दिला. उलट निसर्गाने स्त्रीचे 'पाप' चव्हाट्यावर आणले.

३. स्त्रीपुरुष ही निसर्गाने एकमेकांच्या आकर्षणासाठीच निर्माण केल्याने ते आकर्षण टळावे म्हणून समाजधारकांनी स्त्री व पुरुष यांना जास्तीत जास्त नियमनांनी दूर ठेवले. प्रजोत्पादन विवाहबाह्य होऊ नये म्हणून स्त्रीच्या स्वतंत्र संचाराला पायबंद घातला गेला.

४. स्त्रीचे प्रमुख कार्य प्रजोत्पत्ती. ती विशुद्ध असायला हवी यासाठी विवाह झाल्यावर स्त्रीच्या चारित्र्याचा रखवालदार पुरुषाला केले. तिच्यावर लग्नाचे बंधन घालून तिला अर्थार्जनाची व शिक्षणाची बंदी केली. तिचे जिणे सर्वस्वी पुरुषावर अवलंबून ठेवले.

५. मिळवत्या पुरुषाच्या मिळवतेपणाची किंमत खूप झाली आणि अर्थाबाबत सर्वस्वी लाचार करून ठेवल्याने स्त्री केवळ शय्यासोबतीण आणि दासीमोलकरीण, पण नवऱ्याच्या प्रेमामुळे यापेक्षा निराळ्या नावाखाली घरात स्थानापन्न झाली. नवऱ्याचे प्रेम नसल्यास उघडपणे तेच स्थान तिला मिळत गेले. इतरत्र दासीच्या कष्टाचे पैशात मोल होत असले तरी घटकेत राणी आणि घटकेत पत्यांतील राणीही नाही अशी स्त्रीच्या काबाडकष्टाचे मोल पैशात करण्याइतकीही त्या कष्टांना किंमत राहिली नाही.

या प्रथम पर्वाची अखेर म्हणून स्त्रीला अनेक नाजूक गुण चिकटले, तिचे मन कुजले. 'वीरप्रसू' या नावाखाली वैध प्रजोत्पादन हेच तिचे मुख्य काम व त्याला आनुषंगिक म्हणून घरातील सर्वांची निमूट सेवा हे दुय्यम काम अहोरात्र करण्याचे असे ठरले. स्त्रीच्या या कामाला सोईचा असा मुलगी, सून, बायको, आई या नात्यांनी तिने पाळावयाचा आचारधर्म घालून दिला गेला.

हे पर्व अश्मयुगात सुरू झाले आणि अणुयुगाची चाहूल लागण्यापूर्वी न्हासाला लागले.

## आता दुसरे पर्व अवतरत आहे

आता 'बहुप्रसवा' स्त्री हास्यास्पद ठरू लागली. प्रजोत्पादनाची किंमत फारच घटली. कारण अमर्याद लोकसंख्येने जगावर उपासमारीचे संकट कोसळू लागले. यापूर्वीच समाजाची कुचंबणा झाल्यामुळे स्त्रियांना शिक्षण मिळू लागले. अर्थार्जन पूर्वी करीत नव्हत्या त्यांना ते करण्याची सवड मिळाली. कित्येकांना अर्थार्जन करणे भागच पडू लागले. अर्थार्जन करू लागणाऱ्या स्त्रीने विवाहसंस्थेने आणलेल्या गुलामगिरीला जबरदस्त धक्का दिला. स्त्री-पुरुषांच्यात अनाचार होऊ नये म्हणून ज्या तटबंद्या उभय गोटात घातल्या होत्या त्या ढासळू लागल्या. मूलतःच आकर्षणासाठी निर्माण केलेली स्त्री-पुरुषांची जुनी नीतिबंधने काचून तुटू लागली. अवैध प्रजोत्पत्ती करणाऱ्या स्त्रीस आत्मघात करावा लागे. त्याऐवजी अवैध प्रजा घराबाहेर ठेवण्याच्या सोयी झाल्या. पण अवैध प्रजोत्पादन हे अजून समाज गर्ह्य मानीत असल्याने स्त्रीपुरुषसंबंध चोरटेपणाने होऊ लागले. याच सुमारास अमर्याद लोकसंख्या हटवण्या-

साठी संततिनियमनाची साधने निर्माण करून गर्भपाताने माणसाने निसर्गाला दावण घातली. हे नवे पर्व सुरू झाले आहे. ते क्रांतिकारी आहे. त्यात स्त्रीपुरुष जुन्या विवाहसंस्थेला आणखी धक्के देण्याची चिन्हे दिसत आहेत. स्त्रीपुरुषसंबंधाची भीती नष्ट होण्याची शक्यता दिसू लागली आहे. याचा परिणाम म्हणून आजवर अवैध प्रजोत्पादनाच्या भीतीने दडपणात राहिलेली स्त्री निर्भय होण्याच्या मार्गावर आली आहे. कायद्यांनीही स्त्रीपुरुषांतील विषमतेला कक्षात आणले आहे.

स्थूलमानाने प्रजोत्पादनाची ही दोन पर्वे लक्षात घेऊन समाजधारणेत स्त्रीच्या स्थानाबद्दल विचार करणे भाग झाले आहे. तो विचार केल्यानंतर शेवटी विचार करावयाचा तो हा की समाजात लग्न करून पुरुष आजवर गैर संबंधाला पूर्णपणे मोकळा होता. आता प्रजोत्पादनच सुरक्षित शक्य झाल्यास स्त्रिया गैर संबंधाला पूर्णपणे मोकळ्या होतील. यानंतर समाजधारणेत स्त्रीचे स्थान सर्वस्वी पुरुषाच्या समान— बरोबरीचे झाले, तर सर्वत्र आनंदीआनंद होईल काय? पुरुषप्रधान समाज न राहता स्त्रीपुरुषांची समानता असलेला समाज तोल धरील काय? आणि तो कसा? हा विचार महत्त्वाचा आहे. तो शेवटी करू.

स्थूलमानाने जी दोन प्रजोत्पादनाची पर्वे सांगितली त्यांचा क्रमाने काहीसा बारकाईने इतिहास पाहिला पाहिजे.

## आरंभीची मातृवंशपद्धती पुढे ढासळत चालली

रानटी अवस्थेत कोणतेच ज्ञान नसताना भूक लागली की 'जीवो जीवस्य जीवनम्' या न्यायाने शिकार करून माणूस जगत होता. तेव्हा स्त्री आणि पुरुष यांच्यात आकर्षण नव्हते असे नाही. ते विचित्र आकर्षण शमविण्यासाठी पिंडाचे ठिकाणी ठेऊनच स्त्री आणि पुरुष निसर्गाने जन्माला घातली. पण या आकर्षणातून पुढे प्रजोत्पत्ती होते हे माणसाला कळत नव्हते. स्त्रीला मूल होते एवढे स्त्रीपुरुषांना कळत होते. त्यामुळे मूल हे स्त्रीचे. मुले, मुलांची मुले हा सारा संततिप्रपंच स्त्रीचा. ती नाजूक आहे, कोमल आहे, रक्षणीय आहे इत्यादी गोंडस कल्पनांचा उदय नसल्याने प्रजोत्पादनामुळे तिच्या शिकारीला आण्यात कायमचा अडथळा उत्पन्न झाला नाही. तीच धाडसी होती. प्राथमिक अवस्थेत निसर्गाच्या सरळ नियमानी मातृवंशपद्धतीच निर्माण झाली.

स्त्री आणि पुरुष यांच्या संबंधातूनच मूल होते हे कळल्यावर उत्पन्न होणाऱ्या प्रजेबाबत निर्मात्यांची दृष्टी बदलली. स्त्री हे क्षेत्र आहे. पुरुष हा क्षेत्री आहे. क्षेत्री नसेल तर क्षेत्र काय करील या न्यायाने क्षेत्र्याने आपले श्रेष्ठत्व गळी उतरवले. क्षेत्रावाचून क्षेत्री तरी काय करील हा उलट प्रश्न मध्येच विरला असावा. वास्तविक प्रजोत्पत्ती ही स्त्री-पुरुष या दोघांमुळे होते तेव्हा निर्माण झालेली बहुमोल प्रजा ही दोघांना समानस्थान देणारी ठरावयास हवी. पण तसे झाले नाही. आकर्षणापोटी स्त्रीने याला

हरकत घेतली नाही की अन्य काही कारणांनी हे घडले हे कळणे कठीण आहे. स्त्री असमर्थ आहे, तिला शक्तीची कामे होत नाहीत, हे स्वतंत्रतेच्या काळी खरे नव्हते. काही पुरुष अशक्त तशा काही स्त्रिया अशक्त. शेतीत राबणारी, घरकाम करणारी, गरीब स्त्री ही प्रासादात निरुपयोगी बसलेल्या स्त्रीपेक्षा कधाच्या सवयीनेच सशक्त असते. स्त्री-स्त्रीतही परिस्थितीने आणि सवयीने हा फरक पडतोच. प्राथमिक अवस्थेत स्त्रीच्या दुबळेपणाची कल्पना दृढमूल होण्याचे काहीच कारण नव्हते.

कधी शिकार मारून खाण्याचा शोध लागून घर, घरात संग्रह करणे, तो राखीत बसणे या कल्पनांतून स्त्रीचे घराशी नाते जुळले की काय कोण जाणे. पण एवढे खरे की हळूहळू मातृवंशपद्धती नष्ट होऊन पितृवंशपद्धती सुरू झाली. पुरुषाची श्रेष्ठता सिद्ध झाली. समाज पुरुषप्रधान झाला. पुरुषाने कायदे केले. पुरुषाने अंमलबजावणी केली. कायदा मोडणारांना पुरुष शिक्षा करू लागला. समाजधारणेची चौकट त्याने ठरवली.

## पुरुषाची श्रेष्ठता प्रस्थापित झाली

समाजधारणेला पहिली अत्यंत आवश्यक गोष्ट म्हणजे प्रजेची उत्पत्ती आणि प्रजेचे सातत्य. हे सातत्य स्त्रीमुळेच राखले जाते असे नसले तरी क्षेत्री म्हणून स्वतःला श्रेष्ठ मानणाऱ्या पुरुषाने प्रजेच्या सातत्याचे श्रेय स्त्रीला दिले. समाजधारणेतील एक महत्त्वाचे कार्य ती करते असा तिचा गौरव केला आणि गृहराज्ञी म्हणून तिची घरात स्थापना केली.

टोळ्याटोळ्यांनी समाज वाढत असता त्याच्यात लढाया होणे अटळ होते. त्या अटळ लढायांतूनही स्त्रीचे स्थान ठरले. पुरुषाला वासनांमुळे प्रेमामुळे स्त्री हवी असते. तशीच शत्रुपक्षातील पुरुषाला द्वेषापोटी चुरडून टाकायचीही ती हवी असते. स्त्री आणि पुरुष यांच्यात निसर्गाने असे काही आकर्षण उत्पन्न केले आहे की त्यात जोपासनेची भावना आणि गिळंकृतीची भावना ही दोन्हीही आहेत. स्त्रीपुरुषसंबंधात पुरुषाची समर्थता आणि करणात्मक प्रवृत्ती असते आणि स्त्रीची असहायता आणि अकरणात्मक प्रवृत्ती असते. अशा परस्परांपेक्षा भिन्न असलेल्या प्रवृत्तींनीच रतिसुख उभयतांनाही मिळते. स्त्रीला अकरणात्मक प्रवृत्तीमुळे तिला हवे असेल तेव्हा पुरुषाकडून सुख मिळेल असे नाही. पण पुरुषाला हवे असेल तेव्हा स्त्रीच्या खुशीनाखुशीव्यतिरिक्तही पुरुष स्त्रीसुख मिळवू शकतो. या त्याच्या प्रवृत्तीमुळे टोळ्या टोळ्यांत होणाऱ्या लढायांत शत्रुपक्षाची हानी करताना त्यांच्या स्त्रियांवर सूड घेऊन त्यांचा अपहार केला जाई. उपभोगाचे आकर्षण असलेल्या पुरुषाने आपल्या स्त्रिया शत्रूपासून संरक्षित ठेवण्यासाठी स्त्रीला घरात रक्षणीय म्हणून ठेवली आणि पुरुषाच्या उपभोगाचे आकर्षण असलेल्या स्त्रीने ते संरक्षण मानले. हे सर्व आपुलकीच्या पोटी झाले असे मानणे कठीण जाणार नाही. हजारो हजार वर्षांच्या मानवाच्या इतिहासात लढाया सतत होत असल्याने

स्त्री ही एकन्या शत्रूच्या हाती न जाता तिचे रक्षण व्हावे यासाठी घर हे तिचे आश्रयस्थान ठरले असावे.

ज्या घरात स्त्री राहू लागली तेथील कामे ती करू लागली. मुलोत्पादन निसर्गानेच तिच्याकडे दिले होते. उत्पन्न झालेल्या प्रजेचे संगोपन तिच्याकडेच आले हे सारे क्रमप्राप्त झाले. परंतु लढाया नसतील तेव्हा ती पुरुष करीत असतील ती कामे करीत नव्हती असे मुळीच नाही. उलट शेती पाहणे, शिकार करणे, शेतकामात सहभागी होणे हे स्त्री नेहमी करीत आली आहे. असे असताना आणि शत्रू नसताना तिच्या स्वातंत्र्यावर मर्यादा पडल्या त्या का हा प्रश्न पडतो. तेव्हा स्त्रीची बरोबरी का मानली गेली नाही?

टोळ्यांचे नेतृत्व लाभलेल्या पुरुषाने केवळ रतिसुखाच्या वेळी त्याची असलेली करुणात्मक प्रवृत्ती ही स्वतःच्या श्रेष्ठतेचे गमक मानली हेच त्याचे उत्तर आहे. स्त्रीची इच्छा नसताना स्वतःच्याच केवळ इच्छेने तिच्यावर बळजबरी करता येते, तिला नामोहरम करता येते. हे राकट मनाच्या अवस्थेत असलेल्या टोळीतील पुरुषाला उमगले. त्यामुळे स्त्री ही त्याची भोगवस्तू ठरली. एकाच्या स्नायूंची समर्थता व दुसऱ्याची असमर्थता यामुळे वर्चस्वाची भावना उफाळल्यावर स्त्रीच्या असमर्थतेचा तुच्छतेने उद्धार करण्याची पुरुषांना सवय लागली ती आजतागायत. या तुच्छतेत आणि असमर्थतेतच स्त्रीचे घरात वा समाजात दुय्यम स्थान कायमचे ठरले असावे. दरवेळी तिच्या असमर्थतेच्या जाणिवेतून तिचे घराबाहेरील स्वातंत्र्य मर्यादित होत गेले असावे. एरवी मातृवंश पद्धतीत समर्थ मानली जाणारी स्त्री कायमची असमर्थ ठरण्याला दुसरे सयुक्तिक कारण दिसत नाही.

## बळजबरीवर सुकुमार भावनांचे आवरण

पुरुषाला स्त्रीबद्दल तुच्छता होती तसे आकर्षणही होतेच. तिच्यावाचून पुरुषाला किंवा पुरुषावाचून स्त्रीला जगणे अशक्य आहे हे दोन्ही जातींनी ओळखले होते. त्यामुळे अत्यंत संमिश्र भावनेने त्या दोघांत श्रमविभाग होत गेला. सोपी कामे स्त्रीने करावी, आपण धकाधकीच्या जगात राहून सर्वांच्या पोटाची व्यवस्था करावी ही भावना पुरुषाची होती असा इतिहास नाही. जड अवघड कामे स्त्रिया करीत होत्या. आजही बहुसंख्य समाजात त्या करीत आहेत. पण मनुष्याचे मन हे संस्कारशील असल्याने ओबडधोबड राकट मनातून सुसंस्कार उमटले. हळूहळू त्या सुसंस्कारात वागणुकीचा राकटपणा जाऊन तिला मार्दव येऊ लागले. काव्यमयता आली. सुकुमार भावनांचा उदय झाला आणि स्त्रीपुरुषातील राकट आकर्षणालाही सुंदर अभिव्यक्ति लाभली. त्यात वर्चस्वाची भावना तशीच राहिली आणि प्रेमाचा गुलाबी रंग वर आला. त्यावर स्त्री ही नाजुक आहे, तिचा देह नाजुक, वाणी नाजुक, तिला राकट कामे होणार नाहीत, तिच्या सौंदर्याला भूषणांनी शोभा येते. सुंदर वस्त्रप्रावरणानी शोभा येते. ती प्रेमळ आहे. तिने घराच्या सावलीत

राहावे, उन्हाच्या तिरिपीने ती घाबरीघुबरी होईल, बाहेरच्या जगातील दुष्ट वारे झोंबले तर तिला ते सहन होणार नाही अशा नाजुकसाजुक कल्पनांचा फुलोरा सुसंस्कृत पुरुषाने फुलवला आणि त्या फुलोऱ्याने धुंद झालेल्या स्त्रीने जगाकडील दारे बंद करून घरात स्वतःला बंदिस्त ठेवण्यास राजीखुषीची संमती दिली. उघड्या राकट आकर्षणातून सुसंस्कारित आकर्षणापर्यंत कोणकोणत्या टप्प्यांनी माणसे आली हे सांगणे कठीण आहे. परंतु आकर्षणातील उदात्तता, लोलुपता यांनीच स्त्रीचे समाजधारणेत दुय्यम स्थान ठरले. तिला कारण नसताही कित्येक गोष्टींचा प्रतिबंध झाला, आणि केवळ रटाळपणे तीच ती कामे युगानुयुगे करण्याचे तिच्या नशिबी आले. ती स्त्री जगाच्या ज्ञानाला, जगाच्या अनुभवाला पारखी झाली. तिचे त्याच त्या गोष्टींचे चर्वितचर्वण किंवा रवंथ करीत बसणारे मन संकुचित झाले. मासिक पाळी, गर्भारपण, बाळंतपण, पतीचे आकर्षण एवढ्याच तिच्या आयुष्यातील महत्त्वाच्या घटना ठरल्या आणि त्या लहानशा जगातील क्षुद्र हेवेदावे, क्षुद्र विषय, क्षुद्र भावनाच ती चविष्टपणे चाखू लागली. शृंगाररसासाठी राखून ठेवलेल्या या बाहुलीच्या जीवनात संकुचितपणामुळे क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सरानी बरोबर पोसरापोसर केली. आणि तेच तिचे घरातील राजकारण तिला घेरून बसले. तिचे स्त्रीमन अनेक विरोध विसंगती घेऊन बसले.

स्त्रीच्या स्त्रीत्वाचा हा इतिहास कसकसा केव्हा केव्हा घडत गेला हे सांगता आले नाही, तरी पृथ्वीच्या पाठीवरील साऱ्या पुरुषजातीने साऱ्या स्त्रीजातीला घरात बंदिस्त केले ते एकाच तऱ्हेने. ती संकुचित, व्यवहाराला पारखी ठरली ती एकाच तऱ्हेने, शिक्षणाला पारखी झाली ती तिच्या स्त्रीत्वामुळेच आणि असहाय स्त्रीत्वाचा फायदा घेऊन पुरुषप्रधान समाज उदयाला आला. अश्मयुगापासून विसाव्या शतकातील आजच्या दिवसापर्यंत कोणत्याही आर्थिक स्थितीतील, कोणत्याही सामाजिक पातळीतील, कोणत्याही रांगड्या वा उत्कृष्ट संस्कृतीतील सर्व स्त्रियांची एकच जात आणि त्यांचे काम एकच एक. पुरुषांचे असे झाले नाही. सर्व पुरुषांनी अनेकविध धंदे केले. जीवनाची विविधता भोगली.

## मानवाचा विकास साधण्यास स्त्री खरोखर असमर्थ होती का?

आजवरच्या सर्व मानवी विकासाचे श्रेय हे पुरुषजातीला आहे. निसर्गाची गूढे उकलून माणसाने निसर्गावर मात करण्याचा जो प्रयत्न केला त्यात हरएक पुरुष सहभागी होता असे मुळीच नाही. बहुसंख्य पुरुषांनी सर्वसामान्य आयुष्य घालवले हेही खरे. तरी काही थोड्या पुरुषांनी जे केले ते स्त्रीला कधीच करता आले नाही. पृथ्वीच्या पाठीवर निसर्गाच्या पार्श्वभूमीवर चिरंतन स्वरूपाचे अनंत तऱ्हांचे शिल्प माणसाने केले, केवळ दगडधोंड्यातून, विटा जंगलातून, विटा दऱ्याखोऱ्यातून माणसाच्या संस्कृतीचा सारा इतिहास मूर्तस्वरूप घेऊन ठाकला आहे, तो पुरुषप्रयत्नांनी. त्यानेच शास्त्रे उदयास आणली. त्यानेच समाज घडवले. यात प्रजजननाखेरीज स्त्रीचा काय भाग हे

सांगणे कठीण आहे. पुरुषाला घरात स्त्रीने प्रेरणा आणि सुख दिले म्हणून हे घडू शकले असे सांत्वन केले तरी त्यांतील सत्य पटायला जड जाते. निसर्गाशी झगडणारा, त्याची गूढे उकलणारा पुरुष हा त्या नादब्रह्मात आकंठमीवतही विसरला असण्याचीच जास्त शक्यता. त्याशिवाय हा एवढा पराक्रम त्याच्याने झालाच नसता. त्या त्या काळी त्याने स्त्रीसुख व इतर सुखे भोगलीही असणार; पण त्याला भान होते ते त्याच्या नादाचे, ध्येयाचे. त्याने मानवाच्या विकासाला अखंड गती दिली.

पुरुषजातीने निर्माण केलेले हे मानवी शिल्प, त्याने साधलेला हा विकास पाहिला की सतत जननक्रियेत, अपत्यसंगोपनात आणि घराच्या चार भिंतींत गृहकर्तव्ये करीत बसलेली स्त्री ही जड शिळा झाल्यासारखी वाटते. ज्या प्रजेच्या पालनाला ती झुंजून पडली त्या प्रजेने तिचे नावही कधी लावले नाही; जो धर्म उदयाला आला त्यासाठी जे होमहवन झाले तेथे रांधून वाढून उष्टी काढूनसुद्धा तिला बुद्धीने मंत्रोच्चारही करण्याची मुभा राहिली नाही. एकमेव कामाला जुंपलेल्या स्त्रीचे जीवन असे काही धर्मरज्जूंनी बांधले गेले की निरपेक्षपणे, सोशिकपणे, हसऱ्या चेहऱ्याने एकाळ आयुष्य काढण्यानेच ती श्रेष्ठ ठरली. खरोखरच कोणतीही स्त्री पुरुषाने केलेला विकास करण्यास असमर्थ होती का ? निसर्गाकडून एक गर्भाशय मिळाल्यामुळे खुल्या जगातील कोणताही व्यापार, व्यवहार स्वतःच्या बुद्धीने करण्यास ती असमर्थ झाली असेल का ?

## इतर दलितांपेक्षा स्त्रीची दलित जात वेगळी

आजवरपर्यंत मानवाच्या इतिहासात महत्त्वाच्या क्रांत्या झाल्या. सुरुवातीला स्पर्धा, पराक्रम, जय, स्थैर्य यासाठी मानवी संबंधांनी काही निरगाठी घातल्या. त्यांनी निभेना तेव्हा निरगाठी तोडून सुरगाठी मारायला लागल्या, एवढेच नव्हे तर कोणत्याच प्रकारची गाठ असण्याचे कारणच नाही हेही मान्य झाले. उदाहरणच घ्यायचे तर सर्व मानव सारखे असताना स्पर्धेमुळे, हावेमुळे, सत्तेमुळे आणि सत्तेसाठी काहींच्या बाबतीत जिनजते संबंध निर्माण झाले, उचनीचता आली, धनी–दास संबंध निर्माण झाले, मालक-गुलाम संबंध जन्माला आले, मालक-मजूर संबंध जन्माला आले. या विषम मानवी संबंधां-मुळे काही माणसांना शेकडो वर्षे पशूंचीही किंमत राहिली नाही. सहानुभूतीचा स्पर्श तर राहोच पण निर्दयता, क्रूरता यांखेरीज काहीच भोगता आले नाही. हे विषम संबंध केव्हाना केव्हा अत्यंत विखारी होऊन बसले. इतके की ते विप्र, धनी, मालक, सत्ताधारी यानाही जाचक होऊ लागले. मग निरगाठी तुटू लागल्या, नाती बदलू लागली. अखेर समतेची भाषा आली. नोकरी-कामकऱ्यांची राज्ये आली. धनी, मालक, राजे म्हणवून घेणाऱ्यांचा उच्छेद तरी झाला किंवा त्यांना नमते तरी घ्यावे लागले. दलक आणि दलित यांचे विषम संबंधही युगानुयुगाचे असले तरी त्यांना समता प्राप्त होण्याचे युग आले.

मानवी संबंधात ही जी क्रांती झाली, त्याला जो अर्थ आहे तोच स्त्री-पुरुषांच्या विषमतेला आहे का ? समाजातील इतर दलितांपेक्षा स्त्रीची दलित जात वेगळी आहे.

प्रत्येक दलिताने आपली स्त्री दलित केली. स्त्रीचा संबंध आला तेव्हा कोणताही दलित हा दलकत्व झाला. कारण स्त्री ही उपभोगाची वस्तू स्वतःच्या मालकीची ठेवण्याची त्याला इच्छा होती. आणि स्त्रीला पुरुषाचा उपभोग हवा पण ती वस्तू म्हणून राहणार नाही. थोडक्यात सांगायचे तर हा लढा एकमेकांना आकर्षून घेणाऱ्या स्त्रीत्वाचा आणि पुरुषत्वाचा असल्याने तो इतर दलितांच्या लढ्यापेक्षा अगदी वेगळ्या स्वरूपाचा होत गेला. आणि मानवी विकासाच्या इतिहासात धर्मयुग सुरू झाले, बहरले आणि त्याचा ऱ्हास सुरू झाला. हे होताना अनेक गोष्टींना मोल आले आणि धर्माच्या ऱ्हासाबरोबर ते मोल घसरले. धर्मयुग माणसानीच सुरू केले आणि त्यांनीच त्याचा ऱ्हास सुरू केला आहे. माणूस हा अनेक वासनांचा गोळा आहे मग ती स्त्री असो वा पुरुष असो. ज्ञानी पुरुषांनी वासनात लोळल्यास त्याचे परिणाम काय होतात हे इतिहास व वर्तमानकाल पाहून लक्षात घेतले आणि माणसाला वासनापासून अलिप्त राहण्यासाठी अनेक तऱ्हांच्या आचारधर्मांना बांधून टाकले. पाप-पुण्याची स्वर्ग-नरकाची कल्पना दृढतेने सांगून माणसांना भय दाखवून वासनांना आवरावयाचे शिक्षण दिले. अध्यात्मपरंपरा असलेल्या भारतासारख्या देशात विज्ञानाचे युग अवतरले नसेल, पण मनाच्या विलक्षण शक्ती पोसण्यासाठी प्रखर वासनासंयम अनेकांनी हजारो वर्षे केला. अशा या देशातील श्रुतिस्मृतिग्रंथ चाळल्यास स्त्रीबद्दलच्या कल्पना अभ्यासण्यासारख्या वाटतात. अध्यात्मग्रंथात सर्वत्र स्त्रीबद्दल अत्यंत तिरस्कार दाखवलेला आहे. स्मृतीतही तसेच, आणि याचे कारण पुरुषाचा आकर्षणापासून बचाव करणे गरजेचे होते.

मनुष्यनिर्मित सामाजिक विषमता ही एकेका कालखंडाला उपयुक्त झाली असेल. पुढे ती विषमता निरुपयोगी झाली. कदाचित निराळ्या तऱ्हेची विषमता उत्पन्न होईल किंवा कदाचित समता निर्माण होईल. पण मनुष्याचे षड्रिपूंनी युक्त असलेले मन पाहिले की कायमची समता निर्माण होण्याची शक्यता फार कमी वाटते. समुद्राच्या भरती-ओहोटीत एक समकाल असतो. तसेच काहीसे या समविषमतेचे स्वरूप आंदोलित राहील असे वाटू लागते. सर्व धर्मांचे व वादांचे इतिहास हीच साक्ष देतात. पण हे जे मनुष्यनिर्मित विषमतेत घडत आले तेच निसर्गनिर्मितीत घडेल का?

निसर्गाशी झगडून स्वतःची समर्थता सिद्ध करू पाहणारा माणूस अणुयुगात अनेक ग्रहांवर जाईल हे जसे खरे तसे षड्रिपूंनी उचल घेतल्यास सर्वस्वी आत्मनाश करून घेईल हेही खरे. निसर्गाने सातत्यासाठी जीवसृष्टीत सर्वत्र स्त्री-पुंबीजाची पेर केलेली आहे. निसर्गनिर्मित स्त्री आणि पुरुष यांच्यात विषमता असावी की समता असावी या बाबतीत निसर्गाने कोणताच नियम घातलेला नाही. ते सारे माणसाने ठरवायचे आहे. आणि ते ठरवण्याची अनेक युगानंतर आता वेळ आली आहे.

### पूर्ण स्वातंत्र्याचा रशियातील प्रयोग

स्त्रीपुरुषाची असमता ज्यामुळे निर्माण होते त्या 'सेक्स'च्या बाबतीत संपूर्ण

स्वातंत्र्य स्त्रीपुरुषांना देण्याचा प्रयोग यापुरतेच नव्याने व्हावयाचा आहे असे नाही. विषमता समूळ नाहीशी करण्यासाठी रशियात जी क्रांती झाली त्या क्रांतीत स्त्रीपुरुषांतील विषमता नाहीशी करण्यासाठी उभयतांनाही 'सेक्स'चे स्वातंत्र्य दिले. स्त्रीच्या मार्गात मुले अडतात. त्यांची काळजी सरकारने घेण्याचे ठरविले. मुलांचे खाणे, पिणे, शिक्षण उत्कृष्ट व्हावे यासाठी मोठमोठ्या तज्ज्ञ डॉक्टरना, नर्सना हाताशी धरले, शिक्षणशास्त्रज्ञांना हाताशी धरले. आबाळ किंवा अनारोग्य दिसल्यास कडक शासन केले जाईल ही कार्यकर्त्यांना मिनिट अशी जाणीव दिली. त्यावेळी मातृहृदयाला मुले जवळ असावीसे वाटेल त्यावेळी स्त्रीला आपली मुले आपल्याजवळ घेणे सुलभ केले. 'मुले झाली की ती मुलांच्या पांजरपोळात सोडली' असे हे स्वरूप निश्चित नव्हते. मुले कायमची आईला पारखी झाली असेही त्याचे स्वरूप नव्हते. पण चोवीस तास घर नि मुले या रहाळ जीवनातून मुक्त होऊन स्त्रीला दुसरीही कामे करता यावी, दिवसाकाठी मुलांवर मायाही करण्यास भरपूर अवधी मिळावा अशी व्यवस्था केली गेली.

मानवनिर्मित स्त्रीपुरुषांतील विषमतेला मानवानेच सम करण्याचा प्रयोग सुरू झाला आहे. या प्रयोगाने समाजधारणेत स्त्रीने पुरुषाच्या बरोबरीने काही महत्त्वाची कामे केली का ? या प्रश्नाला 'होय' असेच उत्तर मिळते. प्रत्येक पुरुष जसा शोध लावीत नाही तशी प्रत्येक स्त्री शोध लावणार नाही. प्रत्येक पुरुष जसा अर्थार्जन करतो, त्यासाठी काम करतो, जेवतो, खातो, करमणूक करून घेतो, रतिसुख घेतो तसेच स्त्रीही करते. पण स्वतंत्रपणे विशेष कामगिरी करून समाजाचा विकास करणारे जसे पुरुष आहेत तशा येथे स्त्रियाही आहेत हे निश्चित. जी जी कामे पुरुष करतो ती ती करण्याला स्त्रीला प्रत्यवाय नाही आणि स्त्री ती करतानाही दिसते. रशियात कुटुंबसंस्था नष्ट झालेली नाही. तिचे स्वरूप बदलले आहे. पृथ्वीभोवती निरवकाश यानात पुरुष फिरून आला तशी रशियन स्त्रीही फिरून आली. सर्व पुरुष विशेष काही करतीलच असे नाही, तसा स्वातंत्र्य मिळालेल्या सर्व स्त्रिया विशेष काही करतील असे मुळीच नाही. एखादाच पुरुष विशेष दिसावा तशी एखादीच स्त्री विशेष दिसेल. पण चार भिंतींत अश्मयुगापासून अणुयुगापर्यंत गाडलेल्या स्त्रीला आपल्या शक्ती अन्यत्र पडताळता आल्या तर ती समाजधारणा आहे असे समजण्यास प्रत्यवाय कोणता ? परंतु रशियात स्त्री हजारो वर्षे करीत असलेल्या एकमेव कार्यातून मुक्त झाली याला कारण तेथे मिळालेले राजकीय मतप्रणालीने बद्ध असे सेक्सचे स्वातंत्र्य हे स्पष्ट म्हणणे भागच आहे. सेक्सचे स्वातंत्र्य अनेक देशांत आताही स्वैरपणे घेतले जात असले तरी अवैध संततीला कायद्याने मानली आहे असे नाही. रशियात स्त्रीला मूल होते ते कायदेशीरच आहे असे मानल्याने सर्व प्रश्न सुटले. विवाहबाह्य संततीची इतर देशातून होणारी परवड रशियात होत नाही. ज्या पुरुषाशी संबंध येऊन स्त्रीला मूल झाले असेल त्या पुरुषाशी लग्न करणे किंवा लग्न करून लग्नविच्छेदन करणे यासाठी भयंकर यातायात करावी लागत नाही. त्याचा दुसराही एक विशेष परिणाम होतो. लग्नवालवीने,

छचाछचकीने स्त्री-पुरुष संबंध होऊ लागल्यावर अनेक स्त्रियांच्या व अनेक पुरुषांच्या वासनासंबंधाच्या अनेक भाकड रोगट कथांच्या गप्पा मारण्यात भयंकर वेळ जात नाही. सामर्थ्य खर्च होत नाही. पैशांचा अपव्यय होत नाही. वासनाविषयांची शिकार करण्याने वेळ रोगटपणे घालवला जात नाही आणि त्यातून स्वैरवर्तन इतक्या सवलतीनंतर करणारांना फार कडक शासन होते हे लक्षात ठेवले पाहिजे.

## रशियातील क्रांती सर्व देशांना मानवणारी नाही

विषमतेविरुद्ध झालेल्या रशियातील क्रांतीतील ही सेक्सची क्रांती सर्व देशांना मानवण्यासारखी नाही. विशिष्ट तत्त्वप्रणालीची अंगोपांगांनी कडक अंमलबजावणी होते, तेथेच कडक शिस्तीने सेक्सची क्रांती हा निर्दोषपणा आणू शकली. हे सर्व देशांत जमणारे नाही. पण लोकसंख्या भयानक होऊन कुटुंबनियोजनाची साधने सहजसाध्य झाल्याने नको म्हटले तरी आपण होऊन सेक्सची क्रांती आपल्यावर आदळणार आहे. अतिप्रजा झालेल्या आपल्या देशात स्त्रीच्या लग्नाचे वय एकवीसपर्यंत नेल्यास प्रजेला आवर पडेल हे जसे खरे तदेच विवाहबाह्य संततो आताच पुष्कळ होत आहे त्यात भर पडेल. त्यामुळे विवाहातील संतती होण्याचे टळले तरी दुसरे संकट उभे राहण्याचा फार संभव आहे.

अतिप्रजेने समाजधारणेला धोका उत्पन्न झाला आहे तसा या विवाहबाह्य संततीत भर पडल्यानेही धोका उत्पन्न होणार आहे. अर्थार्जनाच्या स्वातंत्र्याने विवाहसंस्थेला धक्का बसला त्याहीपेक्षा कुटुंबनियोजनाच्या साधनांनी विवाहसंस्थेला फार मोठा धक्का बसत आहे, बसणार आहे. समाजधारणेला उपयुक्त असणाऱ्या विवाहसंस्थेत क्रांतिकारक बदल करण्याखेरीज गती राहणार नाही. अशा समाजात सेक्समुळे घडामोडी होण्याचा संभव आहे. संततिनियमनाची साधने कुमारिकाही वापरतील. वापरूही लागल्या आहेत. ही चोरटी सेक्सची स्वतंत्रता बरी की शिस्तबद्ध सेक्सचे स्वातंत्र्य बरे हा प्रश्न देशात पडल्याखेरीज राहीलसे वाटत नाही. प्रजा निर्माण करणे अगर न करणे हे माणसाच्या हाती विज्ञानाने आल्यामुळे विवाह व सेक्सच्या कल्पनात क्रांती झाल्याखेरीज गतीच नाही. या क्रांतीच्या क्षणी काही नियमनेही अत्यंत महत्त्वाची ठरतील. मानवाने निसर्गाशी झगडत आजवर विकास साधला तो मानवजातीच्या सुखासाठी. पण मानवाने आजवर समाजाच्या सुखासाठी लावलेल्या शोधांपैकी कित्येक उपकारक झाले तसे ते अपकारकही झाले आहेत. उदाहरणार्थ, अमेरिकन दाट वस्तीच्या शहरात प्रत्येक माणसाची सुखसोय म्हणून मोटरगाडी प्रत्येकाजवळ आली. पण आता शास्त्रज्ञांच्या असे लक्षात आले आहे की, लक्ष लक्ष मोटरीतून जो विषारी धूर हवेत मिसळतो त्यामुळे कॅन्सरचे प्रमाण वाढत आहे. माणसाचे मर्यादित आयुष्य आणि त्याची अमर्याद सुखासाठी चाललेली धडपड यात मानवाचा खरा विकास कशात आहे याचा अर्थ अजून भोगवादी जगाने लावलेला नाही. सुखासाठी धडपडून वासनाच भडकत

असतील तर मानवाचा 'विकास' कसा काय म्हणता येईल हे कळणे कठीण आहे.

## सेक्सच्या स्वातंत्र्याने निर्माण होणाऱ्या समस्या

स्त्रीपुरुष संबंध ही मानवाची न आवरणारी वासना आहे, तिला प्रजोत्पादनाची, विवाहसंस्थेची, आचारधर्माची मर्यादा राहिली नाही तर चालेल का? दोघांची समानता राखून सेक्सचे स्वातंत्र्य हे प्रगल्भ संयमी मनांनीच फक्त नीट वापरता येण्याचा कदाचित संभव. कोट्यवधी जीवांना आज तरी हे मन लाभण्याची शक्यता नाही, असे असताना कामवासनेत अहर्निश लोळणारांची बहुसंख्या झाल्यास समाजधारणा होण्याचा मुळीच संभव नाही. स्त्रीपुरुष आकर्षण ही गोष्टच अशी आहे की, ती दोघे केव्हाही एकत्र आली तरी हीच भावना जागी असते. संयमी विवेकानेच माणसे ती आवरतात. परवी स्त्रीपुरुष असंयमी मनांनी वावरल्यास आणि सेक्सचे स्वातंत्र्य मिळाल्यास एकमेकांचा तिरस्कार यावा इतका उपभोग घेतील. कामवासना उपभोगाने कधीच थमत नाही. दुबळी शरीरे मृत्युपंथाला लागली तरी मनात बांडोळ्या कामाचा विचार करीत राहण्याची शक्यता असते. त्यामुळेच बऱ्याच अनुभवांनी आणि विवेकाने विचारवंतांनी संयमाची महती सांगितली आहे.

प्रजोत्पत्तीची वाढ कमी करावी असे म्हटले तरी प्रजोत्पत्ती संपूर्णपणे थांबावी असे क्वचितच एखाद्याला वाटेल. परंतु प्रजेचे वात्सल्य असावे, मूल असावे असेच माणसांना वाटणार. ते नसेल तर कित्येक स्त्रियाच नव्हेत, पुरुषही विमनस्क, वेडे होतील. मात्र सौंदर्यवाद्यांनी चोवीस तास स्त्रीत्वाची उघळमाघळ करीत स्त्रियांनी पुरुषांच्या वासना चेतवीत जगावे असे म्हटले तरी हे सौंदर्यवादी समाजधारणेचे शत्रूच होत. स्त्रीपुरुष संबंधातील पुरुषाची करणात्मक प्रवृत्ती व स्त्रीची असहायता यांत स्वैर उन्मत्ततेने स्त्रीवरच अत्याचाराचा संभव जास्त. तेव्हा संयम हा आधी स्त्रीनेच पाळावा लागेल.

सेक्सचे स्वातंत्र्य हे अविचाराने, असंयमाने वापरल्यास स्त्रीपुरुष विटून कुणी तरी दुसऱ्याचे दास्य पत्करणे बरे असे मानतील. पण पुन्हा ते अकरणात्मकतेने स्त्रीकडेच येईल. माणसात षड्रिपूंचा धुमधुमाट आहे तसे प्रखरतेने त्यांना जाळून टाकण्याची मानसिक शक्तीही सिद्ध झालेली आहे. या सेक्सच्या क्रांतीत मानवी सुख व विकास यांचा रेखीव अर्थ लावणे भागच पडेल.

स्वातंत्र्य म्हणजे स्वैरता नव्हे हे सेक्सच्या क्रांतीत काय किंवा इतर स्वातंत्र्यात काय लक्षात ठेवावेच लागते. शिस्तबद्ध स्वातंत्र्यासाठी सारा समाज कर्तव्यनिष्ठ झाला पाहिजे. त्या कर्तव्यनिष्ठेत जोर भरण्यासाठी समाजाला आपल्या विशिष्ट मतप्रणालीने बद्ध झालेले राष्ट्र हवे. म्हणजेच माणसे सेक्समधून मन काढून वरच्या पातळीवर कर्तव्यात स्वतःला गुंतवतील. नाहीतर हा सेक्सच्या क्रांतीने विनाश ओढवेल.

॥

# १८

# स्त्रीजीवनातील समस्या

गीता साने

सौ. गीता साने, एम्. एस्सी., बी. टी. (जन्म २-९-१९०७) बिहारमधील शैक्षणिक व सामाजिक कार्यकर्त्या व प्रसिद्ध लेखिका. महाराष्ट्र सरकारचे बक्षीस मिळालेला 'चंबळची दस्युभूमि' हा चंबळ खोऱ्यातील विशिष्ट समस्यांवर प्रकाश टाकणारा ग्रंथ लिहिला. जिल्हा परिषद, शिक्षणसंस्था आणि कोळसा खाण मजुरांमध्ये कार्य. (द्वारा – डी. नरसिंह, ॲड्व्होकेट, चिरागोडा, हिरापूर, धनबाद, बिहार)

आजच्या स्त्री-जीवनाकडे ओझरती नजर टाकली तरी त्याला घेटाळणारे अनेक प्रश्न दृष्टीस पडतात. त्यांतले काही क्षुद्र तर काही जटिल, काही प्रयत्नसाध्य तर काही स्त्रीला एकटीला न पेलणारे, काही समाजाच्या अस्तित्वाला धोका आणणारे तर काही मानवजातीला नाशाकडे नेऊ शकणारे असे दिसतात.

## स्त्रीजीवनाचे थर उतरंडीप्रमाणे

ह्या विविध समस्यांमध्ये गुरफटलेले स्त्रीजीवन एकजिनसी नसून एखाद्या उतरंडी-प्रमाणे दिसते. ह्या उतरंडीच्या शुडाशी एक सुंदर अडणी आहे, स्त्रीच्या स्वाधिकाराची, आत्मविश्वासाची, कर्तृत्वाची. ह्यावरती विसावलेली स्त्री सुविद्य, समंजस व जागृत आहे, आदरप्राप्त आहे. मागच्या पिढीत शिक्षणाने तिचे व्यक्तित्व सर्वांगानी उमलून आले व स्वातंत्र्यसंग्रामात पुरुषाच्या बरोबरीने भाग घेत, सामाजिक अन्यायाचा प्रतिकार तिने संघटना उभारून केला. स्वतंत्र भारताने तिचे कर्तृत्व व तिचा दावाही अनेक नवीन कायद्याच्या स्वरूपात मान्य केला. ही स्त्री बहुशः धनिक आहे. तिच्या जीवनाला जाति-धर्मांच्या, रूढ सामाजिक परंपरांच्या मर्यादा पडलेल्या नाहीत. ती भारताची पंतप्रधान होते, परदेशात वकील होते. ती उद्या राष्ट्राध्यक्ष वा मुख्य न्यायाधीश होईल. तिच्याबद्दल स्त्रीला सार्थ अभिमान आहे.

ह्या स्त्रीचा थर अगदी लहान व तो पायात पडलेला आहे, तिचे प्रश्न तिने सोडवलेले आहेत.

ह्या उतरंडीचा दुसरा कळस थोडा मोठा आहे. ह्या स्त्रिया मुक्तवस्तु आहेत. दुसरे महायुद्ध व स्वतंत्र भारताचे औद्योगीकरण ह्या घटनांमध्ये बन्यावाईट मार्गांनी संपन्न झालेले नवधनिक व चार आकड्यात पगार मिळवणारे कुशल तंत्रज्ञ ह्यांच्या कुटुंबांचा ह्या थरात समावेश होतो. ह्या थरात सुशिक्षित-अशिक्षित, सुंदर-कुरूप, अल्पवयी, प्रौढ, अशा विविध स्त्रियांची खिचडी आहे. त्यांना गुंफणारा धागा आहे त्यांच्या संपन्नतेचा. इंग्रजांचे उथळ अनुकरण बहुशः ह्या वर्ग करीत असतो. ह्या स्त्रियांचे प्रश्न आहेत, पण ते डोळ्याच्या पाण्यात विरून जाणारे.

तिसरी घागर पांढरपेशा स्त्रीची. ही मुख्यतः येते 'उच्च' जातींमधून, भारताच्या विस्तृत प्रदेशात मोठ्या प्रमाणावर ब्राह्मण, थोड्या प्रदेशात कायस्थ, राजपूत, क्षत्रिय. ही घागर आहे. सुविद्य स्त्रियांचा भरणा ह्याच थरात आहे. ती मोठ्या प्रमाणावर अर्थार्जन करते आहे व त्यासाठी नित्य नवी क्षेत्रे शोधते आहे. तिला अनेक समस्या आहेत; कारण प्रश्न करण्याइतपत ती जागृत व समजदार आहे. ही स्वतंत्र नाही; पण मनोधैर्य असल्यास झुंज देण्याचे सामर्थ्य तिला आहे, हे ती अनेकदा दाखवून देते.

त्यानंतरचा थर शेतकरी व कुशल कारागिरांच्या स्त्रियांचा आहे. त्या बहुतेक अशिक्षित आहेत. व त्या शूद्र जातींमधून येताना दिसतात. आपल्या मुलींना शिकवण्याची ह्या थरातील स्त्रीला महत्त्वाकांक्षा आहे. पुरुषाने आणलेल्या कोंड्याचा मांडा करण्याचे कौशल्य तिच्या अंगी आहे. एका पिढीपूर्वीची मध्यमवर्गीय स्त्रीच तिच्यात आपल्याला ओळखता येते, व त्यामुळे तिचे प्रश्न आपण हाताळलेले आहेत.

सर्वांत खाली एक प्रचंड रांजण आहे कामकरी व भूमिहीन मजूर स्त्रीचा. ही अतिशूद्र व अंशतः शूद्र जातीची, सर्वदा पददलित आहे. तिच्या जीवनात सर्व गोष्टींचा अभाव भरपूर आहे. ती सारे अन्याय मुकाट सोशीत आलेली आहे. एका शतकापूर्वी तिचा पुरुषवर्ग तिच्याइतकाच दलित होता व आजही जुल्माशी सतत संग्राम करण्यात गुंतलेला आहे. अशरण असणे ही तिची प्रकृती आहे, विकृती नव्हे.

ह्या सर्व उतरंडीला एकत्र जखडणारी चौकट कायद्याची आहे कारण आपले फौजदारी व दिवाणी कायदे तसेच आपले संविधान निदान तत्वतः, सर्वांना एकाच मापाने मापणारे आहे.

वरील सर्व थरांचे प्रश्न आजवर काही प्रमाणात वेगळे होते. पण आज लोकशाही समतेच्या काळात, कामकरी स्त्रीचे जीवन सुकर होण्याऐवजी पांढरपेशा थरातल्या स्त्रीच्या वाट्याला मात्र, मजूर स्त्रीवर होणारा अन्याय व अपमान येऊ लागले आहेत. ती स्त्री त्यामुळे गोंधळली, गांगरली आहे.

ह्या स्त्री-जीवनाच्या समस्या विविध स्वरूपाच्या असल्या तरी जाणिवेच्या पातळीवर त्याचे (१) ज्ञात असलेल्या (२) अर्धवट उमजलेल्या व (३) तिच्या मनाच्या कक्षेत न आलेल्या असे भाग स्पष्ट पडतात.

## पांढरपेशा स्त्रीवर्गाची दशा

पांढरपेशा स्त्रीवर्गाने ह्यांपैकी पहिल्या भागातल्या समस्यांची दखल घेतलेली असल्याने, त्या समस्या आपल्या पूर्ण परिचित आहेत.

पांढरपेशा वर्गातही स्त्रियांचे, अर्थार्जन करणाऱ्या व न करणाऱ्यांचे प्रश्न किंचित भिन्न आहेत व त्यांपैकी नवऱ्याच्या तुटपुंज्या मिळकतीवर अवलंबून राहाणाऱ्या स्त्रीची स्थिती अत्यंत केविलवाणी आहे. अपुरे अन्नवस्त्र, घरे असतील तर ओंगळ, पडायला झालेली, गलिच्छ ! संतती भरपूर, पण प्राथमिक मोफत शिक्षणानंतर मुलांना शिकवण्याची ऐपत नाही. भरवयात काम मिळण्याचा संभव वा पात्रता नाही. ह्याच अपुऱ्या मिळकतीवर इतर कुटुंबियांचा भारही अधूनमधून पडत राहावयाचा. रिकामटेकडी मुले रस्त्यावर काळ कंठीत असतात. दुखण्याला रोज निमंत्रण असते. औदार्याचा, विपुलतेत वाढणारा गुण, कोणीही पाहिलेला नाही. ह्या स्त्रीचे जीवन, संकुचित स्वार्थामुळे अधिक कळकट होते. लहानसहान भांडणे, हेवेदावे ह्यात ती सडत राहाते.

नोकरी करणाऱ्या स्त्रीची स्थिती थोडी बरी आहे. मुलांच्या तोंडात ती ओलाकोरडा घास घालू शकते. पण 'घर व बाहेर' दोन्ही एकदम सांभाळताना तिच्यावर असह्य ताण पडत आहे. लग्न होताच, पहिले कौतुकाचे पोर वर्षाभरात येते, दुसऱ्याची पावले केव्हा तिच्या जीवनात प्रवेश करतात ते समजतही नाही. संततिनियमनाबद्दल एवढा प्रचार चालू असता, आवश्यक ती माहिती व मदत तिला सहज उपलब्ध होत नाही. अनेकदा नवऱ्याचे सहकार्यही ह्या कामी तिला मिळत नाही. त्यामुळे आणखी दोन पोरांची भर तिच्या संसारात पडते. मग मात्र पाळी चुकताच घाबरून जाऊन ती एखाद्या डॉक्टरकडे धावते आणि सुटकेसाठी विनवू लागते. गर्भपातासाठी डॉक्टरकडे जाणाऱ्या विवाहित स्त्रियांची संख्या दिवसेदिवस वाढत आहे, हे कुठलीही डॉक्टर सांगू शकेल.

प्रसूती व मुलाचे संगोपन हेही काळजी करण्याचेच प्रश्न आहेत. नोकरी न करणाऱ्या स्त्रियांजवळ पैसे नाहीत, तर अर्थार्जिताना प्रसूती-रजा मिळतेच असे नाही. नोकरीसाठी घराबाहेर सहा ते दहा तास रखडावे लागत असल्याने मुलाचा सांभाळ ही देखील एक समस्याच आहे. नोकर मिळत नाहीत, मिळाले तर विश्वासू नाहीत, केव्हा निघून जातील सांगवत नाही, परवडण्याचा प्रश्नही असतोच. शेजारी न मिळवत्या गरीब स्त्रिया असतात पण अर्थार्जितेच्या मदतीला धावण्याइतके उदार मातृत्व भारतीय मातेमध्ये नाही. कामाच्या जागी नर्सरी नाहीत. मूल आजारी पडले म्हणजे रजा मिळवण्याचा प्रश्न असतोच.

पाठी मुले बाहेर ठेऊन, घराला कुलूप घालून ही स्त्री पुष्कळदा कामावर जाते व आई परत येईतो मूल घर असूनही वनवासी होते. घरात विसावा नाही. कुटुंबियांना अस्स स्वस्स मदत द्यावीच लागते, त्यांना त्याचे समाधान नाही व संकटप्रसंगी मदत

कल्याण-खात्याच्या सुसज्ज रुग्णालयात पोचले. येथे कोळसा मजुराला व त्याच्या कुटुंबाला विनामूल्य उपचार करण्यात येतात. कुटुंब ह्या शब्दाच्या व्याख्येत मजूर, त्याची बायको, अज्ञान मुलगा, अविवाहित मुलगी, वृद्ध आईबाप व विधवा बहीण ह्यांचा समावेश होतो. शनिचरच्या सर्व कुटुंबाला रुग्णालयात प्रवेश मिळून, विवाहित गुड्डो मात्र प्रवेशाला अपात्र ठरली. 'तिचा सासराही मालकटा आहे' ह्या शनिचरच्या युक्तिवादाची दखल कायदा घेऊ शकत नसल्याने दुखणेकरी गुड्डोकडे रुग्णालयाने पाठ फिरवली. तिचे भवितव्य तिच्या कपाळावर कोरताना सटवाईला काय सुचले असेल कोण जाणे!

(२) मायादेवी १९४२मध्ये राजकीय कैदी होत्या. सुटून आल्यावर त्यांनी प्रथम जिल्हा बोर्डात व नंतर पती श्री. रामदेव ह्यांच्यासह भारत सरकारच्या मजूर मंत्रालयात नोकरी केली. १९५५मध्ये मायादेवी निवृत्त झाल्या व त्यांना मिळालेल्या प्रॉव्हिडंट फंडातून रु. ३००० त्यांनी एका सहकाऱ्याच्या प्रेसमध्ये घातले.

१९६०मध्ये रु. १००० पेक्षा अधिक किंमतीची प्रॉपर्टी विकत घेण्याबद्दल रामदेवांना मजूर मंत्रालयाने विचारणा केली. ही इस्टेट पत्नीची स्वसंपादित आहे, हे त्यांचे म्हणणे विचारात न घेता त्यांच्याविरुद्ध चौकशी करण्यात आली व १९६६मध्ये 'तुमच्याविरुद्ध कारवाई करण्यात का येऊ नये?' अशी नोटीस येऊन पडली आहे. स्वातंत्र्यसंग्रामात भाग घेण्याइतक्या मायादेवी प्रबुद्ध होत्या पण सरकारच्या मते, रु. ३००० एखाद्या व्यवसायात गुंतवण्याइतकी स्वतंत्र बुद्धी त्यांना नव्हती!

नोकरीत व मजुरीत मेहनतीचे माप पूर्णपणे पदरात घातल्यावरही स्त्रीविरुद्ध होणारा पक्षपात सर्वसामान्य आहे. तिच्या मूलभूत गरजाही आपण कशा डावलतो हे ती काम करते त्या संस्थांमधून मुताऱ्याची सोय पाहिल्यास समजून येते. बहुसंख्य संस्थांमधून पुरुषांची ही सोय दिसते मात्र. स्त्रीला ते शक्य नसल्यामुळे तिची होणारी अवस्था आकलन होण्यास स्त्रीचा जन्मच घ्यावा लागेल.

पहिल्या गटामध्ये येणाऱ्या समस्यांचे हे धावते दर्शन. थोड्या प्रयत्नांनी ह्या समस्यांचे समाधान फारसे कठीण ठरू नये, पण त्याच्या पूर्ततेसाठी सखोल अभ्यास, भरीव संघटना, मौलिक विचार, व ओजस्वी मार्गदर्शन ह्यांची तिला आवश्यकता आहे. स्त्रीची खरी समस्या आहे वरील गोष्टी अस्तित्वात आणण्याची.

### अर्धवट उमजलेल्या जटिल समस्या

दुसऱ्या गटामधल्या समस्या जटिल, कुटिल व क्लिष्ट आहेत. स्त्रीला त्या पूर्णपणे दृग्गोचरही नाहीत. त्यांचा आकार व विस्तार तिला उमजेल तेव्हा त्यांच्या समाधानासाठी तिला शिवाचे रान करावे लागेल व त्या समस्या सोडवाव्या लागतील.

सनातनी अल्प अंश सोडला, इतर सर्व स्तरात आईच्या अभावी घरामध्ये एक पोकळी निर्माण झालेली आहे, ही पोकळी इतर कुठल्याही स्वरूपात भरल्याचे प्रयत्न अजून झालेले नाहीत. ही शून्यता नवीन पिढीच्या विकासाला घातक आहे.

मुलांचे मन अत्यंत कोमल, हळुवार व संवेदनाक्षम असते. त्यांच्या निर्दोष वाढीला सुरक्षित वातावरणाची, निरामयतेची, असीम विश्वासाची, अमर्याद क्षितिजांची गरज असते. पण त्यांच्या जीवनात निर्माण झालेल्या पोकळीत ह्या गुणांचा सर्वस्वी अभाव आहे. कोणीही यावे, ह्या दुबळ्या, आश्रयहीन, निराधार पोराला टोचावे, त्रास द्यावा, त्याला त्राता नाही. दाद मागण्याची वाचा नाही. मन सदा साशंक भयभीत, निराधार. ह्या परिस्थितीत त्याची कोवळी बुद्धी वठू लागते. जिज्ञासा, साहस, विचार, धैर्य, औदार्य ह्या बुद्धीच्या विविध गुणांचा ऱ्हास होऊन, उरतो फक्त स्वतःचा व स्वजातीचा बचाव करणारा आंधळा उपजत स्वभाव. विविध जीवजातींना, नित्याच्या घटनांमध्ये टिकाव कसा धरावा ह्याची निसर्गाने दिलेली संथा म्हणजे उपजत स्वभाव होय. एखाद्या विशिष्ट जीवजातीच्या आसमंतामध्ये अचानक परिवर्तन वा एखादे आकस्मिक संकट आल्यास, नित्य स्थितीलाच तोंड देऊ शकणारा उपजत स्वभाव उणा पडतो व जाती नष्ट होण्याचे भय उद्भवते. मानवी संस्कृती, तिची शास्त्रकलांमध्ये होणारी दैनंदिन प्रगती व त्यामुळे नित्यशः बदलणारे मानवी जीवन, ह्यांच्या ओघात उपजत बुद्धीवर अवलंबून राहाणारे समाज फार वेळ टिकून राहाणार नाहीत. प्रथम यांच्या रचनेत अवनतीची चिन्हे प्रकट होऊन क्रमशः ते समाज विनाशाच्या मार्गाने चालू लागतील.

आज ह्या अवनतीची चिन्हे तरुण पिढीवर दिसू लागली आहेत. गेल्या पंचवीस वर्षांत विस्तारत गेलेल्या पोकळीने घराचे घरपण नष्ट केले आहे. निर्व्याज स्नेहाचा, शांत, निश्चित, निरामयतेचा, सुखसंपूर्ण विकासाचा हा गड पडल्यावर मुले गजबजलेल्या गर्दीच्या रस्त्यावर भयानक जीवन जगत आहेत, 'बळी तो कान पिळी' हा नियम आत्मसात करीत आहेत, समाजविघातक मार्गाचा अवलंब एका नव्या मार्गदर्शनाच्या आधारे करीत आहेत. तेथे बुद्धिविकासाला, बुद्धिविलासाला स्थान उरलेले नाही. कधी निसर्गदत्त प्रतिभा टिकाव धरून राहिलीच तर ती समाजाला अपकारक होणाऱ्या धारणीतून वाहू लागते.

मूल मोठे झाल्यावर आई जागी होते. तिच्या त्याच्याविरुद्ध शेकडो तक्रारी सुरू होतात. मन एकाग्र होत नाही, अभ्यासात लक्ष नाही, मेहनत करीत नाही, कल्याणाचे सांगितले तरी ऐकत नाही, दुरुत्तरे करतो, कोणाबद्दल आदर नाही, कोणाचा धाक नाही, इत्यादी. तिच्यामागे चिंतांचे मुंगे लागतात, पण मुलापुढे तिचा निरुपाय असतो. मुले मोठी झाल्यावर समाजाला ती धक्के देऊ लागतात व आपल्याही त्यांच्याविरुद्ध अनेक तक्रारी निर्माण होतात. अविवेकीपणाच्या, विनाशकपणाच्या, बेपरवा वृत्तीच्या, अदूरदृष्टीच्या.... या सर्व गोष्टींचा तथ्यांश एकच आहे. आजची तरुण पिढी अस्वस्थ आहे, बावरलेली आहे, दिशाहीन आहे. तिची वागणूक विनाशक आत्मघाताची द्योतक आहे, या भयानक परिस्थितीकडे आपले लक्ष वेधण्याचा तिचा हा प्रयत्न आहे, या तिच्या भोवती निर्माण झालेल्या विपरीत वातावरणाच्या विरुद्ध हा विद्रोह

आहे, का माणूस म्हणून जगण्याचा त्या स्त्रीचा हा निकराचा प्रयत्न आहे, हे सांगणे कठीण आहे. पण आजची परिस्थिती पालटण्यासाठी आपण ही समस्या नीट अभ्यासणे आवश्यक आहे हे मात्र एक नितान्त सत्य आहे.

## दिशाहीन झालेला समाज

ह्या परिस्थितीमधून समाज पूर्वीही गेलेला आहे. व त्या अवधीचे परिणाम स्वागतार्ह घडण्याजोगे खचित नाहीत. भारताचा बहुजनसमाज कित्येक शतके अनिकेत, अहेतुक, निराधार जीवन जगत आला आहे. ग्रामपंचायती त्या काळी स्वायत्त होत्या, पण बहुजनसमाजाचे क्षेमकुशल त्याही वेळी वरिष्ठ वर्गांच्या दयेवर निर्भर असे. ह्या थरांतील मुलांना बौद्धिक शिक्षणाचे दरवाजे इंग्रजी अमदानीपर्यंत संपूर्णतः बंद होते. त्यानंतर, परंपरागत जडतेमुळे व दारिद्र्यामुळे, शालेय शिक्षणाचा लाभ त्यांच्यापैकी फार थोड्यांच्या पदरात पडला. स्वतंत्र भारताने त्यांना शिक्षणाचे दरवाजे उघडले, दारिद्र्यावर उपाय म्हणून प्राथमिक शिक्षण मोफत केले, जडतेवर उपाय म्हणून शिक्षण सक्तीचे झाले. त्याशिवाय मागास व अनुसूचित जातींच्या मुलांना विद्याभ्यासाला दरमहा आर्थिक मदत स्टायपेंड म्हणून मिळू लागली. ह्या सर्व व्यवस्थेचा लाभ त्यांना विशेष घेता आलेला नाही. कारण आपण त्यांची प्रतिभा खुडण्यात यश मिळवलेले आहे. ही वठलेली वनश्री पुन्हा बहरण्याला लागणारा अवधी आजच्या तीव्र संघर्षात मिळावा असे प्रयत्न करणे येवढेच आपल्या हाती उरले आहे.

ज्या जातींनी अध्ययन अध्यापन हे आपले इतिकर्तव्य मानले, त्या जातींमध्येही रूढीपरंपराचे प्राबल्य वाढत जाऊन, समाजरचनेच्या मूलतत्त्वांना आव्हान देणे अशक्य झाले. त्यांच्यात परिवर्तन करण्याचा प्रश्नच नव्हता. एकाच भगवद्गीतेतून अनेक अर्थ काढण्याची चढाओढ त्यामुळे सुरू झाली. भारतात डोळे दिपवणारे प्रतिभाशाली पुरुष त्यानंतर झाले पण परंपरेच्या बेड्या त्यालाही सर्वस्वी झुगारता आल्या नाहीत. भारत गेली अडीच हजार वर्षे प्रत्येक विदेशी आक्रमणासमोर हार खात आला आहे; तो ह्याच मौलिक विचाराच्या व तदनुगामी कृतीच्या अभावामुळे. आजच्या स्त्रीजीवनातही ह्या धारेरीच्या आंधळेपणाचा प्रत्यय विचित्रपणाने येतो. स्त्रीवर जेव्हा अचानक हल्ला होतो तेव्हा ती बहुशः किंकर्तव्यमूढ होऊन बसते. एका वर्षापूर्वी पाटण्याच्या चतुर्थ वर्षाचा एक तरुण आपल्या सोळा वर्षांच्या पुतणीला शाळेत पोचविण्यास जात होता. मार्गात प्रथम वर्षाच्या एका विद्यार्थ्याने मुलीची छेडी काढल्याने त्याची मान फाडकने धरली, म्हणून प्रथमवर्षीय विद्यार्थ्याने चाकू त्याच्या पोटात खुपसून खून केला. मोकळ्या रस्त्याचे मडे पडले. त्यांनी खुनी आणामाला पकडले नाहीच पण त्या मुलीनेही हालचाल केली नाही व खुनी निसटून गेला. प्रसंगावधान हा उपजत स्वभावाचा गुण नव्हेच!

भारताची जातिसंस्था पोकळाची बनलेली आहे असा एक सनद सर्वत्र दिसून

येतो. ते खरे असले तर आपला समाज गतिमानता हरवून शिलावत् झाला असला पाहिजे. आज ही परिवर्तने आपण घडवली आहेत, त्यांचे श्रेय आपला परकीयांशी आलेला संबंध व त्यांची उदार विचारसरणी ह्यांना द्यावे लागेल. स्वातंत्र्यानंतर पुन्हा एकदा जातिसंस्था दृढमूल होत आहे, परंपरांना उधाण येत आहे. इतिहासातून आपल्याला इष्ट असा अर्थ काढण्याचा प्रयत्न प्रत्येकजण करतो आहे. ह्या वेढ्यांमधून आपली मुले सोडविण्याची व पर्यायाने आपले स्वातंत्र्य अबाधित ठेवण्याची पण अगोचर अशी समस्या स्त्रीजीवनात उभी आहे.

## मुले पळविण्याचा भयंकर उद्योग

ह्या गटामधली आणखी एक समस्या आहे अल्पवयी मुलांच्या व्यक्ति (पर्सन) रक्षणाची. दुर्दैवाने स्त्रीला स्वतःलाही व्यक्तिसंरक्षणाची गरज आहे. तेव्हा ही समस्या दोन्ही पैलूंनी अभ्यासावी लागणार आहे. हरवलेल्या, नाहीशा झालेल्या मुलांबद्दल आपण वृत्तपत्रांमधून केव्हा केव्हा वाचतो. क्वचित एखाद्या छाप्यात पोलिसांना मुले सापडल्याची वार्ता येते. ह्या वृत्ताचा अन्वयार्थ न लागण्याइतके आपण घरील समस्येला अपरिचित आहोत; त्यामुळे मुले चोरीला जातात हे आपल्याला समजत नाही.

भिकारी संघटना व चोरांचे गट मुले पळवून किंवा उचलून नेतात. त्यांना अल्पवयी मुलांचा उपयोग असतो. एखाद्या अनाथालयाचे कुंकू लावून बँडबरोबर भीक मागत फिरणारी मुले गावोगाव वर्गणी गोळा करतात. ह्या वर्गणीचा मोठा हिस्सा — एका विशिष्ट प्रकरणी पासष्ट टक्के — अनाथालयाचा चालक व मालक घेत असतो. गोरीगोमटी व चुणचुणीत मुले वर्गणी जास्त मिळवू शकतात, म्हणून अनाथालयात अशा मुलांना स्थान असते. वेश्याव्यवसायात पुरुषांची अनैसर्गिक मागणी पुरविण्यासाठीही अल्पवयी मुलांना आपले असे एक स्वतंत्र स्थान आहे.

भारतामध्ये देवस्थाने व साधूंचे मठ भरपूर आहेत. तेथेही अल्पवयी मुलांना दीक्षा देण्यात येते. आईवडिलांनी वाहिलेल्या मुलांच्या जोडीला पळवून आणलेली मुलेही त्यांच्यात असतात असे अभ्यासकांचे मत आहे. चंगी-मंगी, विरक्ती न येताच सन्यास घेतलेल्या त्या ब्रह्मचाऱ्यांच्या हाताखाली ह्या मुलांचे जीवन कसे व्यतीत होत असेल कोणी सांगावे ?

केव्हातरी पूर्वेच्या आसाम-बंगालमध्ये, तर कधी पश्चिमेच्या गुजराथमध्ये एखाद्या टोळीकडून, पोलिस छापा घालून, दहा पाच मुले मिळवतात. त्या मुलांना आपले नाव गाव सांगता येत नाही. ती सदैव भयचकित वागतात. व्यक्तित्व व वैशिष्ट्य गमावलेली दोन पायांची मेंढरे हे त्याचे वर्णन योग्य होईल.

काही मुले घरून पळून आल्यावर कोणाच्या जाळ्यात सापडतात. कधी मादक पदार्थ चारून, बेशुद्ध मुले पोत्यात भरून मर वस्तीतून नेण्यात येतात. कधी कित्येक आठवडे मुलांना खाण्याची लालूच देऊन त्यांचा विश्वास संपादन करण्यात येतो.

केव्हातरी मुलांवर मोहिनीप्रयोग करण्यात येतात असेही कानी येते. पोलिसांच्या फायलीमध्ये ह्या विषयावर भरपूर माहिती असते. पण क्वचित वृत्तपत्रे देखील, एखादे प्रकरण आणणारे वर्तमान प्रसिद्ध करून जातात.

मागे कलकत्त्याच्या एका हॉटेलवर छापा घालून पोलिसांनी नऊ ते चौदा वयाची सात-आठ मुले सोडवून आणली. ही सर्व शिकणारी मुले होती. वाढण्याचे काम त्यांच्याकडे असे. ही मुले छळाच्या भीतीने मौन पाळून होती. एका चुणचुणीत पोराने योग्य गिऱ्हाईक हेरून त्याला घरचा पत्ता दिला. त्या गृहस्थाने माहिती नीट पोचवल्याने हॉटेलवर पोलिसांनी छापा घालून मुले सोडविली. तेव्हा 'हरवलेल्या' मुलांच्या अंगावर माराचे वळ व डाग दिल्याची चिन्हे होती.

पळवून नेण्यात येणाऱ्या मुलांची संख्या शेकडेवारीने काढता अगदी क्षुल्लक ठरते. पण एकही मूल हरवताच भयाची व सार्वत्रिकतेची एक प्रचंड लाट समाजात उसळते. संशयावरून अनेक निरपराध माणसांना बेदम मार बसतो. मुलाच्या भोवती दहशतीचे विषारी वातावरण तयार होते. त्या वातावरणात वाढणारी मुले भ्याड-भेकड अपरिहार्यतेने बनतात. वरील स्थिती बदलायची ही स्त्रीला आकलन न झालेली तिच्या जीवनामधली आणखी एक समस्या.

मुलांमध्ये निर्भय वृत्ती आणणारी आई स्वतः निर्भय व आत्मनिर्भर असावी लागते. पण तिच्या व्यक्तिसंरक्षणाचा प्रश्न बिकट असून तो अधिक बिकट होत असल्याने ती स्वतः भयभीत आहे. तिला आत्मनिर्भरता शिकण्याची जरुरी अजून प्रतीत झालेली नाही.

## मान व शील संरक्षणाचा प्रश्न गंभीर

व्यक्तिसंरक्षणाचा तिचा प्रश्न कदाचित औद्योगीकरणाच्या काळामधला असेल. पण 'मान व शील' संरक्षणाची पायमल्ली ही शतकानुशतके सोसीत आहे. पुरातन काळापासून स्त्रीला घरात मान नव्हता, बाहेर स्थान नव्हते. इंग्रजी अंमलानंतर ही स्थिती पालटू लागली. घरात ती मानाला पात्र समजली जाऊ लागली, पुरुषाच्या प्रोत्साहनाने बाहेरची कामे करू लागली. रूढ मार्ग सोडल्यामुळे खवळलेला समाज तिचा अपमान विविध प्रकारे करू लागला. सुसंस्कृत पुण्यात सावित्रीबाई फुलेंच्या अंगावर थुंकण्यात आले. आज भारताच्या सर्व भागात स्त्रियांच्या मागे हिंडणे, अश्लील गाणी गाणे, घाणेरडे बोलणे, हात धरण्याच्या धमक्या देणे हे व असले 'रोडसाईड रोमिओ' प्रकार सरसहा होत आहेत.

हिंदु समाजात, शीलरक्षण—पुरुषाच्या कामवासनेपासून स्वसंरक्षण—हा महत्त्वाचा उद्योग स्त्रीला पुरातन काळापासून असावा; कारण त्या वासनेला संयम शिकविण्याचे प्रयत्न हिंदु संस्कृतीने केलेले नाहीत. ब्रह्मचर्याचा, तारुण्याचा धडिवार करीत, वेश्याव्यवसाय हाच कुळधर्म असणाऱ्या कळवंत, नायक इत्यादी जाती हिंदु

धर्माने निर्माण केल्या, इतकेच नव्हे तर कुलवंतांच्या पोरी देवदासींच्या स्वरूपात मंदिरामधून पोचवल्या व देवद्वाराचाही कुंटणखाना बनवून टाकला. परस्त्रिया स्त्रियांवर देवादिकही पापी दृष्टी ठेवीत, असे आपली पुराणे सांगतात. कामसूत्रात कुलीन स्त्रीला वश करण्याचे अनेक मार्ग सांगितलेले आहेत. बहुपत्नीकत्व होतेच पण त्या स्त्रियांचे भरणपोषणही न करता चैन करण्याचा मार्ग बंगालच्या 'कुलीन' भूदेवांनी शोधून काढला. आजही धार्मिक म्हणवणाऱ्या पुरुषांनी, भावजय, सून, मेहुणी, बहीण वा कन्या, अशा निकटवर्ती स्त्रियांशी व्यभिचार केल्याचे क्वचित कानावर येते. लोणी विस्तवाची उपमा ह्या असंयमातून जन्म पावली असावी. शस्त्रधारणेचे अधिकार नसलेल्या शूद्रजातीमधल्या स्त्रियांची स्थिती जास्त असहाय होती. सत्ताधारी द्विजांनी काय केले असेल ह्याची झलक आजही विविध संस्थानांच्या इतिहासात नमूद आहे. ह्याचा अर्थ सर्व पुरुष वासनेने लिप्त, असंयमी होते वा आहेत असा नाही पण समाजाचे स्वास्थ्य नासायला पाच टक्केही घाण पुरते. हिंदू समाजात घाण ह्यापेक्षा अधिक होती व ती घाण ह्या सदरात जमा न होता जीवनाचे अभिन्न अंग मानली जात होती.

स्त्रीच्या संरक्षणाचा प्रश्न आज जास्त गंभीर होतो आहे. कारण औद्योगीकरणाच्या युगात जुने संकेत पायदळी जात असून वरिष्ठ जातींचेच नव्हे तर सर्व जातींचे पुरुष आपल्या पुरुषार्थाचे प्रदर्शन करण्यास सजलेले आहेत. पेट्रोलच्या तीव्रगति वाहनामुळे चढत्या गुंडगिरीला आळा घालण्याचे सामर्थ्य एकाही नागरिकाला उरलेले नाही. त्यामुळे अनवस्थाप्रसंग उद्भवतो आहे. स्त्री ही आज स्वतंत्र नागरिक असल्याने तिचे संरक्षण ही राष्ट्रीय जबाबदारी आहे येवढाच एक आशेचा किरण.

दिल्लीच्या राजधानीत देखील दोन दिवसात दोन तरुण स्त्रिया नवऱ्याच्या शेजारून उचलून नेऊन बलात्कार करून रस्त्याच्या कडेला फेकल्या जातात (१९६६). दोन्ही प्रसंगी पेट्रोलची वाहने वापरण्यात येतात व त्या वाहनांचे क्रमांक टिपण्याची संधी नवऱ्यांना मिळाली हे भाग्य समजण्याचा प्रसंग येतो.

## स्त्रियांच्या व्यापाराची भयानक कहाणी

स्त्रियांवर होणाऱ्या बलात्कारापेक्षाही त्यांच्या व्यापाराची कहाणी भयानक आहे. १९४१ साली पुण्यास उघडकीस आलेल्या मिरगी अड्ड्यात जबरीने आणून, त्यांच्यावर केलेल्या व्यापाराची करुण कहाणी आपण ऐकलेली आहे. स्वतंत्र भारतातील एका राज्याचा गुप्त (कॉन्फिडेन्शल) रिपोर्ट लेखिकेला पाहावयास मिळाला होता. स्त्रियांना फसवून आणल्याची व त्यांचा अमानुष छळ केल्याची उदाहरणे त्यात होती व समजदार कुटुंबानीही सुटका करून आणलेल्या स्त्रीला तात्पुरता आश्रयही नाकारल्याचे एक कटु करुण उदाहरण त्यात होते. वरील सर्व कहाण्यांचा निष्कर्ष असा निघतो की सदैव घराच्या आडोशाला राहिलेल्या निरागस—वा मूर्ख अज्ञान!— स्त्रीला माणसाची पारख नसते. प्रसंग जिकण्याइतके अवधान नसते व संधी सापडली तरी सुटका

करून घेण्याची युक्ती तिला सुचत नाही. तिच्या किंकर्तव्यमूढतेचा उल्लेख ह्या लेखात पूर्वीही आलेला आहेच.

ह्या व्यापाराचे धागेधोरे आज सर्वत्र व सर्वदूर पसरत आहेत. पूर्वी त्यांचे लक्ष्य व भक्ष्य अशिक्षित अडाणी स्त्रिया असत, त्यांच्या सुटकेचे प्रयत्न करण्याची ऐपत व कुवत त्यांच्या नातलगांना क्वचितच असे. ह्या धंद्यामधल्या दलालांचे धैर्य आज वाढले आहे. त्यांचे चोखंदळ गिऱ्हाईक सुसंस्कृत, कुलीन व शक्य तर कुमारी स्त्रीची मागणी करीत असून अस्सल 'माला'साठी अमाप पैसा मोजायला तयार आहे. अनैतिक मार्गांनी व्यापारात-उद्योगात मरमसाट पैसा मिळवलेल्या नवधनिकांची पुढची पिढी पुष्कळदा अशिक्षित असंस्कृत आहे. त्याच्या पैशाच्या जोरावर त्यांना सर्वत्र प्रवेश मिळतो व त्यांना चांगल्या स्त्रियांची भूक लागते. अफाट मोबदल्याचा लोभाने दलालांची नजर ह्या स्त्रीकडे वळल्यावर, मानव म्हणून जगण्याच्या प्रयत्न करणाऱ्या स्त्रीला 'कायदा व सुव्यवस्था' ही पंढ असल्याचे व निराशा देणारे अनुभव येतात. त्याचे स्वतःच्या माहितीमधले एक उदाहरण पुढे देत आहे.

## सुशिक्षित स्त्री सदैव धोक्यात

नीरा व हिरा ह्या भारतीय सेनादलाच्या लेफ्टनंट (वय २२ व २३) बसमधून रात्री नऊला उतरल्या. व रिक्षा करून चार मैलांवरच्या कॅन्टोन्मेन्टकडे निघाल्या. 'फार दूर आहे, रस्त्यात अंधार आहे' ह्या रिक्षावाल्याच्या कुरकुरीकडे त्यांनी दुर्लक्षच केले. अर्धे अंतर गेल्यावर मार्गदीप मागे पडले. तेव्हा रिक्षावाला खाली उतरला व पुढे जाण्याचे पुनश्च नाकारू लागला. त्याचे बोलणे चालू असता समोरून आलेला एक सायकलवाला खाली उतरून मुलींना म्हणाला,

'बहन, आप लोग घर कभी नही पहुचेंगी, यहींसे वापस लौट जाव.'

नीरा-हिरा सावध झाल्या. उजव्या बाजूने एक कच्चा रस्ता येऊन मिळत होता तेथे गिऱ्हाईक नसलेल्या, रॉकेलच्या चिमण्यांचा भकभक धूर ओकणाऱ्या पानविड्यांच्या ठेल्यांभोवती मवाली दिसणारे बरेच लोक त्यांना दिसले.

नीराने रिक्षा परत फिरवून घेतली व त्या आल्या मार्गाने मागे वळल्या. त्यांच्या रिक्षाच्या मागेपुढे आठ माणसे सायकलवर डबलसीट किंवा एकेकटी असल्याचे नीराने पाहिले. मुलींच्या मनाला भयंकर भय वाटत होते, कारण दुतर्फा असलेल्या शिक्षणसंस्था रात्री बंद म्हणून रस्ता निर्जन होता. थोड्या वेळानंतर दोन गुंड रिक्षाजवळ आले व 'कुठे जाणार ? पोचवून देऊ का ?' अशा विचारणा करू लागले. त्या मुली काय करणार याचा अंदाज त्यांना येत नसावा व आपल्या प्रभावाखालीच गुंड सुचवल्यात पडण्याचाही मुलींना उपयोग झाला असावा. दीड मैल अंतर कापल्यावर स्थानिक सिव्हिल हॉस्पिटलचे गेट त्यांना लागले. नीराने रिक्षा आत घेतली, तेव्हा चार माणसे पुढे निघून गेली, दोन फाटकाशी उभी राहिली व दोन मात्र त्यांच्या

रिक्षाबरोबर आत गेली व ती माणसे, मुली वार्डात शिरल्यावर बाहेर दाराशी उभी राहिली. मुलींनी आपल्या अधिकाऱ्यांना फोन करून वाहन मागवले. वाहन आल्यावर वॉर्डाच्या दरवाजावरचे गुंड निघून गेले; बाहेरचे गुंडही तोपर्यंत निघून गेले असावेत.

हे प्रकरण धसास लावण्याच्या हेतूने लेखिकेने काही कालहरण करून, मिलिटरी हॉस्पिटलच्या कमांडिंग ऑफिसरची व नंतर त्यांच्यासमवेत संबंधित जिल्हाधिकाऱ्याची भेट घेतली. नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे 'अशा तक्रारी आमच्याकडे कधी आलेल्या नाहीत, आजवर असे कधी झाले नाही' इत्यादी उत्तरे लेखिकेला ऐकवण्यात आली. कमांडिंग ऑफिसर व त्यांच्या पत्नींनी लेखिकेच्या म्हणण्याला आपल्या अनुभवाचा दुजोरा दिल्यावर जिल्हाधीशाचा पवित्रा बदलला. 'आधी तक्रार करायला हवी होती. गुंड पकडून खटला भरला असता.'

चारदोन गुंडांना रागेमधून, दोन पोरींनी हात धरून बाहेर काढल्यावर त्याचे परिणाम त्यांना किती भोगावे लागतील हेही त्या अधिकाऱ्याला समजावून सांगण्याचे काम लेखिकेवरच पडले. त्या भेटीत, कमांडिंग ऑफिसरला गुंडांच्या सवटना, निम्न श्रेणी (लोअर स्टाफ)चा त्याना असणारा पाठिंबा व आपले विफल होणारे प्रयत्न, ह्यांची सविस्तर माहिती दुसऱ्या एका संदर्भात जिल्हाधिकाऱ्याने दिली हे नमूद करणे योग्य ठरेल.

राज्याच्या चीफ सेक्रेटरींची ह्याच प्रकरणी भेट घेऊन लेखिकेने त्यांच्याशी चर्चा केली. तेव्हा 'मुलींनी बाहेर जाण्यापूर्वी पुरेशी नोटीस दिल्यास त्यांच्या संरक्षणार्थ पोलिस कॉन्स्टेबल पाठवू' असा दिलासा त्यांनी दिला. 'देशाच्या सरक्षणासाठी, उत्तरेमधली भमाप खाजगी प्रॅक्टिस सोडून शॉर्ट सर्व्हिस कमिशन घेणाऱ्या तरुणींच्या सरक्षणासाठी पोलिस शिपाई ही कल्पनाही हास्यास्पद म्हणून लेखिकेने अमान्य केली. चर्चेच्या अखेर चीफ सेक्रेटरी म्हणाले, 'आम्ही शक्य त्या सर्व उपाययोजना करू, पण ह्या मुली माझ्या भगिनी वा कन्या असत्या तर विन्हीसाडांनंतर (डस्क) मी त्यांना एकट्या हिंडू दिल्या नसत्या.'

लेखिकेच्या विनंतीवरून 'एकट्या' शब्दाची व्याख्या त्यांनी 'बरोबर बंधु अधिकारी असल्याशिवाय' अशी केली. नीरा-हिराला व्यक्तिशः विशेष सवलत देण्यात आली. स्थानिक पोलिस सुपरिंटेंडंटला मदत देण्याचे लेखी हुकूम असून जरूर वाटेल तेव्हा पोलिसामार्फत त्या टॅक्सी मागवू शकतात. आज दोन वर्षांनंतरही नीरा व हिरा एकट्याने सायंकाळी शहरात जाऊ शकत नाहीत.

आज सैनिक स्त्रिया देशाच्या सीमेवरच नव्हे तर वांगोसारख्या अराजकग्रस्त प्रदेशातही जात आहेत. ही धैर्यसंपन्न स्त्री देशाच्या आत सुरक्षित नसावी ह्याचा अन्वयार्थ कसा लावायचा? व हे दूषणे कुठल्या वेशीवर टांगायचे?

सेनादलामधल्या स्त्रियांची ही स्थिती, बाहेरच्या स्त्रियांची स्थिती जास्त वाईट असणे स्वाभाविक आहे. दिवसाढवळ्या भर गर्दीतून मुली ओढून नेण्याचे प्रकार अलीकडे घडू लागले आहेत. मुलींना शाळा-कॉलेजासाठी, बाजारहाटासाठी पायी वा

यम-रिक्षाने घराबाहेर हिंडावे लागते. एखाद्या पोरीच्या दोन्ही बाजूंना दोन गुंडांनी उभे रहावे, ती आपली नात्याने बहीण, मामी, पत्नी असून पळून जात आहे किंवा वेडी आहे असा दावा करावा व तिला जबरीने घेऊन जावे, मध्ये कोणी पडू लागल्यास दम व दाम यांचा उपयोग करावा अशी उदाहरणे वारंवार कानी येत आहेत. ह्या स्त्रियांनी मदतीसाठी केलेला धावा कानावर पोचून सहाय्य आले तर ते बहुशः अशिक्षित कामकरी पुरुषाचे असते, हे उल्लेखनीय आहे.

असे काही भयानक प्रसंग कानी आले म्हणजे आपण 'स्त्री'चाच काही दोष असेल असे मानतो. किंवा तिची उधळ वा प्रच्छन्न संमति गृहीत धरतो. गेल्या महिन्यात धनबाद येथे पंधरा वर्षांच्या एका बालिकेला वडिलांचा (खोटा) निरोप सांगून मॅट्रिकच्या वाऱ्या करीत असलेले दोन तरुण रिक्षात घालून निघाले. तिच्या शाळेचे गेट मागे पडल्यावरही मोकळ्याच्या मदतीव ओरडा करण्याचे तिला जमले वा सुचले नाही. ती रडत व परत नेण्यासाठी विनवीत राहिली. सुदैवाने ती युनिफॉर्ममध्ये असल्याने समोरून येणाऱ्या दोन विद्यार्थिनींचे लक्ष तिच्याकडे वेधून त्यांनी मुख्याध्यापिकेला रिपोर्ट दिला. पुढे तिच्यावर बलात्कार करण्याचे प्रयत्न, अचानक आलेल्या मदतीने फसून मुलीची सुखरूप सुटका झाली. गुन्हेगार पकडले गेले, पण तिची संमति नव्हती हे तिच्या सहाध्यायिनींच्या प्रसंगावधानामुळेच सिद्ध होऊ शकले. वस्तुस्थिती न समजून आपण मुलींच्या रहाणीवागणुकीवर वाभरे झार्डात राहातो. ऑल इंडिया विमेन्स कॉन्फरन्ससारख्या संघटनेने मुलींच्या उचाल येगाला अशा घटनांबाबत जबाबदार धरून कडक टीका केली. ती टीका किती बेजबाबदारपणाची व अन्यायाची आहे, हे पहाण्याची तसदी इतर स्त्रियांनी घेतली नाही.

सत्य असे आहे की, काळचावलेले धनिक व त्याचे दलाल ह्यांच्यामुळे लज्जारक्षणासाठी आज स्त्रीच्या अंगावर लक्ष्मणरेषा उरली नाहीत. खाली मान घालून शाळेत जाणारी लज्जावती, आत्मविश्वासाने पावले टाकणारी गर्वोद्धता, विद्या व कर्तृत्वाने समाजाला भूषणभूत झालेली गंभीर प्रौढा, कुठलीही स्त्री धनिकाचे मन चाळवू शकते. त्याची नजर ओळखून, त्याची वासना पुरविण्यासाठी दलाल सिद्धच असतात. ती स्त्री त्याला न गवसली तरी तिच्या प्राप्तीसाठी प्रयत्न केले जातातच व तिला गुंडाचा उपसर्गही पोचतो.

## कायदे निकामी, स्त्रीला अन्याय करणारे

ह्या भयानक घटनामध्ये सापडलेल्या स्त्रीला मदत करणारे कायदे तिला अन्याय करणारे आहेत. धनबादच्या बालिकेवर अत्याचार करणारे सापडले असूनही केस करावयास तिचे पालक राजी झाले नाहीत. कारण 'कोर्टात तिच्या अब्रूचे धिंडवडे निघतील व नंतर तिचे लग्न होणे कठीण जाईल.'

कायदे अन्यायकारक तर वृत्तपत्रे मासिके दुर्लक्ष करणारी. अविवाहित स्त्रीच्या

जीवनात येणारे वैफल्य रंगवण्याच्या भरात, विवाहित स्त्रियांचा सौदा करणारे पति त्यांना दिसत नाहीत. गृहिणी व नागरिक ह्या नात्यांमध्ये निर्माण झालेला तीव्र भयानक संघर्ष त्यांना आकलन झालेला नाही. त्यामुळे लोणची कशी घालावं, स्वेटर कसा विणाल, सुंदर कशा दिसाल, हे त्यांच्या लेखनाचे विषय झालेले आहेत. रेडिओही ह्याच सदरात पडतो आहे.

ह्या विषयाला तोंड एका जागतिक संघटनेने फोडले. न्यूयॉर्क येथील एका कन्व्हेन्शनवर सही केल्यामुळे,१९५६ मध्ये भारताने Suppression of Immoral Traffic in Woman and Girls 'स्त्रिया व मुली यांच्या अनैतिक व्यापाराला आळा' हा कायदा पास केला. त्या कायद्यान्वये कलकत्ता, दिल्ली, मुंबई इत्यादी ठिकाणी कुंटणखान्यावर पोलिसांनी छापे घालून खटले दाखल केले. ह्या घटनेचा निषेध अत्यंत सात्त्विक व सत्त्वशील व्यक्तींनीही केला. त्यानंतर अलाहाबादच्या वेश्यांनी संविधानाकडे बोट दाखवून ह्या कायद्याविरुद्ध हायकोर्टाचे इन्जंक्शनही मिळविले. आता हा कायदा मग्न पडला आहे. शांत सभ्य वस्तीत चालणारे अगाव कुंटणखाने निर्वेधपणे आता आपल्या व्यवसायात दंग झाले आहेत, स्त्री सत्यानाशाच्या मार्गावर अविरोध ढकलली जाते आहे व तिला ह्या गोष्टीचे भान राहिलेले नाही.

ह्या उद्वेगजनक व विनाशकारी बनावाच्या काही रंजक पैलूंचा नामनिर्देश येथे करणे योग्य ठरेल. स्वेच्छेने परपुरुषरत होणाऱ्या स्त्रीचा आपल्याला सात्त्विक संताप येतो. आपल्याला तिची घृणा वाटते. पण तिने निवडलेला पुरुष सत्ता वा संपत्तिसंपन्न असला तर समाज तिचे काही वाकडे करू शकत नाही. तिला आवश्यक वाटणाऱ्या सर्व सुखसोयी उपलब्ध होतात. इतकेच नव्हे, तर तिला सर्व घरांचे दरवाजे उघडे असतात. तिच्या पाठीमागे समाज तिची निंदा करतो, पण तोंडावर स्तुतिसुमने वहातो. कालांतराने इतरेजनही तिची मर्जी संपादन करून, स्वार्थ साधण्याची धडपड करू लागतात.

स्वैरिणी स्त्रीच्या संपर्कामुळे, 'स्त्रीपुरुष संबंध लैंगिकच असतात' असे गृहीत धरणाऱ्या समाजात सभ्य पुरुषांना भय निर्माण होते व त्यांना आपल्या अब्रूला जपावे लागते.

स्त्री ही माणूस नसून निव्वळ मादी आहे, हे गृहीतकृत्य समजणाऱ्या समाजाला, कामेच्छा जीवनाचा एक छोटा भाग मात्र व्यापते, तहान भूक ह्यांच्याप्रमाणेच तिचेही समाधान होते हे न समजून अनेक हास्यास्पद, कधी घृणास्पद तर कधी विनाशक घटना घडत राहातात. ह्या गृहीतकृत्याचे विनाशक स्वरूप एखादे युद्ध किंवा अंतर्गत यादवी अशा होळ्या पेटल्या म्हणजे आपल्याला समजून येईल; पण आपली चूक सुधारण्याची संधी त्यानंतर आपल्याला मिळेल का ? —हे कोणी सांगावे ?

दुसऱ्या गटात येणाऱ्यांपैकी काही समस्यांचे ओझरते दर्शन घडवण्याचा वर प्रयत्न केलेला आहे. तेवढ्यावरूनही त्यांची गंभीरता विशद होऊन आपले लक्ष वेधून घेण्यात त्या यशस्वी व्हाव्यात इतक्या त्या भयानक आहेत. वस्तुतः ह्या समस्या

# १९

# स्त्रीजीवनाची चित्रे

श्रीपाद शंकर नवरे

श्री. श्रीपाद शंकर नवरे, बी. ए. (जन्म १९००) ज्येष्ठ मराठी पत्रकार. वर्तमानपत्रांत विपुल लेखन. माटुंगा येथील श्रद्धानंद महिलाश्रमाचे कार्य त्याच्या संस्थापनेपासून चाळीस वर्षांवर अनन्यसाधारण निष्ठेने चालवीत आहेत. मुंबई मराठी साहित्य संघ, महाराष्ट्र साहित्य परिषद, मराठी साहित्य महामंडळ, संयुक्त महाराष्ट्र परिषद, वगैरे संस्थांतील पूर्वीचे पदाधिकारी. (रामदास भुवन, शिवाजीपार्क रोड नं. १, मुंबई २८)

## स्त्रीजीवनाचा जिवंत बोलपट

माटुंगा येथील श्रद्धानंद महिलाश्रमाचा कारभार कार्यवाह या नात्याने गेली चाळीस वर्षे पहात असताना स्त्रीजीवनाचा एक दीर्घ चित्रपट मला अगदी जवळून पाहायला मिळाला. या चित्रपटाला बोलपट म्हणणे अधिक युक्त होईल. कारण डोळ्यांपुढून गेलेली सारी चित्रे जिवंत—चालती बोलती—होती. ती देखील दुरून चालणारी आणि बोलणारी नव्हेत, तर प्रत्यक्ष माझ्याशी बोलणारी, माझ्या प्रश्नांना उत्तरे देणारी, माझ्या समोरून जाणारी-येणारी, माझ्या देखरेखीखाली जीवन कंठणारी, आयुष्याचा पुढील मार्ग आशेने आणि उत्सुकतेने शोधणारी!

## दोन पिढ्यांतील उलथापालथी

चाळीस वर्षांचा काळ लहानसहान नव्हे. चांगला दोन पिढ्यांचा. त्यातून हा काळ राजकीय, सामाजिक आणि आर्थिक दृष्ट्या इतिहासातील एवढ्याच कोणत्याही अवधीपेक्षा कितीतरी अधिक वेगवान! जगाच्या कोणत्याही भागात या काळात जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात जेवढ्या प्रचंड उलथापालथी झाल्या तेवढ्या पूर्वी होण्याला याच्या किती तरी पटींनी अधिक काळ लागलेला आहे. आमच्या स्त्रीजीवनामध्येही गेल्या चाळीस वर्षांत अशीच उलथापालथ तीव्र गतीने झालेली आहे!

सामाजिक सुधारणेला कायद्याचा आधार घ्यावा की नाही, हा वाद गेल्या शतकाच्या अखेरीस आणि चालू शतकाच्या प्रारंभी सुरू झाला. समाजाची तयारी नसताना

त्याचेवर कायद्याने कोणतीही सुधारणा लादणे गैर आहे, ती अपेक्षेप्रमाणे फलद्रूप होत नाही, हा आक्षेपाचा एक भाग. दुसरा भाग असा की जेथे लोकमनाचा पुरेसा प्रभाव पडू शकत नाही त्या परक्या सरकारच्या कायदेमंडळाच्या हाती समाजसुधारणेचे हे कोलीत देणे परिणामी घातक ठरणारे आहे. राजकीय सुधारणा होत गेली, म्हणजे आपल्या देशाचा कारभार आपल्या लोकप्रतिनिधींच्या हाती आला, की समाजसुधारणेचा रस्ता मोकळा झाल्यासारखे होईल.

## समाजसुधारणेला अनुकूल परिस्थिती

गेल्या चाळीस वर्षांच्या काळात परिस्थितीतील हा द्रष्ट फरक घडून आला. दोन जागतिक महायुद्धांनी त्याला फार मोठा हातभार लावला. स्वातंत्र्यासाठी चाललेल्या आमच्या प्रयत्नांचा वेग वाढला. या प्रयत्नांना जास्तीत जास्त जनतेचा पाठिंबा मिळावा म्हणून धर्माने किंवा रूढीने घट्ट केलेले निर्बंध शिथिल करण्याचे उद्योग पुढाऱ्यांनी आरंभिले. ज्यांना ज्या सुधारणा आवश्यक वाटल्या त्यांनी प्रतिकूल लोकमताची पर्वा न करता किंवा कायद्याच्या पाठिंब्याची वाट न पहाता स्वतःच्या व्यवहारांवर त्या सुधारणा घडवून आणण्याचे कंकण बांधले. त्यामुळे सामाजिक सुधारणेसाठी अवश्य असलेली जनतेची भूमिका तयार होत चालली. दुसऱ्या बाजूला स्वराज्याच्या राजकीय चळवळीमुळे परकीय राज्याखाल कारभारात लोकप्रतिनिधींच्या हक्कांची आणि अधिकारांची कमान हळूहळू वाढत चालली आणि १९४७ सालामध्ये तर संपूर्ण स्वातंत्र्यच पदरात पडले! सारांश, आंतरराष्ट्रीय आणि अंतस्थ परिस्थितीमुळे आमचे सामाजिक चित्र झपाट्याने बदलत गेले. त्याचे प्रतिबिंब महिलाश्रमासारख्या संस्थांतून उमटल्यावाचून कसे राहील!

## जुन्या समस्या सुटत चालल्या, नवीन पुढे येत चालल्या!

जातीचा किंवा धर्माचा विचार न करता निराश्रित आणि अनाथ महिलेला आश्रयासारखे साहाय्य करणे या कल्पनेतून महिलाश्रमाचा जन्म झाला. 'निराश्रिता' आणि 'अनाथ' या शब्दांच्या प्रारंभीच्या अंधुक आणि अस्पष्ट कल्पना पुढे अनुभवाने स्पष्ट होत गेल्या. साहाय्य या शब्दाची व्याप्ती वाढवावी लागली. मुलांवाचून केवळ महिलेचा विचार करता येत नाही, याचा साक्षात्कार होत चालला. स्त्री 'निराश्रित' होण्याच्या विविध कारणांचा हळूहळू शोध लागून ती कारणे नाहीशी करण्यासाठी सार्वजनिक संस्थांची उपयुक्तता वाटू लागली. परिस्थितीबरोबर स्त्रीजीवनातील समस्याही झपाट्याने पालटत चालल्या असून त्या सोडविण्याकडे विचारवंत पुरुषांनी लक्ष देण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. जुन्या समस्या सुटत चालल्या नाहीत तोच नवीन नवीन समस्या अचानकपणे पुढे येऊन पूर्वीचा गोंधळ बरा होता, असे म्हणण्याची पाळी क्रियेकांवर आली आहे!

स्त्री-शिक्षण, प्रौढविवाह, विधवाविवाह, सार्वजनिक क्षेत्रात स्त्री-पुरुष समानता, ९० सुधारणा समाजाने आता पचनी पाडलेल्या आहेत. एकपत्नीत्वाचे बंधन कायद्यानेच घातलेले आहे. त्याच्या जोडीला घटस्फोटाची आता मुभा मिळालेली असल्यामुळे दांपत्यातील वितुष्टातून मार्ग काढणे शक्य झाले आहे. या तरतुदीमुळे उठल्या सुटल्या घटस्फोटाचे स्फोट होऊन कुटुंबसंस्था उद्ध्वस्त होते की काय या भीतीला अद्यापि तरी आधार मिळालेला नाही. तसे होऊ नये म्हणून कायद्यामध्ये आवश्यक त्या तरतुदी करण्यात आलेल्या आहेत. पण घटस्फोटाचा दरवाजा अजिबात बंद होता तेव्हा काही जातींतील स्त्रियांचा मोठा कोंडमारा होत असे, ही गोष्ट अनुभवाने सिद्ध आहे. अनाथाश्रमात सनाथांचीच, म्हणजे सुवासिनींचीच, गर्दी विशेष असते हे आमच्या लक्षात अगदी पहिल्या वर्षीच आले! आणि वर्षामागून वर्षे लोटली तरी त्या अनुभवात फरक पडलेला नाही! 'बाई, तू पाहिजे तेवढे शीक. आम्ही तुझ्या शिक्षणाची सगळी व्यवस्था करतो. शिकल्यावर तुला नोकरी करता येईल व तू स्वावलंबी होशील' हा उपदेश ऐकून घेण्याच्या अवस्थेमध्ये फारच थोड्या स्त्रिया आढळल्या! 'आम्ही इथे शिकण्याकरिता आलो नाही. आमचे लग्न करून द्या. आम्हाला मुलाबाळांचा संसार करायचा आहे' असे ठणठावून सांगणाऱ्या विवाहित पण परित्यक्ता बायकाच फार! वय विशी-पंचविशीमधले असल्यामुळे त्यांना दोष देता येत नाही. अशा परिस्थितीत पुरुषांना आपली 'भूक' शमविण्याचे मार्ग जसे मोकळे असतात तसे स्त्रियांना नसतात. कायद्याप्रमाणे दुसरे लग्न करण्याची किंवा पहिल्या लग्नाचा विच्छेद मिळविण्याची स्त्रीला मुभा नव्हती. तेव्हा झिजून झिजून आमच्यासमोर अशा स्त्रिया मेल्याची उदाहरणे आहेत. विधवाविवाहाच्या कायद्यानंतर बरोबर शंभर वर्षांनी पास झालेल्या विवाह-विच्छेदाच्या कायद्याने परित्यक्ता स्त्रियांना आशेचा थोडातरी प्रकाश दाखविला आहे!

## स्त्री शिकली; आता नोकरी!

'स्त्रियांना शिकून काय नोकरी करायची आहे थोडीच!' अशा एक ठेवणीतला आक्षेप साठसत्तर वर्षांपूर्वी स्त्री-शिक्षणाविरुद्ध सनातनी लोकांकडून घेण्यात येई. पण आज स्त्रियांना नोकरीसाठी जास्तीत जास्त शिकण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. लग्नासाठी देखील शिकलेली किंवा नोकरी करणारी मुलगी लागते! म्हणजे पुरुषाप्रमाणे स्त्रियांना शिक्षणाचे जास्तीत जास्त मार्ग उपलब्ध करून देण्याची पहिली अडचण, आणि शिक्षणानंतर तिला कोठेतरी नोकरी शोधून देण्याची जबाबदारी आली, ही दुसरी अडचण! नोकऱ्यांच्या बाबतीत स्त्री पुरुषाशी स्पर्धा करू लागली. म्हणून पुरुषांच्या बेकारीत स्त्रियांच्या बेकारीची भर!

## एकटी स्त्री समाजात असुरक्षित

नोकरीच्या या आवश्यकतेमधून आणखी एक समस्या निर्माण झाली आहे.

पुरुष नोकरीसाठी वाटेल त्या गावी, वाटेल त्या ठिकाणी, जाऊ शकतो. पण स्त्री जाऊ शकत नाही. तिला कोणाचा तरी आधार किंवा संरक्षण लागते. एकटी राहील तर तिच्याकडे अहोरात्र भीती! सगळ्यांचेच डोळे तिच्याकडे! शिक्षिका, आरोग्यसेविका, परिचारिका, कुटुंबनियोजन-प्रचारिका, असे कितीतरी मार्ग आज थोडे शिकलेल्या केवळ स्त्रियांसाठी खुले झालेले आहेत. नोकरीपूर्वी केवळ शिक्षणासाठी देखील स्त्रियांना आपले घर आणि कुटुंब सोडून दुसरीकडे रहाण्याची पाळी येते. सर्वत्र ठिकाणी जवळचे नातेवाईक नसतात आणि क्वचित असले तरी जागेच्या सार्वत्रिक टंचाईमुळे आपल्या आधीच भरगच्च कुटुंबात आपली एका प्रौढ मुलीची सोय करणे त्यांना अडचणीचे वाटते. शिकणाऱ्या किंवा नोकरी करणाऱ्या स्त्रियांसाठी सुरक्षित जागा म्हणून हल्ली शहरातून वसतिगृहे निघू लागलेली आहेत. पण गरजेच्या मानाने त्यांची संख्या फारच तोकडी आहे. धंदा म्हणून खाजगी रीतीने ही गरज भागवू इच्छिणारे लोक '*गरजवंताला अक्कल नसते' या म्हणीचा पदोपदी प्रत्यय आणून देण्याकरिता की काय, मागणी-*पुरवठ्याच्या चक्रातील बाजार उघडउघड मांडतात. सर्वांना ही पिळवणूक परवडण्यासारखी नसते. पण या बाबतीत शहरापेक्षा खेड्यात सर्वच आकाश फाटल्यासारखे वाटते. शहरापेक्षा खेड्यात राहाण्याची जागा सुलभतेने मिळण्याची अधिक शक्यता. पण गावगुंडांपासून किंवा समाजकंटकांपासून आत्मसंरक्षणाच्या साधनांची तेथे अधिक दुर्मिळता! त्यांच्याकडे वाद मागायचे तेच गावगुंडांपैकी कोणीतरी! आणि कोणी रक्षणाला आलेच तर त्याचा जीव धोक्यात! परिचारिकेची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर काही महिने कोठेतरी खेड्यात राहून काम करण्याची सक्ती असते. अशा बहुतेक मुली अविवाहित असतात. खेड्यात एकटे राहणे-वावरणे त्यांना भीतिदायक वाटते. गुंडांच्या दडपणाला अनिच्छेने बळी पडून अनाथाश्रमांचा उंबरठा चढावा लागल्याची उदाहरणे आमच्या डोळ्यांपुढे आहेत. मग नात्यांचा दुरावा, नोकरीची पंचाईत, विवाहाची पंचाईत!

## स्त्रियांसाठी वसतिगृहे

स्त्रीने नोकरी करणे गरजेच्या अपरिहार्यतेमुळे समाजात आता इतके रूळले आहे की त्याबद्दल आक्षेप घेण्यास जागा उरली नाही. नोकरदार अविवाहित स्त्रीच्या अडचणींची कथा वर सांगितली. अशा स्त्रियांसाठी जबाबदार चालकांकडून शक्य तितक्या कमी खर्चात निवासीय निर्वाह वसतिगृहे पाहिजे आहेत. स्त्री विवाहित असेल तर आपली निराळ्याच अडचणींना तोंड द्यावे लागते. पहिली अडचण रहाण्याच्या जागेची. नोकरीच्या ठिकाणापासून राहाण्याचे ठिकाण दूर असेल तर वेळेवर वाहन मिळण्याची अडचण, जाण्यायेण्यात केलेला व्यर्थ वेळ, जागा मिळविण्यासाठी प्रारंभीच भरावा लागणारा भुर्दंड, हे कर्ज फेडण्यासाठी दरमहा मिळकतीपैकी द्यावा लागणारा अंश, रहाण्याची जागा शेजारी असेल तर दैनंदिन हरएक अडचणी, दारा लोकांच्या

राज्यामुळे रात्रंदिवस भीतीचे वातावरण आणि मुलाबाळांकडे दुर्लक्ष ! नवरा आणि बायको दोघेही नोकरीदार असल्यामुळे दिवसभर घराला कुलूप, किंवा मुले वाऱ्यावर सोडून किंवा शेजाऱ्यांचे स्वाधीन करुन त्यांच्या सुरक्षिततेबद्दल ईश्वरावर हवाला ! हॉटेलांना आश्रय देण्याची दोघांनाही रोज आवश्यकता. त्यामुळे मिळेल ते अन्न आणि खर्चात वाढ. गिरण्या-कारखान्यांतून काम करणाऱ्या स्त्रियांची तान्ही मुले संभाळण्याच्या सोयी अलीकडे नोकरीच्या ठिकाणीच केलेल्या असतात. पण अन्यत्र ऑफिसांतून अशा सोयी नसतात. आईच्या गैरहजेरीत मुले संभाळण्याची जबाबदारी काही सार्वजनिक संस्था किंवा महिलामंडळे स्वीकारू लागल्या आहेत. उत्पन्नाची बाब म्हणून काही कुटुंबेही हा धंदा अलीकडे करू लागली आहेत. पण अशी ठिकाणे जवळपास सोयीच्या ठिकाणी असतीलच असे नाही. शिवाय आईची देखरेख आणि इतरांची देखरेख यामध्ये तफावत पडणे आणि मुलांवर होणाऱ्या संस्कारांची आबाळ होणे स्वामाविक नव्हे का ? नवरा आणि बायको यांच्या नोकरीची ठिकाणे निरनिराळ्या गावी असतील तर या सगळ्या अडचणीत आणखी भर ! अनिच्छेचा विभक्तपणा ! नित्याचे कौटुंबिक सुख असून नसल्यासारखे ! तथापि वाईटातून देखील कधीकधी चांगले निघाते त्याप्रमाणे अशा परिस्थितीचा काच शक्य तितका कमी बसावा म्हणून संतति-नियमनाच्या साधनांचा वापर करणे दोघांनाही भागच पडते ! अशा रीतीने न कळत का होईना त्यांच्या हातून आजच्या परिस्थितीत देशसेवा घडत असते ! प्राप्त परिस्थितीत या साधनांची उपयुक्तता अशिक्षित समाजाला पटवून देऊन मुलाबाळांवरुन त्यांनी आपल्या हातांनी आपल्यावर ओढून घेतलेल्या आपत्ती कमी करण्यासाठी सार्वजनिक संस्थांनी आणि महिला मंडळांनी 'महिलांची सल्लागार मंडळे' स्थापन करण्याची आवश्यकता आता उत्पन्न झालेली आहे.

## गरजवंतांना काम नाही

याच अनुषंगाने आणखी एका समस्येचा उल्लेख याच ठिकाणी केला पाहिजे. नोकरीदार स्त्रियांच्या अडचणींचा विचार झाला. पण इच्छा आणि आवश्यकता असूनही नोकरी करुन कुटुंबासाठी द्रव्यार्जन करण्याची सोय ज्यांना उपलब्ध नाही अशा स्त्रियांची काय वाट ? केवळ पांढरपेशा नव्हे तर सर्वच थरांतील स्त्रियांसाठी गेल्या २०/२५ वर्षांत ही नवीन समस्या अत्यंत तीव्रतेने जाणवू लागलेली आहे आणि तीही विशेषतः शहरातून. याचे कारण दिवसेंदिवस महागाईचे होत चाललेले जीवन. खर्चाच्या मानाने प्राप्तीची साधने आणि प्रमाण वाढलेली नाहीत आणि लोकसंख्येची वाढ या दोहोंना मागे टाकीत चाललेली आहे ! फावल्या वेळात स्त्रियांना प्राप्तीची नवीन नवीन साधने उपलब्ध करून देणे हा एकच यावर तोडगा आहे. सार्वजनिक संस्थांना सामुदायिक रीत्याच तो उपयोगात आणता येण्यासारखा आहे.

श्रद्धानंद महिलाश्रमाने बाहेरच्या गरजू स्त्रियांसाठी स्थानिक कारखानदारांच्या

मान्याने चौदा वर्षांपूर्वी हा प्रयोग सुरू केला. नवरा असेल तर त्याची प्राप्ती अपुरी म्हणून आणि नसेल तर कुटुंबाच्या पोषणाची आणि मुलांच्या शिक्षणाची सर्वच जबाबदारी शिरावर पडली म्हणून, स्त्रीला मिळकतीचे काही साधन शोधावे लागते. याशिवाय आईबाप किंवा त्यांपैकी कोणी एक जिवंत असून मुले पुष्कळ, त्यांतील मुलींची लग्ने सहजासहजी होऊ शकत नाहीत आणि शिक्षणात त्यांची प्रगती होत नाही, अशा स्थितीत प्रौढ मुलींना काही उद्योग करून कुटुंबाचा आर्थिक भार हलका करावा किंवा आपले भटकणारे मन कोठेतरी गुंतवून ठेवावे म्हणूनही नोकरीधंद्याची आवश्यकता उत्पन्न होते. नोकरीनिमित्त स्त्रियांना घराबाहेर बराच वेळ राहावे लागत असल्यामुळे पूर्वी ज्या गोष्टी स्त्रिया फावल्या वेळी घरी करीत असत त्या बाजारातून आयत्या विकत आणण्याची प्रथा आता निदान लहानमोठ्या शहरातून सर्रास पडत चाललेली आहे. याचा फायदा घेऊन पापड, लोणची, मेतकूट, मसाले विकणाऱ्या दुकानदारांनी मोठमोठी घरे बांधल्याची उदाहरणे डोळ्यासमोर आहेत. महिला मंडळांनी हा व्यवसाय उचलून आपल्या संघटनेमार्फत गरजू स्त्रियांना फावल्या वेळात प्राप्तीचे साधन पुरविण्याचा उपक्रम आरंभिला आहे. पण घरगुती पद्धतीने केलेले हे शिवण मोठ्या प्रमाणावरील कारखानदारीशी टक्कर देऊ शकत नाहीत, म्हणून व्यवसायाचे क्षेत्र मर्यादित आणि प्राप्तीही बेताबताची. यापेक्षा अन्य उत्पादन करणाऱ्या कारखानदारांकडून जे काम विशेष प्रयासावाचून कारखान्याबाहेर अन्यत्र करवून घेता येण्यासारखे आहे ते महिला संस्थांना आपल्या जागेत गरजू स्त्रियांना पुरविता येईल. श्रद्धानंद महिलाश्रम चारपाच कारखानदारांकडून अशी कामे मिळवून ६०–७० स्त्रियांना त्याचे सेवार चालविण्याला मदत करीत आहे. पण मागणीच्या मानाने हे प्रयत्न कितीतरी तोटके पडतात. आर्थिक जीवन इतके कष्टाचे होत चाललेले आहे की असा एकही दिवस जात नाही की जेव्हा दोनचार स्त्रिया तरी डोळ्यात पाणी आणून आपल्या म्लान चेहऱ्याने आश्रमाचे दाराशी काहीतरी कामाची मागणी करण्यासाठी येत नाहीत! पण एकटा-दुकटा महिलाश्रम हा बेकारीचा प्रश्न सोडवू शकणार आहे थोडाच! 'सगळ्या जागा कधीच भरल्या. तुर्त तुम्हांला देता येण्यासारखे काम नाही' हे ठराविक उत्तर महिलाश्रमाच्या कार्यवाहांचे तोंडून ऐकले की डोळ्यातील पाणी धारेचे रूपाने वाहू लागते आणि जड पावलाने वाट पाठमोरी होते!

## कुटुंबसंस्थेला क्षय

जातिसंस्थेवर प्रहार करण्याचे काम गेली कितीतरी दशके या देशात चालू आहे. पण जो जो टिकावे तो तो नित्य नवीन जीवन प्राप्त व्हावे असा विचित्र अनुभव येत आहे. याचे उलट कुटुंबसंस्था मात्र कोणी कधी प्रहार न करताच केवळ परिस्थितीमुळे डळमळायला आलेली आहे! त्याच्या कारणांचा विस्तार करण्याचे हे स्थळ नव्हे. या कारणांनी घडून आलेले कार्य म्हणून एवढेच सांगता येईल की गेल्या दोनतीन

पिढ्यांत अविभक्त कुटुंबाचे छत्र इतके फाटून गेलेले आहे की एकाकी पडलेली स्त्री कौटुंबिक आपत्तीमध्ये होरपळून जाण्याला वेळ लागत नाही. मुलेबाळे आहेत पण ती कर्तीसवरती झालेली नाहीत. सासरी-माहेरी नातलगांचा तुटवडा नाही, पण 'कोणी पुसेना कोणाला' अशा जीवनसंग्राम कठीण झालेला आहे! घरचेच थोडेथोडके जड वाटू लागल्यावर त्यांच्यांचे घोडे दारात कोण बांधू देणार! दाही दिशा फाटलेली आणि उदरनिर्वाहाचे काही साधन नसलेली तरणीताठी बाई रडते आणि मुलांबाळांसह सरळ एखाद्या अनाथाश्रमाचे दाराशी आश्रयाची भीक मागते! एवढ्या लटांबरासह कोणता आश्रम किती महिलांना आश्रय देऊ शकेल? त्याऐवजी आश्रमाने बाईला एखादा रोजगार मिळवून देण्याची व्यवस्था केली तर संस्थेवर या सर्व कुटुंबाचा भार न पडता ती बाई मीठभाकरी खाऊन का होईना आपले मग्न होऊ पहाणारे कुटुंब सावरून धरून मुलांबाळांसह आपलेच खोलीत अब्रूने आणि स्वतंत्रपणे राहू लागली तर चांगले नव्हे काय? याच कल्पनेमधून श्रद्धानंद महिलाश्रमाने चौदा वर्षांपूर्वी वर वर्णिलेला आपला 'परिश्रमालय विभाग' सुरू केला आणि कोसळत चाललेले कितीतरी सामान्य स्त्रियांचे संसार सावरून धरले!

## वृद्धांच्या अडचणी

विस्कळित झालेल्या कुटुंबसंस्थेतूनच वृद्ध महिलांचा (आणि पुरुषांचा!) नवा प्रश्न उत्पन्न झालेला आहे. मुली विवाह होऊन नवऱ्याकडे जातात आणि मुलगे नोकरीच्या ठिकाणी रहातात. जागेची टंचाई आणि जुन्या-नव्या पिढीमध्ये आचार-विचाराचे बाबतीत झपाट्याने रुंदावत चाललेले अंतर, यामुळे वृद्ध आणि 'निकामी' माणसांची अडगळ जवळ नकोशी वाटते आणि वृद्धानाही मुलींकडून किंवा मुलांकडून होणारी अवहेलना, अनादर, तिरस्कार, दुर्लक्ष, ही सोसवेनाशी होऊन आयुष्याच्या अखेरचा काळ कोठेतरी निवांतपणे घालवावासा वाटू लागतो. वृद्ध दांपत्य असले तर दोघांना एकत्र रहाणे सोयीचे वाटते. त्यापैकी एखादेच कोणी असेल तर आपल्या जातीच्या एखाद्या अनाथालयात पैसे देऊन किंवा फुकट रहाण्यास ते उत्सुक असतात. म्हणूनच अनिवार्य सामाजिक गरज म्हणून आता सरकारी प्रेरणेने किंवा खाजगी रीतीने 'वृद्धाश्रम' निघू लागलेले आहेत. अविभक्त कुटुंबपद्धतीमध्ये आणि आर्थिक सुस्थितीच्या काळात वृद्ध, अपंग, विधवा, परित्यक्ता, मंदबुद्धी किंवा विकृत मेंदूच्या माणसांची कुटुंबातच कशीबशी निभा रावली जात असे. आज समाजाला किंवा सरकारला त्यांची सोय पाहावी लागते, त्यांची चिंता वहावी लागते.

## विधवांचा प्रश्न मिटला, अविवाहितांचा उद्भवला!

कायद्यानेच विवाहाची वयोमर्यादा वाढविल्यामुळे बालविधवा समाजातून दिसेनाशी झाली आहे. विधवांचे केशवपन समाजानेच तिरस्कार्य ठरविले आहे. केशवपनच

काय पण पूर्वी सौभाग्याचे अलंकार समजले जाणारे कुंकू व बांगडी यांचा वैधव्यामध्ये त्याग न करण्याची प्रवृत्ती सुशिक्षित स्त्रियांमध्ये वाढत आहे ती अनिष्ट समजण्याचे मुळीच कारण नाही. विधवाविवाह समाजाने पुनीत केलेला आहे. श्रद्धानंद महिलाश्रमाच्या प्रारंभीच्या काळात हे काम थोडे अवघड होऊन बसलेले होते. म्हणजे विधवेशी धिटाईने लग्न तयार करण्यास तयार होणारे क्वचित. कोणी तयार झालेच तर विवाहविधी करणारा ब्राह्मण मिळणे कठीण. विवाहानंतर कुटुंबात आणि चाळीत लोकांच्या कुचेष्टेचा विषय. पुनर्विवाहित दांपत्याच्या मुलामुलींच्या लग्नाची अडचण आणि अशी लग्ने लावणारे ब्राह्मण विरळा. अर्थात विधीसाठी अडेल तेथे आम्हा कार्यवाहांना पुढे व्हावे लागे! विधवा किंवा पतित यांच्यात तत्त्वतः फारसे अंतर नसल्यामुळे शुद्ध करून पतितांची लग्ने होण्यास आता अडचण पडत नाही. हीच गोष्ट जातीजातींतील विवाहाविषयी म्हणता येईल. विवाहाचे बाबतीत जातींची व पोटजातींची बंधने आता पुष्कळच शिथिल झालेली असल्यामुळे विवाहाच्या निवडीचे क्षेत्र उत्तरोत्तर विस्तृत होत चालले आहे.

बालविवाहाचा लंबक प्रौढविवाहाकडे वळला. आता तर कायद्यानेच विवाहाची वयोमर्यादा २१ पर्यंत नेण्याच्या सूचना पुढे येऊ लागलेल्या आहेत आणि नवीनच समस्या पुढे येऊ लागल्या आहेत. बालविवाहात मुलामुलींची लग्ने ठरविण्याचा मक्ता आईबापांकडे किंवा दुसऱ्या कोणा वडील मध्यस्थांकडे असे. तेव्हा यांचा उशीर झालाच तर देण्याघेण्यावरून. पण आता आईबापांच्या बरोबरीने किंवा त्यांना विचार न घेताच, वधुवरांची त्यांच्या इच्छेने निवड होऊ लागल्यामुळे विवाह जमणे बरे कठीण होऊन बसले आहे. त्यातूनच प्रौढ कुमारिकांचा प्रश्न पुढे आला. 'माझे वय ३५ आहे, माझ्यात कोणतेही व्यंग नाही. पण माझे लग्न झालेले नाही. स्वतः कमवित्याने पैशाची खाण्याची शाश्वती आहे. विवाहसंस्थेचा अनुभव चांगला नाही. तेव्हा तुमच्या संस्थेचे या कामी मला काही साहाय्य होईल काय?' अशा पृच्छा मधूनमधून आमच्याकडे करण्यात येत असतात. प्रेमविवाह यशस्वी किती आणि अयशस्वी किती याबद्दल निश्चित आकडे सापडणे कठीण. पण या संदर्भात आमच्याकडे दररोज पत्रे येतात की, 'अमुक माणसाने मला लग्नाचे वचन देऊन फसविले. आता तो बेपत्ता आहे. माहेरची माणसे मला थारा द्यायला तयार नाहीत. म्हणून आपल्या आश्रमात मला आश्रय मिळावा'. कुमारिका मातांची संख्या वाढू लागली आहे असे आमच्या दप्तरातले आकडे दर्शवितात. गर्भपाताला कायद्याची मान्यता मिळवून देण्याची नवीन मोहीम अलीकडे सुरू झालेली आहे त्यामुळे ही संख्या आणखी वाढण्याची शक्यता आहे!

### बंदिस्त स्त्री बाहेर पडली, पण —

घरामध्ये बंदिस्त असलेली स्त्री शिक्षण, नोकरी, प्रवास, क्रीडा, करमणूक, वाचनालये, बाजार, उद्याने, इत्यादी निरनिराळ्या निमित्तांनी आता घराबाहेर पडली

आहे. पुरुषांशी मिसळण्याचे प्रसंग तिला हरघडी येतात. जीवनाच्या सर्व क्षेत्रांत वावरण्याची तिला मुभा मिळालेली आहे. यामुळे स्त्रीजातीची शारीरिक किंवा नैतिक दृष्ट्या हानी झालेली आहे, असे विधान करण्यास आधार नाही. त्याचे उलट असे विधान करण्यास हरकत नाही की अलीकडील स्त्री अधिक धीट, अधिक चौकस, अधिक बहुश्रुत, अधिक स्वावलंबी व म्हणून अधिक आत्मविश्वासपूर्ण होत चाललेली आहे. तथापि काही प्रसंग असे असतात की ज्या वेळी त्यांना योग्य मार्गदर्शन झाले तर त्यांचा पाय घसरणार नाही, किंवा त्यांचे हातून अज्ञानाने किंवा मोहाने होणाऱ्या चुका टाळता येतील. यासाठी जबाबदार महिलांची आणि कायदेपंडितांची सल्लागार मंडळे स्थापन झाली तर बरे होईल. अशा प्रश्नांची एका खाजगी बैठकीत चर्चा चालू असता एका हायकोर्ट जज्जाने स्वानुभवावरून असे सांगितले की अशा गोष्टी वकिलाकडे आणि कोर्टाकडे गेल्या तर अधिक नासतात, न्यायाची परवड होते. म्हणून शक्य तर खाजगी रीतीने जबाबदार लोकांकडून त्याची शहानिशा करण्याचा प्रघात पडणे जरूर आहे. समाजकार्य करणाऱ्या संस्थांनी हे कार्य हाती घेण्यासारखे आहे.

## पुरुष नामानिराळा !

स्त्री मोहाला वश होऊन आपण होऊन भ्रष्ट होते किंवा पुरुष फसवून, फसले तरी आमिष दाखवून, किंवा बलात्काराने, तिला भ्रष्ट करतो. आजच्या सामाजिक कल्पनेप्रमाणे दोन्ही बाबतीत ती जन्माची कलंकित होते. समाज तिला दूर लोटतो. कुटुंबातून आणि जातीतून ती बहिष्कृत होते. अशा वेळी तिला तीनच मार्ग मोकळे असतात— आत्महत्या, परधर्मस्वीकार किंवा कुंटणखाना ! यातूनच कित्येक वेळा तिचे हातून बालहत्येचा गुन्हा घडून तिला जन्मठेपीच्या शिक्षेला पात्र व्हावे लागते ! तिला भ्रष्ट करणारा पुरुष मात्र नामानिराळा राहून समाजात उजळ माथ्याने फिरू शकतो, इतकेच नव्हे तर असले गुन्हे सहजासहजी पचू शकतात म्हणून अधिकच निर्ढावून तो तसले आणखी गुन्हे करण्यास प्रवृत्त होतो ! स्त्रीच्या साक्षीने गुन्हेगार शोधून काढणे कठीण नसले तरी न्यायालयात गुन्हा शाबीत होणे कठीण जाते. आधी त्या पुरुषाला न्यायालयात खेचण्यास स्त्री किंवा तिचे नातेवाईक तयार नसतात. कारण गुन्हा शाबीत झाला काय, किंवा न झाला काय, स्त्रीची अब्रू चव्हाट्यावर येते ही भीती ! एकीतेवी कलंक लागला आहे, आता चारचौघांत आणखी शोभा नको, झाले ते मुकाट्याने निस्तरले पाहिजे, अशी मनाची समजूत करून तोंड दाबून त्याला बुक्क्यांचा मार सहन करण्यावाचून दुसरे गत्यंतर नसते. म्हणून अधिक चर्चा न करता पुढील गोष्टी शक्य तितक्या गुप्तपणे पार पाडण्याकडे संबंधित लोकांची प्रवृत्ती असते.

## पतित आणि विधवा एकच

पण अशा गोष्टी गुप्त राहूच शकत नाहीत. या ना त्या रीतीने त्यांना वाचा फुटल्यावाचून रहात नाही. निवडुंगात फेकून दिलेले व्यभिचारोत्पन्न मूल सापडले आणि

पंढरपूरच्या अनाथ बालकाश्रमाचा जन्म झाला. त्यामुळे घालहत्येला प्रतिबंध बसला. पतित स्त्रीचा त्याग हे देशातील परमधर्मीयांची संख्या वाढण्याचे एक कारण आहेच. पण हिंदू समाजाने असल्या पतितांकरिता संस्था काढण्याचेही एक कारण आहे. हिंदू समाजाने असल्या पतितांकरिता संस्था काढण्याचे सुरू केल्यावर बालहत्येला काही अंशी आळा बसला आणि परधर्माकडे नाइलाजाने जाणारा ओघ थोडा आटला. कुंटणखान्यांनीही काही बाजू ओस पडली. समाज पूर्वीपेक्षा अधिक उदार आणि समंजस झाल्यामुळे विधवाप्रमाणे पतितांनाही मवितव्यामध्ये आशेचे काही किरण दिसू लागले. विधवा आणि पतित यामध्ये तत्वतः काही फरक नसल्यामुळे लागूनसवरून पतित स्त्रीचा विवाह होणे आता तसे पूर्वीइतके कठीण राहिलेले नाही. एकदा पतित म्हणजे कायमची पतित या गणिताला अनुभवाचा आधार नाही. पतित स्त्रियांनी विवाहोत्तर चांगले संसार केल्याचे दाखले पाहिजे तेवढे आहेत. संस्थेतर्फे असले विवाह न होता नातेवाईकांनी ते केले तर मुलीच्या पूर्वेतिहासासंबंधी काहीएक स्पष्ट न ठेवणे मुलीच्या हिताचे दृष्टीने अत्यावश्यक असते. कारण आपली पत्नी 'उपभुक्त' आहे हे नवऱ्याचे लक्षात येण्यास वेळ लागत नाही. आपली फसवणूक करून देण्यात आली तर तो पत्नीचा त्याग करील किंवा तिला अवहेलनेने वागवील, कदाचित फसवणुकीबद्दल पत्नीच्या नातलगांना न्यायालयात खेचील! इतकी गुंतागुंत निर्माण करून मुलीला चिखलात अधिक खोल लोटण्यापेक्षा सर्व गोष्टी एकमेकांना समजून करणे सर्वांच्याच हिताचे नाही काय? मुलीला भ्रष्ट करणारा माणूस तिच्याशी मागाहून विवाह करण्यास तयार असेल तर त्याच्यापासून विवाहापूर्वी झालेले तिचे मूल कायदेशीर होऊ शकते आणि जननिंदेपासून ती अजिबात सुटली नाही तरी दांपत्याचे मूल त्यांचेजवळच राहून वाढविता येते. मुलाला आपले खरे आईबाप जन्मभर लाभू शकतात. पण गुन्हेगार माणूस आधीच विवाहित असतो, अशिक्षित किंवा बेकार असतो, वयाने मोठा असतो, किंवा मवाली असतो, तेव्हा तो तयार असला तरी त्याच्या गळ्यात मुलीला बांधून उघड्या डोळ्यांनी तिचे जन्माचे नुकसान करण्यास नातेवाईक किंवा संस्थांचे चालक स्वाभाविकच तयार नसतात.

## पोटचे मूल स्वतःच 'बाळगावयास'

तीनचार उदाहरणे अशी घडली की मुलगी व मुलगा 'व्यभिचारानंतर' आणि मुलाच्या जन्मानंतर एकमेकांशी विवाहाने बद्ध होण्यास व ते मूल आपले म्हणून घेऊन जाण्यास आनंदाने तयार असताना केवळ नातेवाईकांच्या विरोधामुळे त्यांना ते मूल बरोबर नेणे अशक्य झाले. पोटच्या मुलाची ताटातूट करणे आईच्या जिवावर आले. तिने मोठा आकांतही केला! यावर पुढे अशी तोड काढण्यात आली की आईबापांनी हे विवाहपूर्व मूल काही महिने किंवा वर्षे आश्रमातच वाढू द्यावे व पुढे परिस्थिती थोडी अनुकूल दिसताच ते मूल 'बाळगावयास' म्हणजे दत्तक म्हणून न्यावे म्हणजे

मुलाला खरे आईबाप मिळाले आणि आईबापांना आपले मूल मिळाले! ज्ननिंदेला थोडी मुरड घालायला मिळाली. पती आणि पत्नी प्रेमानें वढ, वय, जात, शिक्षण व संस्कृती यांचे दृष्टीने दोघांमध्ये कसली तफावत नाही, अशा वेळी या गोष्टी सहज होऊ शकतात. मूल संस्थेत असेपर्यंत त्याचा खर्च या दांपत्याकडून मिळत असे. तसेच मुलाची ओळख (किंवा लळा) कायम रहावा म्हणून मधूनमधून आई काहीतरी निमित्ताने त्याला भेटून आणि कुरवाळून जात असे.

## दत्तकविधानात इष्ट परिवर्तन

गेल्या २०–२५ वर्षांमध्ये आपल्या समाजात जी अनेक इष्ट परिवर्तने सहजासहजी घडून आलेली आहेत त्यामध्ये दत्तकाच्या भावनेला बरेच वरचे स्थान दिले पाहिजे. म्हणजे ज्याच्या गणगोताची काही माहिती नाही अशा 'अनाथ' मुलाला निःशंकपणे आपले मूल म्हणून बाळगावयास नेणाऱ्या निपुत्रिकांची संख्या झपाट्याने वाढत आहे. मात्र मुलीपेक्षा मुलगा मागणारांची संख्या फार! मृत्यूनंतर आपणाला 'पिंड' घायला कोणी पाहिजे म्हणून नव्हे, तर मुलावाचून घर ओसाड दिसते, दोघांच्या-प्रमाणे कोडकौतुक करायला घरात मूल नाही, या विरुणतेमुळे! शिवाय हल्ली सर्वांची वयोमर्यादा वाढत चालली असल्यामुळे 'म्हातारपणाची काठी' म्हणूनही मूल हवेसे वाटते. किंवा कोणाला आपल्या मालमत्तेला वारसदार हवासा वाटतो! मुलगी लग्न झाल्या-वर दुसऱ्याचे घरी जाणार — अर्थो हि कन्या परकीय एव — म्हणून ती दत्तक नको असते. तथापि या दत्तकविधानात कायद्याची एक गोम आहे. बाळगावयास नेलेले मूल कायदेशीर रीत्या दत्तक ठरत नसल्यामुळे त्याला वारसा हक्क मिळू शकत नाही. दत्तक बापाने त्याचेकरिता मृत्युपत्र करून ठेवले तर गोष्ट निराळी. पण तशी व्यवस्था करण्यास तो चुकला तर बापाचे टपून बसलेले दूरचे नातलग त्याच्या इस्टेटीमोवती माशांप्रमाणे घोंगावू लागतात आणि बाळगावयास नेलेले मूल अगदी उघडे पडते! कोर्टकचेऱ्या करून आपला हक्क शाबीत करणे त्या मुलाच्या शक्तीबाहेरचे काम होऊन बसते.

जातगोत न पहाता 'दत्तक' म्हणून बाळगावयास नेलेले मूल आणि परंपरागत धर्मशास्त्राप्रमाणे जातकुळी पाहून अगदी जवळचे दत्तक घेतलेले मूल यांचे अनुभव हा सामाजिक संशोधनाचा एक विषय होऊ शकेल. त्यासाठी पुरेशी माहिती जमवावी लागेल. तथापि एकाच आईबापाच्या मुलामुलांत आढळणारा फरक, जातकुळी पाहून धर्मशास्त्राप्रमाणे दत्तक मुलाचे डोळ्यापुढील बरेवाईट अनुभव, याचेहून अनाथालया-तील बाळगावयास नेलेल्या मुलाचे अनुभव यांमध्ये विशेष फरक आढळेल असे वाटत नाही. पत्रिका पाहून मुहूर्तावर केलेली लग्ने आणि पत्रिका न पहाता (मुहूर्ताऐवजी) सोयिस्कर दिवशी केलेली लग्ने यांत यशापयशाचे दृष्टीने कोठे तफावत आढळते?

## सनातनी सुधारक होताल!

'वचनात् प्रवृत्तिः वचनात् निवृत्तिः' किंवा श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्मांचे कंकण

# २०

## आंतरभारतीय स्त्रीजीवन

श्रीपाद रघुनाथ जोशी

श्री. श्रीपाद रघुनाथ जोशी (जन्म २३-१-१९२०) पुण्याच्या गोखले इन्स्टिट्यूटमध्ये काम. महाराष्ट्रातील एक बहुभाषी व्यासंगी लेखक. वर्तमानपत्रांत व नियतकालिकांत विपुल लेखन. मराठी, इंग्रजी, हिंदी, उर्दू, गुजराती व बंगाली या भाषांतील अनेक उत्कृष्ट साहित्यकृतींचे अनुवादक अनेक स्वतंत्र पुस्तकांचे लेखक. काही पुस्तकांचे इतर भाषांत अनुवाद झाले आहेत. ('श्री. रघुवंश' डॉ. केतकर पथ, पुणे ४)

### अखिल भारतीय पातळीवर विचार

राजकीय दृष्ट्या भारत हे एक सुसंघटित व संपूर्ण राष्ट्र असले तरी सांस्कृतिक दृष्ट्या त्याच्यात खूपच विभिन्नता आढळते. संस्कृतीमध्ये धर्मांचा समावेश केल्यास ढोबळ मानाने भारताला एक संपूर्ण सांस्कृतिक घटक मानण्यास हरकत नाही. अर्थात जगातील बहुतेक सर्वच प्रमुख धर्म या देशात नांदत असल्यामुळे हे विधानही तिळके ततोतंत बरोबर ठरणार नाही. वेगवेगळ्या धर्मांच्या पार्श्वभूमीवर विभिन्न संस्कृती येथे नांदत आहेत असे म्हणावे लागेल. परंतु इतक्या खोलात न शिरता आपण ढोबळ अर्थानेच या प्रश्नाकडे पाहणे बरे. नेहमी वापरण्यात येणारी कमल-पुष्पाची उपमा घेऊन आपल्याला असे म्हणता येईल की, एकूण भारतीय जीवन हे कमळासारखे असून विभिन्न प्रदेशांचे त्यातील स्थान कमळाच्या पाकळ्यासारखे आहे. याचा अर्थ असा की एकतेच्या एका सूक्ष्म सूत्राने या विविध अंगांना एकत्र बांधून त्यातून एक सुंदर कलाकृती निर्माण केलेली आहे. हीच गोष्ट *आंतरभारतीय स्त्रीजीवनासंबंधीही* खरी आहे. बाहेरच्या लोकांच्या दृष्टीने अखिल भारतीय स्त्रीचे एक सर्वसामान्य स्वरूप असते. त्यातील बारकावे व भेद त्यांना कळतच असे नाही. परंतु भारतीय माणसाला मात्र, त्याने डोळसपणे पाहिल्यास, आंतरभारतीय स्त्रीजीवनातील वैचित्र्य व वैविध्य सहज दिसू शकते. अखिल भारतीय पातळीवर या प्रश्नाचा विचार करताना आपण ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की कोणताही एक प्रदेश किंवा भाग घेतला तरी त्यातील

(व आदिवासी) समाजात आजही मुलीचा हुंडा घेतात. अशा मुलींचे बाप आपल्या मुलींना सासरहून पळवून आणून माहेरी ठेवतात आणि तिच्या निर्वाहव्ययाची मागणी करून तिच्या सासरच्या लोकांकडून पैसे उकळतात किंवा घटस्फोट मिळवून दुसऱ्या माणसाशी तिचे लग्न करून देतात. (वृत्तपत्रात येणाऱ्या 'मी तुमची लग्नाची बायको असून तुम्ही मला नीट नांदवत नाही...' यांसारख्या जाहिरातींवरून ही वस्तुस्थिती लक्षात यावी) याच्या उलट आपल्या मुलगा ही सोन्याची अंडी घालणारी कोंबडी आहे असे समजणारे आईबाप काही मागासलेल्या प्रदेशात मोठ्या प्रमाणावर आढळतात. एका सुनेकडून मिळालेल्या हुंड्याने समाधान न झाल्यामुळे ते त्या सुनेला विहिरीत टकलून देतात अथवा तिच्या अंगावर रॉकेल ओतून तिला जाळून टाकतात आणि चिरंजिवांना पुन्हा बोहल्यावर उभे करून दुसऱ्यांदा (अनेकदा!) हुंडा उकळतात. अशी आहे आपली विविधता.

## कला-साहित्यातील व सार्वजनिक क्षेत्रातील स्त्रिया

भारतीय स्त्रीवर इतकी अनंत प्रकारची दडपणे असूनही कला-साहित्याच्या क्षेत्रात तिने मर्यादित स्वरूपात का होईना जी कामगिरी बजावली आहे ती पाहिली की सानंद कौतुक वाटते. त्या बाबतीत लक्षात भरण्यासारखी गोष्ट म्हणजे महाराष्ट्र-बंगालसारखे एकदोन प्रांत सोडले तर इतर प्रांतांत जीवनाच्या सर्व क्षेत्रांत प्रविष्ट झालेल्या स्त्रिया फार थोड्या आढळतात. काही प्रांतातून काही विशिष्ट क्षेत्रांतच कर्तबगारी गाजविलेल्या स्त्रिया सापडतात. अर्थात आपापल्या प्रांतापुरते ज्यांचे नाव प्रसिद्ध आहे अशा स्त्रियांचा विचार येथे केलेला नाही. अखिल भारतीय पातळीवर ज्यांनी आपली काही छाप टाकली आहे अशाच स्त्रियांचा उल्लेख येथे करता येण्यासारखा आहे.

या संदर्भात महाराष्ट्रामधील गायिकांची नावे सर्वप्रथम डोळ्यासमोर येतात. सर्वश्रीमती हिराबाई बडोदेकर, मोगूबाई कुर्डीकर श्रीमतीबाई नार्वेकर, अंजनीबाई लोलेकर, ज्योत्स्नाबाई भोळे, माणिक वर्मा, पद्मावती शालिग्राम (गोखले), लता मंगेशकर, आशा भोसले, किशोरी आमोणकर वगैरे असंख्य नावे आठवू लागतात. अर्थात या सर्वांपेक्षा तामिळनाडच्या श्रीमती सुब्बलक्ष्मी (सुब्बुलक्ष्मी) यांचे जागतिक कीर्तीचे स्थान अगदी वेगळे आहे, हे मान्य केले तरी आमच्या गायिकांच्या

आहे असे म्हणण्यास हरकत नसावी. साहित्याच्या क्षेत्रात कै. सौ. कुसुमावती देशपांडे यांचा जसा दबदबा अखिल भारतीय पातळीवर होता तसा इतर कोणाचा नसला तरी इस्मत चुगताई (उर्दू), अमृता प्रीतम (पंजाबी), महादेवी वर्मा (हिंदी), लीला रॉय (बंगाली, इंग्रजी) शांता रामराव, कमला मार्कंडेय (इंग्रजी) यांची नावे चांगलीच परिचित आहेत. पंडिता क्षमा राव संस्कृत पंडिता म्हणून प्रसिद्ध होत्या. लोकसाहित्याच्या संदर्भात श्रीमती दुर्गाताई भागवत, डॉ. कु. सरोजिनी बाबर इत्यादींची नावे अखिल भारतीय पातळीवर जाऊन पोचली आहेत. विद्वत्तेच्या क्षेत्रात डॉ. इरावती कर्वे (मानववंशशास्त्र), डॉ. कुमुदिनी दांडेकर (जनसांख्यिकी) यासारखी काही महाराष्ट्रीय नावे इतमामाने झळकतात. शिक्षण व लोकशिक्षण या विभागात सर्वश्रीमती सुलभा पाणंदीकर, चंद्राताई किर्लोस्कर, डॉ. चित्रा नाईक, कुलसुम सयानी वगैरे मराठी नावे ऐकू येतात.

समाजसेवेच्या व सार्वजनिक जीवनाच्या क्षेत्रात एकेकाळी महाराष्ट्राचे नाव खूपच गाजले. परंतु त्याचे श्रेय मुख्यतः महात्मा फुल्यांपासून महर्षी कर्व्यांपर्यंत पुरुष-कार्यकर्त्यांनाच आहे. पंडिता रमाबाईंसारख्या अखिल भारतीय कीर्तीच्या मराठी महिला या क्षेत्रात फारच थोड्या आढळतात. सर्वश्रीमती सरोजिनी नायडू, कमलादेवी चट्टोपाध्याय, डॉ. मुथुलक्ष्मी रेड्डी, रामेश्वरी नेहरू, लेडी धनवंती रामराव, विजयालक्ष्मी पंडित, लक्ष्मी मेनन, इंदिरा गांधी, हॅना सेन, राजकुमारी अमृत कौर, रेणुका रे, रेणु चक्रवर्ती, दुर्गाबाई देशमुख, डॉ. सुशीला नायर, रुक्मिणीदेवी अरुंडेल, अम्मू स्वामिनाथन, अचम्मा मथाई, सुचेता कृपलानी, वगैरेंच्या बरोबरीने नाव घेता येईल अशा समाजसेविका महाराष्ट्रात अभावानेच आढळतात असे म्हणावे लागते. याचे कारण काय असावे ते शोधले पाहिजे.

### समाधानकारक ?

आंतरभारतीय स्त्रीजीवनाचे हे एक ओझरते दर्शन आहे. केवळ एक स्थूल आराखडा आहे. परंतु तेवढ्यावरून एकूण भारतीय स्त्रीजीवनाची काहीतरी कल्पना निश्चितच येते. आपल्या देशातील आदिवासी व अशिक्षित स्त्रियांचा विचार येथे केलेला नाही. कारण त्यांच्या समस्या खूपच मूलगामी व प्रचंड आहेत, परंतु तथाकथित सुधारलेल्या, पुढारलेल्या शिक्षित समाजातील स्त्रियांची स्थिती तरी समाधानकारक आहे असे आपल्याला म्हणता येईल काय ? आर्थिक संपन्नतेचा, आकर्षक व्यक्तिमत्त्वाचा, लोकप्रिय कुटुंबाचा किंवा खानदानी घराण्याचा आधार लाभलेल्या काही स्त्रिया अखिल भारतीय पातळीवर महत्त्वाची स्थाने भूषवीत असल्याची दृश्ये अधूनमधून दिसतात. कोणी आमदार-मंत्री होतात, कोणी राज्यपाल-महामंत्री बनतात, किंबहुना राष्ट्रसंघासारख्या जागतिक संस्थेचे अध्यक्षपदही कोणी भूषवून जातात. पण त्यामुळे सामान्य भारतीय स्त्री व अशी अपवादाभूत उदाहरणे यांच्यातील दरी अधिकच मयाण दिसू लागते. वस्तुतः शिक्षणाच्या सार्वत्रिक प्रसारामुळे भारतीय स्त्रीला

कोणत्याही क्षेत्रात कर्तबगारी दाखविण्याची संधी प्राप्त झालेली आहे. आर्थिक ओढग्रस्तीमुळे तिच्या कर्तृत्वाला आव्हानही मिळालेले आहे. केरळसारख्या छोट्याशा प्रांतातून हजारोंच्या संख्येने बाहेर पडणाऱ्या नर्सेस, शिक्षिका, लघुलेखिका व टंकलेखिका पाहिल्या म्हणजे त्यांनी हे आव्हान स्वीकारले आहे याची खात्री पटते. परंतु तरीही भारतीय स्त्रीचे जीवन अजून मध्ययुगीन कल्पना व बंधने यांच्या पाशातच गुरफटलेले आहे असे वाटते. म्हणून बहुधा देशाची जवळजवळ निम्मी लोकसंख्या व्यापणाऱ्या स्त्रियांना राज्यविधानसभांत किंवा संसदेत एक दशांशही जागा मिळत नाहीत. असे का होते ?

मला वाटते, भारतीय स्त्री सुधारणेच्या मार्गाने वाटचाल करीत असली तरी तिने अजून आपले मानसिक परावलंबन सोडलेले नाही. पुरुषनिरपेक्ष जीवनाची कल्पनाच तिला सहन होत नाही. आजवर आपण असे समजत आलो की स्त्रीला निसर्गाने दुबळी व परावलंबी बनविले आहे. परंतु निसर्गाने लादलेल्या दुबळेपणावर विजय मिळविण्याची साधने आज उपलब्ध झाल्यानंतरही आपण तीच कल्पना उराशी बाळगून बसलो आहोत. एखादी धंदखोर स्त्री समाजाची बंधने तोडून मुक्त होण्याचा प्रयत्न करते पण ती चुकीच्या मार्गाला लागल्यामुळे मुक्त होण्याऐवजी उच्छृंखल बनते आणि दोर फाटलेल्या गलबताप्रमाणे भरकटत जाते. स्त्री ही पुरुषासारखीच एक स्वतंत्र मानव आहे, ती उपभोगाची किंवा विलासाची वस्तू नाही, ही गोष्ट पुरुषांना कळेल तेव्हा कळो, पण तत्पूर्वी खुद्द स्त्रीला या सत्याचा साक्षात्कार होणे आवश्यक आहे. त्या दृष्टीने आचार्य दादा धर्माधिकारी यांच्यासारखे चिंतन करणारे पुरुष जे विचार मांडतात त्यांचा अभ्यास अधिक गंभीरपणाने स्त्रियांनी केला पाहिजे. ' मी स्वतंत्र व्यक्ती आहे, माझे भवितव्य मी घडविणार आहे, त्यासाठी भोगाव्या लागणाऱ्या हालअपेष्टा सोसण्याची व येणाऱ्या संकटांना धैर्याने तोंड देण्याची माझी तयारी आहे ! ' असा निश्चय जेव्हा भारतीय स्त्री करील तेव्हाच आधुनिक मुक्त मानवाचे जीवन ती जगू शकेल. या दिशेने भारतीय स्त्रीने वाटचालही सुरू केलेली दिसते. तिचा वेग फारच मंद असला तरी तेवढ्याने निराश होण्याचे मात्र काही कारण नाही.

# २१

## स्त्रीजीवनाचे भवितव्य

[१]

लक्ष्मी मेनन

श्रीमती लक्ष्मी मेनन, एम्. ए., एल्. टी., टी. डी., एल्एल्. बी.; पद्मभूषण (जन्म मार्च १८९९) शिक्षिका, अध्यापिका म्हणून सुरुवात करून केंद्र शासनात उपमंत्री पदापर्यंत पोचल्या. शैक्षणिक, सामाजिक व राजकीय क्षेत्रात अनेक जबाबदारीच्या स्थानांवर कार्य व परदेशात प्रवास. ['ग्रेनव्यू' सेंट्रल स्टेडियमजवळ, त्रिवेंद्रम १, केरळ)

भारतीय स्त्रीजीवनाचे भवितव्य हे भारताच्या किंवा जगाच्या भवितव्यापेक्षा विशेष स्वतंत्र किंवा निराळे आहे असे मानता येणार नाही. स्त्रियांना स्त्रीजात या नात्याने स्वतंत्र अस्तित्व नसल्यामुळे त्यांच्यापुढे स्वतंत्र जीवितध्येय आहे, असे समजता येणार नाही. कारण त्यांची सुखदुःखे, त्यांच्या आशा-आकांक्षा व त्यांनी प्रत्यक्ष करावयाचे कार्य हे एकंदर समाजाच्या कार्यक्रमांशी नेहमीच निगडित राहणार. मात्र आजच्या काही समस्या अशा आहेत की, ज्या सर्वच मानवजातीच्या अंतिम हिताच्या दृष्टीने, अत्यंत महत्त्वाच्या ठरणार आहेत. तथापि त्यातही काही गोष्टी मात्र अशा आहेत की जेथे स्त्रियांना महत्त्वपूर्ण भाग घ्यावा लागेल, नव्हे, त्यांनी तसा तो घेतलाच पाहिजे.

स्थायी स्वरूपाची शांतता निर्माण करण्याच्या हेतूने सध्या जगामध्ये निकराचा प्रयत्न चालू आहे. तथापि, हे उद्दिष्ट सफल होण्यात जर कोणती प्रमुख अडचण येत असेल तर ती म्हणजे विशिष्ट समस्यांना तोंड देण्याबद्दल पुरुषजातीकडून व्यक्त होणारी झुनाट स्वरूपाची पारंपारिक मनोवृत्ती! राष्ट्राराष्ट्रांतील वैरभावना, सामाजिक ताण व आर्थिक मागासलेपणा हे बहुतांशी या झुनाट मनोवृत्तीचेच परिपाक होत. यासाठी भावी काळातील विश्वसमाजाची उभारणी करताना आंतरराष्ट्रीय संबंधातील व्यवहारांमध्ये परस्परसहकार्याच्या शाश्वत मूल्यांची जोपासना करण्याकडे तळमळीने लक्ष देणे अटळ मानले पाहिजे. मात्र, हे स्वप्न साकार करण्यासाठी स्त्रियांना एक पथ्य पाळण्याची गरज आहे. ते असे की, पुरुषजातीने आजवर केलेल्या भूतकाळातील व्यवहारांची चौकट त्यांनी निरुपाई मानली पाहिजे. स्त्रियांनी जी वाट चोखाळायची आहे ती अवघड वाट

आहे. त्यात हृदयाची विशालता, सहिष्णुता, समजूतदारपणा, सहजीवन व औदार्य यांची क्षणोक्षणी गरज भासणार आहे. जेव्हा जगातील स्त्रिया संकुचित राष्ट्रवादाने प्रेरित न होता जागतिक बंधुभावनेने कार्य करण्यास प्रवृत्त होतील तेव्हा या जगाचा चेहरामोहराच बदलून जाईल. संघर्षातील निरर्थकता, सुसंस्कृत जीवनातील मांगल्य, ध्येयासंबंधीची प्रामाणिक निष्ठा आणि उच्चार व आचार यांची एकवाक्यता या मूल्यांची निष्ठावंत उपासना जेव्हा स्त्रिया करू लागतील तेव्हाच या मूल्यांना नवा अर्थ प्राप्त होईल. दुर्दैवाने आजच्या पिढीतील स्त्रिया ही कठोर उपासना करताना दिसत नाहीत. ज्या काही थोड्या स्त्रियांना थोडीफार संधी क्वचित प्राप्त होताना दिसते तेथेही त्या संधीचा उपयोग व्यापक ध्येयसिद्धीसाठी केलेला आढळत नाही.

वर्तमानकाळातील संधीचा उपयोग कसा केला जातो यावरच भारतीय स्त्रीजीवनाचे भवितव्य सर्वस्वी अवलंबून आहे. जे अधिकार त्यांना या पिढीत सहजासहजी उपभोगावयास मिळत आहेत त्यांमुळे त्यांची आत्मसंतुष्टता पोसली जाणार आहे काय ? का येथील समाजजीवनात बदल घडवून आणण्यासाठी त्या आपल्या अंगावर नवीन जबाबदाऱ्या घेऊन त्या मनापासून पार पाडणार आहेत ? 'जे व्हायचे असेल ते होणारच' अशा वृत्तीने जर त्या स्वस्थ बसून राहातील तर ती एक मोठीच चूक ठरेल परंतु त्याऐवजी जर त्या 'आम्हाला इतकीच समाजव्यवस्था नको असून या देशात सर्वांना सुखस्वास्थ्य प्राप्त होईपर्यंत आम्ही विश्रांती घेणार नाही' असा धडाडीचा निर्धार करतील तर उज्ज्वल भविष्यकाळाच्या त्या शिल्पकार ठरतील. परंतु यासाठी अपरिमित कष्ट, अविरत परिश्रम व प्रचंड त्याग त्यांना करावा लागेल. आपण हे आव्हान स्वीकारून त्यासाठी पडेल तो त्याग करावयास तयार आहोत काय ? जर या प्रश्नाचे उत्तर होकारार्थी मिळणार असेल तर भारतीय स्त्रीजीवनाचे भवितव्य खात्रीने उज्ज्वल आहे.

## [२] स्त्रियांच्या संघटना

धनवंती रामराव

श्रीमती धनवंती रामराव, एम्. ए. पद्मभूषण (जन्म १०-५-१८९३) सुप्रसिद्ध समाज कार्यकर्त्या. अखिल भारतीय महिला परिषदेत उच्च पदाधिकारी. कुटुंबनियोजनाच्या क्षेत्रात भरीव कार्य. देशीपरदेशी संचार. (ब्लॉक बी, १०, मफतलाल पार्क, भुलाभाई देसाई रस्ता, मुंबई २६)

गेल्या शतकामध्ये होऊन गेलेल्या राजा राममोहन राय यांच्यापासून तो अलिकडील काळात महात्मा गांधींपर्यंत देशातील सर्व प्रमुख नेत्यांनी स्त्रियांना शिक्षण देण्याची गरज असल्याचे आग्रहाने सांगितले आहे. शिक्षणामुळे स्त्रियांचा सामाजिक व राजकीय

प्रश्नांकडे पाहाण्याचा दृष्टिकोण अधिक व्यापक होईल असा त्यांचा विश्वास होता. याच पुढारी मंडळींच्या प्रभावामुळे उत्तेजन मिळून स्त्रिया स्वखुषीने पुढे येऊ लागल्या. आणि स्त्रियांना शिक्षण मिळाले पाहिजे व त्यांच्या संपूर्ण विकासाच्या आड येणाऱ्या जुन्यापुराण्या चालीरीतींवर आधारलेल्या समाजव्यवस्थेत बदल झाला पाहिजे, यासाठी प्रयत्न करू लागल्या. अशा या प्रयत्नांतूनच विविध प्रांतांमधून स्त्रियांच्या खास संघटनांचा उगम होत गेला आणि हळूहळू त्यांना प्रतिष्ठा प्राप्त होत गेली.

स्त्रियांच्या सामाजिक विकासासाठी प्रयत्न करणाऱ्या देशभर विखुरलेल्या या स्त्रीसंस्थांना अखिल भारतीय पातळीवर संघटित करण्याची गरज १९२६-२७मध्ये त्याच्या पुढाऱ्यांना वाटू लागली. कारण त्यामुळे देशातील सर्व सुशिक्षित व पुढारलेल्या स्त्रियांचे सहकार्य व सक्रिय पाठिंबा संघटनेस मिळणार होता. तसेच निरनिराळ्या सामाजिक व आर्थिक समस्या, कायदेकानू व तत्कालीन परिस्थितीमध्ये कुचकामी ठरलेल्या जुन्या सामाजिक रूढी व अडाणी समजुती या सर्वांवर चर्चा करता येणार होती.

स्त्री-संघटनांच्या कार्यामुळे महिलावर्गात बरीच जागृती झाली व तिचा परिणाम म्हणून जुन्या हिंदू कायद्यामध्ये काही दूरगामी सुधारणा करण्यात यश येत गेले. विवाह, वारसा, व मुलांच्या पालकत्वाच्या बाबतीत पूर्वी कधीही न मिळालेले कायदेशीर हक्क स्त्रियांना हळूहळू प्राप्त झाले आहेत. त्याचप्रमाणे बालविवाह, पडदापद्धती व स्त्रियांच्या समान हक्कांच्या आड येणाऱ्या इतर काही सामाजिक रूढींचा बीमोड करण्यातही स्त्री-संघटनांनी बरीच कामगिरी बजावली आहे.

आजच्या सार्वजनिक जीवनामध्ये पुरुषांच्या बरोबरीने भाग घेऊन राष्ट्रीय विकासाला हातभार लावणाऱ्या स्त्रिया दिसत आहेत त्याचे श्रेय मुख्यतः स्त्री-संघटनांनी केलेल्या प्रयत्नांना द्यावे लागेल. कारण या संघटनांनी स्त्रियांना स्वातंत्र्य मिळवून दिले इतकेच नव्हे तर राष्ट्राच्या नागरिक या नात्याने त्यांच्यावर येणारी जबाबदारी पेलण्याचे सामर्थ्य त्यांना दिले. एखाद्या लहानशा खेड्यापासून ते मोठ्या शहरापर्यंत चालणारे स्त्री-संघटनांचे कार्य आजही अनिवार्य महत्त्वाचे आहे. विशेषतः समाजकल्याण क्षेत्रांमध्ये सरकार आखीत असलेल्या अनेक प्रगतिपर योजनांना स्वयंस्फूर्त पाठिंबा देऊन देशाचे जीवन अधिक समृद्ध व सुसंस्कृत करण्यासाठी पुढील काही वर्षे या संघटनांना मोलाचे कार्य करावे लागेल.

## [३] लघुउद्योग

कुसुमताई वानखेडे

श्रीमती कुसुमताई वानखेडे, एम्. ए., (जन्म १-१-१९१७) प्रथम श्रेणीच्या सामाजिक कार्यकर्त्या, कुशल संघटक. भारतीय स्त्री-संघटनांमध्ये उच्च पदावर काम. महाराष्ट्र राज्य समाज कल्याण सल्लागार मंडळाच्या अनेक वर्षे अध्यक्ष. (गमाडिया हाउस, हाजी अली पार्कसमोर, भुलाभाई देसाई रस्ता, मुंबई २६)

प्रत्येक स्वतंत्र राष्ट्राला आपल्या विकासाच्या दृष्टीने निश्चित पाऊलवाट करावी लागते. आपला भारत हा कृषिप्रधान देश खरा पण केवळ त्या क्षेत्रातील प्राधान्य देशाच्या सर्वांगीण विकासाला कसे पुरे पडणार? म्हणून कृषिऔद्योगिक विकासाचा कार्यक्रम हाती घेतला गेला, परंतु औद्योगीकरणाशिवाय हा समन्वय अशक्यप्राय होता. देशाचा आर्थिक विकास करण्याच्या दृष्टीने केवळ मोठ्या उद्योगधंद्यांची वाढ करून भागणार नाही, म्हणून लघुउद्योगालाही उत्तेजन देण्याची आवश्यकता औद्योगिक नीतीचा विचार करताना एका ठरावान्वये एप्रिल ३०, १९५६ला प्रतिपादन करण्यात आली आहे. मागील तीन पंचवार्षिक योजनांमध्ये केंद्र सरकार व राज्य सरकार ह्यांनी लघुउद्योगाच्या प्रगतीसाठी निरनिराळ्या सवलती कारखानदारांना उपलब्ध करून दिल्या. त्या सर्वांचा तपशील ह्या ठिकाणी देणे कठीण आहे. तरी त्या उत्तेजनामुळे लघुउद्योगांना जोम आला व ह्या उद्योगाद्वारे पंचवार्षिक योजनेत जो विकास अभिप्रेत होता तो म्हणजे आर्थिक विकासाचा पाया बळकट करणे, लोकांना कामधंदा देण्याच्या दृष्टीने त्यांना संधी मिळवून देणे व सर्वसाधारण राहणीमान वाढविणे हाच अंशतः साकार झाला. भांडवली साधनसामुग्रीचे न्यूनत्व आणि कुशल मनुष्यबळाचा अभाव असलेल्या भारतासारख्या देशात लघुउद्योगांना एक महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले आहे. राष्ट्रीय विकासाच्या योजनेच्या कार्यक्रमातील एक महत्त्वाचे अंग म्हणून लघुउद्योगाकडे पाहिले जाते.

महाराष्ट्र राज्याने लघुउद्योगवाढीसाठी नुकतीच महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाची स्थापना केली आहे. तंत्रज्ञांना ते एक आवाहन आहे. केवळ भांडवलाच्या अभावी ज्या तंत्रज्ञांना स्वतःचा उद्योगधंदा काढता येत नाही अशा तंत्रज्ञांना हे महामंडळ जमीन, पाणी, वीज, कुशल कामगार पुरविण्याच्या दृष्टीने हरप्रकारचे सहाय्य करते.

अशा लघुउद्योगांना दिलेल्या सवलतींचा स्त्रिया कितपत फायदा घेतात हा विचार करण्याजोगा प्रश्न आहे. वास्तविक मध्यमवर्गीय स्त्रियांना सदैव आर्थिक अडचण असते व संसार सुरळीत चालविणे हे अपरिहार्य आहे. परंतु बहुतेकांना संसारिक जबाबदारीमुळे ३-४ तास काम करून काही कमावता आले तर सोयीचे वाटते. नाहीतर नाइलाजास्तव घराची व मुलांची जबाबदारी एखाद्या नातेवाइकावर किंवा अडाणी

मोलकरणीवर टाकून सातआठ तास श्रमासाठी घराबाहेर जावेच लागते. परंतु दररोज नियमितपणे तीनचार तास काम करून सुद्धा अर्थार्जन करणे शक्य आहे. रंगकांड्या, खडू, लिफाफे, ऑफिसला लागणाऱ्या इतर उपयुक्त वस्तू तयार करणे, महिलांना फावल्या वेळात जरूर करता येण्यासारखे आहे. असे उद्योग एकटीने करण्याऐवजी जर संस्थांमार्फत सहकारी क्षेत्रात चालविले तर जास्त उपयुक्त होईल. कारण कच्चा माल आणणे, तयार माल योग्य रीतीने साठविणे व विकणे ह्या अतिशय कटकटीच्या व जबाबदारीच्या बाबी आहेत. त्या संस्थांवर सोपविल्यास गरजू महिलांना जास्त सोयीचे होईल. हा कार्यक्रम देताना संस्थांचा प्रामाणिकपणा हीच त्यांची कसोटी! कारण गरजू स्त्रियांना योग्य मोबदला मिळाला पाहिजे. नाहीतर गरजू म्हणून त्यांच्याच पोटावर पाय देऊन संस्थांचा फायदा करून घेण्याची प्रवृत्ती आढळते.

अर्थात तयार झालेल्या मालाचा दर्जा चांगला हवा. नाहीतर तो खपविणे कठीण जाते. शिवाय असा उच्च प्रतीचा माल विकत घेण्याचे सरकारी धोरण असून वाजवी किंमतीपेक्षा त्याला पंचवीस टक्के जास्त किंमत मिळते. उद्योग सुरू करताना कच्च्या मालाची सुलभता, त्याची बाजारात मागणी आदी साऱ्याच गोष्टींचा सारासार विचार करून उद्योग सुरू करावा. कागदी फुले, मातीची खेळणी अशा वस्तूंना बाजार मिळणे कठीण असते.

आज असे लघुउद्योग सुरू करण्याची आवश्यकता गरजू महिलांसाठी आहे. त्यासाठी संस्थांनी पुढे यावे. परंतु त्यापूर्वी उद्योगधंदा या विषयाचा अभ्यास कार्यकर्त्यांनी अवश्य करावा. त्या ज्ञानाच्या व धडाडीच्या अभावी स्त्री-संस्थांनी सुरू केलेले उद्योग थोड्याच काळात बंद होतात असा अनुभव आहे. त्याचप्रमाणे अशा उद्योगांना राज्य सरकार व केंद्रीय सरकार ह्याकडून जी मदत मिळत आहे त्याचा फायदा जरूर घ्यावा व संस्थांना ही मदत लवकर व वेळेवर मिळेल याची सरकारनेही दक्षता घ्यावी.

## [४] गर्लगाइड चळवळ व समृद्ध स्त्रीजीवन

अनसूया करकरे

श्रीमती अनसूया करकरे, बी. ए., बी. टी. (जन्म २-२-१९०९) पुणे येथील 'संगम' गर्ल गाइड संस्थेच्या आशियाई मध्यवर्ती केंद्राच्या प्रमुख. राजस्थान शिक्षणखात्यात दोन तपे काम केल्यावर 'वर्ल्ड असोसिएशन ऑफ गर्ल गाइड्स ॲन्ड गर्ल स्काउटस' संस्थेच्या आशियाई खाटनेच्या प्रवासी अधिकारी. (संगम, आनंदी रस्ता, पुणे ६)

विज्ञान, वैद्यक व तांत्रिक ज्ञान या क्षेत्रांमध्ये प्रगती होत असल्याचे आजच्या तरुण पिढीतील बऱ्याच जणांना माहीत असते. परंतु आजच्या या वैज्ञानिक युगातही मनवाची नैतिकदृष्ट्या प्रगती झाली पाहिजे असे फारच थोड्यांना वाटते. त्यामुळेच

आपल्या तरुण पिढीच्या विचारांना चालना देणारे काही प्रश्न विचारणे जरूर आहे. उदाहरणार्थ, आपल्या शेजाऱ्यांबाबत आपल्या काही जबाबदाऱ्या असतात यासंबंधीची तुमची जाणीव वाढली आहे का? सामान्यतः अलीकडचे लोक एकमेकांशी अधिक स्नेहाने वागतात असे तुम्हास वाटते का? तुम्ही पूर्वीपेक्षा अधिक सहिष्णू व उदारमतवादी झाला आहात का? निरनिराळे धर्म व वर्ण यांबद्दलचे आपले पूर्वग्रह दूर करून देऊन त्यांच्यातील फरक नीट समजावून घेण्याचा प्रयत्न तुम्ही करता का? यांसारख्या प्रश्नांसंबंधी स्वतंत्रपणे विचार करण्यास मुलांमुलींना जर लहानपणापासून प्रोत्साहन दिले तर त्यांच्यातून अधिक चांगले स्त्रीपुरुष निर्माण होऊन ते मानवी संबंध सुधारू शकतील.

लहान वयाच्या मुलांमुलींना त्यांचा स्वतःचा जीवनविकास पूर्ण होण्याच्या दृष्टीने व दुसऱ्यांची सेवा करण्याच्या दृष्टीने कार्यक्रम देणारी एक चळवळ माझ्या डोळ्यापुढे आहे. ती म्हणजे मुलांकरिता स्काउट व मुलींकरता गाईड. लार्ड बेडन पॉवेल या इंग्रज गृहस्थाने सुरवातीस मुलांसाठी काही कार्यक्रम आखला. लवकरच त्या कार्यक्रमाकडे मुलींचा एक छोटा गट आकर्षित झाला. गाइडच्या या छोट्या गटाचे रूपांतर पुढे लक्षावधी मुलींच्या आंतरराष्ट्रीय कुटुंबात झाले. गाइड शिक्षण घेतलेल्या व त्याचा जीवनदृष्टी म्हणून स्वीकार केलेल्या मुलींनी जागतिक मैत्री व समजूतदारपणा यांच्या उपासनेस फार मोठा हातभार लावला आहे. गाइडमध्ये शिक्षण घेतल्यामुळे त्या अधिक चांगल्या स्त्रिया झाल्या असून त्यामुळे राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवर अनेक क्षेत्रांमध्ये त्यांनी पुढारीपण स्वीकारले आहे.

अशी ही गाइड शिक्षण देणारी चळवळ म्हणजे आहे तरी काय? 'सतत तयार रहा' हे गाइड शिक्षणाचे ब्रीदवाक्य आहे व 'सत्कृत्य करीत जा' हे गाइडच्या जीवनव्यवहाराचे मार्गदर्शक तत्व आहे आणि या दोहोंतून शेजाऱ्यापाजाऱ्यांची सेवा करण्याचे व्रत प्रतिबिंबित होते. या चळवळीच्या थोर संस्थापकाने आपल्या मृत्युशय्येवरून जागतिक स्काउट व गाइडना पुढील संदेश दिला होता: 'इतरांना सुखी केल्यामुळेच तुम्ही सुखी होऊ शकाल.' या अमर संदेशात गाइड चळवळीपाठीमागे असणारा मेवाभाव दिसून येतो.

स्काउट व गाइड चळवळीची काही उल्लेखनीय वैशिष्ट्ये आहेत. त्यांवरून मुलांमुलींना मिळत असलेल्या उच्च ध्येयवादाच्या व मानवी मूल्यांच्या शिकवणुकीची कल्पना येते. पहिली गोष्ट म्हणजे या चळवळीत कोणत्याही वंश-जाती-धर्म-पंथाच्या तरुणांना भाग घेता येतो. त्यामुळे जागतिक बंधुभावनेचे ध्येय स्पष्ट होते. तसेच या चळवळी ऐच्छिक स्वरूपाच्या असून राजकारणापासून अलिप्त आहेत. कोणत्याही संकुचित गटबाजीपासून दूर राहिल्या आहेत. त्यांचे स्वरूप जागतिक आहे. अशा या व्यापक व सर्वांना सामावून घेणाऱ्या संघटनेत वावरणाऱ्या मुलाला किंवा मुलीला माणसामाणसांमधील कृत्रिम भेदभावांची जाणीवच होत नाही.

गाइड चळवळीच्या कार्यक्रमात पाच मूलभूत सूत्रांचा अंगिकार केला आहे. चळवळीला आध्यात्मिक अधिष्ठान देणारे गाइड वचन व दहा नियम; पेट्रोल सिस्टिम (लहानांना सामुदायिक जीवनाचा अनुभव देणारी व त्यातून नेतृत्वाची संधी व अनुभव देणारी संघपद्धती); सुसंस्कृत आरोग्यसंपन्न जीवनपद्धती आणि हस्तव्यवसाय याच्यासंबंधीच्या कसोट्या व प्रावीण्यपदके; समयसूचकता, स्वयंस्फूर्तीने पुढाकार घेण्याची वृत्ती व उद्योगीपणा यांचा विकास करणाऱ्या उघड्या मैदानावरील छावण्या, सहली व असे इतर अनेक कार्यक्रम आणि निरनिराळ्या उपक्रमांतून वाढीला लागणारी आतरराष्ट्रीय मैत्री, व भगिनीभावना.

गाइड शिक्षणाचे तंत्र शिक्षणशास्त्रदृष्ट्या निर्दोष आहे. गाइड शिक्षणाचा संपूर्ण कार्यक्रम हा पूर्वनियोजित कार्यक्रमाभोवती गुंफलेला असतो. 'स्काउट शिक्षण हा एक खेळ आहे' ही बेडन पॉवेल यांची उक्ती सुप्रसिद्ध आहे. स्काउट व गाइड चळवळींत उत्साहाने भाग घेणाऱ्यांना मजा व साहस यांचा अनुभव लुटता येतो. ही चळवळ म्हणजे असा एक खेळ आहे की त्यात शिस्त बाहेरून लादली जात नाही तर ती अंतःप्रेरणेने निर्माण होते.

स्काउट व गाइड चळवळ हा उत्कृष्ट नागरिकत्वाचे शिक्षण देण्याचा अप्रत्यक्ष परंतु सहजसुलभ मार्ग असल्याचे जगातील प्रमुख शिक्षणतज्ञांनी मान्य केले आहे. हे नागरिकत्व म्हणजे संकुचित किंवा बंदिस्त राष्ट्रीयत्वाच्या स्वरूपाचे शिक्षण नसते. स्वतःच्या घरामधील सत्कृत्यापासून सुरुवात करणारी छोटीशी गाइड हळूहळू आपला हात, भोवतालचा समाज, स्वतःचा देश व शेवटी विशाल जग याच्या मदतीसाठी पुढे करते. 'जागतिक निर्वासित वर्ष' व 'अधिक धान्य पिकवा' यासारख्या युनोने मदतीदाखल आखलेल्या उपक्रमांना जगभर पसरलेल्या गाइडनी उत्साहाने साद दिली आहे.

गाइड चळवळ प्रथम इंग्लंडमध्ये सुरू झाली व त्यामुळे ती फक्त पाश्चात्त्य संस्कृतीच्या मुलींसाठीच योग्य आहे असा गैरसमज सुरुवातीला निर्माण झाला होता. तथापि, महायुद्धानंतरच्या काळात गाइड चळवळीतील मूलभूत प्रेरणा न बदलता त्या त्या देशातील परिस्थितीशी व संस्कृतीशी त्या जुळवून घेण्याची वृत्ती निर्माण झाली. मात्र त्या चळवळीतील वर सांगितलेली पाच मूलभूत सूत्रे कायम राखण्यात आली. त्यामध्ये फरक करण्यात आला नाही.

गाइड चळवळीच्या सुमारे साठ वर्षांच्या इतिहासाकडे नजर टाकल्यास गाइडनी शांततेच्या व युद्धाच्या काळातील आव्हानाचा स्वीकार केल्याचे दिसून येते. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी स्थापन झालेल्या 'गाइडस् इंटरनॅशनल सर्व्हिस' च्या कार्यात त्या त्या देशातील गाइडनी तत्परतेने व उत्साहाने भाग घेतला होता. निरनिराळ्या युद्धक्षेत्र्या व नागरी संस्थांचे काम त्यांनी अंगावर घेतले होते. गाइड शिक्षणामधून मिळणारी उपयुक्त अशी अनेक कौशल्ये त्यांनी आत्मसात केल्याने वरिष्ठ दुय्यमच्या जागांवरील कामे त्यांना यशस्वीरीत्या पार पाडता आली.

स्त्रियांची परिस्थिती किती बिकट असेल याची कल्पनाच करावी लागेल. घरात तर त्या गुलाम होत्याच. पण आर्थिक दुर्दशेमुळे गिरण्या अगर विड्यांच्या कारखान्यांतून त्यांना कामधंदा शोधावा लागे. परकीय ब्रिटिश राज्यकर्त्यांना तेथे त्यांच्या संरक्षणासाठी कायदेकानू करण्याची फारशी फिकीर नव्हती. त्यामुळे कारखान्यांतूनही त्यांना अगदी गुलामासारखे राबावे लागे. १९३७ साली सोलापुरातील विडी कामगार बायकांनी संप केला. त्यावेळचा प्रसंग मला चांगला आठवतो. संपातील एक हुशार बाई दोन दिवस दिसली नाही. म्हणून मी चौकशीला तिच्या घरी गेले. तर त्यावेळी तिचा नवरा, 'बायको सभेला जाते', म्हणून एका दाडक्याने तिला झोडपून काढीत होता! पण अशा अवस्थेमध्येही या स्त्रिया घरात व बाहेर झगडत राहिल्या.

अशा प्रकारे समाजातील वरच्या व खालच्या थरांतील महिला जरी आपआपली वाटचाल करीत होत्या तरी त्यांच्या मार्गामध्ये एक मोठी घोंड होती. त्यामुळे हे दोन प्रवाह सुमारे दोन पिढ्या तरी अलगच राहिले. ती घोंड म्हणजे जातीयता. त्यामुळे महात्मा फुले व महर्षि कर्वे आदी नेत्यांनी अपार कष्ट व त्याग करून ज्या शाळा काढल्या त्यांचा फायदा त्यावेळच्या जास्त पांढरपेशा वर्गालाच झाला असे त्या कालावर आज वास्तववादी नजर टाकली तर आढळून येते. या पांढरपेशांच्या मुली पुढे शिक्षकिणी, डॉक्टर, किंवा परिचारिका झाल्या. ऐतिहासिक दृष्टीने ही घटना अपरिहार्य असेल पण स्त्रीविमोचनाचा मोर्चा बांधताना या स्त्रिया व बहुजनसमाजातील कामकरी स्त्रिया यांना एकत्र आणण्यामध्ये आपल्या जातिसंस्थेने मोठी अडचण निर्माण केली ही गोष्ट नाकारून चालणार नाही. त्याबरोबरच दुसरी घोंड परकीय सत्तेचीही होती. या सत्तेला भारताचे औद्योगीकरण जलद गतीने करावयाचे नव्हते. ते झाले असते तर जातिसंस्था स्वाभाविकपणेच खिळखिळी झाली असती.

स्वातंत्र्यानंतर आता या परिस्थितीत बऱ्याच झपाट्याने बदल होऊ लागला आहे. मुख्यतः घटनेने स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचा दर्जा प्राप्त झाला आहे. आणि सार्वत्रिक शिक्षणामुळे बहुजनसमाजातील मुलीही मोठ्या प्रमाणावर शिक्षण घेऊ लागल्या आहेत. आता सरकारी अगर बिनसरकारी क्वचितच एखादी कचेरी असेल की ज्याठिकाणी मुली काम करताना आढळत नाहीत.

त्याचप्रमाणे देशाचे औद्योगीकरणही पूर्वीपेक्षा जास्त वेगाने होऊ लागले आहे. बुद्धिजीवी पांढरपेशा समाज व शारीरिक कष्ट करणारा बहुजनसमाज असे पूर्वी समाजाचे दोन भिन्न भिन्न थर असत. औद्योगीकरणामुळे मोठमोठ्या कारखान्यांतून क्लिष्ट आणि नाजूक यंत्रांवर कामे करताना ढोर मेहनतीचा भाग कमी व बुद्धीचा भाग जास्त लागतो. त्यामुळे टेबलावर कारकुनी काम करणारे बुद्धिजीवी व यंत्रांवर कष्टाचे काम करणारे ते कामगार ही पूर्वीची कल्पना मागे पडू लागली असून त्या प्रमाणात या उभय समाजातील व पर्यायाने महिलावर्गातील अंतरही काटले जाऊ लागले आहे.

हा बदल अनुकूल दिशेने होत असला तरी यापुढे कष्टकरी स्त्रियांचा मार्ग

निष्कंटक झाला आहे असे मात्र नव्हे. कारखान्यांतून स्त्रीकामगारांची हकालपट्टी मोठ्या प्रमाणावर होऊ लागली आहे. १९३९ साली मुंबईच्या गिरण्यांमध्ये नेकडा पंधरा स्त्रीकामगार होत्या त्या १९६१ साली शेकडा पाच झाल्या, अशी खुद्द महाराष्ट्र सरकारने कबुली दिली आहे व औषधी कारखान्यातून 'लग्न केल्यावर नोकरी सोडीन' ही अट मुलींना मान्य करावी लागते. जागरूक महिला संस्थांनी आता स्त्रियांविरुद्ध या व अशा अन्यायांच्या निवारणार्थ कंबर कसली पाहिजे. परिस्थिती बदलली म्हणजे जुने वाक्प्रचार लोप पावतात असे लेखाच्या सुरुवातीला म्हटले आहे. त्याचप्रमाणे नवे अस्तित्वातही येऊ लागतात. आता सुशिक्षित महिला व मजूरणी हा वाक्प्रचार हळूहळू मागे पडत असून त्या जागी श्रमिक महिला — श्रम करणारी स्त्री मग ती कोणत्याही वर्गातील व पेशाची का असेना — अशी नवी शब्दपंक्ती तयार होऊ लागली आहे. या तत्त्वावर महिलांची संघटनाही होऊ लागली आहे. उच्चनीचतेच्या पातळ्यावर उभारलेली समाजरचना लोप पावण्याच्या मार्गावर असून स्वतःच्या श्रमावर जगणाऱ्या महिलांचा समाज एकात्म होण्याच्या मार्गावर आहे याची जाण या शब्दपंक्ती आणून देतात आणि त्यामुळे बहुजनसमाजातील कष्टकरी स्त्रियांच्या विमोचनाचा काळही फार दूर नाही असा मनाला धीर येतो.

## [६] कर्तव्य हेच जीवन

इंदिराबाई देवधर

सौ. इंदिराबाई देवधर (सप्टेंबर १९०१) पुण्यातील अनेक सामाजिक संस्थांमध्ये उच्च पदाधिकारी. व्यापक वाचन, परिणामकारक वक्तृत्व, घेतलेल्या कार्याबद्दल तळमळ व निष्ठा. स्फुट लेख, कविता व 'संस्था संयोजन' हे पुस्तक. गृहिणी व समाजकार्यकर्ती, ह्या दोन्हींचा उत्कृष्ट समन्वय (पी. वाय. सी. जिमखाना, पुणे ४)

एकंदर मानवजातीचेच भवितव्य काय असावे? असा प्रश्न केल्यास मानवजातीची 'सर्वांगीण उन्नती' असे अगदी थोडक्यात उत्तर देता येईल. म्हणून एकंदर मानवजातीच्या बद्दलचे जे भवितव्य तेच स्त्रीजीवनाचे पण भवितव्य होय. परंतु स्त्रीजातीची सर्वांगीण उन्नती म्हणजे नक्की काय? याबद्दल मात्र संपूर्ण एकवाक्यता होतेच असे नाही.

चालू शतक हे दलितोद्धाराचे शतक आहे. आणि स्त्रिया ह्या आजवर दलितवर्गातच मोडत असल्यामुळे त्यांना समानतेच्या भूमिकेवर आणण्यातच ह्या शतकातील सुधारकांची आणि समतावाद्यांची एवढी कर्तबगारी खर्ची पडलेली आहे, व याचे फल म्हणजे केवळ पाश्चिमात्यांतच नव्हे, तर भारतातही स्त्रियांसाठी समानहक्क, समानसंधी वगैरेंची

तरतूद राज्यघटनेतच केली गेली आहे. याचाच अर्थ, स्त्रीजीवनाचे भवितव्य ठरविण्याला स्वतः स्त्रीच आता समर्थ झाली आहे, असा होतो.

मनुष्याला या जगात दोन तऱ्हेची कर्तव्ये पार पाडायची असतात. एक स्वतःबद्दलचे आणि दुसरे इतरांबद्दलचे; आणि ही कर्तव्ये चांगल्या तऱ्हेने पार पाडण्यासाठी त्याला शिक्षण, सामर्थ्य, अधिकार, संपत्ती, योग्य संधी, वगैरेंची आवश्यकता असते. तेव्हा या गोष्टी मिळविणे हेच जीवनाचे साध्य नसून मनुष्याच्या कर्तव्यपूर्तीला लागणारी ती साधने आहेत, ही गोष्ट प्रथम लक्षात घ्यावयास हवी.

साधारणतः प्रत्येक स्त्रीला तिच्या आयुष्यात पुढील भूमिका कराव्या लागतात: कन्या, भगिनी, पत्नी, माता, गृहिणी, गृहस्वामिनी, सुनागरिक इत्यादी.

ह्या भूमिका जास्तीत जास्त चांगल्या तऱ्हेने पार पाडता येण्यासाठी स्त्रीला, सुदृढ शरीर, बौद्धिक सामर्थ्य आणि सुसंस्कृत आचारविचाराने जोपासले गेलेले कर्तव्यदक्ष असे मन यांची जोड मिळाली पाहिजे. हे ज्या स्त्रीजवळ आहे, तिची सर्वांगीण उन्नती झाली आहे असे म्हणता येईल, आणि अशा उन्नत झालेल्या स्त्रियांनी हेच गुणविशेष आपल्या कुटुंबातील पुढील पिढीत आणि समाजातही सातत्याने रहावेत म्हणून निःस्वार्थीपणाने सतत प्रयत्न करीत रहाणे म्हणजेच त्यांना स्वतःला मिळालेल्या शिक्षणाचे व समानसंधीचे चीज करणे आहे असे मी समजते.

कुटुंबाने व समाजाने आपल्या उन्नतीसाठी जे प्रयत्न केले, त्यांची परतफेड, त्याच सत्कृतीने प्रत्येकाने केल्यास, समाजातही त्याचे सातत्य रहाते, आणि मग तीच मानवाचा स्वभाव बनत जाऊन, समाज हळूहळू आचारविचाराने उन्नत होत जातो. म्हणून कोणत्याही परिस्थितीत आपल्या कर्तव्याला डावलू नये.

भगवद्गीतेत सांगितलेच आहे की—

॥ यद्यत् आचरति श्रेष्ठः तत्तदेवेतरो जनः ॥
॥ स यत् प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥

तेव्हा हा विचार नेहमी स्त्रिया चित्तात ठेवतील तर स्त्रीजीवनाचे भवितव्य सदैव उज्ज्वलच राहील, यात मुळीच शंका नाही.

## [७] स्त्रियांची विधायक शक्ती

शकुंतला परांजपे

श्रीमती शकुंतला परांजपे, बी. एस्सी. एम्. ए. (जन्म १७-१-१९०६) राज्यसभा सभासद. पूर्वी महाराष्ट्र विधान परिषद सभासद. तीन वर्षे इंटरनॅशनल लेबर ऑफिसमध्ये काम. तीस वर्षे कुटुंबनियोजनाचे कार्य. नाटके, कादंबरी, गोष्टी, लेख, प्रवासवर्णन, असे लेखन. (परांजपे रस्ता, पुणे ४)

स्त्री व पुरुष यांमधील नैसर्गिक भेद अद्याप तरी कायम आहेत. गर्भारपण व बाळंतपण या चक्रात पूर्वी स्त्रीची बहुतेक सर्व उमेद खर्च होत असे. परंतु आता तसे होण्याची आवश्यकता नाही. विचारपूर्वक जेव्हा हवी तेव्हा व हवी तितकी मुले पदरात पाडून घेऊन तिला आता कितीतरी इतर व्यवसाय करता येतील. समान हक्कांच्या पाठीमागे लागून ती अधिकाधिक पुरुषी बनू पहात आहे हे दुर्दैव! शारीरिक बळ पुरुषाला अधिक असले तरी चाणाक्षपणा, समंजसपणा आणि सहनशीलपणा स्त्रियांजवळ जास्त प्रमाणात आढळतो. आपली स्वाभाविक प्रकृती ओळखून व आपले नैसर्गिक सामर्थ्य जाणून जर तिने पावले टाकली तर तिच्या हातून कितीतरी कार्य होण्यासारखे आहे.

प्रकृतीने पुरुष विध्वंसक असतो असे आता म्हणावे लागत आहे. रानटी अवस्थेत त्याला परिस्थितीशी सदोदित झगडावे लागत असे. आता रानटी अवस्था गेली परंतु लढण्याची खुमखुमी गेलेली दिसत नाही. आजकाल सर्वत्र जी जाळपोळ, मोडतोड, दगडफेक दिसून येते तीत स्त्रिया भाग घेताना दिसत नाहीत. त्यांचा तो स्वभावच नाही. फार तर संतापाच्या भरात एखादे लाटणे, रवी अथवा पुस्तकसुद्धा फेकण्यापलीकडे स्त्रीचा संताप टिकणार नाही. आनंदीबाईप्रमाणे स्वार्थासाठी ती एखादा खूनही करील, अथवा करवील. परंतु अफाट प्रमाणात रक्तपाताची कल्पनाही तिला सहन होत नाही. किंबहुना लढाई हा प्रकारच तिच्या स्वभावाला मानवत नाही. कारण तिच्या पोटचे गोळे त्या धामधुमीत दगावतात. मुलगा सैन्यात जाण्याची इच्छा दर्शवू लागला की घरी आई प्रथम विरोध करते. कोरियातील लढाईत अमेरिकेने भाग घेतला तेव्हा अमेरिकन स्त्रियांनी विरोध केला होता.

अपत्यनिर्मितीचे विधायक कार्य निसर्गाने स्त्रीकडे सोपविले असल्यामुळे विनाशक प्रवृत्ती तिच्या प्रकृतीतच दिसत नाहीत. तसेच अफरातफर, लाचलुचपत, इत्यादी व्यवहार स्त्री फारच कमी प्रमाणात करते असे आढळून आले आहे. शाळा कॉलेजात सुद्धा मुलांपेक्षा मुलींचाच अभ्यास, वर्तन व शिस्त अधिक श्रेष्ठ असते असे मी कित्येक शिक्षकांच्या तोंडून ऐकले आहे. तेव्हा देशाची किंवा जगाची विस्कटलेली

वडी फिरून नीट बसवण्यास स्त्रीला पुष्कळच पुढाकार घेता येईल. मुलांना चांगले वळण लावणे हे तिचे पहिले कर्तव्य. नंतर कुटुंबाचे, गावाचे, देशाचे व्यवहार कसे चालतात ह्याचा अभ्यास करून आणि त्यात अधिकाधिक भाग घेऊन तिला सद्यःपरिस्थिती सुधारता येईल. विलायतेतील स्त्रियांप्रमाणे ग्राहक संघ (कंझ्युमर्स सोसायटीज) चालवता येतील.

शेतकरी समाजात कामाचा बोजा आणि घरचे व बाहेरचे कामाचे तास मोजले तर स्त्रियांचाच वाटा एकंदरीत अधिक असतो. हल्ली बुद्धिजीवी वर्गातही स्त्रिया नोकरी करायला लागल्यापासून केव्हा केव्हा अशीच परिस्थिती आढळून येते. ही काम करण्याची आपली ताकद व चिकाटी जेव्हा स्त्रिया ओळखतील तेव्हा सार्वजनिक आणि राजकीय बाबतीतसुद्धा त्यांना आपले वजन पाडता येईल.

# २२

# भारतीय स्त्रीजीवन : गौरवशाली कहाणी

कमलादेवी चट्टोपाध्याय

श्रीमती कमलादेवी चट्टोपाध्याय, डिप्लोमा इन सोशिऑलॉजी (लंडन), पद्मभूषण (जन्म ३-४-१९०३) अखिल भारतीय महिला परिषदेच्या संस्थापकांपैकी एक; पुढे अध्यक्षा. राष्ट्रीय नाट्य केंद्राच्या संस्थापक-अध्यक्षा. वाटुमल व मॅगसेसे पारितोषिकांच्या मानकरी. सामाजिक व सांस्कृतिक क्षेत्रातील आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या कार्यकर्त्या, लेखिका व वक्त्या. जगभर पुष्कळ प्रवास (मायन्स पेन्टहिपन, पश्चिमविहार माडेल, मथुरा रोड, नवी दिल्ली.)

भारतीय स्त्रीला, तिचा सध्याचा दर्जा व स्थान हे मुख्यतः दोन गोष्टींमुळे प्राप्त झाले आहे. पहिली गोष्ट म्हणजे आपल्या भारतीय संस्कृतीतील काही चांगल्या परंपरा आणि दुसरी गोष्ट म्हणजे स्वतः समाजसुधारक, शिक्षणतज्ज्ञ व सुरुवातीच्या काळात नेतृत्व करणाऱ्या स्त्रिया यांचे प्रयत्न. विशेषतः ज्या स्त्रीनेत्यांनी स्त्रियांना अधिक मानाचे, जबाबदारीचे व गौरवाचे स्थान प्राप्त करून देणाऱ्या नवयुगाची पताका मोठ्या धैर्याने आपल्या खांद्यावर घेतली त्यांचा गुणगान उल्लेख केला पाहिजे.

## भारतीय स्त्रीची प्राचीन उज्ज्वल परंपरा

आपली प्राचीन काळातील परंपरा खरोखर फार अभिमान वाटावा अशी गौरवशाली आहे. फार पूर्वीपासून स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीने शिक्षण घेण्याची व निरनिराळ्या प्रकारच्या कारागिरीत कौशल्य प्राप्त करून घेण्याची संधी मिळत होती. अतिशय वंद्य असलेली अर्धनारीनटेश्वराची प्रतिमा स्त्रीपुरुषातील समानता बिनतोड व समर्पक रीतीने व्यक्त करते. भारतीय विचार व तत्त्वज्ञान यांचे उगमस्थान असणाऱ्या ऋग्वेद या मूळ ग्रंथावरून स्त्रियांनी केलेल्या भरीव कामगिरीची साक्ष पटते. कारण त्यातील काही ऋचा स्त्रीपंडितांनी रचल्या आहेत. या संदर्भात जिच्या लिखाणाचा अंतर्भाव वेद व पुराणे यांमध्ये झाला आहे अशा ब्रह्मवादिनींच्या उज्ज्वल मालिकेतील वाक् ही पहिली श्रेष्ठ स्त्री, त्याचप्रमाणे, महाकाव्य लिहिणारी गंगादेवी, घोषा, जुहू, यमी, सूर्या, रात्री, शची, व अपाला या स्त्रिया विख्यात आहेत. गार्गी, मैत्रेयी व

उभयभारती यांसारख्या स्त्रिया वादविवादात महत्त्वाचा भाग घेऊन कित्येकदा पुरुषांना निरुत्तर करीत असत. शंकराचार्यांसारख्या प्रकांडपंडितालाही उभयभारतीबरोबर वाद करताना विचारासाठी वेळ मागून घ्यावा लागला होता. लोपामुद्रा, रोमशा यांसारख्या तरस्विनींबद्दल समाजामध्ये आदरभाव होता. आर्य स्त्रियांना विद्यासंपन्न होण्याची संधी मिळत असे व त्यामुळे त्यांनी धर्मकृत्यांमध्ये भाग घ्यावा अशी समाजाकडून अपेक्षा केली जात असे.

बौद्धकालीही सामाजिक व धार्मिक क्षेत्रांत स्त्रियांना मानाचे स्थान होते. स्त्रियांमधून निर्माण झालेल्या प्रभावी वक्त्या व धर्मोपदेशिका हे बौद्धकाळातील एक वैशिष्ट्य होते. या क्रांतिकारक काळामध्ये सांस्कृतिक व सामाजिक क्षेत्रांमध्ये सेवेची अनेक दालने स्त्रियांना खुली झाली. साहजिकच धार्मिक जीवनात व साहित्यात स्त्रियांकडून उल्लेखनीय भर घातली गेलेली आढळते. त्यांनी रचिलेल्या सूत्रांचा अंतर्भाव बौद्ध शास्त्रग्रंथांमध्ये झालेला आढळतो. कवयित्री म्हणून नावलौकिक मिळविलेल्या सुमेधाने भिक्षुणी होण्यासाठी आपल्या राज्याचा त्याग केला व तिच्याइतक्याच प्रसिद्धी पावलेल्या इसिदासी, उप्पलवण्णा, सुमा जीवकम्बवनिका या स्त्रियांनी तिचे अनुकरण केले. जैन संप्रदायातही स्त्रियांना आदराचे स्थान असल्यामुळे अनेक स्त्रिया चमकल्या. भद्रा, कांती व अक्कादेवी कवयित्री म्हणून प्रसिद्ध होत्या. दक्षिणेतील अम्माळ्यार व राजस्थानमधील मीराबाई यांना सबंध देशात गौरवाचे स्थान प्राप्त झाले आहे. त्याचप्रमाणे, महाराष्ट्रातील मुक्ताबाई, ओरिसातील माधवी, तेलंगणातील मुद्दुपलानी, केरळातील मनोरमा थामपुरायी — जिच्या ओव्या प्रेमळ व भक्तिमार्गाने परमेश्वराचे पूजन करणाऱ्या वैष्णव धर्मग्रंथांत समाविष्ट केल्या आहेत — वगैरे इतर स्त्रियाही प्रसिद्ध आहेत. तंजावरमधील मधुरवाणी व बंगालमधील चंद्रावती विद्वत्तेबद्दल प्रसिद्ध होत्या. काश्मिरी भाषेतील प्राचीन सहित्यात हब्बा खानूनच्या सुंदर काव्याला मानाचे स्थान आहे. याशिवाय, पुरातन काळापासून स्त्रियांनी लोकवाङ्मयात वेळोवेळी भर घातलीच आहे. मध्ययुगात स्त्रीचे स्थान घसरत गेले.

मध्यंतरी ओळीने तीनशेहून अधिक वर्षे होत राहिलेल्या परकीयांच्या स्वाऱ्यांमुळे सर्व समाजव्यवस्था विस्कळित होऊन गेली; अर्थव्यवस्था कोलमडून पडली. नित्यजीवनात अस्थैर्य निर्माण झाले व या कारणामुळे स्त्रियांचा सामाजिक दर्जा घसरला. इस्लामी संस्कृतीच्या प्रभावामुळे व असुरक्षिततेच्या वातावरणामुळे पडदापद्धती अंमलात आली. अर्थात ही चाल बहुतांशी वरच्या वर्गात प्रचलित झाली. मात्र या अत्यंत धामधुमीच्या व प्रतिकूल असलेल्या काळातसुद्धा काही वीरांगना व राजकारणी स्त्रिया पुढे आल्या. मार्को पोलोने वर्णन केलेली काकतीय राणी रुद्राम्मा, पुरुषाप्रमाणे रणवेष धारण करून अकबराविरुद्ध आपली फौज लढविणारी चांदबिबी, औरंगजेबाच्या हल्ल्यांचा शौर्याने प्रतिकार करणारी ताराबाई, इंग्रजांनी सुद्धा जिच्या कर्तृत्वाचा गौरवाने उल्लेख केला ती अहल्याबाई होळकर व इंग्रजांच्या तावडीतून आपले राज्य वाचविताना धारातीर्थी

पडलेली झांशीची राणी लक्ष्मीबाई अशा अनेक स्त्रिया चमकून गेल्या. एवढेच नव्हे तर राजवाड्यातील बंदिस्त जीवन कंठणाऱ्या जहानारा, रोशनारा व झेबुन्निसा या स्त्रियांनीही इतिहासाला आपल्या अस्तित्वाची दखल घ्यावयास लावली.

ढासळलेल्या समाजव्यवस्थेत स्त्रियांचे स्थान दशकानुशतके खालीच घसरत गेले. नंतर ब्रिटिश आल्यावर त्यांनी शासनासाठी जेव्हा नवीन कायदे केले तेव्हा त्यासाठी त्यांनी जुन्या कायद्यांचाच आधार घेतला. याचे एक कारण म्हणजे जुन्यासंबंधी ब्रिटिश मनाला वाटणारा भीतियुक्त आदर! १९१९ मध्ये जेव्हा नव्या राजकीय सुधारणांचा हप्ता भारतीयांच्या समाधानासाठी तयार करण्यात आला, तेव्हाही असेच झाले. भारतातील प्रागतिक मताच्या संघटनांनी व स्त्रीपुरुषांनी भारतीय स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळावा म्हणून जोरदार मागणी केली. परंतु ब्रिटिश पार्लमेंटने त्याबद्दल नाखुषी दाखविली. खुद्द ब्रिटनमध्येही त्या काळात स्त्रियांना मतदानाचा हक्क प्राप्त झालेला नव्हता! अर्थात ब्रिटिश पार्लमेंटपुढे आपली बाजू आग्रहपूर्वक मांडण्याचा निर्णय भारतीय स्त्रीनेत्यांनी घेतला व त्याप्रमाणे स्त्रियांच्या एका शिष्टमंडळाने आपली बाजू एका 'संसदीय समिती'पुढे यशस्वीपणे मांडली. त्याचा परिणाम असा झाला की, भारतीय स्त्रियांना मतदानाचा हक्क प्रदान करण्याचे स्वातंत्र्य नव्यानेच स्थापन होणाऱ्या भारतातील कायदेमंडळांना देण्यात आले. अर्थात नवी कायदेमंडळे अस्तित्वात आल्याबरोबर, जवळजवळ पहिलीच गोष्ट त्यांनी जर कोणती केली असेल तर स्त्रियांना कायदेमंडळांचे दरवाजे खुले करण्याची होय. त्याप्रमाणे १९२९ साली भारतीय स्त्रियांनी प्रथम कायदेमंडळात प्रवेश केला व त्या पुरुषांबरोबरीने एका महत्त्वाच्या कामात भाग घेऊ लागल्या. पुढे १९३६ साली जेव्हा प्रांतीय स्वायत्तता आली व नवी मंत्रिमंडळे स्थापन झाली तेव्हा अनेक प्रांतांतून स्त्रिया मंत्रिपदही विभूषित करू लागल्या.

## ब्रिटिश अमदानीत स्त्रीजीवनाचे पुनरुत्थान

ब्रिटिश अमदानीत शिक्षणाचा प्रसार मुख्यतः खाजगी प्रयत्नामुळे झाला. या क्षेत्रातही स्त्रियांच्या शिक्षणासाठी स्वतंत्र संस्था स्थापन झाल्या. विशेष म्हणजे त्यांत एका महिला विद्यापीठाची स्थापना केली गेली. शिकलेल्या स्त्रियांचे प्रमाण जरी सुरुवातीस कमी राहिले तरी त्यांनी अनेक क्षेत्रांत व व्यवसायांत धडाडीने प्रवेश करण्यास सुरुवात केली. सुदैवाने, *यावरूनच आपल्या प्राचीन उच्च परंपरेचा स्त्रियांना* फायदा मिळाला. कर्तृत्वाचे कोणतेही दालन त्यांना निषिद्ध समजले गेले नाही. १८७८ सालाइतक्या मागच्या काळातही मुली विद्यापीठात शिक्षण घेऊ लागल्या होत्या व पुढील अभ्यासासाठी युरोपअमेरिकेसारख्या लांबच्या प्रदेशाची सफर करू लागल्या होत्या. १८९२ मध्ये पहिली स्त्री वकील झाली. १९२१ साली पहिली स्त्री बॅरिस्टर म्हणून काम करू लागली. त्यामुळे सुरुवातीपासूनच स्त्रियांनी नगरपालिका व लोकलबोर्डे या नागरी कारभार पहाणाऱ्या संस्थांत सुलभतेने प्रवेश केला.

## गांधीजींच्या नेतृत्वामुळे चैतन्य निर्माण झाले

निरनिराळ्या सामाजिक व धार्मिक सुधारणांच्या चळवळीमुळे स्त्रियांच्या वाटचालीस अधिक चालना मिळत गेली. राष्ट्रीय व प्रांतिक पातळीवर सुसंघटित व बलिष्ठ महिला संघटना स्थापन झाल्या आणि त्यातून राष्ट्रीय अन् प्रांतीय पातळीवर काम करणाऱ्या कार्यकर्त्या व स्त्रीनेत्या उदयास आल्या. परंतु गांधीजींच्या नेतृत्वामुळे या चळवळीमध्ये खरे चैतन्य निर्माण झाले. गांधीजींचे नेतृत्व स्त्रीचळवळीला प्रेरक ठरले. प्रत्येक पाऊल पुढे टाकताना त्यांनी स्त्रियांना बरोबर घेतले. गांधीजींनी स्त्रियांमध्ये जो क्रांतिकारक ध्येयवाद निर्माण केला त्यामुळे त्यांच्या जीवनात कायाकल्प घडून आला. जरी त्यावेळी बहुसंख्य स्त्रिया साक्षर नव्हत्या तरी प्राचीन कला, हस्तव्यवसाय, पुराणातील ज्ञान व धर्मग्रंथातील तत्त्वज्ञान त्यांना अवगत होते. देशभक्तीच्या उर्मीच्या जोडीला मूलभूत स्वातंत्र्याची आवश्यकता त्यांना अनेक परीने जाणवत होती. शैक्षणिक सोयींची दुर्मिळता, सामाजिक सुधारणांना होत असलेला विरोध व आर्थिक हलाखीची परिस्थिती या समस्यांची दाहकता जाणवू लागल्याने भारतीय स्त्रीचे लक्ष राजकारणाकडे वळू लागले होते. त्यामुळे गांधीजींनी जेव्हा स्त्रियांना ती ऐतिहासिक हाक दिली तेव्हा त्या एखाद्या लाटेप्रमाणे राजकीय आंदोलनात सामील होण्यासाठी पुढे सरसावल्या. हे पुष्कळसे अनपेक्षितच घडले. कारण स्त्रियांनी काही विशिष्ट कार्यक्रमातून भाग घ्यावा अशी त्यांची सुरुवातीची अपेक्षा होती. परंतु अनेक शतकांचा मागासलेपणा त्यांनी क्षणार्धात झुगारून दिला व भारतीय स्वातंत्र्याच्या उग्र आंदोलनाशी त्या उत्साहाने एकरूप झाल्या. कळकळ व निश्चय ही त्यांची आयुधे होती. साध्या सुती साड्या हा त्यांचा गणवेष होता. जरी त्या अशिक्षित व अननुभवी असल्या तरी त्यांनी धडाडीने नव्या जबाबदाऱ्यांचा स्वीकार केला. त्यांच्यापैकी बऱ्याच जणी दूरदूरच्या खेड्यांतून आल्या होत्या; तरी इतर काही जणी अशा होत्या की ज्यांनी सुखवस्तु व ऐश्वर्यशाली जीवनावर तुळशीपत्र ठेवले होते. जणू एका नवीन संजीवनी मंत्राने त्या सर्वांनाच भारावून टाकले होते. लाठीमार-गोळीबाराला तोंड देत त्या धैर्याने आगेकूच करीत होत्या. गांधीजींना अटक झाली तेव्हा त्यांच्या पाठोपाठ चळवळीचे नेतृत्व करण्यास एक स्त्रीच पुढे आली होती. पुरुषांच्या बरोबरीने स्त्रियांनीही स्वतःकडे राजकीय पुढारीपण घेतले व निरनिराळ्या जबाबदाऱ्या कुशलतेने पार पाडून दाखविल्या. प्रत्येक क्षेत्रामध्ये त्या शेकडोंनी, हजारोंनी सामील झाल्या व त्यांनी आपल्या कर्तृत्वामुळे गांधीजींकडून प्रशस्ती मिळविली की, 'भारतीय स्वातंत्र्यलढ्यात स्त्रियांनी बजावलेली अमोल कामगिरी सुवर्णाक्षरात कोरून ठेवावी लागेल.'

## स्वातंत्र्यप्राप्तीनंतर स्त्रियांची कर्तबगारी वाढत्या प्रमाणात

१९४७ साली राजकीय दृष्ट्या स्वतंत्र झालेल्या भारतात एक नवा कालखंड सुरू होत असताना स्त्रियांना त्यांचे योग्य स्थान मिळावे हे क्रमप्राप्तच होते. देशाची

घटना जेव्हा तयार केली गेली तेव्हा तीन स्त्रीपुरुषसमानता, सर्व क्षेत्रांमध्ये उभयतांना समानसंधी व सारख्या कामासाठी सारखेच वेतन यांस स्पष्टपणे मान्यता दिली गेली. त्यानंतर घटनेने मान्य केलेली समानता प्रत्यक्षात आणण्याच्या दृष्टीने पूर्वीच्या अनेक कायद्यांतील विषमता दूर करणाऱ्या सुधारणा संमत झाल्या.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या काळात स्त्रियांनी वाढत्या प्रमाणात नव्या नोकऱ्या व नव्या जबाबदाऱ्या स्वीकारल्या आहेत. व्यापारधंद्यापासून ते राजकारणापर्यंत व कलाक्षेत्रापासून ते समाजकल्याणक्षेत्रापर्यंत त्या उत्साहाने आपला वाटा उचलीत आहेत. लोकसभा व राज्यांच्या विधानसभा यांच्या निवडणुकीसाठी जो स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळाला आहे त्याचा परिणाम हितकारक ठरला आहे आणि विशेष म्हणजे पुरुष मतदारांपेक्षा स्त्रीमतदारांनी आपले मत नोंदविण्याविषयी कितीतरी अधिक उत्साह दाखविला आहे. काही राजकीय पक्षांचे स्वतंत्र महिला विभाग असून त्यांनी आपले उमेदवार निवडताना स्त्रियाना योग्य प्रतिनिधित्व देण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. गेल्या सार्वत्रिक निवडणुकीत एकूण १० कोटी स्त्रीमतदार होते व त्यापैकी ४० टक्के म्हणजे ४ कोटी मतदारानी मतदान केले. निवडून आलेल्या उमेदवारांमध्ये राज्यविधानसभांमध्ये १५४ व लोकसभेमध्ये ३२ स्त्री-उमेदवार निवडून आले आहेत.

उत्तरोत्तर सर्व वयाच्या स्त्रिया व मुली विविध प्रकारच्या नोकरीधंद्यामध्ये जास्त जास्त प्रमाणात भाग घेऊ लागल्या आहेत. उच्च शिक्षणामध्ये स्त्रिया मागे राहिल्यामुळे त्यासंबंधीने चालना देण्यासाठी व सोयी उपलब्ध करून देण्यासाठी मुख्यतः स्त्रियांचीच एक खास समिती नेमण्यात आली होती व तिचे अध्यक्षपद एका स्त्रीकडे होते. विश्वविद्यालयीन शिक्षण घेऊ न इच्छिणाऱ्या स्त्रियांसाठी स्वतंत्र पॉलिटेक्निक शाळा स्थापन केल्या गेल्या आहेत. त्यामुळे त्याना जीवनोपयोगी व व्यावहारिक उद्योग-व्यवसायात पडता येऊ लागले आहे. समाजविकासाच्या व राष्ट्रीय विस्तारकार्यक्रमांच्या सर्व योजनामध्ये स्त्रिया उत्साहाने भाग घेत आहेत. देशातील कला व हस्तव्यवसाय यांचे पुनरुज्जीवन करण्यात तर त्यांनी उल्लेखनीय भाग घेतला आहे.

### मध्यवर्ती समाजकल्याण मंडळ

स्त्रियानी समाजकल्याण क्षेत्रामध्ये बजावलेली कामगिरी तर खचितच नेत्रदीपक आहे. या क्षेत्राकडे गांधीजींचे विशेष लक्ष असे व त्यांच्या मार्गदर्शनाखाली स्त्रियांनी या क्षेत्रात चांगल्या परपरा तयार केल्या आहेत. त्यांच्या पत्नी कस्तुरबा यांच्या नावे उभारण्यात आलेला निधी ग्रामीण भागातील कार्यावर लक्ष केंद्रित करीत आहे. तेथील कार्याला चेतना देत आहे. तसेच कस्तुरबा निधीतर्फे खेड्यांत काम करू इच्छिणाऱ्या स्त्रियाना ग्रामसेविकेचे प्रशिक्षण दिले जाते. स्वातंत्र्य मिळण्यापूर्वीच ग्रामीण कार्यासाठी आखलेल्या या योजनेतील कार्यक्रमांना आकार प्राप्त झाला होता. ग्रामीण स्त्रियांना स्वतःचा विकास घडवून आणण्यास उद्युक्त करण्यासाठी गेल्या दशकामध्ये 'ग्रामीण

महिला संघ' स्थापन केला गेला आहे. तथापि या संघटनांपेक्षाही सर्वांत अधिक प्रभाव पाडणारी संस्था म्हणजे केंद्रीय शिक्षण मंत्रालयाच्या कक्षेतील 'मध्यवर्ती समाज कल्याण मंडळ' ही स्वयंशासित संघटना होय. एका ख्यातनाम स्त्रीच्या उत्साही मार्गदर्शनाखाली या मंडळाने केलेले कार्य अत्यंत स्पृहणीय आहे. मंडळाच्या कार्यात मदत करण्यासाठी स्वयंस्फूर्तीने काम करणाऱ्या कार्यकर्त्यांना मंडळाने यशस्वीपणे खेचून घेतले आहे. त्याचप्रमाणे, मंडळाच्या कामात अनेक हितकारी संघटना सामील झाल्या आहेत. उण्यापुऱ्या दहा वर्षांच्या अवधीत मंडळाने अनेक कार्यकर्त्यांमध्ये असलेली सुप्त शक्ती कार्यान्वित केली असून तिची संगम नदीच्या पात्राप्रमाणे विशाल होत जाणाऱ्या कार्याशी घातली आहे. मंडळाच्या विस्तारकार्यक्रमाच्या द्वारा चाळीस हजारांहून अधिक खेड्यांमध्ये प्रशिक्षित स्त्रीकार्यकर्त्यांचा प्रवेश झाला असून त्यांनी त्या खेड्यांतील जीवनामध्ये नवसंजीवन ओतले आहे. या अशिक्षित किंवा अर्धशिक्षित स्त्रियांसाठी अल्पमुदतीचे अभ्यासक्रम आखून त्यांना समाजकार्यकर्ती, नर्स, दाई, शिक्षिका, चिटणीस, मेट्रन, सुपरिंटेंडंट वगैरेंचे प्रशिक्षण दिले गेले आहे. केवळ या योजनेमुळे पाच हजार निराधार स्त्रिया, साठ हजार मुले व एक लक्ष अपंगांना आधार मिळाला असून त्यांची व्यवस्था आधारगृहे, आफ्टरकेअर होम्स व अनाथाश्रम या समाजसेवा-केंद्रांतून झाली आहे. याखेरीज असंख्य स्त्रियांना संधी प्राप्त करून दिल्यामुळे व त्यांच्यावर जबाबदारी सोपविल्यामुळे त्यांची गुणवत्ता वाढण्यास आणि त्यांच्यामधील नेतृत्वशक्तीचा विकास होण्यास मदत झाली आहे. या सर्वांचा परिणाम समाजाच्या पुनर्रचनेला मोठ्या प्रमाणात चालना मिळण्यात होत आहे.

0

# ग्रंथसूची

[ लेखकानी कळविलेले संदर्भग्रंथ व इतर ठळक ग्रंथ सोयीकरिता तीन गटांत विभागून दिले असून इंग्रजी ग्रंथ त्याच क्रमाने आहेत. हिंदी व संस्कृत ग्रंथांची संख्या लहान असल्याने ते एकत्रच दिले आहेत.]

## स्त्री-जीवन आणि समाज


अळेकर, गो. र.—साध्वी स्त्रिया

आचार्य, हरि महादेव—मुलींच्या वारसा हक्काचा विचार १९४९

आंबेडकर, भीमराव—हिंदु स्त्रियांची उन्नति आणि अवनति याला जबाबदार कोण?; अनु. चांगदेव भ. खैरमोडे १९६१

ईश्वरचंद्र विद्यासागर—विधवाविवाह; अनु. वि. प. पंडित १८६५

ओक, विनायक कोंडदेव—मोठे कोण? नवरा का बायको! म्हणजे स्त्रियांची परवशता १९०६

कंटक, प्रेमा—हिंदी स्त्रियांचे जीवन १९४५

करी, व्यंकट रंगो—विधवावपन अनाचार १८८९

कानिटकर, गोविंद वासुदेव—स्त्रियांची परवशता (जॉन स्टुअर्ट मिलकृत 'सबजेक्शन् ऑफ विमेन' नांवाच्या मूळ इंग्रजी निबंधावरून)

काळे चांदेकर, केशव नारायण—अबला प्रेमसुधा १८९६

केळकर, का. न. व टारे बाकूताई—स्त्रियांच्या हक्कांची सुधारणा

किर्लोस्कर, रा. पा.—विवाहसंस्थेचा इतिहास

केळकर, माधव सदाशिव—स्त्रियांची गुलामगिरीपासून सुटका (इंदुप्रकाशपत्रांत प्रसिद्ध झालेला निबंध) १९१०

खरे, दाजी आबाजी—पुनर्विवाह १८९२

खांडेकर, दत्तात्रय गणेश—संपा. हिंदु विवाहाबाबत अधिनियम; सन १९५५ चा भारताचा अधिनियम १५ वा १९५८

गजेंद्रगडकर, के. वा.—हिंदु कायद्यात स्त्रियांचे स्थान १९४४

गांगनाईक, भानु केशव—स्त्रीधर्म (मूळ बंगाली ग्रंथाच्या आधारे)

गांधी, मोहनदास करमचंद—गांधीजींचे स्त्रियांशी हितगुज; संग्रा. व अनु. मु. गो. देशपांडे व भाऊ धर्माधिकारी १९४६

गांधी, मोहनदास करमचंद—तेजस्वी तरुणी; अनु. वेल्हे १९४७

गांधी, मोहनदास करमचंद – स्त्रिया व सामाजिक अन्याय; अनु. प्र. ह. खाडिलकर १९४९
गांधी, मोहनदास करमचंद – स्त्रीजीवन १९६०
गुंर्जीकर, रामचंद्र भिकाजी – सौभाग्यरत्नमाला : भाग १, २ (विविधज्ञानविस्तार मासिक पुस्तकामध्ये निरनिराळ्या वेळी लिहिलेले स्त्रीशिक्षणसंबंधी लेख १८८६
गोखले, कृ. के. – हिंदु स्त्रियांची कायदेशीर दुर्दशा १९३२
चोळ, अनंत महादेव – पुनर्विवाह शास्त्रार्थविचार १९११
जोशी, मोरेश्वर हरिश्चंद्र – धर्मसद्बोधमाला १८८५
जोशी, रामचंद्र भिकाजी व दत्तात्रय ज. सहस्रबुद्धे – स्त्रीपुनर्विवाह चालू करण्याची कारणें १९११
जोशी, लक्ष्मण नारायण – महिला जीवन म्हणजेच गृहिणीकर्तव्य १९२१
जोशी, वामन विश्वनाथ – पुनर्विवाह शास्त्रसंग्रह १९१०
जोशी, वासुदेव विनायक – स्त्रियांचे हक्क व सुधारणा १९२८
टिळक, कमलाबाई – स्त्रीजीवनविषयक कांही प्रश्न १९४०
टिळक कमलाबाई – स्त्रीजीवनाचीं नवीं क्षितिजें १९६५
ठाकरे, ज. ना. – स्त्रियांचा प्रश्न
धर्ते, नारायण परशुराम – आदर्श-स्त्रीजीवन (केसरींतून 'स्त्रियांचे समाजातील स्थान आणि आर्यसंस्कृति' या नावांखालीं प्रसिद्ध झालेली लेखमाला) १९४०
दप्तरदार, रघुवीर विठ्ठल आणि अंताजी दि. घेडेकर – विधवाविवाह खंडनाचा साधन इतिहास १८७०
दांडेकर, मालती – तरुणींचे प्रश्न १९४९
दांडेकर, दां. वा. संपा. भारतातील थोर स्त्रिया अनु. वासु बाळ १९६३
देशपांडे, कमलाबाई – अपौरुषेय वाङ्मय अर्थात स्त्रीगीतें १९४८
देशपांडे, कमलाबाई – स्त्रियांच्या कायद्याची वाटचाल (१८२९ ते १९२९) १९६०
देशपांडे, विमलाबाई – घर आणि अंगण १९५८
दोशी, हिराचंद – बालविवाह
निमकर, दत्तात्रय वासुदेव – हिन्दुलग्नसंस्था ; इतिहास आणि विवाहशास्त्र १९२८
पटवर्धन, रमाबाई – स्त्रियांचे कल्याण १९४७
पटवर्धन, वसुंधरा – आमचे स्त्रीजीवन १९४९
पंडित, विष्णु परशुरामशास्त्री – स्त्रीपुनर्विवाहाच्या सशास्त्रतेचा विचार (पुणें व नाशिक येथील व्याख्यानें) १८७०
पंडिता रमाबाई – स्त्रीधर्मनीति १९६७
पदमनजी, बाबा – स्त्रीकंठभूषण १८६८
पुनर्विवाह प्रतिबंध निवारणार्थ आजपर्यंत झालेला यत्न व त्याचें फळ.
(ज्ञानदीप मासिकांत प्रसिद्ध झालेला निबंध) १८९६

पेची, किसन – बालविवाह १८९१
बावर, सरोजिनी – मराठीतील स्त्रीधन १९६४
बालविवाह व असंमत वैधव्य (निबंधचंद्रिकेत प्रसिद्ध झालेला निबंध) १८८५
बेडेकर, मालती – घराला मुकलेल्या स्त्रिया व बाळाची चाहूल १९६२
बेडेकर, मालती – संकटमुक्त स्त्रियांचे पुनर्वसन १९६४
बेंडे, विनायक यशवंत – विधवादुःखवर्णन आणि विधवाविवाहसंबंधी मुंबई व पुणे येथील खरा इतिहास (काव्य) १८७०
भागवत, राजाराम रामकृष्ण – विधवाविवाह सशास्त्र की अशास्त्र ? १८८५
मोडक, विश्वनाथ आबाजी – हिंगणे स्त्रीशिक्षण संस्थेची साठ वर्षे १९५६
मोडक, वामन आबाजी – बालविवाहाच्या संबंधाने हिताहित विचार १८८७
यति, परमहंस प्रज्ञानेश्वर – विधवावपनशास्त्रार्थासंबंधी अखेर निर्णय १९२९
यथार्थवर्णनसूचक – विरक्तोद्वाहकलिका १८७०
रानडे, राम केशव – स्त्रियांचा कायदा १९४९
रानडे, राम केशव – हिन्दु स्त्रियांच्या मिळकतीबाबत देशमुख कायदा १९४३
रोकडे, जनाबाई – स्त्रियांची सामाजिक कर्तव्ये (फ्लॉरेन्स नाइटिंगेल हिच्या चरित्रास अनुसरून दिलेले व्याख्यान) १९१४
लिमये नरगुंदकर, विनायक गो. – स्त्रीशिक्षणज्ञानमाला १८८५
विधवाविवाहाच्या सशास्त्रतेविषयी वाद (हा वाद पुणे मुक्कामी रविवार दि. २७ मार्च १८७०या दिवशी श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य यांच्या संनिध दीक्षित यांच्या वाड्यात सुरू झाला त्याचा वृत्तान्त) १८७०
विधवादुःखनिवेदन आणि पुनर्विवाहाच्या सशास्त्रतेविषयी विचार १८८०
विनोबा – स्त्री शक्ति १९६४
विवेकानंद – भारतीय नारी १९६०
विवेकानंद – भारतीय स्त्रिया, अनु. सरोजिनी वमतनूरकर
विश्वेश्वर – हिंदुसमाज आणि पतित स्त्रियांची सुधारणा १९२९
वैद्य, चिंतामण विनायक – अबलोन्नति लेखमाला १९२९
शंकराचार्यस्वामी (मठ करवीर व संकेश्वर) – विधवाविवाहाच्या अशास्त्रतेविषयी निर्णयपत्र १८७०
शिंदे, ताराबाई – स्त्री-पुरुष तुलना १८८२
श्रीसरस्वतीमंदिर, सोलापूर – उपदेशमाला (लेखसंग्रह)
संत, दु० का० – मराठी स्त्री १९५७
साठे, कृष्ण प्रभाकर – पुनर्विवाह निषेध १८६७
साने, पांडुरंग सदाशिव – भारतीय नारी १९५६

## संकीर्ण

अळतेकर, अ० स० – प्राचीन भारतीय शिक्षणपद्धति १९३५.
आगरकर, गोपाळ गणेश – संपूर्ण आगरकर संपा. अळतेकर १९३७
कर्वे, इरावती – परिपूर्ती, १९४९
कर्वे, इरावती – मराठी लोकांची संस्कृति
कर्वे, इरावती – युगान्त १९६७
काणेकर, अनंत – रसेलनीति १९४१
केळकर, गिरिजाबाई – गृहिणी-भूषण अथवा स्त्रीशिक्षणविषयक स्फुट विचारमाला १९११
केळकर, गिरिजाबाई – स्त्रियांचा स्वर्ग १९२१
केळकर, द० के० – मराठी साहित्याचे सिंहावलोकन १९६३
केतकर, श्रीधर व्यंकटेश – ब्राह्मणकन्या व भारतीय समाजशास्त्र १९३६
कोलते, वि० भि० – साहित्यसंचार १९६५
खाफेकर, नारायण गोविंद – पेशवाईच्या सावलीत १९३७
जावडेकर, शंकर दत्तात्रय – आधुनिक भारत १९५३
जेरेट – ऐने अकबरी : खंड ३ रा
जोग, रा. श्री., संपा. – मराठी वाङ्मयाचा इतिहास (१८००–१८७४). १९६५
जोशी, रा. भि. – मराठी भाषेची घटना १९२३
दाडेकर, वि. पां – मराठी साहित्याची रूपरेषा : पूर्वार्ध – प्राचीन मराठी साहित्य, उत्तरार्ध – अर्वाचीन मराठी साहित्य १९५२
देशपांडे, अ. ना. – आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास भाग १, २. १९६७
देशपांडे, हरिहर वामन – १८५७ च्या वीर महिला १९५९
नेने, वि. पां. – अर्वाचीन मराठी साहित्य (१८५५–१९३५). १९३५
पट्टाभिसितारामय्या – कॉंग्रेसचा इतिहास १९३६
पुरंदरे, सरस्वती – मराठी सामाजिक कादंबरी वाङ्मयातील स्त्रीजीवन १९५४
प्रदक्षिणा – (१८४० ते १९५५ या कालातील मराठी वाङ्मयाचे समीक्षण) १९६०
भारत इतिहास संशोधक मंडळ – पेशवेकालीन सामाजिक व आर्थिक पत्रव्यवहार
भारतीय विद्याभवन – भारताचा इतिहास, खंड ६ वा
भावे, वा. कृ. – पेशवेकालीन महाराष्ट्र १९३५
भावे, वि. ल. – *महाराष्ट्र सारस्वत १९५१*
मगदूम, अप्पाभाऊ – जैन वीर स्त्रिया १९३६
माचवे – शालिनीची निवडक पत्रे
मारे, श्रीपाद महादेव – कर्तबगार स्त्रिया १९५७
लोकहितवादी – लोकहितवादींची शतपत्रे १९४०

## हिंदी

टंडन, यशपाल – पुराण-विषय समनुक्रमणिका १९५२
नागर, अमृतलाल – ये कोठेवालियां १९६१
प्रशान्तकुमार – वैदिक साहित्य में नारी
वेणीपुरी रामवृक्ष – नई नारी : भारतीय नारी की नई पिढ़ी की समस्याओं पर एक रोशनी १९६४
भंडारकर, वनमाला – महाभारत में नारी
सांकृत्यायन, राहुल – व्होल्गा से गंगा

## संस्कृत

अग्निपुराण – आनंदाश्रम प्रत
नारदपुराण – वेंकटेश्वर प्रत
पद्मपुराण – ,, ,,
ब्रह्मपुराण – ,, ,,
भविष्यपुराण – ,, ,,
मत्स्यपुराण – ,, ,,
मदन पारिजात – (१४ व्या शतकातील स्मृतिग्रंथ)
पाराशर माधव स्मृतिग्रंथ

## Woman and Society Individual

Aiyangar, Bhashyam, K. T.—"Women in Hindu Law"
Altekar, A. S.—"The Position of Women in Hindu Civilization", 1956
Appadorai, A., Ed.—"Status of Women in South Asia," 1954
Baig, Tara Ali—"Women of India", 1958.
Bachmann, Hedwig, Tr. by Sheelavati Ketkar—"On Soul of Indian Woman", 1942.
Bader Clarisse—"Women in Ancient India: Moral and Literary Studies", tr. by M. E. R. Martin, 1964.
Baroda Committee—Report: "Hindu Women's Property Rights."
Baroda, Maharani of, and Mitra, S. M.—"The Position of Women In Indian Life", 1911.
Barve—"Present Position of Hindu Women and Means of Ameliorating Their Lot".
Bavreja Malik Ram—"Woman in Islam" tr. by M. Abdul Ali

Caton, A. R., Ed.—"Key of Progress: A Survey of the Status and Conditions of Women in India", 1930.

Chattopadhyaya, Kamaladevi and Others—"The Awakening of Indian Women", 1939.

Chaudhari, Jatindra Vimal—"Sanskrit Poetesses".

Chaudhary, Rooplal—"Hindu Woman's Right to Property (Past and Present)", 1961.

Chiplunkar, G. M.—"The Scientific Basis of Women's Education", 1930.

Choksi, Mithan and Gedge, Evelyn C., Eds.—"Women in Modern India" (15 papers by Indian women writers), 1929

Christian Literature Society—"Women of India and What Can Be Done for them", 1895.

Cormack, Margaret—"The Hindu Woman", 1961.

Cousins, Margaret—"Awakening of Asian Womanhood".

Cousins, Margaret—"Indian Womanhood Today", 1947.

Curle, R.—"Women—An Analytical Study".

Das, Freida M. (Mrs)—"Purdah, the Status of Indian Women", 1932.

Das, R. M—"Woman in Manu and His Seven Commentators", 1962

Desai, Neera—"Woman in Modern India", 1957.

Gajendragadkar, K. B.—"Legal Rights of Hindu Women".

Gandhi, M. K—"Women and Social Injustice", 1954

Gedge, Evelyn C. and Choksi, Mithan, Eds—"Women in Modern India", 1929.

Gharpure, J. R.—"Rights of Women Under the Hindu Law", 1943

Gujarati, B. S.—"Woman of East and West", 1944

Handigiri—"The Women Poets of the Rgveda".

Hardinge, M. E—"The Way of All Women".

Haridas Nanabhai and Shantaram Narayan—"Legal Opinions on Caste-meetings and ex-Communications with reference to the late Marriage of a Brahman Widow".

Hate, Chandrakala—"Hindu Woman and Her Future", 1948

Holtby—"Women and Changing Civilization".

India Information Service—"Women in India".

Indra—"The Status of Women in Ancient India", 1955.

Joyce, T. A., Ed.—"Women of All Nations", 1910.

Kacker, Muralidhar—"Hindu Shastras on Marriage of Widows".

Klein, Viola—"Feminine Character".

Durant, Will—"Story of Civilization".
Elliot and Dowson—"History of India", 1867.
Engels, F.—"Origin of Family".
Hartog Committee Report—"India Government—Age of Consent Committee Report", 1928.
India Government: Labour and Employment Ministry, Labour Bureau—"Women in Employment", 1964.
Karve, D. K.—"My Twenty Years in the Cause of Indian Women", 1915.
Law, Bimal Churan—"Women in Buddhist Literature", 1927
Megasthenes—"Ancient India", tr. McCrindle, 1877.
Mukerjee—"History of Education in India".
National Committee on Women's Education, India—Reports 1958-59, 1964-65.
Nehru, Jawaharlal—"Glimpses of World History"
Nilkantha (Shastri)—"History of South India".
"Progress of Women's Education in British Empire"
Randell—"Creative Centuries".
"Review of Education in Bombay State, 1855 to 1955"
Radhakrishnan, S.—"Report on Education".
Ramakrishna Mission Pub.—"Cultural Heritage of India"
Rege, Y. M.—"Whither Women?"
Roy, M. N.—"Ideal of Indian Womanhood", 1941
Sacchau—"Alberuni's India", 1914
Saiyadine, K. G.—"Education in India"
Smith, V. A.—"History of Fine Arts", 1910
Sternbach, Ludwik—"Ganika-Vritta-Sangraha" or "Text on Courtezans in Classical Sanskrit", 1953
Syed Nurullah and J. P. Naik—"History of Education in India".
Unesco—"Women and Education".

**INDIVIDUAL**

Besant, A.—"An Autobiography".
Dutt, G. S.—"Woman of India. Being the Life of Saroj Nalini", 1929.
Karve, D. K.—"Looking Back" (autobiography), 1936